"चिंतने, चिंतने, तद्रूपता"।

३+१००।
२१५।२०१२



प. पू. अण्णा घाणेकर कृत

# आत्मचिंतन

## (भाग - २)

- संकलन -

सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी




## ।।राजस सुकुमार।।

मूर्तीची घडण : वालूकाश्म. (खडबडीत दगडाची)
वर्ण : संपूर्ण काळा नव्हे. अल्पसा करडा, संपूर्ण मूर्तीची उंची ३ फूट ९ इंच

# ।। श्री पांडुरंगाष्टकम् ।।

महायोगपीठे तटे भीमरथ्या । वरं पुण्डरीकाय दातुं मुनीन्द्रैः ।
समागत्य तिष्ठन्तमानन्दकन्दं । परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम ।।१।।
तडिद्वाससं नीलमेघावभासं रमामंदिरं सुंदरं चितत्प्रकाशम्।
वरं त्विष्टिकायां समन्यस्तपादं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम्।।२।।
प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां नितंबः कराभ्यां धृतो येन तस्मात्।
विधातुर्वसत्यैः धृतो नाभिकोशः परब्रह्मलिगं भजे पांडुरंगम्।।३।।
स्फुरत्कौस्तुभालंकृतं कंठदेशे श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासम्।
शिवं शान्तमीड्यं वरं लोकपालं परब्रह्मलिगं भजे पांडुरंगम्।।४।।
शरच्चंद्रबिंबाधरं चारूहासं लसत्कुंडलाक्रान्तगंडस्थलांगम्।
जपारागबिंबाधरं कंजनेचंत्रं परब्रह्मलिंग भजे पांडुरंगम्।।५।।
किरीटोज्ज्वलत्सर्वदिक् प्रान्तभागं सुरैरर्चितं दिव्यरत्नैरनर्घ्यैः।
त्रिभंगाकृति बर्हमाल्यावतंसम् परब्रह्मलिगं भजे पांडुरंगम्।।६।।
विभुं वेणुनादं चरन्तं दुरन्तं स्वयं लीलया गोपवेषं दधानम्।
गवां वृंदकानन्दं चारूहासं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम्।।७।।
अजं रूक्मिणी प्राणसंजीवनं तं परंधाम कैवल्यमेकं तुरीयम्।
प्रसन्नं प्रपन्नार्तिहं देवदेवं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम्।।८।।
स्तवं पांडुरंगस्य वै पुण्यदं ये पठन्त्येकचित्तेन भक्त्या च नित्यम्।
भवांभोनिधींतेऽपितीर्त्वाऽन्तकालेहरेरालयंशाश्वतंप्राप्तुवन्ति।।९।।
इति श्रीमद् शंकराचार्यविरचितं श्री पांडुरंगाष्टकम् संपूर्णम्।।

- आत्मचिंतन (भाग-२) -

**अक्षर जुळवणी -**

श्री. समीर सदानंद गद्रे / श्री. सागर सदानंद गद्रे.
श्री महालक्ष्मी एंटरप्रायझेस
प्लॉट नं. ३४८, सोसा. नं. २, आर. के. नगर, कंदलगाव रोड,
कोल्हापूर - ४१६०१३. ९४२२०४८९१८.

---

**मुद्रक/फोटो टाईप सेटींग -**

श्री. अशोक डी. चव्हाण.
प्रिंट डेस्क, ६५, प्रभानंद कॉम्प्लेक्स,
टेंभे रोड, सावित्रीबाई फुले दवाखान्याजवळ, कोल्हापूर - ४१६१०२.
०२३१-२६४२६४० ९८२२०८७६९६

---



---

**आवृत्ती** - पहिली
चैत्र शु. प्रतिपदा 'गुढीपाडवा', शके १९३५ दि. ११ एप्रिल, २०१३

---

**स्वागत मूल्य** (खाजगी वितरण) - रू. १००/-

---

**मुखपृष्ठ** - श्री. अशोक चव्हाण.

---

**ग्रंथ प्राप्तीचे ठिकाण** - १) मे. भारत होजिअरी, दत्त-मारूती रोड, सांगली - ४१६४१६ (०२३३) २३७२६७२

# अर्पण पत्रिका

''भरोनि सद्भावाची अंजुळी।
मियां वोंवियाफुलें मोकळीं।
अर्पिलीं अंध्रियुगुलीं। विश्वरूपाच्या।।''

ज्ञा. अ. ११-७०८

ज्यांच्या सहवासाने व पूर्ण कृपाशीर्वादाने,
परब्रह्मस्वरूप श्री पांडुरंगाची असीम
प्रेमभक्ती निर्माण झाली, ज्यांनी
कटाक्षाने आत्मचिंतनास प्रवृत्त केले
त्या वैकुंठवासी
गुरुवर्य
**प्राचार्य, शं. वा. तथा सोनूमामा दांडेकर**
यांना ही विचार सुमनें
कृतज्ञतापूर्वक समर्पित

– संतचरणरज
अण्णा



श्री ज्ञानेश्वर माऊली संजीवन समाधी क्षेत्र आळंदी

॥ ॐ ॥

## ज्यांच्या आत्मचिंतनावर हा पूर्ण ग्रंथ आधारित आहे त्या प. पू. आनंद रामचंद्र तथा आण्णा घाणेकर यांचा

# – अल्प परिचय –

'शुद्ध बीजापोटी । फळे रसाळ गोमटी ।।' या जगद्गुरू तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे प. पू. आण्णांचा जन्म जमखंडी (कर्नाटक) येथे श्रावण व!!८ गोकुळअष्टमी शके १८५३ (दि. ४ सप्टें. १९३१) रोजी कुलवान, शीलसंपन्न, शिक्षकी पेशाद्वारे ज्ञानदानात तत्पर अशा सत्पुरूषाच्या पोटी झाला. प्राथमिक शिक्षण जमखंडी येथे व नंतरचे तत्वज्ञानातील उच्चतम (एम. ए.) पदवीपर्यंतचे शिक्षण पुणे येथे झाले.

वैदिक धर्माच्या व्याख्येनुसार; व्रतबंध होताच 'द्विजत्व' प्राप्त झाले. त्याचवेळी वारकरी पंथाचे अध्वर्यु, ज्ञानीभक्त वै. शं. वा. दांडेकर यांचा अनुग्रह व पुढे सलग तीस वर्षे त्यांचा निकटचा सहवास लाभला. त्या उपदेशाने व वातावरणाने प्रभावीत होऊन आजन्म ब्रह्मचर्यव्रत स्विकारले व निभावले.

"स्वाध्याय" ही एक परमार्थातील दैवी संपत्ती व अध्यात्ममार्गातील महत्वाची पायरी लगेच चढावयास सुरूवात केली. प्रदीर्घ कालपर्यंत उपनिषदें, षड्दर्शने, ब्रह्मसूत्रे, शांकरभाष्य, गीता, भागवत्, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, नाथ भागवत्, स्वामी रामदासांचे ग्रंथ इ. अनेकानेक ग्रंथांचे सखोल अध्ययन, चिंतन केले. याला सत्संग व सत्श्रवणाची अभूतपूर्व अशी जोड दिली. सुजलाम्, सुफलाम् होण्यासाठी भूमी तत्पर झाली.

"अंतरीचे धावे स्वभावें बाहेरी" या उक्तीनुसार कीर्तने, प्रवचने, भागवतकथा, ग्रंथांची पारायणे, पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी या माध्यमातून "लोकसंग्रह" सुरू झाला (आषाढी-कार्तिकी वारी सलग ५८ वर्षे हा एक विक्रमच! हा "विक्रम" अजूनही चालू आहेच.)

मध्यंतरीच्या काळात "वृत्ती" सांभाळण्यासाठी सुमारे १६ वर्षे नोकरी केली. पण तिचा "प्रवृत्ती"च्या वाटचालीत अडथळा येऊ लागल्याने नोकरीला कायमचा रामराम ठोकला.

भगवान श्रीकृष्ण श्रीमद्भागवत ग्रंथाद्वारे उद्धवाला उपदेश करतात की, नामस्मरण व सत्संग याद्वारे माझी जशी लवकर प्राप्ती होते तशी अन्य कोणत्याही साधनानीं होत नाही. (स्कं. ११-अ, ११ व १२) हाच धागा पकडून प. पू. आण्णांनी तरूणपणीच ध्यास घेतला. त्याचे फलित म्हणून गुरूदेव रानडे, वै. ह.भ.प. सोनोपंत दांडेकर, वै. ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर, योगीराज वामराव गुळवणी, स्वामी स्वरूपानंद, नानामहाराज तराणेकर, काकासाहेब तुळपुळे, दादा महाराज देशपांडे, म्हादबा पाटील, अण्णासाहेब कुलकर्णी,

काकासाहेब कारखानीस, प्रा. न. ग. दामले इ. अनेकानेक सत्पुरूषांचा सहवास, मार्गदर्शन त्यांना लाभले. आध्यात्मिक उन्नती हे गोड फळ त्यांना मिळालेच!

१९७० साली त्यांना परदेश-वारीचा योग आला. लंडन व केंब्रीज येथे ३/३ महिने भारतीय तत्वज्ञानावर अभ्यासपूर्ण प्रवचने केली.

व्यासपीठावर मिळालेल्या ऐच्छिक दक्षिणेतून वेद पाठशाळा, वारकरी शिक्षण संस्था आळंदी, देवस्थाने, तीर्थस्थळे, हुषार परंतु गरीब शिक्षणार्थी विद्यार्थी यांना सढळ हाताने मदत करीत आहेत.

एवढे मोठे व्यक्तिमत्व असल्यावर पुरस्कार, सत्कार यांनी पाठ सोडली असती तरच नवल! शंकराचार्यांचे करवीर पीठ, कांची पीठ, सुर्णवल्ली पीठ अशा अनेक नामवंत धार्मिक संस्थांनी त्यांना गौरविले. पण प. पू. आण्णांचा स्थायीभावच असा आहे की, प्रसिद्धी माध्यमांपासून (विशेषत: टी. व्ही.) ते दूर राहणेच पसंत करतात. माऊलीची शिकवणच पहा ना -

**पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानी नायकावी ।**
**हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ।।**

ज्ञाने. अ. १३-१८८

**जीवन हेतू -** शेवटच्या श्वासापर्यंत बिदागी न ठरवता प्रवचन, किर्तन, भजन या माध्यमातून आत्मविद्येचे प्रबोधन करण्याचा निश्चय आहे. उरलेला सर्व वेळ जास्तीत जास्त नामस्मरणात.

* * *

# प्रस्थानपूर्व पाऊल

सर्वात अधिक प्रिय असलेला आत्मारामच दर्शनास, श्रवण करण्यास, मनन करण्यास आणि निश्चयाने ध्यान करण्यास योग्य आहे. खरोखर आत्मारामाला पाहिले असता, ऐकले असता, त्याचे मनन केले असता व त्यालाच विशेषत: जाणले असताच, ते एक आत्मस्वरूप, अत्मस्वरूपाला, "स्व" ला प्रिय असते हे सर्व कळते.

आत्मस्वरूपाच्या अंत:करणाच्या सात्विक, शुद्धसात्विक, आत्यंतिक समाधानाकरीता अथवा आत्मसाक्षात्काराकरीता म्हणजेच ब्रह्मात्म्यैक्य साक्षात्काराकरीता ज्या साधनाचा, मार्गाचा उपयोग केला जातो त्या मार्गाला, साधनाला "प्रस्थान" असे म्हणतात.

याशिवाय प्रस्थान शब्दाचा व्युत्पत्तिदृष्ट्या जर विचार केला तर **"प्रकृष्ट स्थिती साधनम् प्रस्थानम्"** अर्थातच प्रकृष्टस्थितीचे निश्चित फळात पर्यवसन होणारे अंगदृढ साधन म्हणजे प्रस्थान. आता प्रकृष्ट म्हणजे सर्वोत्तम, सर्वोच्चम, उच्च हा शब्दच मुळात सापेक्ष आहे. उच्च स्थिती कोणती ? हे ठरविणे सुद्धा फार कठीणच आहे. याचा विचार करताना ओघातच अधिकाराचा विचार येतोच.

महिना १००० रुपये मिळवणारा २००० रुपयास उच्च समजतो, अनवाणी चालणारा गाडीत बसलेल्याला उच्च समजतो. अशी शेकडो उदाहरणे सांगता येतील, **पण याने उच्च/भाग्य म्हणजे काय** याचा निर्णय होत नाहीच. कोणी ही एकजण प्राप्त असलेल्या स्थितीत मी कृतार्थ आहे असे म्हणत नाही.

अप्राप्य वस्तूची प्राप्ती केवळ क्षणभरच "कृतार्थता" वाटते, पण ती क्षणमात्रच असते. जिच्या प्राप्तीनंतर प्राप्तव्यच रहात नाही तीच खरी-खुरी कृतार्थता, खरी प्राप्ती म्हणजेच उच्च स्थिती. याच स्थितीस अध्यात्मशास्त्रकार मोक्ष, ब्रह्म असे म्हणतात. संत यालाच सगुणाच्या भाषेत देव म्हणतात. देव म्हणजेच दु:ख संबंधरहित परमानंदस्वरूपता.

सर्व सुखाचे आगर असे श्रीज्ञानराज, नरहरी सोनार, जनाबाई, तुकाराम इत्यादी सर्व संत म्हणतात, हे सुख नित्य प्रकाशरुप, नामरुपास आधार, स्वयंप्रकाश, शुद्ध आणि अपार, व्यापक आहे, सुखरूप आहे.

सुख कोणाला नको ? दु:ख कोणाला हवे ? तर सर्व प्राणीमात्रांस सुखच हवे ना !!! श्री तुकोबाराय म्हणतात, या सुख-दु:खाचे प्रमाण काय ? एकमेकांशी !! तर **सुख पाहतां जवापाडे। दु:ख पर्वता एवढे।।** केवळ मोक्ष, ब्रह्मसुखच दु:खसंबंधरहित शाश्वत सुख आहे. आत्मशांती असं पण त्याला म्हणतात. म्हणून तर "शांन्ति: पुष्टिस्तुष्टिश्चास्तु" असा वैदिक आशीर्वाद आहे.

या साजूक सुखाशिवाय जीवनात बाकी सुख-दु:खाची वजाबाकी होते. १) सुखातून सुखच वजा जाते तर कधी २) दु:खातून दु:खच वजा जाते, तर केव्हा ३) सुखातून दु:ख वजा जाते तर कधी कधी ४) दु:खातून सुखच वजा जाते.

या सगळ्याचा श्री तुकाराम महाराजांनी हिशोबच मांडला. काय तर, **"सर्व सुखाचिया**

**आशा जन्म गेला। क्षण एक मुक्तियत्न नाही केला। हिंडता दिशा शीण पावला। माया वेष्टिला जीव माझा।।१।।''**

हवेत पेढे !! पण गेला मिरच्याच्या बाजारात !! मग पेढे मिळणार कसे ? केव्हा आणि कोठून ? तसेच सुखाचे देखील.

अरे बाबा !!! तुला पेढे हवेत का ? पेढेच हवे असतील तर आमक्या बाजारात जा, आमक्याच्या दुकानात तुला उत्तम पेढे निश्चितच व योग्य मापात, योग्य दरात मिळतील. इतरत्र पेढे मिळणार नाहीत, कां तर हा बाजार नुसता मिरच्यांचाच आहे. जसे एखादा दयार्द्र पुरुष पेढे हवे असणाऱ्यास सांगतो अगदी तसेच शब्द स्पर्शादी पंच विषयांच्या बाजारात सुख शोधणाऱ्या जीवांना, मानवांना संत श्री तुकाराम महाराज सुखाचा अचूक पत्ता सांगतात -

**''आपुला तो देव एक करूनि घ्यावा। तेणेंविण जीवा सुख नोहे।।१।।**
**येर तीं मायिकें दुःखाची जनिती। नाहीं आदि अंती अवसान।।२।।**
**अविनाश करीं आपुलिया ऐसें। लावी मना पिसें गोविंदाचे।।३।।**
**तुका म्हणे एका मरणेंचि सरे। उत्तमचि उरे कीर्ती मागे।।४।।''**

तू मनाला गोविंदाचे वेड लाव. भगवंताला, देवाला आपलासा करण्याचा उपाय देवावर प्रेम करा. प्रेमाने प्रेम वाढते. पिसे म्हणजे वेड, देवाचे वेड.

श्री ज्ञानेश्वरमहाराजांची ओवी आहे, **''आवडी आणि लाजवी। व्यसन आणि शिणवी। पिसें आणि न भुलवी। तरी ते काई ?।।''** आवड आणि लाज, व्यसन आणि शीण, वेड आणि असमंजसपणा यांचे कधीच साहचर्य नसते पण यांच्यात चढता वाढता क्रम आहे बरं कां !!! मनाला देवाची आवड लावावी, आवडीचे पर्यवसन व्यसनात व्हावे, पण एवढ्यानेच भागत नसून शेवटी व्यसनाची परिणती देवाचे पिसे, वेड लागण्यात व्हावी.

वै. गुरुवर्य प.पू. सोनूमामा दांडेकरांच्या उपदेशांच्या खतपाण्याने, चिंतनाच्या मशागतीने या परमप्रेमास्पद श्री पांडूरंगाच्या कृपास्वरूप बीजाचा, इवलाशा रोपाचा वेल गगनावर गेला आणि आत्मसुखाचा मोगरा दरवळून उठला. ओंजळीत मावेनासा झाला. **''अंतरीचे धावें स्वभावें बाहेरि। धरितांही परी आवरेना।।''** या श्री तुकोबारायांच्या उक्तीप्रमाणे.

भारतीय संस्कृती काय ? कशी ? तर **''सेवितो हा रस, वाटितो आणिका।''** भा चा अर्थ प्रभा, आभा अर्थात ज्ञान, मात्र त्या ज्ञानामध्ये रतः - रममाण राहणे त्याला **भारत** म्हणतात. ज्ञानांत रत राहणे, ज्ञानाची उपासना करणे आणि तो ज्ञानानंद अवघ्यांना देत राहणे हेच **भारतीयत्वाचे** व्यवच्छेदक लक्षण आहे.

**''संस्कृती''** अर्थात सम्यक् सद्गुणांचा संग्रह. एका ''कृ'' धातू पासूनच प्रकृती, विकृती आणि संस्कृती हे तीन्ही शब्द तयार झालेत. कृतीला ''प्र'', ''वि'' आणि ''सं-सम्'' हे तीन उपसर्ग लावलेत. त्याचे अर्थ भिन्न-भिन्न झालेत. जसे आपल्याजवळ स्वोपार्जित-स्वयं उपार्जित जे काही आहे त्यातच संतुष्ट राहणे, ही झाली प्रकृती,

आपल्याजवळ जे स्वयं-उपार्जित आहे तेवढ्याने संतुष्ट न होता जे दुसऱ्याजवळ आहे ते ओढून, हिसकाऊन (अन्यायाने, अधर्माने, बळाने) लुबाडणे ही विकृती आणि आपल्याजवळ स्वयं उपार्जित जे आहे त्यातच संतुष्ट राहून, त्यातीलच इतर अन्यजणांसही देणे ही संस्कृती. यालाच भारतीय संस्कृती म्हणतात.

आत्मारामाची उपासना, आत्मचिंतनाच्याद्वारा करूनही परहितदक्ष वा रत राहणे ही संस्कृती. अशा भारतीय संस्कृतीच्या अनेकानेक विलक्षणता आहेत. त्या विलक्षणता व्यापक स्वरूपाच्या आणि उच्चतम, अतीव, श्रेष्ठ स्वरूपाच्या आहेत. त्यातील एक विलक्षणता ''**पुरुषार्थ**'' ही आहे.

पुरुषार्थ शब्दाची व्युत्पत्ती पुरुषैरर्थ्यते इति पुरुषार्थ: अशी आहे. म्हणजे चेतनाकडून/ चेतनाद्वारा ज्याची इच्छा केली जाते तो पुरुषार्थ.

म्हणून यावत् प्राणीमात्रांच्या इच्छेचा जो विषय आहे त्यास पुरुषार्थ म्हणतात. शास्त्रांनी १) धर्म, २) अर्थ, ३) काम आणि ४) मोक्ष असे चार पुरुषार्थ सांगितले. भक्तिप्रेमशास्त्रकारांनी प्रेलक्षणा भक्तिप्रेमसुख असा पाचवा पुरुषार्थ सांगितला. मुक्तीवरील भक्ती जाण अशी संतांची अनुभूती आहे. .......... असा परमपुरुषार्थ या आत्मचिंतनातून बहुतांसाठी प्रगट होत राहिला. धर्म-मानस कन्या चि. सौ. प्रज्ञा आणि धर्म-मानस भगिनी चि. सौ. उषाताई यांना पत्राद्वारा तो पाठवत राहिलो. त्यांनी ते कागद ??? प्राणपणाने जपून ठेवले. अमानित्व, जगण्याचा छोटासा प्रयत्न होता पण मानस कन्या चि. सौ. प्रज्ञा व मानस भगिनी चि. सौ. उषाताई या दोघीजणी व परमस्नेही बापू भिडे यांनी चंगच बांधला. अण्णांचा विचार होता प्रकट न व्हावे पण अकृत्रिम स्नेहप्रेमाने त्यांच्या म्हणण्यास होकार द्यावा लागला.

या सगळ्यांनी मोठ्या कष्टाने, चिकाटीने तन, मन, धनाने हा सगळा प्रकाशनाचा रथ यशस्वीपणे ओढला.

वारकरी संप्रदायाचा भक्तिप्रेमसुख हा श्वास आहे. तो अनादी आहे. हा वेदानुमोदित असून शास्त्रप्रणित आहे. मूळ आदिनाथापासून आल्याने याला अनादित्व आहे. ''**आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा**'' महादेवांनी त्याचा स्विकार केला आहे तो वेदबोधित आहे, ''**वेदमार्गे मुनी गेले, त्याचि मार्गे चालिलो।**'', हे उपनिषदांचे सार ''**वेदशास्त्र प्रमाण। श्रुतीचे वचन**'' यानुसार वेदबोधित आहे. ''**तेणे मुक्तीचारी साधियेल्या**'' हे ज्ञान ''**जयाचिये हाती। तोचि समर्थु इये मुक्ति**'' हे फल आहे. या संप्रदायाचे गुरु/आद्यगुरु शिव असले तरी हा वैष्णव संप्रदाय आहे. ''**हरिहराभेद नाही, नका करू वाद।**'' ब्रह्मात्म्यैक्यज्ञान हे या संप्रदायाचे तत्त्वज्ञान आहे. क्षीरसमुद्राचे तिरी भगवान शंकर उमेला तत्त्वज्ञान सांगत असता तेच तत्त्वज्ञान मच्छिंद्रानी ग्रहण केले होते.

वैष्णवांची मांदियाळी संघटित करणारे ज्ञानराज असूनही ते ''महावैष्णव''. त्यांनी पाया घातला व श्री तुकोबाराय या वैष्णव मंदिराचे कळस झाले.

ब्रह्मात्मैक्याज्ञान व भक्ती यांचा एकमेकांशी विरोध नाही. ज्ञानोत्तर भक्ती हा आत्मज्ञानाचा अलंकार. अलंकारात सोन्याचा अन्वय आहे पण सोन्यात अलंकाराचा व्यतिरेक आहे. सुवर्ण अलंकार हाच अनध्यस्त विवर्त आहे. आत्मज्ञान सामान्य आणि भक्तीप्रेमसुख विशेष. विशेषणाने सामान्य झाकले जात नाही. जसे अलंकाराने सोने झाकले जात नाही. देव आणि भक्त यांचे असेच ऐक्य आहे. **''प्रकाश तो प्रकाश की''** या ओवीतून ज्ञानराज हेच सांगतात. वेदांताच्या भाषेत याला दृष्टिसृष्टिवादच म्हणावे लागेल. **''देव आणि भक्त दुजा नाही विचार'', ''की भक्तिसुखालागी। आपणपेचि दोही भागी''** असे संत सांगतात. नुसते सांगतात असे नाही तर प्रत्यक्ष अनुभवतात. कल्पित द्वैतात म्हणजेच खरे तर अद्वैतात, भक्तीप्रेमसुख भोगता येते पण हा बोलण्याचा विषय नसून अनुभवाचा आहे.

**''नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त, तू देव ऐसे करी।।''** असं श्री तुकाराम महाराजांचे वचन आहे.

इतकेच काय पण निराकार निर्गुण परब्रह्म म्हणते नां, **''तयालागी मज रुपा येणे। तयालागी मज इथे असणे।''** तो पहावा हे डोहाळे ज्याला लागतात तो परमात्मा, नामी, नाम आणि नामधारक हे अंतत: एकच द्वितीय निरपेक्ष एकत्व. **''राम म्हणता रामचि होइजे।''** असा हा प्रेमलक्षणापूर्वक नामस्मरण – नामचिंतनाचा आनंद सोहळा. **चिंतने चिंतने तद्रूपता। ब्रह्मविद् ब्रह्मएव भवति।** याच्यापेक्षा अद्वैत सिद्धांत काय वेगळा असतो ?

आत्मचिंतनाची गोडी वै. प.पू. गुरुवर्य सोनूमामा दांडेकर यांच्या सान्निध्याने लागली, वाढतच गेली. १९७० ला निमसरकारी सेवेचा राजीनामा दिल्यावर एकच छंद राहिला ज्ञानेश्वरी, गाथा, आळंदी, पंढरीची वारी. गेल्या ४२ वर्षात जिज्ञासू ज्ञानेश्वरीप्रेमींना, अभ्यासू, चिंतनशील भगवद्भक्तास पावन ज्ञानेश्वरी सांगण्याच्या निमित्ताने अधिकाधिक चिंतन घडले. सांगली, अहमदनगर, पुणे येथील या मंडळींना थोडे चिंतन देता आले. त्यातील नाव घेण्याजोगे म्हणजे उद्योगपती चि. शहाजीराव जगदाळे, चि. विजय नावंधर, अहमदनगरचे चि. राजेश झंवर, सध्या सांगलीत अभ्यासवर्गातले श्री. जोशी, या ग्रंथाचे प्रस्तावना लेखक श्री. पं. का. थावरे आणि धर्म कन्या, भगिनी यांनाच हे चिंतन घडल्याचे श्रेय आहे. जामात चि. गुरुनाथ मोठे नेटके, भजनप्रेमी, संगीतपरायण, भजनसेवेतला आनंद घेतात व त्यांच्या सहकार्यानेच भजन, प्रवचन, कीर्तनाचा आनंद द्विगुणीत होतो. त्यांचे निरपेक्ष प्रेम, आदर, तसेच ह्याच कार्यात पण सर्वच कार्यात मोठेच सहकार्य. ह्या जगन्नाथाच्या रथाचे सारथ्य कुशल सारथी स्नेही श्री. बापू भिडे यांनी केले. प्रस्तावना लिहीण्यात हातखंडा असणारे श्री. पं. का. थावरे, मुद्रण इत्यादी केले. प्रवीण तसेच तत्पर श्री. अशोक चव्हाण व समीर, सागर गद्रे, कोल्हापूर यांनी मोठ्या प्रेमादराने व सुबकपणे हे काम पूर्ण केले, तेही अत्यंत माफक दरात, ना नफा ना तोटा या तत्त्वावर.

तसेच हा रथ ओढण्यात अनेकानेक ज्ञात-अज्ञात सुहृदांचे उत्स्फुर्त, सर्वतोतरी सहाय्य

झाले. त्यांचा नामोल्लेख व आभार प्रगटीकरण त्यांच्या संस्कृतीला न आवडणारे आहे. त्या सगळ्यांना श्री पांडुरंगाचे अनेकानेक सप्रेम शुभकृपाशिर्वाद.

करुणापारावर, परमदयाघन, परमप्रेमस्वरूप श्री पांडुरंगाचा कृपाप्रेम वर्षाव, श्री गुरु ज्ञानेश्वर महाराजांचा कृपानुग्रह, वै. प.पू. सोनूमामांचा अखंड आशिर्वाद व प्रोत्साहन, पाठिंबा आणि **''जन नोहे हा अवघा जनार्दन''** अशी अखंड जाणीव, अनेकानेक भगवद्भक्तांचा उत्कट प्रेमभक्तीभाव या सर्वांच्या सहयोगाने हे चिंतन घडत आहे. त्यातूनच आत्मरती, आत्मतृप्तता आणि आत्मक्रीडा शेवटच्या श्वासापर्यंत घडावी ही त्या विश्वात्मक, सर्वजगत्रुपाने नटलेल्या भगवत्चरणी माथा टेकवून प्रार्थना.

श्री क्षेत्र अलंकापूर
आषाढ व।। ११ शके १९३४
दि. १४/०७/२०१२
मुक्काम सांगली

संतचरणरज:कण अलंकृत,

**आनंद रामचंद्र तथा आनंदाण्णा घाणेकर**

## प्रकाशकाचे मनोगत -

||श्रीराम||

माझे धर्मपिता गुरुवर्य अण्णा घाणेकर यांच्या चिंतनांच्या संग्रहाचा हा दुसरा भाग प्रकाशित करताना माझी अवस्था अगदी **''आनंदाचे डोही आनंद तरंग''** अशी झाली आहे. ''आंधळा मागतो एक डोळा अन् देव देतो दोन'' या म्हणीनुसार हा दुसरा भाग म्हणजे गुरुवर्य अण्णांच्या चिंतनांच्या माध्यमातून माझा उघडलेला हा दुसरा ज्ञाननेत्रच आहे. गीतेत भगवंतांनी चर्मदृष्टी, दिव्यदृष्टी व ज्ञानदृष्टी अशा तीन दृष्टींचे वर्णन केले आहे. गुरुवर्य अण्णांच्या चिंतनांच्या वाचन-मननरुपी सहवासात आपणा सर्वांनाच अंधुकशी का होईना, ज्ञानदृष्टी प्राप्त होत आहे हे आपणा सर्वांचे महद्‌भाग्यच !

या चिंतनांचा पहिला भाग मागील वर्षी प्रकाशित झाला. त्यावेळी आमच्या कुटूंबाचे स्नेही आदरणीय बापू भिडे यांनी दुसरा भाग आम्ही पुढील वर्षी प्रकाशित करू असे आश्वासन दिले. सर्वांच्या सहकार्याने खरोखरच तसे घडत आहे.

आपल्यापैकी बहुतेकजणांनी पहिला भाग वाचला असेल. त्यात मी आमच्या घराण्याचा गुरुवर्य अण्णांशी असलेला स्नेहसंबंध याविषयी सविस्तर लिहिले आहे. ते जिज्ञासूंनी मुळातूनच वाचावे. त्याची पुनरावृत्ती आता करीत नाही.

या दोन्ही भागांचा प्रकाशन-संकल्प, संबंधित सर्व जुळवाजुळव, पहिल्या भागाचा झालेला अप्रतिम देखणा असा प्रकाशन सोहळा, ग्रंथविक्री अशा सर्व बाबतीत माझे प्राणनाथ, उदार हृदयाचे, सश्रद्ध, प्रेमळ पती श्री. गुरुनाथ यांचे अनमोल सहाय्य झाले. स्वत:चे लौकिकातील सर्व व्याप, व्यवसाय सांभाळून या धर्मकार्यास निरपेक्षपणे सहाय्य केले. कोणत्याही पत्नीला असा पती लाभणे हे तिचे महद्‌भाग्यच होय ! मी तर त्याबाबतीत इतरांनी हेवा करावा अशी भाग्यवान आहे. पत्नीच्या पुण्यात पतीचा व पतीच्या पुण्यात पत्नीचा वाटा असतोच अशी आपली धारणा आहे. त्यांच्या मणभर पुण्यात मला विनासायास वाटा मिळतो आहे. भाग्य भाग्य म्हणतात ते याहून वेगळे असे काय असते ?

आता थोडेसे या ग्रंथातील चिंतनांविषयी. याही भागात मागीलप्रमाणेच १५० चिंतनांचा समावेश आहे. ही चिंतने मूल्याचेबाबतीत पुढची पायरी आहेत. साखरेच्या पोत्यातून कोठूनही घेतलेली मूठभर साखर गोडच लागणार, त्याप्रमाणे यातील कोणतेही चिंतन वाचले तरी चित्ताला ते समाधान, आनंदच देणार. याविषयी प्रस्तावनेत सविस्तर ऊहापोह केलेला आहेच. म्हणून प्रस्तावना वाचावीच !

**चोखा म्हणे येथे एकचि समाधान।**

**संतांसी शरण जाई सुखे।। – चोखामेळा**

या ग्रंथाच्या प्रकाशनासाठी अनेकांचे निरपेक्ष सहाय्य लाभले. आदरणीय बापू भिडेकाकांनी प्रकाशनापूर्वीची सर्व अंगे मागील वेळेप्रमाणेच सांभाळली. प्रस्तावना आमच्या श्री. थावरेकाकांनी अगदी थोड्या वेळात लिहून दिली. ही एक विभुती म्हणजे आमचे कुटुंबास सापडलेला ज्ञानठेवाच आहे. त्यांनी 'प्रस्तावना' लेखनाचे काम आपणहून घेऊन ते उत्तमरितीने पूर्ण केले. या विषयात त्यांचा हातखंडा आहे. मुद्रण व फोटो टाइपसेटींग श्री. अशोक द. चव्हाण, कोल्हापूर यांनी मोठ्या आस्थेने व श्रद्धेने करीत असता प्रत्यक्ष खर्चाइतकेच पैसे मोठ्या संकोचाने स्विकारले त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच. भगवान दत्तात्रयाचे आशिर्वादानेच हे काम त्यांनी केले. अक्षर जुळवणीचे काम श्री. समीर/सागर गद्रे या द्वयीने श्रद्धापूर्वक व सुबकरितीने पूर्ण केले. या सर्वांचे प्रति ऋणनिर्देश. पुढील भागाच्या प्रकाशनासाठीही त्यांनी असाच सहभाग द्यावा.

जेवावयास बसल्यानंतर आपण गोड पदार्थ नंतर खातो त्याप्रमाणे आता शेवटी गुरुवर्य अण्णांविषयी ! हे त्यांचेच चिंतन-भांडार मी आपल्या हाती देत आहे.

**फोडिले भांडार धन्याचा हा माल।**

**मी तो हमाल भारवाही। – तुकाराम महाराज**

संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर माऊलींनी ज्ञानेश्वरी ग्रंथ समाप्तीनंतर विश्व कल्याणासाठी पसायदान मागीतले. त्यातील एका प्रार्थनेची पूर्तता गुरुवर्य अण्णा करीत आहेत. कोणती हो ?

**वर्षत सकळमंगळी। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी।**

**अनवरत भूमंडळी। भेटतु भूता।। ज्ञानेश्वरी अ.१८-१७९६**

गुरुवर्य अण्णा अन्य ईश्वरनिष्ठांप्रमाणे सामान्य जनांवर कृपेचा, आतमबोधाचा अखंड वर्षाव करीत भ्रमण करीत आहेत. त्यांना दीर्घायुष्य लाभो हिच माऊलीच्या चरणी प्रार्थना !

****

सांगली
आषाढी एकादशी
इ.स. २०१२

**सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी**
**''श्रीराम'' ५६१, जोशी गल्ली,**
**गांवभाग, सांगली - ४१६ ४१६**
**दूरभाष : (०२३३)२३३२५८०**

प्रस्तावना –

।।ॐ।।

## ।।अहो अळुमाळु अवधान देयावे।।

''वैष्णवतीर्थ'' या नामाभिधानानेच ज्यांचा यथोचित गौरव होऊ शकेल अशा विठ्ठलभक्ती-परायण प.पू. अण्णा घाणेकर यांच्या चिंतन-संग्रहाचा हा दुसरा भाग सद्‌भक्तांच्या हाती येत आहे, ही सर्वांच्या महद्‌भाग्याची गोष्ट आहे.

**मुक्तपणे मुक्त। श्रेष्ठपणे श्रेष्ठ।**
**सर्वत्रा वरिष्ठ। आदिशक्ती।।**

असे ज्या संतश्रेष्ठ मुक्ताबाईचे वर्णन एकनाथ महाराजांनी केले आहे ती संतांविषयी काय म्हणते पहा –

**संत तोचि जाणा जगीं। दया क्षमा ज्याचे अंगी।।१।।**
**लोभ अहंता नये मना। जगीं विरक्त तोचि जाणा।।२।।**
**इह परलोकीं सुखी। शुद्ध ज्ञान ज्याचे मुखीं।।३।।**
**मिथ्या कल्पना मागे सारा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।४।। – मुक्ताबाई**

वरील वर्णन ज्यांना तंतोतंत लागू पडते त्यांच्या चिंतनांच्या या भागाच्या अंतरंगात बुडी घेण्यापूर्वी मागील वर्षी (गोकुळ अष्टमी इ.स. २०११) प्रसिद्ध झालेल्या पहिल्या भागाचा थोडक्यात परामर्श घेऊ.

**सिंहावलोकन :– भाग पहिला**

या भागात निवडक अशा १५० चिंतनांचा समावेश आहे. ही चिंतने म्हणजे विषयप्रवेश, साधकाची परमार्थमार्गावरील वाटचाल, गुरुकृपेचे झालेले आकलन, संत-साहित्य वाचन, मनन, निदिध्यासन याद्वारे मनाची झालेली मशागत आणि प्रत्यक्ष अनुभूतीचा प्रारंभ याविषयी विवेचन होय. बाराखडी आत्मसात केल्याशिवाय लिहिता-वाचता येत नाही, त्याप्रमाणे हा भाग वाचण्यापूर्वी पहिला भाग वाचणे आवश्यक आहे. (सुमारे ८००-८५० जणांच्या हाती हा भाग आला आहे. त्यापैकी कितीजणांनी संपूर्ण वाचन केले हा भाग निराळा !) ग्रंथवाचन करण्याच्या संदर्भातील एक हरिदासी कथा थोडक्यात अशी – नोकरीतून निवृत्त झालेल्या एकजणाने थोडे ग्रंथ विकत आणले व बरेचसे मित्रांकडून वाचण्यासाठी आणले. प्रत्यक्षात एकही ग्रंथ वाचला नाही किंवा मित्रांकडून आणलेला एकही ज्याचे-त्याला परत केला नाही. आता बोला ! या भागात त्यांनी निरनिराळ्या ठिकाणी त्या त्या प्रसंगानुसार केलेल्या प्रवचनांचा उल्लेख अनेक ठिकाणी आढळतो. त्यानिमित्ताने भक्तीमार्गाचे माहात्म्य, संतांनी केलेली साधना याचा अधिक उहापोह आहे. ही चिंतने वाचून अध्यात्माची गोडी लागलीच म्हणून समजा ! मग त्याने परमार्थमार्गावरील वाटचाल सुरू करणे आवश्यक आहे. अध्यात्ममार्गासाठी लागणाऱ्या प्राथमिक तयारीचे

मार्गदर्शन - जसे श्रद्धा, सत्संग, नामस्मरण, ग्रंथवाचन (लौकीकातील साहित्य ते पुस्तक, परमार्थावरील तो ग्रंथ - जसे आपली आंघोळ, देवाची पूजा !) याविषयी उहापोह उत्तम रीतीने केलेला आहे म्हणून या ग्रंथाच्या वाचनाची जरूरी आहे.

**विहंगमावलोकन :- भाग दुसरा**

अगदी सुरवातीस आपण काही चिंतनीय, मननीय अशी वाक्ये पाहू, जेणेकरून आपण ग्रंथ वाचनास उद्युक्त होऊ -

**चिंतन क्र. १५५ :-** भक्तीला अजिबात अंतरायचं नाही म्हणजे नेमकं काय करायचं ? "नामाचे अखंड चिंतन-ध्यान आणि त्याचबरोबर भगवंत/श्रीगुरु/आत्मरूपाचे अखंड दर्शन."

**चिंतन क्र. २२१ :-** (श्रीगुरु-भगवंत) यांच्या सेवापुष्पांच्या माळेत "अनुराग" हे एकच बळकट न तुटणारे सूत्र आहे. "अनुराग" म्हणजे उत्कट भक्तीप्रेमाने उद्भवणारी व ही "हरिभक्ती-प्रेमसुधा" सतत मिळावी अशी सात्त्विक आसक्ती होय. (सात्त्विक म्हणजे सत्त्वगुण. त्याविषयी तुकाराम महाराज म्हणतात, **"तुका म्हणे ऐका सत्त्वाचे सामर्थ्य। करवी परमार्थ अहर्निशी।।"**)

**चितन क्र. २५५ :-** नामाची व्याख्या अशी आहे, "आपण आपल्या मनाने नामाचा हात धरून चारी वाणींच्या (परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी) पायऱ्या उतरून आपल्या अंत:करणात उतरायचे की जेथे परमानंदाचा अक्षय खजिना आहे; हा परमानंद अखंड भोगण्याचे नाव म्हणजे नामसाधना."

**चिंतन क्र. २६६ :-** परमार्थ साधनेने परमानंदाची प्राप्ती, परमानंदाने जीवनातील अध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशा तापत्रयाचा नाश, सर्वांभूती आत्मभाव व त्यायोगे विश्वात्मकभाव. मग **"सर्वही सुखरूप असावेत"** असा एकच एक जीवनहेतू उरतो. संकुचित स्वार्थाचे स्मरणही राहात नाही.

अशी अनेक अमृततुल्य वाक्ये ग्रंथात जागोजागी विखुरलेली आहेत. त्यासाठी संपूर्ण ग्रंथच वाचण्याची आवश्यकता आहे. (शक्य असल्यास पहिल्या भागाच्या वाचनानंतर). परमार्थमार्गाचे योग्य दिग्दर्शन घडेल. वास्तविक आम्हाला व्यवहारापेक्षा परमार्थात संशय, शंका फार ! देव, गुरु, नाम सर्वांबद्दल संशय. **संशयात्मा विनश्यती !** (भगवद्गीता)

या ग्रंथातील ठळक विषय म्हणाल तर गुरुभक्तीचे माहात्म्य, सत्संग, नामसाधना व शेवटी "आत्मतृप्ती", नित्यतृप्तता. यावरून ज्यांनी वाटचाल करून ध्येय गाठले तेच सत्पुरुष, संत ! प.पू. अण्णा तसे आहेत. संताची व्याख्या करताना समर्थ रामदासस्वामी म्हणतात, **"जो जाणेल भगवंत। तया नाव बोलिजे संत। जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी।।"** वरीलपैकी प्रत्येकाविषयी प.पू. अण्णांचे वैशिष्ट्य आता पाहू.

**गुरुभक्ती :-** अगदी तरुणपणीच प.पू.वै. सोनोपंत दांडेकर हे समर्थ सद्गुरु लाभले.

तेव्हापासून गुरुभक्ती कशी असावी याविषयी ज्ञानेश्वरीतील पुढील ओव्या त्यांनी आचरणात आणल्या -

**गुरुसंप्रदायधर्म। तेचि जयाचे वर्णाश्रम।**
**गुरुपरिचर्या नित्यकर्म। जयाचे गा।। ज्ञानेश्वरी अ.१३-४४५**

**गुरु क्षेत्र गुरु देवता। गुरु माता गुरु पिता।**
**जो गुरुसेवेपरौता। मार्गु नेणे।। ज्ञानेश्वरी अ.१३-४४६**

**जयाचे वक्त्र। वाहे गुरुनामाचे मंत्र।**
**गुरुवाक्यांवाचूनि शास्त्र। हातीं न शिवे।। ज्ञानेश्वरी अ.१३-४४८**

**जया इथे भक्तीची चाड। जया इथे विषयींचे कोड।**
**जो हे सेवेवाचून गोड। न मनी काही।। ज्ञानेश्वरी अ.१३-४५३**

ज्ञानेश्वरीतील गुरुभक्तीच्या अनेक ओव्या प.पू. अण्णांनी आचरणात आणल्या, अनुभवल्या ! त्यामुळेच आताची **अवस्था** ! खरे म्हणजे मनुष्य-जन्माची लावलेली **व्यवस्था** !

**सत्संग :-** प.पू. गुरु, परम सद्गुरु, इतर अनेक संत-सत्पुरुष यांचा प.पू. अण्णांनी सत्संग साधला, अनुभवला. स्वत:च्या साधनेला खतपाणी घातले, त्यातूनच या ग्रंथातील चिंतने उत्स्फूर्तपणे उदयाला आली. आपल्या वैयक्तिक साधनेचे "**सत्संग हे फळ आहे**" असा विश्वास ठेवून सत्संगाची फळे चाखली. (याविषयी प.पू. अण्णांची खंत - त्या तोडीचे भगवद्भक्त आता क्वचितच आढळतात. असो ! तो विषय निराळा !)

**नामसाधना :-** याविषयी सर्वांग-परिपूर्ण मार्गदर्शन या चिंतनांच्याद्वारे होते. त्यांच्या मते, नामस्मरण हाच परमार्थाचा पाया, देखणी, डौलदार इमारत आणि तळपणारा कळस होय. ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात म्हणतात, "**हरिनाम सार जिव्हा या नामाची। उपमा त्या दैवाची कोण वानी।।**" नामाची जिव्हा म्हणजे जिच्यात फक्त नामच आहे अशी जिव्हा ! प.पू. अण्णांच्या जिव्हेचा नाम हाच चाळा आहे असेच दर्शन या चिंतनांमधून घडते. "**पांडुरंग नाम जप। हेचि माझे महातप।।**" - **संत जनाबाई.** आपल्याला हेच तप करावयाचे ! **काळ सार्थक केला त्यांनी। धरिला मनीं विठ्ठल।। - निळोबाराय.**

**नित्यतृप्ती :-** "पराशांती"ला मनुष्य केव्हा पोहोचतो याचे भगवद्गीतेत पुढील श्लोकात वर्णन आहे -

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते।। अ.१८-५३**

(**अर्थ :** देहाहंकार, विषयांचे बळ, प्रिय विषयांच्या प्राप्तीने उत्पन्न होणारा गर्व, काम, क्रोध, जिंकण्यास कठीण असा परिग्रह (विषयोपभोगासाठी वस्तूंचा संग्रह) या सर्वांचा ज्याने ठावठिकाणा नाहीसा केला, ज्याला 'माझे' म्हणावे, एवढेदेखील द्वैत ज्याच्या

ठिकाणी उरले नाही, अशा साधकाचा अभ्यास ब्रह्मप्राप्तीजवळ आला, असे पाहून मंदावतो, हीच ''शांती'' होय.) अशी शांती प.पू. अण्णा सध्या अनुभवितात व तेच प्रतिबिंब चिंतन क्र. २८७ मध्ये ''नित्यतृप्त'', ''सदैव तृप्त'' (म्हणजेच स्वतःच्या आत्म्याशीच रममाण झालेला) या शब्दांनी व्यक्त झालेले आढळते. हे चिंतन मुळातूनच अवश्य वाचावे. प.पू. अण्णांचे हे आत्मकथन, आत्मचरित्रच होय.

नामयोगी प.पू. गोंदवलेकर महाराजांचे कृपांकित वै. के. वि. बेलसरे यांनी ''संतांचे आत्मचरित्र'' नावाचा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे. निरनिराळ्या संतांनी आपल्या अक्षर वाङ्मयातूनच अप्रत्यक्षरित्या आत्मचरित्र कसे लिहिले आहे याचा सुंदर सारांश त्यात लिहिला आहे. हे आठवण्याचे कारण असे की, प्रस्तुत ग्रंथातील काही चिंतनांतील काही वाक्ये वाचली तर ते प.पू. अण्णांचे आत्मकथनच आहे असे प्रकर्षाने जाणवते. वानगीदाखल पुढील उदाहरणे पहा. चिंतन क्र. १७३ (साधकाची प्राथमिक अवस्था), चिंतन क्र. १९२ (भक्त आणि देव, श्रीगुरु-शिष्य यांची एकात्मता, एकरूपता हाच प्रत्यय नित्यनूतनपणे अनुभवास येत असतो), चिंतन क्र. १९९ (''अचेत चेतले भक्तिप्रेम सुखे'' भक्ताला अशा सगुण, षड्गुणैश्वर्य भगवंताचेच प्रेम आहे) त्याचे असेच दर्शन अनेक चिंतनांच्याद्वारे घडते असो.

आता १/२ चिंतनांचा थोडा विस्तारपूर्वक परिचय करून घेऊ -

**चिंतन क्र. २६० :-** हे चिंतन पूर्णतया प.पू. अण्णांना जागृतावस्थेत भगवंताच्या आलेल्या अनुभूतीविषयी आहे. त्यात ते म्हणतात, ''श्रीगुरुकृपाप्रसादे अंतर्मौन लाभते. नक्षत्रांचा सडा भरदिवसा अनुभवास येतो, कधी अति-ज्वलंत अग्निच्या ज्वाळा दिसतात तर कधी पौर्णिमेचा पूर्ण शुभ्र चंद्रमा डोळ्यांसमोर चकाकत असतो. त्या आत्मचंद्राचा ललित प्रकाश पाहून मन वेडावून जाते. मनाचा राजहंस ह्या चंद्राच्या चांदण्यातील अमृतकणाचा अति मवाळपणे आस्वाद घेतो. हा मानसीचा राजहंस मोठ्या दिमाखाने सारखा डोलत असतो, झुलत असतो.''

**चिंतन क्र. २९४ :-** प.पू. अण्णा ''आत्मतृप्त'' झाले, ''नित्यतृप्त'' झाले. आपले काय ? **ऐसी कळवळ्याची जाती। करी लाभावीण प्रीती।। - तुकाराम महाराज**. आता या चिंतनातून आपल्यासारख्या साधकांनाही बोध केला आहे. पाऊस कोसळतो आहे, आपली घागर आपण आता पालथी अगर आडवी करून न ठेवता नीटपणे उपडी केली पाहिजे. प.पू. अण्णा म्हणतात, ''अत्यंत विशुद्ध (अशी) निष्काम भक्ती सदासर्वदा अहैतुकी असते. भक्तीमार्गात तत्त्वचर्चा व शास्त्राभ्यास यापेक्षा आचारावर व भावनाप्रवाहावर अधिकाधिक भर दिला आहे. उपासकाने, भक्ताने आपल्या सर्वच्या सर्व भावभावना भगवत्केंद्रित, श्रीगुरुकेंद्रित व संबंधीत करावयाच्या. मग सगळ्याच्या सगळा आचार श्रीहरीप्रित्यर्थ, त्या आनंदकंदासाठीच करावयाचा. अशा सर्व भावभावना व सर्व आचार भगवत्केंद्रित होणे हीच भक्ती होय.

**आणिकही जे जे सर्व। कायिक वाचिक मानसिक भाव।**

**तया मीवाचूनि धाव। आनौती नाही।। ज्ञानेश्वरी – अ.१२-७९**

वरील दोन्ही चिंतने मुळातूनच संपूर्णपणे अवश्य वाचावीत.

सत्संग, नामस्मरण व गुरुपदिष्ट मार्गाने साधना केल्यास मनुष्य पूर्णत्वाला पोहोचतो. याविषयी एकनाथी भागवतातील काही ओव्या पहा –

**(भगवंत म्हणतात) संत माझे लळेवाड। त्यांची पूजा मज लागे गोड।**
**जैसी कीजे भगवद्भक्ती। ती भक्त पावती तेचि क्षणी।। अ.२-६१०**
**जेवी अमृत म्हणता। चवी न लाभे गा सर्वथा।**
**तेवी शाब्दिक ज्ञानयोग्यता। अनुभवता स्वये नुपजे।। अ.३-२८४**

प.पू. अण्णांना आपल्या सद्गुरुविषयी आत्यंतिक प्रेम, भगवंतापेक्षाही काकणभर जास्तच. त्या सद्गुरुबद्दल नाथ महाराज एकनाथी भागवतात म्हणतात –

**सद्गुरुचे अगाध महिमान। जे वेदा न बोलवेचि जाण।**
**त्याची कृपा झालिया पूर्ण। दुर्लभ कोण पदार्थ।। अ.२१-५२७**

प.पू. अण्णांच्या "**आत्मचिंतन – भाग २**" या अत्यंत उत्कृष्ट अशा ग्रंथाविषयी हे दोन शब्द लिहावयाची सुसंधी मिळाली हे मी माझे भाग्यच समजतो. अल्पमतीनुसार जसे आकलन झाले, जसे शब्दबद्ध करता आले, तसे केले. ही सेवा गोड करून घ्या, ही विनंती.

**कहना था वो कह दिया।**
**अब क्या बजावूं ढोल।। – कबीर**

।। हरिः ॐ तत्सत्।।

**आषाढी एकादशी शके १९३३**
**३० जून, २०१२**

**पं. का. थावरे**
**'सच्चिदानंद', गल्ली क्र. १,**
**दत्तनगर, पाचगांव,**
**कोल्हापूर ४१६ ०१३**
**फोन नं. – (०२३१) २६३८९७७**

'नंदन' १९३४
ज्येष्ठ कृ. १४ रविवार
दि. ०३/०६/२०१२

श्री. ह.भ.प. अण्णा घाणेकर,

पुणे/सांगली

पीठस्थ देवतेचे उत्तम आशीर्वाद व आमचे 'नारायण-स्मरण'

'आत्मचिंतन' भाग २ पाहिला. आनंद आहे.

सच्चिदानंद एकत्वाने राहणाऱ्या आत्म्याचे चिंतन मात्र अंगहीन असणाऱ्याच्या विविध बाजूने चिंतन आता भाग २ मध्ये प्रसिद्ध होत आहे.

श्रवण, मनन व चिंतन ह्या उत्तरोत्तर घडणाऱ्या गोष्टी आहेत. आपण सद्गुरु कृपेने श्रवण केलेत त्याचेच मनन झाले. ह्या मननाच्या मंथनातून हे चिंतन साकार होतंय. श्रवण, मनन ह्या अन्योन्य गोष्टी आहेत. श्रवणाशिवाय मनन नाही तर मननाशिवाय श्रवणभक्तीचा नाश ठरलेला आहे. चिंतन मात्र युक्ती (शास्त्रमान्य) ने आत्मा व ब्रह्म यांचे ऐक्य बिंबवते. अर्थात हे सर्व चालू असताना त्याचे लिखाण होणे कठीणच. पण ह्या चिंतनाचे जेव्हा लिखाण चालू होते तेव्हा बुद्धिवैभव काम करते. पाहणारे डोळे असतात तर बोलणारी वाचा असते व या दोहोंच्या संबंधातून ज्या वेळेस वर्णन होते तेव्हा पाहणे व बोलणे यात फरक राहतोच.

चिंतन २९३ दाखविते की नामस्मरण हे अंत:करण शुद्ध, सात्त्विक बनवते. अशा शुद्ध अंत:करणात अतिशय पवित्र असणारे ज्ञान उमटते व ते दृढ होणे याला अपरोक्षानुभूती असे म्हणतात.

चिंतन २९४ भक्ति म्हणजे भगवंताविषयी परमप्रेम भाव.

साधक कुणावर प्रेम करू शकतो ? दुसऱ्यावर की स्वत:वर ? उपनिषदाधारे पाहिले तर - **आत्मनस्तु कामाय .....।** याचाच अर्थ असा की, स्वत:वरच प्रेम करतो. म्हणूनच असे सुद्धा म्हणता येईल की, तो स्व म्हणजे भगवंताचे वसतिस्थान, भगवंतावरील प्रेम म्हणजेच स्वप्रेम, हेच ज्ञान व हीच भक्ती म्हणून संतश्रेष्ठ तुकोबाराय एका अभंगात म्हणतात, **हेचि भक्ति हेचि ज्ञान। एक विठ्ठलचि जाण।।**

म्हणून प्रत्येकाने असे वागावे - **स्वये आचरिता स्वकर्म। ते कर्मचि होय ब्रह्म। हेचि कर्मक्रियेचे वर्म। सर्व मानवा परमगति।।**

**स्वधर्मे घडे भगवद्भक्ति।**

यासाठी सर्वांनी स्वधर्माचरण करावे. एकनाथ महाराजही म्हणतात, **स्वधर्माचे आचरण। हीच थोर भक्ति जाण।**

सर्वांनी लक्षात असू द्यावे, **धर्म एव हतो हन्ति। धर्मो रक्षति रक्षित:।।**

पुनश्च एकदा पीठस्थ देवतेंचे अनेक आशिर्वाद व आमचे नारायण-स्मरण सर्वांस विदित व्हावे.

महानुशासनम् वरीवर्ति
**श्री. जगद्गुरू शंकराचार्य,**
करवीर पीठ, कोल्हापूर

।।श्री हरिः।।

स्वामी गोविंददेव गिरी
(आचार्य किशोर व्यास)

धर्मश्री, मानसर अपार्टमेंटस्
पुणे विद्यापीठ मार्ग, पुणे ४११०१६
दूरभाष : (०२०) २५६५२५८९
फॅक्स : (०२०) २५६७२०६९

## स्वानंद साम्राज्य

भगवद्भक्त श्रद्धेय **अण्णा घाणेकर** यांच्या **''आत्मचिंतन भाग – १''** या ग्रंथानंतर **''आत्मचिंतन भाग – २''** या ग्रंथाचे टंकलिखित जे बाड पाहण्यास मिळाले, परम संतोष झाला. भक्तीप्रेमामृताने ओथंबलेली ही सर्वच चिंतने, **''पिकलीया सुखाचा परिमळू''** अशी श्री गुरुज्ञानेश्वरमाऊली यांच्या वचनाप्रमाणेच आहेत. या अमृतस्वरूप चिंतनांचा अवघ्याच भक्तांनी लाभ घेतला, तर त्यांचे अवघे जीवनच सुवर्ण (कैवल्यकनक) होईल.

**कै. प. पू. गुरुवर्य सोनूमामा दांडेकरांसारख्या** सोळा आणे/बंदा रुपया श्री गुरुंच्या कृपाप्रमादाने अण्णांचे जीवनाचे सुवर्ण झाले. भारतीय अद्वैत तत्त्वज्ञान, भारतीय संस्कृती यांनी सर्व जीवनाला एक सुंदर - सुबक घाट - आकार आला.

या सगळ्याच चिंतनातन आत्मानुभवाबरोबर साधना करणाऱ्या साधकांनाही बोध केला आहे. श्रवण – मनन चिंतनाचाच हा परिपाक आहे. **''चिंतने चिंतने तद्रूपता।''** या श्री तुकोबारायांच्या उक्तीप्रमाणे शास्त्रमान्य युक्तीने चिंतन झाल्यावर ब्रह्मान्मैक्य ज्ञान पूर्णत्वाने बिंबते.

अमृताच्या सरोवरातून कोठूनही घेतलेला अमृताचा एक थेंब अमृतच असतो, मग तो सरोवराच्या मध्यवर्ती खोल भागातला असो अगर भूमीशी टेकलेल्या कडेचा असो. कोणतेही एक चिंतन आपल्याला रम्य समाधानाचा अखंड महामस्तकाभिषेकच करील.

आपली चिंतने अक्षरबद्ध करण्याच्या ओघात अण्णांनी गुंफलेली शब्दकुसुमे हे **''शब्द नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्य दिपीका।''** या ज्ञानराजांच्या ओवीची आठवण करून देतात. उदाहरणार्थ चिंतन क्र. १८८ – खरे-खरे प्रेम आत्म्यस्वरूपावरच. हे आत्मस्वरूपच ''घनानंद'' अखंड च्चिदानंद घनता हाच भक्तीप्रेमभावाचा उल्हास. चिंतन क्र. २२६ – अंगी भक्तीप्रेमाचे भरते यावे, त्या भरतीला ओहोटी नसावी. यासाठी नाम हृदयात राहावे, शरीरावर रोमांच उभे राहावेत, कंठ सद्‌गदीत व्हावा, नेत्रातून आनंदाश्रु पाझरावे. केवढी व्याकुळता आहे या मागण्यात ! चिंतन क्र. २४९ – सगळ्याच आत्म-साक्षात्कारी संतांचा ''मी'' विश्वात्मक झालेला असतो. त्यामुळेच प्राप्त झालेली सर्वात्मकता त्यांच्या अमृत वाणीतून अखंड पाझरत असते जसे **''पुढा स्नेह पाझरे। मागा चालती अक्षरे। शब्द पाठी अवतरे कृपा आली।।''** चिंतन क्र. ३०१ – आत्मानुभूती ही असंप्रज्ञात – समाधी **''रम्य**

**समाधी**'' हा आनंदभावच शांतरस आहे. शिष्याचे अंतर्यामी श्रीगुरुच असतात. नाम-सबीज नाम देतात. ''**रामकृष्णहरि**'' हा नाममंत्र म्हणजे आनंदघनाचे मूर्त स्वरूपच. नामाला रुप आहे, चव आहे, नाद आहे. नामापाशी काय नाही ???

अशी असंख्य शब्दरत्ने या ग्रंथात विखुरली आहेत. अगदी पानोपानी, ओळी-ओळीत. सगळी चिंतने वाचताना उगाच अवघड शब्द, शब्दांची कसरत, अजिबात जाणवत नाही. एका महावैष्णवाच्या अंतरंगात उगम पावून पुढे विशाल होत जाणाऱ्या भक्तीभावाची गंगाच आत्मस्वरूप सागराला मिळण्यासाठी वेगाने, आतुरतेने वाहात असल्याचा प्रत्यय येतो. याचे श्रेय प.पू. आनंदाण्णांच्या ठिकाणी अखंड वास करणाऱ्या **हरि-गुरुभक्तीलाच** आहे. अण्णांचे मन:पूर्वक अभिनंदन. इति लेखन सीमा.

कार्तिक शु।।१, शके १९३४
दि. १४/११/२०१२

श्रीज्ञानेश्वरपदाश्रित
स्वामीगोविंददेवगिरि
(स्वामी गोविंददेवगिरि)

।।श्री पांडुरंग।।

हरिभक्तिपरायण आदरणीय आण्णांनी केलेले आणि सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी यांनी संकलित, संपादित केलेल्या "**आत्मचिंतना**"चा दुसरा भाग पाहिला, खूपच आनंद वाटला.

महाराष्ट्राच्या वैभवसंपन्न संस्कृतीच्या जडणघडणीमध्ये संतचरित्र आणि संतवाङ्मयाचा फार मोठा वाटा आहे. भगवत्स्वरुपाचा आलेला यथार्थ अनुभव आपल्या कृतीतून आणि शब्दातून संतांनी जगासमोर मांडला आहे. तत्त्वज्ञानाचे चिंतन आणि त्याच्या अंतीम गन्तव्याची प्राप्ती, जाणीव करून घेणे आणि त्याचे ध्येय जगत्कल्याण ठेवणे हीच मानवी जीवनाची परिपूर्णता असते, हेच संतांनी वारंवार सांगितले आहे. त्यामुळेच नंतरच्या संतांनी त्याचेच आचरण करून कालपरत्वे मांडणीमध्ये बदल करून तेच सांगितले आणि या परंपरेने चालत आलेल्या विचार प्रवाहाने या संस्कृतीला व्यापक आयाम देऊन नवनवोन्मेषशालिनी बनविले आहे. संतांचे हे वाङ्मय आणि कार्य या संस्कृतीचा प्राण आहे.

संतांनी आचरलेले आणि सांगितलेले हे तत्त्वज्ञान मानवी जीवनाला प्रगल्भता आणि प्रासादिकता देणारे आहे. या अद्वैत तत्त्वज्ञानामध्ये तीन तत्त्वांचा प्रामुख्याने विचार केला जातो. अर्ध्या श्लोकामध्ये हा विचार नेहमी सांगितला जातो.

**श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः।**
**ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या जीवोब्रह्मैवनापरः।।**

परब्रह्म हेच एकमेव सत्य आहे. ब्रह्म व्यतिरिक्त ज्याचा व्यवहारतः अनुभव येतो ते सर्वजग मिथ्या (नश्वर, ब्रह्मस्वरुपामध्ये विलिन होणारे) आहे आणि जीव हा स्वरुपाने ब्रह्मापेक्षा वेगळा नाही. ही तीन तत्त्वे आहेत. संतांनी हीच तत्त्वे आपल्या परिभाषेमध्ये आपणास समजाऊन दिली आहेत. **'सत्य तू सत्य तू सत्य तू विठ्ठला। का गा हा दाविला जगदाकार।।' 'रज्जू सर्पाकार। भासियले जगडंबर।।' 'तुका म्हणे कैची कीव। कोठे जीव निराळा।।'** या सारखी अनेक संतांची अनेक प्रमाणे सांगता येतील. या तत्त्वाचरणाने मानवी जीवनाची इतिकर्तव्यता होते असा अनुभव संतांनी प्रकट केला आहे.

या तत्त्वज्ञानाचा अनुभव म्हणजेच भगवत्स्वरुपता प्राप्त होण्यासाठी कर्म, ज्ञान आणि भक्तीचा मार्ग सांगितला आहे. या तीनही साधन मार्गांचा पुनः स्वतंत्र विचार आहे. त्याचा वेगळा विचार आहे. परंतु येथे हे ध्यानात घेतले पाहिजे की हे मार्ग जरी स्वतंत्र आणि भिन्न वाटत असले तरी त्यांचा एकमेकांशी साध्यसाधनभावसंबंध आहे. समन्वयाच्या भूमिकेतून सांगावयाचे तर 'भक्तीच्या अधिष्ठानावरून यथार्थ ज्ञानाने केलेले सत्कर्मच व्यष्टी व समष्टी कल्याणाचे कारण ठरू शकते.' हा समन्वयाचा विचार फार महत्त्वाचा आहे. कर्म, कर्माचे प्रकार, ज्ञान, अज्ञान, त्यांचे प्रकार, भक्ती, भक्तीचे प्रकार या सर्वांचा सखोल व सांगोपांग विचार झाला तरच या समन्वयाचा विचार करता येऊ शकतो. अन्यथा साधनांतर आणि त्यांच्या अभिनिवेशातून जन्मलेले वाद ठरलेलेच !

हरिभक्तीपरायण आदरणीय आण्णांच्या आत्मचिंतनातून याची जाणीव स्पष्टपणाने होते. यामध्ये एकूण १५१ लेख किंवा चिंतने आहेत. त्यामध्ये विशिष्ट क्रम नसला तरी स्वतंत्रपणे प्रत्येक चिंतनाचे काही मूल्य आहेच ! काही चिंतने मात्र एका विचाराच्या सूत्रात गुंफलेली आहेत. यापैकी काही अभंगांचे विवरण करणारी तर काही ओव्यांचा विस्तार करणारी आहेत. ज्ञान, कर्म, भक्ती, उपासना, योग, वैराग्य, विवेक, धैर्य, अभ्यास, दानादि अनेक विषयांचा स्पष्टपणे अथवा अनुषंगाने विचार येथे प्रकटला आहे. अर्थातच याला संतवाङ्मयाचे भक्कम, अजोड असे प्रामाण्य आहेच ! काही काही चिंतने वाचताना त्यातील भावगर्भता ध्यानात येऊन अपूर्व आनंद लाभतो. (उदा. **'पैल तो गे काऊ कोकताहे'** या श्री माऊलींच्या अभंगावरील विवेचन !) तर काही चिंतने अर्थवाही अधिक वाटतात. त्यातील अर्थगर्भता अधिकच आनंद देते. याच अभंगांच्या विवेचनात

**'चिंतात्रजागरोद्वेगो तानवंमलिनांगता।**

**प्रलापोव्याधिरुन्मादा: मोहमृत्युर्दशादश ।।**

या भूतविरहाचे आलेले वर्णन संतवचनांनी चांगलेच फुलले आहे.

या चिंतनांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांचा सुटसुटीतपणा ! सहज, सोपे, साधे असे शब्द वापरुनही त्याचे रसाळपण अबाधित राहिले आहे. एरवी वेदांताचे चिंतन विशिष्ट पारिभाषिक शब्दात, बोजड व रटाळ वाटू शकते पण 'आत्मचिंतन' वाचल्यानंतर हे सर्व गैरसमज दूर होतात. कोणतेही पान उघडावे आणि कोणतेही चिंतन वाचावे चिंतनाला चालना आणि दिशा नक्कीच मिळते असे हे विचार आहेत.

हरिभक्तिपरायण आदरणीय आण्णांची अनेक वर्षांची श्रद्धायुक्त, भावनापूर्ण, निस्पृह आणि प्रामाणिक सेवाच या रुपाने अभिव्यक्त झाली आहे आणि तिच्या पाठीशी उभे आहेत श्रीगुरुंचे भक्कम आशीर्वाद !

**श्रीगुरुसारिखा असता पाठीराखा।**

**इतरांचा लेखा कोण करी ।।**

या वचनाची साक्ष स्वत: आण्णांनीच ठायी ठायी दिली आहे. या आत्मचिंतनाचे वर्णन श्री माऊलींच्या भाषेत करताना एवढेच म्हणेन की हे आत्मचिंतन म्हणजे,

**पिकलिया सुखाचा परिमळु। की निवालिया अमृताचा कल्लोळु।**

**ऐसा कोवळा आणि सरळु। बोलु बोलिला ।।**

हे आत्मचिंतन सर्वांसाठी आध्यात्मिक मार्गातील दीप व्हावे आणि पोटभरूनही शिल्लक रहाणारी शिदोरी व्हावे ही संत व भगवच्चरणी प्रार्थना !

भगवंतांनी आदरणीय आण्णांना दीर्घायुरारोग्य प्रदान करावे ही प्रार्थना !

भवदीय

चैतन्यभानुदासमहाराजदेगलूरकर.

# चिंतन १५१

वामन निवासात निरूपणास गेलो. खूपच जाणता श्रोतृवर्ग प. पू. योगीराज वामनरावजी गुळवणींची २९ वी पुण्यतिथी. योगीराज ढेकणेकाका व प. प. हरिस्वामी असे दोन अनुभवसंपन्न प्रमुख श्रोते; श्रीगुरूकृपा काय असते बघा!!! अतिशय रसाळ सेवा झाली. वरील दोन्ही आणि सारेच श्रोते मंत्रमुग्ध झाले. **"योगी पावन मनाचा"** हा चित्कला मातुश्री मुक्ताबाईचा अभंग होता. योगमार्गापेक्षा भक्ताला लाभलेली समाधी हा सिद्धांत योगसाधकांना न दुखवता, मोठ्या मार्मिकपणे कथन झाला. दि. २४ ला **"समाधि हरिची समसुखेविण"** ह्या ज्ञानराजमाऊलीच्या हरिपाठ रत्नमालेतील एका अभंगाचा विचार केला. ६ ते ८ दोन तास सेवा झाली.

ह्यात अण्णाचे काहीच नाही. आहे ती श्रीगुरूकृपा, श्री कृपावंत, दयाघन पंढरीनाथाची मायेची पाखर आणि भगवंताच्या गोडाहून गोड अशा नामाचा प्रभाव. निरूपणाच्या वेळी खूपच आनंद घेऊन श्रीगुरूकृपेचा एक सुंदर नेत्रदीपक अनुभवच पहावयास सापडला. सेवेच्या वेळी अण्णा नसतातच, तर स्वामीच सेवकाच्या माध्यमातून सेवासुख अनुभवत असतात. अद्वैत न मोडता!!

आणि एक सुंदर योगायोग. २५ ला वर्गाच्या वतीने आळंदीत महापूजा होणार होती, ती काही कारणास्तव रद्द झाली. ज्ञानोबामाऊलीच्या दर्शनासाठी जीव आसुसला होता नुसता. पण काय करणार ? सगळ्यांचा एकच घोष आता दोन दिवस कुठे जायचे नाही. गप्प बसलो बापडा. मातेलाच लेकराची ओढ. पदराखाली घेण्याची अनावर इच्छा. एक सद्गृहस्थ २४ ला शुक्रवारी सकाळी ८ वाजता कोरी गाडी घेऊन आले. म्हणाले, अण्णा तुम्हाला घेऊन आज अलंकापुरास जायचे. तेथेच गाडीचे पूजन. श्रीगुरूमाऊलीचे दर्शन झाले.

जागोजागी रत्नासारखी माणसं जोडली गेली ही त्या मायालाघवी जगत्‌नियंतकाचीच लीला. श्रीतुकाराममहाराज म्हणतात, **"देवाकारणे अवघे जगची सोयरे"** होय. खरे आहे बघा. नाहीतर **"कोण येते जाते आमुच्या घराला। काय ज्याचा त्याला धंदा नाही ?।।"**

पण भगवंताच्या ठिकाणी असणाऱ्या नितांत भक्तिप्रेमाच्या सूत्रात ही सगळी मंडळी गुंफून एक छान भक्तिकुसुमाची भावसुगंधित पुष्पमाला तयार झाली. होय की नाही?

अनुसंधानात रहा. भगवंताची प्रार्थना करा. आर्ततेने केलेल्या प्रार्थनेला तो धावत येतो. भक्ताच्या हाकेसरशी उडी घालतो तो जगश्रेष्ठ. त्याला हाका मारा. त्याचे स्मरण-चिंतन करा. यावेळी तत्वचिंतन नाही झाले, पण मनोभाव आणि अनुभव तो पण गुरूकृपेचा प्रकटला आहे.

* * * *




श्रीगुरू म्हणजे केवळ ज्ञानदायिनी शक्ती. ज्ञानाचे मूर्तीमंत स्वरूप म्हणजेच श्रीगुरू. ज्ञानाची अधिष्ठात्री देवता गणेश आणि प्रत्यक्ष ज्ञान देणारे श्रीगुरू एकाच तोलामोलाचे. श्रीज्ञानराजांनी म्हणून तर आपल्या श्रीगुरू निवृत्तीनाथांचे वर्णन गणेशाच्या रूपकातून केले. **"तुमचा अनुग्रहो गणेशु।।"** असं ते म्हणतात. १७ व्या अध्यायात तर त्यांनी **"तया नमोजी गणेंद्रा। श्रीगुरूराया।।"** असं म्हणून श्रीगुरू व गणेश यांची सहज एकरूपता प्रगट केली आहे.

या गुरुगणेशामुळे एखादे बालकही अगदी सहज सारस्वताची निर्मिती करू शकते असा विश्वास प्रकट करून माऊलींनी स्वत:कडे जाणून-उमजून बालकाची भूमिका घेतली आहे.

**''तुमचा अनुग्रहो गणेशु। जैं आपुला दे सौरसु।**

**तै सारस्वती प्रवेशु। बालका आथि।।''**

भाष्यरूप साहित्यनिर्मितीचे, त्यातील रसवत्तेचे सारे-सारे श्रेय आपल्या गुरूगणेशाला देऊन महाराज मोकळे होतात.

आपल्या श्रीगुरूंच्या कृपानुग्रहानंतर श्रीगुरूंची स्नेहशीलता आपल्याला पदोपदी जाणवली पाहिजे. नुसत्या श्रीगुरूंच्या स्नेहाद्र दृष्टीमुळे आपल्याकडून काय होत नाही ? श्रीगुरूंनी अंगीकार केल्यावर मुकादेखील वाचस्पती होतो अशी श्रीगुरूनिष्ठा हवी. होय की नाही ?

श्रीगुरूचा स्नेहाळपणा आणि कृपादृष्टी याला मायमाऊलीच्या उपमेनेपण गौरविता येत नाही. आईमुळे जसे बाळाला पोषण लाभते, त्याचा चिमुकला देह दिसामासाने वाढू लागतो; त्याप्रमाणेच श्रीगुरूकृपेने साधक-शिष्याची नाम-साधनेत प्रगती होऊन तो परमात्म पदापर्यंत विकसीत होतो. सगळ्या संतांनी आईपेक्षाही श्रीगुरूचे थोरपण सांगितले आहे. कारण आई मुलाचे केवळ शरीर पोषण करते, तर गुरू मात्र आपल्या शिष्य-साधक-बालकाचे मानसिक, बौद्धिक, आत्मिक पोषण करतात.

सद्‌गुरूमुळे साधकाचे/शिष्याचे जीवन आत्मज्ञानप्रकाशाने अंतर्बाह्य उजळून निघते; आणि म्हणूनच श्रीगुरूंना ज्ञानसूर्याची उपमा देतात. पण थोडा फरक; आकाशातील सूर्य प्रकाशाबरोबर तापही देतो, पण ज्ञानसूर्य असणारे श्रीगुरू आत्मज्ञानरूपी प्रकाश देऊन संताप मात्र नाहीसा करतात. आहे की नाही मौज ! हा गुरूस्वरूप ज्ञानसूर्य साधकाची प्रज्ञा फुलवितो. म्हणून आपले ज्ञानोबाराय त्याचे वर्णन बघा कसं करतात ते -

**''जय जय आचार्या। समस्तसुरवर्या।**

**प्रज्ञाप्रभातसूर्या। सुखोदया।।''**

यात त्यांनी गुरूला प्रज्ञाप्रभातसूर्य म्हटले आहे; पण गुरूमुळे लाभणारा प्रकाश हा काही साधा नित्याचा जड प्रकाश नसतो तर तो चैतन्याचा,

ब्रह्मचैतन्याचा प्रकाश असतो. म्हणूनच ज्ञानदेवांना सूर्याचे उपमान तोकडे वाटले असावे; त्यांनी श्रीगुरूवर चित्सूर्याचे रूपक केले आहे.

परोपरीने गुरूसामर्थ्याचे वर्णन करूनही, शेवटी श्रीगुरूचे सामर्थ्य वाचातीत आहे. "**मौन गा तुझे राशिनाव**" असंच म्हणावयास हवे. "**धन्य जागो गुरूमहिमा। देही दाविला देव**" असे श्रीगुरू !

* * * *




शिवशक्तीचे मूर्त स्वरूप म्हणजेच श्रीसद्गुरू. साधकाला आत्मसाक्षात्काराच्या सिंहासनावर आरूढ होण्यासाठी साधन करावे लागते. श्रीगुरू साधकाला ते साधन उपलब्ध करून देत असतात. तो श्रीगुरूंचा साधन-उपदेश फार-फार महत्वाचा. साधन जर लक्षात आले नाही, सद्गुरूंनी सांगितलेले साधनातील **वर्म** जर लक्षात आले नाही, तर मग साधकाला त्याचे साध्य कसे प्राप्त होणार?

वनाला शोभा कशाची? तर त्या वनातल्या झाडांचा टवटवीत हिरवेपणा, झाडांवर लगडलेली फुले आणि फळे, त्या फुलांचा सुगंध आणि फळातील रस हेच तर रानाचे-बागेचे-मळ्याचे वैभव. हे वैभव बागेला प्राप्त व्हावे म्हणून माळ्याला परिश्रम जरूर करावेच लागतात आणि ते पण भरपूर आणि न कंटाळता. परंतु परिश्रमाला वसंत ऋतूची साथ हवी. वैभवाचं मूलभूत कारण वसंत ऋतू हेच आहे. श्रीसद्गुरू हा साधकाच्या साधनजीवनातील साक्षात् वसंत ऋतुच आहे. भगवंताजवळ जाण्यासाठी तपश्चर्येची (नामस्मरणस्वरूप) गरज आहे. परंतु ती तपश्चर्या कशी करावयाची हे वर्मासहित सांगणारा, दाखवून देणारा शेवटी एक श्रीगुरूच. "**जेणे हा गोपाळ कृपा करी**" त्यातली खुबी एक श्रीगुरूच सांगू शकतात.

भगवंत वास्तवात अमूर्तच आहे. पण तो कारुण्याची मूर्ती असतो. भगवंताच्या मूर्त-अमूर्त खेळातला सद्गुरू हा मूर्त खेळ आहे. अमूर्ताकडे साधकाला घेऊन जाणारा श्रीगुरू मात्र मूर्तिमंत कारुण्याचीच सगुणसंपन्न मूर्त आहे. ज्ञानेश्वरमहाराज तर म्हणतात की श्रीगुरूंची **आज्ञा** हा **अहेवतंतु** आहे; साधकाच्या सौभाग्याचा. कारण श्रीगुरू म्हणजेच भगवंताचे/परब्रह्माचे मूर्त सच्चिदानंद स्वरूप आहे. हे कळल म्हणजे मगच "शिव-शक्तीच्या" एकरसतेचा म्हणजेच या दृश्य विश्वाकाराचा खेळ काय ते समजते. जगताचे यथार्थ स्वरूप लक्षात येते.

अविद्येच्या अंधाऱ्या रानांत अडकलेल्या जीवांना जर मुक्तता हवी असेल; दुःखाची अत्यंतिक निवृत्ती होऊन परमानंदाची अखंड आनंदकारता हवी असेल तर साधकाने भगवंताच्या अनुसंधानात/चिंतनात गर्क व्हावयास हवे; त्यासाठी **नामस्मरण**. हे सबीज नाम देणारा सद्गुरू त्यासाठी भेटावाच लागतो. आणि तो **भेटला** याचाच अर्थ आपले **सुकृत थोर आहे** असे एका अनुमान प्रमाणावरून सहजच सिद्ध होते आणि आपल्या साधक जीवनातील **श्रीगुरू भेटीचा** अपूर्व अनुभव त्यास अधिकच बळकटी देतो नाही का? ह्या अविद्येच्या रानांत-आडरानांत म्हणा, मायारूपी प्रचंड मोठे हत्ती वावरत असतात. या मायारूपी हत्तींच्या कळपात सामान्य संसारी जीव अडकून, पडतो. जिथे जिथे जावे तिथे तिथे हे मायारूप धिप्पाड, प्रचंड, हत्ती आपला साधकाचा रस्ता आडवून बसतात. मग श्रीगुरू काय करतात? तर या हत्तींचा नाश करतात आणि परममुक्तीचा मोत्याचा चारा/घास आपल्याला सदैव भरवतात; मग जीवनात भय उरत नाही, खंत राहत नाही. परम शांतीचेच अखंड साम्राज्य नांदू लागते. सद्गुरूंनी भरवलेल्या या मोत्याच्या चाऱ्याने/घासाने नित्यतृप्तता लाभते.

श्रीसद्गुरूची कृपादृष्टी एकदा का आपल्या **लाघवी** शिष्याच्या-परमशिष्याच्या अस्तित्वावरून फिरली ना, अगदी क्षणभर जरी फिरली ना की परमशिष्याचा कायापालटच होतो. त्याच्यासाठी अवघ्या दिशा अनंदाने उजळून निघतात. अवघ्या वाटाच **आनंदमय** होतात. भगवंताचे जे स्वरूप

ज्या साधकाने जाणावयाचे ते **स्वरूपच** मंद वाऱ्यावर दरवळत राहणाऱ्या सुगंधासारखे, अगदी अलगद, साधकाच्या अनुभवास येते. नाक का कोठे सुगंध घ्यावयास आपले स्थान सोडून देशांतराला जाते? तर नाही-नाही सुगंधच आपणाहून नाकापाशी येतो. अगदी तसच होत बघा भगवंताच्या दर्शनाबाबत. श्रीगुरू आपलीच ओळख आपल्याला करून देतात. (म्हणजे आपल्या आत्मस्वरूपाची ओळख करून देतात; आणि आत्मस्वरूप हे परमात्मस्वरूपाशिवाय/पेक्षा दुसरे नाही; तर परमात्मा-आत्मा एकच आहेत; याचा अनुभव येणे). श्रीगुरू आपल्या परमशिष्याच्या पुढ्यात आरसा होऊन उभा राहणे; आणि श्रीसद्गुरूच्या कृपाप्रसादाने तो परमशिष्यच मग श्रीगुरूमध्ये आपले **स्वरूप** न्याहाळू लागतो.

श्रीसद्गुरू कैवल्य (स्वानंद) रूपी सोन्याचे दान करताना कधीही हा लहान, हा मोठा असा भेद करीत नाहीत. आपले श्रीज्ञानोबाराय तर म्हणतात की **श्रीगुरू** हा द्रष्टा असतो आणि म्हणूनच तो संपूर्ण विश्वच जणू आपल्या परमशिष्याच्या ओंजळीत दान म्हणून टाकत असतो. सत्शिष्याच्या स्वरूपात तो आपल्याला पाहत असतो; आणि पाहणाऱ्या परमशिष्याला आपले **श्रीगुरूत्व** कायम स्वरूपी बहाल करून टाकतो. ''**आपलेचि पद देती दासा**'' असं तुकोबारायांनी श्रीगुरूंच्या दातृत्वाचे गुणगान केले आहे. ''**आपले पदी बैसविले**'' असं श्री ज्ञानोबारायपण म्हणतात.

श्रीगुरूंची ही कृपामयी दृष्टी ही परमशिष्याच्या आयुष्यातला **आनंद-दालनाचा** उंबरठाच असतो. एका दर्पणाने दुसऱ्या दर्पणाला पहावे तैसेच हे परमगुरू-परमशिष्य एकमेकांना भेटतात, भेटत राहतात.

* * * *

# चिंतन १५४

हा जीव अनंत योनींतून, त्याचे त्याचे कर्मानुसार प्रवास करीत असतो; आणि असा प्रवास करत असतांना अनंत जन्मांत केलेल्या पुण्याईने त्याला हा दुर्लभ मानवदेह प्राप्त होतो. हा मानव देह दुर्लभ तर आहेच आहे, पण विचार करता हा तसा नश्वरच आहे. ज्ञानोबाराया तर म्हणतात **''माशी पांख पांखडु। तव हे सरे।।''**

जरी हा नश्वर-क्षणभंगूर असला तरी पण बाकीचे देहापेक्षा या देहात सारासार विचार करणची शक्ती भगवंताने दिली आहे आणि या सारासार विचाराच्याद्वारा याच देहाचे साधन करून माणसाला आत्मसाक्षात्काराच्या कैलासपर्वतावर आरोहण करता येते.

कृपावंत भगवंताने हा मानवदेह दिला आहे, जो त्याच्याकरताच खर्ची पडावा. नाही का? समर्थ तर निर्वाळा देऊन सांगतात, साधकासाठी, की **''तुझे कारणी देह माझा पडावा।''**

याकरता मार्ग एकच. श्रीगुरूकृपेची कास धरून, त्या जगत्‌गुरू श्रीकृष्णभगवंतास अनन्य भावाने शरणागती करावी. या देहातून श्रीसद्‌गुरूकृपेने मग साधना होत राहते.

तो श्रीहरि फार कृपाळू आहे बघा. आजपर्यंत अनेक थोर-थोर साधू-संत-महात्मे यांनी निरनिराळी **साधना**रूपी सुगंधित पुष्पे त्याच्या चरणी अर्पण केलीत. आपल्याजवळ जरी अशी जाई, जुई, मोगरा, चाफा-गुलाब अशी सुगंधी पुष्पे नसली; दुर्वांकुर असले, ते पण नसून साधा अगदी तरवडीचा पाला असला तरी भाव-भक्तीने वाहिलेल्या या रानटी अशा पाल्यानेसुद्धा तो श्रीहरि भगवंत प्रसन्न होतोच होतो.

आपल मूल वेडंवाकडं, अडाणी, गलिच्छ, पाप्याच पितर अस जरी

असल तरी त्याच्या मातेस ते अत्यंत प्रिय असते. “**मुके, पांगळे, बहिरे, अनर्गळ। परि जीवापरिस माते वाल्हे आवडते।।**” अशीच श्रीतुकारामहाराजांची साक्ष आहे. श्रीगुरू/भगवंताच्या बाबतीत ही गोष्ट घ्या. व्यावहारिक सिद्धांतापेक्षा कितीतरी पटीनी जास्त सिद्ध आहे ना ! श्रीगुरूकडून साधक आश्वासित झाला; निर्भय झाला, आनंदीत, नाही, आनंदाकार झाला, नाही नाही होतोच तो. आपल्या लाडक्या, लाघवी, अंतरंग शिष्याच्या मनांत जे जे येईल ते ते सर्व श्रीसद्गुरू **मायमाऊलीच्या** रूपातून पूर्ण करतात आणि सत्शिष्याला त्याची प्रचिती वारंवार येत असते; त्याच लक्ष श्रीगुरूचरणावर असेल तर.

भगवत्नाम हीच नौका आणि श्रीसद्गुरू नावाडी. त्यानेच आपला हात धरून एकदा का या नामनौकेत बसविले व तोच नावाडी होऊन ही नामनौका वल्हवू लागल्यावर मग काय प्रश्न? श्रीगुरूंसारखा सुदृढ असा आधार मिळाल्यावर अगदी आंधळ्या, लुळ्या, पांगळ्या, बहिऱ्या, अडाणी, अशक्त अशाही अपंगास भयाचे कारणच नाही. सर्वस्वी एक तो श्रीगुरूच सांभाळत असतो व तोच शेवटपर्यंत सांभाळणार. खर ना ?

एकंदर काय, तर मनुष्य देह, भगवत्दर्शनाची तीव्र इच्छा व ब्रह्मनिष्ठ श्रीगुरूंचा सहवास या तीन गोष्टी मिळावयास फारच कठीण. ईश्वराची श्रीगुरूस्वरूप कृपादृष्टी लाभल्याशिवाय त्या मिळणे असंभवनीय. पण, आपल्याला कार्यावरून कारणाचा बोध होतो. ज्या अर्थी या गोष्टी आपल्या जीवनात घडून आल्या तर त्याचा अर्थ इतका सुस्पष्ट की, ही आपल्या या आणि मागील जन्म-जन्मांतरीची अनंत पुण्याई.

आता या गोष्टी प्राप्त झाल्यावर मग जीवाने परमार्थसाधनेचा कंटाळा करू नये, आळस करू नये, दुय्यम मानू नये. तर ह्या श्रीहरिगुरूकृपेचा पूर्णपणे योग्य उपयोग करून निश्चयाने श्रीगुरूपदिष्टीत साधन (**नामस्मरण**) करावे.

मग काय करावे? तर चित्त **आत्मरत** करून, **मोठ्या** भावभक्तिप्रेमाची

आपल्या अंत:करणांत जोपासना करावी. आपली **सर्व** कर्मे ईश्वरार्पण भावाने करावीत आणि प्रपंचात कर्तव्य-कर्म करत असतांना साक्षीभावाचे अनुसंधान ठेवावे, सतत त्याचे (म्हणजे या साक्षित्वाचे) भान राखावे. अखंड नामस्मरणात डूब देऊन असावे. असा हा साधनमार्ग आहे.

भगवंतास **आपलासा** करण्याचे दोन उपाय. सेवा व साधन. प्रेमभावातूनच तो **आपलासा** होतो. ही **प्रेमभावभक्ती** त्याच्याच **नामस्मरणातून** वाढत असते आणि हे नामस्मरण हीच त्याला आवडणारी सेवा !

* * * *



## चिंतन १५५

सामान्यजनांची कल्पना असते, भगवद्भक्तांविषयी, "**की भक्त ना? भेंड्याची भाजी; बिन कण्याचे.**" पण तस नाही. संतमहात्मे मेणाहून मऊ असतात, पण त्याचबरोबर वज्राहून कठीण वस्तूचा भेद करण्याइतके बलदंड असतात.

श्रीगुरुज्ञानेश्वरमहाराज गोड शब्दात समजाऊन सांगतात त्याचबरोबर परखड शब्दात सुनावण्यास पण मागे सरत नाहीत. आता हेच बघा ना ! भगवान् अर्जुनाला सांगताहेत की, "**तुला जर मी हवा असेन तर तू भक्तिला अंतरता कामा नये.**"

ह्या भगवंताच्या बोलण्याचा अनुवाद श्रीगुरुज्ञानेश्वरमहाराजांनी जरा कडक शब्दांत केला आहे तो असा -

**"एथ पार्था पुढती पुढती। तेचि ते सांगो किती?।**
**जरी मिया चाड तरी भक्ति। न विसंबिजे गा।।"**

"अरे अर्जुना, पुनः पुनः तीच एक गोष्ट तुला कितीवेळा सांगावयाची रे? त्याला काही प्रमाण? आम्ही सांगायचं आणि तू ते कानामागे टाकावयाचस आणि पुनः प्रश्न करायचा, याला काही अर्थ आहे का? तूच खरोखर विचार कर म्हणजे झाल. तुला माझ्या प्राप्तीची जर मनापासून खरोखरचीच इच्छा असेल, तळमळ असेल तर तू माझ्या भक्तिपासून एक क्षणभरसुद्धा मुळीच अंतरता कामा नये."

भक्तिला अजिबात अंतरायचं नाही म्हणजे नेमक काय करायच? तर **"नामाचे अखंड चिंतन-ध्यान आणि त्याचबरोबर भगवत्/श्रीगुरू/आत्मरूपाचे अखंड दर्शन."** या भगवंताकडे घेऊन जाणाऱ्या, थोर भक्तीच्या, भक्तीसोपानाच्या सुरवातीच्या महत्वाच्या पायऱ्या आहेत.

श्रीगुरु ज्ञानोबारायांनी भक्ती न करणाऱ्यांचे खंडन अत्यंत तिखट शब्दांत केले आहे बघा.

भक्तिप्रेमसुखाच्या ठिकाणी कुळाच्या व्यर्थ अशा अभिमानाचा काहीएक लाग लागत नाही; आपल्या कुलीनतेचा पण तेथे काही एक उपयोग नाही; खूप शास्त्राध्ययन करून त्याद्वारा शब्दपांडित्य मिरवले तर ते कुचकामीच. या आणि अशा अहंकाराला खत-पाणी घालणाऱ्या गोष्टी ह्या भक्तिप्रेममार्गात पासंगाला सुद्धा पुऱ्या पडत नाहीत. मग रूप, वय, सत्ता, संपत्ती ह्या तर कस्पटासमानच !

ज्या नगरीत वस्ती नाही; त्या ओसाड नगरीचा काय उपयोग? ज्यात दाणाच भरला नाही अशा कणसाचं काय करावयाच ना? मोराच्या पिसाऱ्यात पिसे किती? त्या प्रत्येक पिसावर एक-एक डोळा! पण त्या डोळ्यांचा दृष्टी म्हणून काहीएक उपयोग आहे का?

तसं भगवंताविषयी एक **प्रेमभक्तिभाव** तेवढा नाही, मग बाकीच सगळ पाल्हाळच. निर्जिव मातीच्या देखाव्यासारखंच.

श्रीगुरुज्ञानाराज माऊली म्हणतात, "एक **भगवंताच्या** भक्तिप्रेम भावाखेरीज बाकी सगळं उदंड आहे"; काय उपयोग त्याचा? पृथ्वीतलावर

दगड काय कमी आहेत? ते बिचारे पाषाण योनितलेच आहेत. पण भक्तिप्रेमाशिवाय मनुष्य म्हणजे मातेच्या उदरी जन्म घेतलेला दगडच.

कडूलिंबाची झाडं त्याच्या फळांनी म्हणजे लिंबोण्यांनी अगदी लगडली; तर त्याचा उपयोग कावळ्यांनाच. तसंच भगवंताच्या प्रेमलक्षणाभावभक्ति-शिवाय असलेलं ऐश्वर्य, सत्ता, लौकिक, कीर्ती हे सगळ सगळ दुर्गुणरूपी कावळ्यासारखंच.

भक्तिचा पाया जर काही असेल तर भगवंताचे/श्रीगुरूंचे ठायी असणारा अपार प्रेमभाव. हा प्रेमभावच नसेल तर मग भक्ती कसली?

काही समाजात (मृत) कलेवराला महायात्रेच्यावेळेपुरतं नखशिखान्त अलंकारांनी सजवतात; किंवा गाढवाला गंगा-यमुना-पुष्कर अशा तीर्थामध्ये अभ्यंगस्नान घातले किंवा कडू दुध्या भोपळा वरून अगदी गुळाने माखला, काय त्याचा उपयोग?

या **प्रेमभावाने** काय होतं म्हणाल तर भगवंताचा/श्रीगुरूंचा विसर पडत नाही. हा **भक्तिप्रेमभाव** कशातून लाभतो? तर भगवंताच्या अमृताहून गोड असणाऱ्या नामाच्या संकीर्तनाने, नामस्मरणांने.

म्हणून साधन एक **नामसाधन.** जस जस नाम आपला श्वासोच्छ्वासच होईल तस तस भावाच बळ, भक्तिप्रेमाच सामर्थ्य, भक्तिप्रेमसुखाच ऐश्वर्य वाढतच जाईल. मग या **भक्तिप्रेमसुखाच्या** ऐश्वर्याला तो लक्ष्मीपती, कुबेर ज्यांचा भांडारी, असा श्रीपती भुलतो.

* * * *

# चिंतन १५६

बघा !!! प्रार्थनेत काय सामर्थ्य आहे ते ??? सगळा प्रवास झाला, अगदी ऐन भर उन्हाच्यावेळी, पण भगवंताची काय योजना, कुठेही उन्हाचा यत्किंचितसुद्धा त्रास झाला नाही. अभाळ होते आणि वावटळीसारखे वारे होते. त्या वावटळीत जीर्ण, सुकलेला पाला-पाचोळा कोठल्याकोठे उडून जातो. आपण सर्वजण त्या पाचोळ्यासारखेच आहोत. सत्ता त्याची आहे. खेळिया सोंगटे, पडलेल्या दानानुसार, आपल्या मनानुसार हलवत असतो. भगवंत खेळिया आहे; आपले-आपले कर्म हे पडणारे-पडलेले दान आहे आणि आपण या विश्वपटावरची सोंगटी आहोत.

केवळ वेदाध्ययनाने, शास्त्रीय ग्रंथाचा अभ्यास केल्याने, अगर अनेक प्रकारच्या तपाचरणाने, किंवा यज्ञभागांनी **देव** आतुडत नाही म्हणजे अनुभवास येत नाही. या आतुडें शब्दाने आपल्या श्रीगुरूज्ञानेश्वर महाराजांनी, फार खोल अर्थ सांगितला आहे. "**आत + उडे = आतुडे.**" म्हणजे भगवंत/देव, या शरीरांतूनच उड्डाण करून बाहेर येतो. म्हणजे गोचर होतो. अनुभवाचा विषय होतो. गुरूदेवांच्या Dichotomy म्हणजे प्रतिकृतीच्याच एका सिद्धांताचा तोच अर्थ आहे. "**अस्मात् शरीरात समुन्याय**" असे आपल्या उपनिषदकारांचेपण म्हणणे आहे.

भगवंताचा साक्षात्कार म्हणजे **बाहेरील** कोणत्यातरी काल्पनिक आकाराचे दर्शन नसून, आपला अंतर्यामी असणारा आत्मारामच, आपण आपणाला निरनिराळ्या प्रकारे अनुभवाला येतो. हा अनुभव इंद्रियातीत असतो. या दिव्य **अनुभवालाच** श्रीगुरूज्ञानोबारायांनी आतुडे असे म्हटले आहे. साक्षात्कार ही आत्मारामाचीच प्रतिकृती. मग सगुण असो अथवा निर्गुण आणि अशी प्रतिकृती होण्यास श्रीगुरूंनी 'एकचि परी' एकच मार्ग आहे असे

सांगितले आहे. तो मार्ग म्हणजे -

**तैसा मी एकीचि परी। आतुडें गा अवधारी।**
**जरी भक्ति येऊनि वरी। चित्ताते गां।।**

या ओवीतील शब्दरचना केवळ शब्दज्ञान्यांना जरा विचित्र वाटण्यासारखी आहे पण, शब्दाच्या अध्यात्मिक अर्थाच्या दृष्टिने ही माऊलीची शब्दरचना अगदी अचूक आहे. नि:संशय बरोबर आहे. भक्ती ही जीव-ब्रह्माच्या, देव-भक्तांच्या ऐक्याची एक नितांत सुंदर रमणीय अशी अवस्था आहे.

चित्त हा अष्टधाप्रकृतीमधला एक अत्यंत महत्वाचा घटक आहे. या चित्ताच्या ठिकाणी चिंतन (चिंता नाही बरं का!) करण्याची अफाट शक्ती आहे. ही शक्ती देह, मन आणि बुद्धी या सर्वांत व्यापलेली आहे. देव-भक्तांच्या, जीव-शिवाच्या एकरमतेची, एकरूपतेची अवस्था चित्ताला व्यापून उरणे म्हणजेच आपले चित्तच **ब्रह्मचैतन्य** म्हणजेच आनंदस्वरूप बनणे, चित्तच कां **आनंदस्वरूप** झाले की त्यातील (म्हणजे चित्तातील) प्रकृतीचे जड दु:खाला कारण असणारे अंश नाहीसे होणे. अशा अवस्थेलाच श्रीगुरुज्ञानोबाराय "**भक्ति येऊनि वरी चित्ताते गां।**" असे म्हणतात.

आत्मारामाची प्रतिकृती (आत्मसाक्षात्कार) आणि चित्ताला होणारी अशा दिव्य **प्रेमभक्तिची** भेट ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळी एकाच शुभमुहूर्तावर होत असतात. म्हणून भगवंताचा साक्षात्कार (मग सगुण असो अथवा निर्गुण) ही जीवा-शिवाच्या, देव-भक्तांच्या, श्रीगुरू-शिष्याच्या दिव्य अशा ऐक्याचीच महन्मंगल अवस्था आहे. नाही कां?

यासाठी संपूर्ण शरणागती हा भक्तिचा मूलभूत घटक आहे. या पूर्ण शरणागतीखेरीज भक्तिच्या या पूर्णावस्थेस पोहोचण्याचा अन्य मार्गच नाही. आकाशातून पडलेले पावसाचे पाणी भूमीवरच पडले पाहिजे; गंगेचा प्रवाह अखेर जसा सागरातच विलीन झाला पाहिजे; सुवर्णमणी सोन्याशीच एकनिष्ठ मिळून राहिला पाहिजे तसा जीव-शिवाशी, शिष्य श्रीगुरूंशी आणि भक्त भगवंताशी एकरूप होऊन राहिला पाहिजे.

आपले ज्ञानोबाराय या संबंधी काय म्हणतात पहा ना!

**तैसें सर्वभावसंभारे। न धरत प्रेम एकसरे।**

**मजमाजी संचरे। मीचि होऊनि।।**

**भक्तिभावाची** पूर्ण व्याख्या करून कोणी मोकळा झालेला दिसत नाही. तशा व्याख्या, सगळ्या वैष्णवांनी, भक्तिसूत्रकारांनी, भक्तिशास्त्रकारांनी खूपच केल्या आहेत. पण, **भक्तिभाव** ही **भावनाच** एवढी तरल, सूक्ष्म, पारदर्शक, अनेक पैलूनी संपन्न आहे. **शोभादर्शक** यंत्रासारखी आहे असे म्हणा हव तर! त्यामुळे शब्दाच्या साच्यात बसवता येत नाही म्हणण्यापेक्षा कोंबता येत नाही हेच म्हणणे जास्त शोभनीय. नाही का?

हं, मात्र हा भक्तिप्रेमभाव निर्माण होण्याचे, वाढतच राहण्याचे आणि तो **भाव** पक्का होण्याचे साधन मात्र एकच ! श्रीगुरूकडून मिळालेल्या **सबीज नामाचे स्मरण**.

* * * *




भक्तिचा पायाभूत घटक जर कोणता म्हणाल तर संपूर्ण शरणागती. उपक्रम, उपसंहार आणि अभ्यास जर कशांत असेल तर तो एका अशा परिपूर्ण शरणागतीतच.

भक्ती म्हणजे **भाव**, अशी एक भक्तीची सुलभ व्याख्या खूपच वैष्णवांनी केली आहे. पण भाव म्हणजे तरी नेमक काय? याची व्याख्या परिपूर्णपणे कोणी केल्याचे दिसत नाही. भाव! दोनच अक्षरी शब्द आहे. अणू जेवढा सूक्ष्म तेवढी त्याची स्फोटक शक्ती जास्त असा विज्ञानाचा सिद्धांत

आहे. भावाचे तसेच आहे. **भावाच्या** अंगी ब्रह्मांडनायकाला वश करण्याची ताकद आहे.

**अनन्यता** हा भावाचा स्थायीभाव आहे. "**पर्जन्याची सुटिका जैसी। धरावांचूनि अनारिसी। गतीचि नेणे।।**" असा पण त्यांनी अनन्यतेचा दाखला दिला आहे. चकोर चंद्राशी, मासोळी पाण्याशी, कासवीची लेकरे कासवीशी, लाटा-पाण्याशी, सुवर्णालंकार सोन्याशी, शिष्य-श्रीगुरुशी तसा भक्त हा भगवंताशी अनन्य आहे.

या भावामध्ये प्रेम, आदर, श्रद्धा, विश्वास, निष्ठा, आपलेपणा, स्नेह, आवड या खेरीज "**आणखी काहीतरी**" आहे, की ते शब्दांनी कथन करता येत नाही आणि या सर्वांचा परिणाम म्हणजे फार तर **भाव म्हणावा**. पण एवढ्याने काही भावाची व्याख्या पूर्ण होत नाही.

अशा भावाने, गंगा जशी अखंडत्वाने सागरातच प्रवेश करते तसा जो भगवंतामध्ये अखंड प्रवेश करतो तो भगवद्रूपच होतो. जशी गंगा सागरच होते.

या भगवंतामध्ये प्रवेश करण्याचे साधन कोणते? त्याचा मार्ग कोणता? त्याची प्रक्रिया कोणती? याचा विचार फार-फार महत्वाचा. नाही कां?

भगवंतामध्ये प्रवेश करण्याचा मार्ग फारच अरूंद. एकेरी मार्ग. एकावेळी एकासच प्रवेश. दुसऱ्याला नाही. एका वेळी दोघ जाण केवळ अशक्यच इतका अरूंद. गुरूदेव म्हणावयाचे **आठव** किंवा नाठव यापैकी एकालाच या मार्गात प्रवेश मिळतो.

**आठव** म्हणजे साक्षात्कारी/आत्मसाक्षात्कारी अशा समर्थ श्रीसद्गुरूंकडून मिळालेल्या सबीज नामाची आठवण. नामाची आठवण हेच **साधन**. मनाच्या मार्गाने, नामाच्या साधनाने, कणाकणाने मिळवत क्षणाक्षणाला पुढे-पुढे भगवंताकडे सरकत मनोमार्गे जायच असते पहा! कुणाच्या संगतीत म्हणाल तर "**संतांचे संगती, मनोमार्ग गति। आकळावा श्रीपती, येणे पंथे।।**" असा हरिपाठात ज्ञानोबारायांनी या मार्गाचा नकाशाच आपल्या हाती दिला आहे.

निर्विकल्प अशा नामाचे स्मरण/ध्यान, **निर्विकल्प मनाने** केल्यास निर्विकल्पांत म्हणजेच भगवंतात/श्रीगुरू स्वरूपात सहजच प्रवेश होतो.

**तैसें सर्वभावसंभारे। न धरत प्रेमएकसरें।**
**मजमाजी संचरें। मिचि होऊनी।।''**

अशा प्रकारे नामसाधना सुरू झाल्यावर मग कणाकणाने आणि क्षणाक्षणाला नामधारक भक्त हा नामी अशा भगवत्स्वरूपालाच प्राप्त होतो आणि तेथे भगवत्स्वरूपच होऊन राहातो.

अशी भगवत्स्वरूपता, असा साक्षात्कार ही एक घटना नसून ती क्रमाक्रमाने होत जाणारी एक दिव्य प्रक्रिया आहे. या प्रक्रियेचा विचार ज्ञानोबा माऊलींनी बाराव्या अध्यायात फार छान केला आहे. ज्ञानोबाराय म्हणतात, **''चित्त मजमाजी रिगतां। हळुहळु पंडुसूता। मीचि होईल।।''**

एका दिवसात जसा कोणी श्रीमंत होत नाही; एका दिवसाच्या अध्ययनाने-अभ्यासाने कोणी पंडित होत नाही; एका दिवसात कोणी आत्मज्ञानी होत नाही, तसा एका दिवसात कोणी ब्रह्मस्वरूप होत नाही. तर भक्त हा हळूहळू भगवद्रूपच होत जातो.

क्षीरसागराच्या काठावरही क्षीरच असते आणि काठावरून आत आत जावे तसे तसे क्षीरच असते ना? क्षीर म्हणजे दूध. तसा नामस्मरणांत आनंदच असतो. मग तो **आनंदच** क्षणाक्षणाला आनंदघन/आनंदस्वरूप होत जातो. Qualitative unity and quantitative plurality असं गुरूदेव म्हणत असत.

सारभाग काय? तर निश्चयाने, नेमाने, कट्टाने, निष्ठेने नामस्मरण करावे. ज्ञानोबाराय **हरिपाठ** शब्दाने हेच सांगतात पहा. मागील स्मरणाची उजळणी व पुढील नामाचा पाठ म्हणजे हरिपाठ.

एवंच् काय, शरणागती, श्रद्धा आणि भक्तिप्रेमभाव यांचा त्रिवेणीसंगम म्हणजे भक्ती. ती अखंड, वाढती-चढती अशी असावी. ती अशी वाढती राहण्याचे साधन म्हणजे **नाम**.

* * * *

# चिंतन १५८

कीर्तन म्हणजे नामस्मरण; नामघोष, या नामगजराच्या आनंदाच्या भरात, नट जसा नाचतो, नर्तक जसा नाचतो, तसाच भक्त पण नाचू लागतो. अशावेळी या भक्ताला नामस्मरणामुळे देहभावाचा विसर पडलेला असतो. तो **आनंदस्वरूपच** झालेला असतो. या आनंदानुभवापुढे समाधिच काय पण महासमाधिचे सुख कुरवंडी करून टाकावे. एवढी ही आनंदस्वरूपता दांडगी आहे, "**समाधिचे सुख सांडा ओवाळुनि। ऐसा या कीर्तनी ब्रह्मरस।।**" असच या **आनंद** स्थितीचे गुणगान श्रीतुकाराम महाराजांनी केले आहे. देहदु:ख संपत नाही; पण जाणवत नाही. श्रीरामकृष्ण परमहंसांना घशाचा कर्करोग, श्रीसमर्थांना पोटशूळ अशा व्यथा होत्या; पण हरिभजनांत रंगल्यामुळे व्यथा दु:ख देऊ शकल्या नाहीत. हा नामस्मरणाचा स्थूलशरीरावर परिणाम, मग १७ तत्वांच्या सूक्ष्म शरीरावर होणार नाही? तर होतोच होतो. "**ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी। भाग्य तरी ऋणी देव ऐसा।।**" बघा काया ब्रह्मरूप होते. एवढेच नाही तर भगवंत, तो लक्ष्मीनाथ ऋणी होतो आणि मग म्हणूनच **अमृतपान** अमृताला पण लाजवते. त्या अमृतपानाची गोडी काय वर्णावी ना? नामामुळेच ह्याला म्हणजे **अमृतपान रसास्वादाला** अवीट सुस्वरूपता लाभते. नाही का?

अशा नामगजरांत, जयघोषांत, नामस्मरणांत वारकरी देहभान/भाव हरपून नाचू लागल्यावर, गुरूदेव एकदा म्हणाले, "**पहा रे पहा, काय मौज आहे, साक्षात् उघडे परब्रह्मच नाचत आहे.**" अशा नामानंदात नाचणाऱ्या, डोलणाऱ्याच्या पाप-पुण्याची होळी होते. मग पश्चात्ताप आणि प्रायश्चित्ताचा तेथे प्रश्नच उरत नाही. आपले श्रीगुरूज्ञानोबाराय काय म्हणतात बघा ना - "**यमदमा अवकळा आणिली। तीर्थे ठायावरूनि उठविलीं। यमलोकीची खुंटिली। राहाटी आघवी।।**"

अशा नामाच्या उत्कर्षाने यम आणि दम दोन्ही निकामी बनले आणि पापाचीच खंडना झाल्याने तीर्थ क्षेत्रांचे महत्वच राहिले नाही. यमदम या भाववाचक शब्दांना मनुष्याच्या रूपकांतून ज्ञानेश्वरमाऊलींनी प्रकट केले आहे. त्यातला **यम** हा मनाशी संबंधित असून **दम** हा इंद्रियांशी संबंधित आहे. यम म्हणजे मनाचे नियमन. श्रीगुरूंनी दिलेल्या सबीज नामाची, **केवळ श्रीसद्‌गुरूंच्या** आज्ञेप्रमाणे **आनंदाने** (विश्वासाने, प्रेमाने, निष्ठेने, आत्मीयतेने) नामसाधना केली की मनातील संकल्प विकल्पच नाहीसे होतात; मनाचे स्वरूपच बदलते. मन **आत्मानंदात** मावळते. मग यम म्हणजे नियमन करण्यासारखे मनांत काही राहतच नाही. त्याचप्रमाणे दमाचे. भगवंतच मग नामधारकाचा विषय बनतो.

लोकांचे तीर्थागमन कशासाठी असते? तर पाप, ऋण, रोगादी दारिद्र्य यांच्या विमोचनासाठी. नाही का? आनंदाने नामघोष करू लागल्यावर ही मंडळी कशाला तेथे राहतात? मग तीर्थाचा तीर्थपणा अर्थात् त्याचे महत्वच उरत नाही. गुरूदेव २० वर्षे अलाहाबादला होते, पण त्रिवेणीचे स्नानास गेले नाहीत. "**सकळही तीर्थ घडवी आम्हा, आदि करूनी काशी**" कशांत? कोठे? तर एका नामस्मरण **तीर्थात**. ज्ञानराजमाऊली पण म्हणते नामघोष, नामकीर्तन होत असतांना तीर्थास जायची आवश्यकता नाही.

एक नामरहस्य तुम्हाला अनुभवातून सांगतो. अशा नामस्मरणाने, अर्थातच श्रीसद्‌गुरूंकडून मिळालेल्या नामाच्या साधनाने. साधकाचे विश्व म्हणजे हा देह. या देहाची अध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक दुःखे दूर होतात. याचा खरा अर्थ दुःखाचे प्रसंग नाहीसे होतात असा नव्हे बर कां! तर नामस्मरण करणाऱ्या भक्ताचे मन, बुद्धी आणि चित्त, भगवंताच्या नामांत म्हणजे **भगवंतातच/श्रीगुरूस्वरूपातच** एकरूप झाल्याने, या देहास होणाऱ्या वेदना मनापर्यंत पोहोचतच नाहीत. "**ते पोट आहे, तर दुखणारच.**"

या नामसाधनेने व्यक्तिचे तर परमकलयण होतेच होते पण, विश्वाचेसुद्धा कल्याण होते. ज्ञानोबाराय म्हणतात, "**अवघें जगचि महासुखें। दुमदुमित**

**भरले।।''** आपण नामसाधन करीत रहावे, म्हणजे जगांत कोठेतरी, कोणाचे तरी चांगलेच होते. नामस्मरणामुळे आत्मभावांत वावरणाऱ्या नामसाधकास सगळीकडे स्वानंदघन आनंदकंदाचाच भावानुभव येत असल्याने विश्वात आनंदच भरल्याचा अनुभव येतो.

नामधारकाला/भक्ताला अतींद्रिय आणि निसर्गाच्या सर्वसामान्य नियमाच्या पलीकडील अनुभव येतात! प्रकाश रूप वगैरे! होय की नाही? नामामृताबद्दल आणि त्याच्या परिणामांविषयी एक सांगतो, **''घरी जेवू नको; बाहेर खाऊ नको; आणि जेवल्याशिवाय तर राहू नको.''** याचा अर्थ एवढाच की नामामृताने पोट भरल्यासारखी तृप्ती येते. तीन तास कट्टाने नाम घेतल्यास एक छटाक तूप अगर अर्धाशेर दूध प्यायल्यासारखे होते. या अमृताला इंग्रजी भाषेत "Ambrosial Juice" असं म्हणतात. मग पोट दुखी ती काय? नाही का?

नामाशिवाय आपणाला दुसरे काही कळत नाही, येत नाही, याव, कळाव अस वाटत नाही. तेव्हा अनुभवांतून पुन: पुन: सांगतो. नामाला विसरू नका.

* * * *



# चिंतन १५९

कोणी एक मृत्यू पावतो त्याच्याबद्दल आपुलकीने दुसरा रडतो. परंतु असा रडणाराही आपण स्वत: या मरण्याचे रांगेत उभे आहोत हे कुणी लक्षातच घेत नाही. आकाराला आलेले सगळे या एकाच मार्गाने जावयाचे. त्यातून कोणाचीही, अगदी कोणाचीही सुटका होत नाही. कोणी जात्यात तर कोणी सुपात असतो इतकेच. तेव्हा मरणाचा शोक करण्यात/मानण्यात अर्थ नसतो. प्राप्त परिस्थितीला **समाधानाने** आणि मोठ्या **शांतपणे** तोंड देत

आपले कर्तव्य करीत राहणे हेच इष्ट असते. अन्त्येष्टीच्या विधीतहि मरणाराच्या नावाने रडू नये असा धर्मशास्त्राचा आदेश आहे.

माणूस योग्यतेचा असला, त्याच्याशी जिव्हाळ्याचे संबंध/नाते असले की त्याच्या मृत्यूने दु:ख हे होणारच; आणि ते अगदी स्वाभाविक आहे; पण योग्य नाही ते शोक करणें. शोकाच मूळ लोभात आहे; आणि शोकाची परिणती तर क्षोभात होते. प्रारब्धानुसार घडावयाच्या गोष्टी घडतच असतात. तेव्हा आत्मीयतेपोटी दु:ख होणे नैसर्गिक असले तरी शोक होतो तो मात्र अपेक्षेपोटी, आसक्तिपोटी, अविवेकापोटी. जन्ममृत्यूचे चक्र मागे लागते ते यामुळेच.

शोक ही दु:खाची स्वाभाविक परिणती नसून तो लोभ-मोहाचा परिणाम आहे. आपणास वाटते **"प्रेम-जिव्हाळा"** असो ही जर चांगली गोष्ट आहे तर त्यातून वियोगामुळे शोक हा निर्माण होणारच. पण ते योग्य नव्हे. दया काय, वात्सल्य काय, प्रेमभाव काय हे सन्माननीय सद्‌गुणच आहेत. पण ते तद्‌विषयक लोभामुळे आपत्तीजनक ठरतात.

सर्व जगत् ही एक मृत्यूभूमी आहे; असा संदेश स्वत: समर्थांनी मनोबोधात मांडला/दिला आहे. **"मरणं प्रकृति: शरीरिणाम्"** हाच या मृत्यूलोकातला नियम आहे. पण आपण माणसे जणू अमरपट्टा घेऊन आल्यासारखे वागतो ना? एक तत्व नेहमीच डोळ्यासमोर सातत्याने ठेवा. माणसाने स्वत:ला **चिरंजीव**, अमर, अज मानून वागावे पण केव्हा तर आत्मज्ञान मिळवताना, साधना करताना, परमार्थ करताना, श्रीगुरूसेवा करताना; आत्मज्ञानाची फळे अनुभवावयाची-चाखावयाची ती **"याचि देही याचि डोळा."** पण साधनाची (**नामसाधनाची**) तांतडी करतांना मात्र मृत्यूने शेंडी पकडली आहे, हिसडा मारून केव्हा घेऊन जाईल ते सांगता येत नाही, हीच भावना डोळ्यासमोर ठेवून; ह्याचे भान राखून.

सत्ता, संपत्ती, लौकिक, ऐश्वर्य यांचा कितीही संग्रह केला असला तरी त्यांचा त्याग घडून अकस्मात् निघून जावे लागते. नाही का? कृतकर्माशिवाय

काहीही, कोणीही बरोबर येत नाही. म्हणून तर सगळ्या संतांचा एकच आग्रह सदाचाराने वागा. सदाचार म्हणजे सत् वस्तू-परमात्म वस्तू. भगवंताकडे नेणारा उपचार. यासाठी एक फक्त भगवंत/श्रीगुरूच अविनाशी आहे, हे लक्षात ठेवून वागणे हेच आपल्या परम कल्याणाचे आहे.

नामसाधनेने भगवंताला/श्रीगुरूला आपलेस केल, तरच तरणोपाय आहे; अन्यथा या मृत्यूलोकातील वावरणें हे पेटलेल्या वणव्यांत सापडल्यासारखे आहे. काळाची उडी पडत असतांना, आपल्याला भगवंतावाचून कोण वाचवणार? आणि त्याच स्मरण करत राहिल्यावर तो आपल्याला "**आत्मबोधाच्या**" पिंजऱ्यांत ठेवून, आपल्याला "जन्म-मृत्यूच्या" भयांतून, बंधनांतून सोडवतोच सोडवतो. आता पंचभूतांचा देह हा पडणारच. अगदी नाम घेता घेता नामाशी/भगवंताशी एकरूप झालेल्याचा सुद्धा. पण मग तो नामधारक देहाला **टा–टा** करतो कसा? तर आईच्या खांद्यावर पडलेला, कडेवर असलेला लहान मुलगा, पाहुण्यांस टा-टा करतो तसा.

संतांचा हा उपदेश, सांगणे, आपल्यापैकी पुष्कळांना न आवडणार आहे! तरी पण ते पूर्णपणे यथार्थ आहे. अगदी त्रिवार सत्य आहे. हे बोलणे आपल्या परम कल्याणाचेच आहे.

नामस्मरणाने मरणाचासुद्धा '**सोहळा**' होतो. "**आपुलें मरण पाहिले म्या डोळां। तो सुख सोहळा अनुपम्य।।**" पण, कशामुळे ? तर श्रीतुकोबाराय अनुभवांतून सांगतात, "**कौतुक वाटें झालिया वेचाचे। नाम मंगलाचें तेणें गुणें।।**" आणिक काय सांगू, नाम सोडू नका.

* * * *

# चिंतन १६०

असणे आणि नसणे ह्या मर्त्य मानवाच्या मर्त्य अनुभव कल्पना आहेत. आकार-देह हा मर्त्यच आहे; पण आत्मा-परमात्मा हा असण्या-नसण्याच्या पलिकडे आहे. हा आत्माराम जिथे जिथे आहे, तिथे तो तसाच आहे. आकार हा आपल्या दृष्टीच्या पलिकडे कधी ना कधी जातोच जातो. तो सातत्याने आपल्या दृष्टीचा विषय होऊन राहूच शकत नाही. मर्त्य मानवाकाराचे काय, परब्रह्माची अवताररूपे चैतन्यघन असूनसुद्धा काळाच्या पडद्याआड जातात. जावेच लागते.

झरा झुळूझुळू वहात असतो तेव्हा आपल्याला पाणी दिसते. निर्मळ स्वरूपात ते पाणी वाहत असते. परंतु कडक उन्हामुळे, दीर्घ अवर्षणामुळे जर उद्या किंवा काळाच्या ओघांत केव्हातरी तो झरा आटला तर पाणी नष्ट होते का? तर नाही. मग? झऱ्यातले पाणी आपल्या ठिकाणी आटले इतकेच वास्तव. परंतु ते पाणी दिसत नसले; वाहण्याचे थांबले असले तरी नष्ट झाले नाही. पाणी जसे जसे वाहत असेल, ज्या ज्या ठिकाणी असेल तशी त्याला वेगवेगळी नांवे आहेत. नाही का? झरा, विहीर, नदी, ओढा, नाला, नद, समुद्र, महासमुद्र. परंतु पाणी एकच. तसेच देह अनेक, नाते संबंध अनेकानेक; पण सगळ्यांच्यातला आत्माराम एकच; आणि तो पण नित्य, सर्वगत, स्थाणू, अचल आणि सनातन.

पाणी जेव्हा आटते, तेव्हा एक तर जमीनीत मुरलेले तरी असते किंवा त्याची वाफ होऊन वर आकाशाच्या पोकळीत बाष्प रूपाने तरी असतेच असते. पण पाणी काही नष्ट होत नाही; आपल्या नजरेला ते दिसत नाही इतकेच. तसेच आत्मारामाचे स्वरूप आहे.

म्हणून आपली दृष्टी आकारावर स्थिर न करता, नाना आकारात (जरी ते

नाहीसे झाले तरी) असणाऱ्या आत्मतत्वावर स्थिर करावयाची आहे. आत्माराम जरी नजरेला (स्थूल चर्म दृष्टीला) दिसत नाही म्हणून त्याचे अस्तित्व नाकारता येत नाही. त्याचे अस्तित्व, आकार, निरपेक्ष, स्वयंसिद्ध आणि स्वयंपूर्ण आहे. सुवर्णालंकार सोन्याशिवाय असूच शकत नाही; पण सोने अलंकाराशिवाय असतेच ना? तसा देह हा चैतन्याशिवाय असूच शकत नाही; पण देहाकार नसला तरी चैतन्याचा नाश होत नाही. गीता-उपनिषदे-षड्दर्शने-संतसाहित्य आपल्याला काय शिकवते ? आकारावर नको तर आत्मारामावर ज्ञान-दृष्टी स्थिर करा.

वरच्या पाण्याच्या दाखल्यानुसार पाणी, आकाश हे जसे आपल्या असणेपणाने सिद्धच आहेत. तसा हा आत्मारामसुद्धा आपल्या असणेपणानेच स्वयंसिद्ध-अमृतस्वरूप आहेच ना? आत्मारामाचे रूप आणि **स्वरूप** असते. **देहरूपाने नटलेला** असतांना तर तो आहेच, आणि देहाकार नष्ट झाला तरी तो नष्ट न होता त्याचे रूप (बाह्य) बदंलते इतकेच.

हं, आणि हे बदललेले बाह्य रूप बाकीच्या रूपांना कळत नाही. हे खरं, आणि कळत नाही हेच किती छान नाही का? जर हे कळले असते तर ह्या सृष्टीच्या दैनंदिन जीवनांत तसेच व्यक्तीजीवनांत मोठाच अनर्थ ओढवला असता नाही का? जरा विचार करा ना! या रूपाचे-आकाराचे नाहीपण इतके सांडते-हरवते-नाहीसे झाल्यासारखे वाटते की ते आपल्या, माणसाच्या, नजरेच्या टप्प्याबाहेर जाते.

आत्माराम देहांत असतांनासुद्धा देहाकाराच्या मर्यादेच्या कुंपणात कधीच अडकत नाही. झाडांच्या फांद्यामधून दिसणारा चंद्र, झाडांच्या फांद्यांत अडकल्यासारखा वाटतो; पण तो केवळ भास असतो. तसा आत्मा शरीरांत नांदतो अस वाटल तरी तो शरीरात अडकला का? शरीराने बद्ध मर्यादित झाला का? म्हणजेच काय तर मुळी आत्मारामाचे स्व-रूप **आहे** आणि **नाही** त्याच्या पलिकडील आहे.

सूर्याला कुठे ठाऊक आहे की आपल्यापाशी प्रकाश आहे! आत्माराम हा

सदैव आहे. जागा आहे. सुस्वरूप-आनंदघन-स्वयंप्रकाश आहे. थोडक्यात काय तर, अस्तित्वाची जाणीव होत नसली तरी **अस्तित्व** नाही असे म्हणताच येत नाही. अस्तित्व हे आपल्या नित्यसिद्ध अस्तित्वाने सदैव नांदतच असते. फक्त मर्त्य जीवाला त्याची जाणीव नसते एवढेच.

हे आत्मारामाचे नित्यसिद्ध अस्तित्व आणि देहाकाराचे नश्वरत्व नामाने कळते. नाम आपल्याला आत्मारामाचे स्वरूप आत्मारामाचेच ठिकाणी आणि देहाचे रूप देहाच्याच ठिकाणी पहावयास शिकवते आणि हे ज्ञान वस्तूस्थिती कळल्यावर दुःख कुठे, कशाचे आणि कसे उरणार ना? म्हणून दुःख संपण्याचा एकमेव निश्चित फळपर्यवसायी उपाय म्हणजे ‘‘**नाम**’’

* * * *




अध्यात्मशास्त्रात आत्मसाक्षात्काराला एक अत्युच्च्य आगळे असे महत्व आहे. हा आत्मसाक्षात्कार अनुभूतिशास्त्रातील उच्चतम अशी अनुभूती आहे. ज्या अनुभूतीनंतर अनुभवायचे काही उरतच नाही अशा अनुभवामध्ये अनुभव, अनुभाव्य आणि अनुभाविता ही त्रिपुटीच नसते. ‘‘**देव पहावया गेलो। तेथे देवचि होऊनि ठेलो।।**’’ असा रोखठोक अनुभव श्रीतुकोबारायांचा आहे. तर ‘‘**पहावा पाहणें दूरी सारोनिया।**’’ असा श्रीगुरूज्ञानोबारायांचा रोकडा आत्मविश्वास. एक गोपी पण सांगते आहे ‘‘**लाला को देखी तो मैं ही हो गयी लाल।**’’

ह्यासाठी आपल्या बुद्धीला वैराग्याच्या (वैताग नाही) बळाची जोड द्यावी. वैराग्य म्हणजे वाया, वृथा, नाशीवंत जे आहे त्याचा राग आणि वीतराग म्हणजे संताप नाही तर ‘‘**नावड.**’’ अशा बुद्धिच्या सहाय्याने, मी म्हणजे देह हा देहाहंकार सोडून, अंतर्मुख होऊन अंतर्निरीक्षण करावे; त्याच्या बरोबर

सारासार विवेकाच्या मदतीने आपल्या मन आणि बुद्धिचा निश्चय करून आपल्या श्रीसद्‌गुरूंनी दिलेल्या नामाचे मनन म्हणजे मन, मन म्हणून उरणार नाही अशा रितीनें चित्तांत स्मरण करावे आणि हृदयांत ध्यान करावे.

असा नामाचा ध्यास लागला की तेथे भगवंत आणि भक्त/श्रीसद्‌गुरू आणि प्रिय सत्‌शिष्य यांचे ऐक्य झालेले असते. अशा देवभक्तांच्या अभेद ऐक्यालाच अध्यात्म शास्त्रकारांनी आत्मज्ञान म्हणले आहे.

असे आत्मज्ञान होताच नाम, नामी व नामधारक एकरूप होतात. मनालाच रामरूपता लाभते. **''मन हे राम झाले, मन हें राम झालें''** साधक आणि साध्य यात भिन्नता राहत नाही. या अवस्थेत आपल्या जाणीवेशिवाय **नाम** आपोआप अखंड चालत रहाते. अशी मीपण नसलेल्या अवस्थेत अनुभवाला येणारा **आनंद** हेच आपले निजस्वरूप, हाच **स्वरूपानंद**. हीच आपली स्वरूपस्थिती. अस स्वरूपदर्शन, स्वरूपानुभूती म्हणजेच आत्मसाक्षात्कार.

आरशांत आपल्याला आपले दिसणारे प्रतिबिंब म्हणजे स्वरूपदर्शन नव्हे. ज्ञानोबाराय म्हणतात -

**परि दर्पणाचेनि आधारे। एकचि करून दुसरें।**

**मुख पाहाती गव्हारे। तैसे नको हो।।**

आरसाही खोटा, पाहणाराही खोटा आणि आरशांतील रूप ही खोटे नाही का? आरसा नसला तरी स्वरूप आहे. असला तरी स्वरूप आहेच. आरशाने स्वरूपाची उपलब्धी नाही. स्वरूपाची उपलब्धी स्वयंभू, स्वयंप्रकाश आणि स्वसंवेद्य आहे.

मग **स्वरूप-स्वानंद** कशाला म्हणावयाचे? आत्मस्वरूपाचे स्पष्टिकरण करत असताना,

**आपणेचि आपणयाने। पाहिजे जै अद्वैते।**

**तें ऐसे होय निरूते। बोलीजत असे।।**

**जे पाहिजतेवीण पाहिजे। काही नेणणाचि जाणिजे।**

**आद्यपुरूष म्हणिजे। जया ठायातें।।**

म्हणजे ''**आपणेचि**'' आपणाप्रमाणे पाहाणे. पण आपले हे स्वरूप कसे असते याचा खुलासा त्यांनी ''**जे अद्वैते**'' या शब्दांनी केला आहे.

अद्वैत, अभेद याचाच दुसरा अर्थ म्हणजे ज्ञाता आणि ज्ञेयाच्या, (भक्तिच्या भाषेत भगवान आणि भक्त) ऐक्याच्या अवस्थेत साधक आपले निजस्वरूप आपले आपण पाहू शकतो. अशा अनुभवाच्या वेळी पाहणारा मुळीच नसतो. म्हणजे आपण पाहतो आहोत अशी जाणीवच तेथे नसते. (मी नाम घेत आहे अशी जाणीवच नसते पण नाम चालू असते) ''**राम हमारा जप करें हम बैठे आराम।**'' असं कबीरमहाराज सांगतात.

असं चालणारं नाम, अशी नाममयस्थिती म्हणजेच आत्मसाक्षात्कार. आत्मदर्शन.

नामाने अनुभवास येणाऱ्या अशा **स्वरूपानंदात** द्वैतभाषेचा, द्वैतभावनेचा, द्वैतबुद्धिचा आत्यंतिक लोप होतो. नामधारक **आनंदस्वरूप** होतो. ही आनंदस्वरूपता **अनिर्वचनीय** असते. म्हणजे मुक्याने गूळ खाल्ला तरी तो गोऽऽड आहे असे त्याला सांगता येत नाही.

तसे देव-भक्ताचे/श्रीगुरू-शिष्याचे/आत्मा-परमात्मा यांचे ऐक्य आहे. सुख-आनंद आहे. ''**ते सुख काय सांगो। वाचे बोलता नये।।**'' मग दर्शन, स्पर्शन, संभाषण, आलिंगन काहीही असो, अगदी ''**चहू भूजी आलिंगन**''. ज्ञानदेव म्हणतात तसे केवळ अनिर्वचनीय.

* * * *

# चिंतन १६२

भक्ति म्हणजे काय? मुख्य म्हणजे भक्तीची जडण-घडण व वाढ ही बुद्धीबलाने होत नाही; तर अकृत्रिम भावाने केल्या जाणाऱ्या अंत:करणाच्या प्रेमभावाने होत असते. पण, म्हणून भावनांचा खळखळाट करण हीपण भक्ती होत नाही. तसेच आपल्या हृदयात प्रेमभाव नसतांना काहीतरी कृती, अभिनय करण ही भक्ति होत नाही. भोळसटपणे, आंधळेपणाने काहीतरी करणं म्हणजे पण भक्ति नव्हे.

भक्तियोग/मार्ग हा परमात्मप्राप्तीचा सर्वात सुलभ उपाय आहे. भगवंतावरील दृढ श्रद्धेने त्याच्या प्राप्तिसाठी अंत:करणाच्या सर्व भावना **त्याच्या ठिकाणी** एककेंद्रित करून, प्रज्वलित करून त्या परमप्रेमास्पद सर्वेश्वराची, नित्यनेमाने, चढत्या-वाढत्या नित्य उल्हासाने, सद्‌भावपूर्ण होणारी उपासना म्हणजे भक्ती. या भक्तीभावगंगेमध्ये अधिकाधिक अवगाहन करता येण्यासाठी केलेली साधनाच भक्ती प्रेमलक्षणा भक्ति स्वरूप होते.

भगवंताचा उत्तम, श्रेष्ठ, प्रिय, अंतरंग भक्त होण्यासाठी, शारीरिक पात्रतेची, कुशाग्रबुद्धीची, वयाची, उत्तम कुळाची, जातीची, शिक्षणाची, आर्थिक स्वास्थ्याची कोणतीच अट--पात्रता लागत नाही. भक्ती सिद्ध होण्यासाठी घर, दारा-सुत, नोकरी-धंदा-व्यवसाय यांचा त्याग करून रानावनात जाण्याची मुळीच आवश्यकता नाही. असाल तेथे, असाल तसे आणि **आहे त्याच** परीस्थितीत भक्तिसाधना करता येते! कौटुंबिक विरोध, जननिंदा व प्रतिकूल परिस्थिती यामुळे अडथळे येतील, निरूत्साह वाटेल, ही वाट सोडूनच द्यावी असे वाटेल खरे पण, **मन खंबीर** ठेवावे लागते. मनोनिग्रहानेच **बळ** वाढते, निर्भयता येते व भक्ति एकप्रवाही आणि दृढ होते अशी एकप्रवाही दृढ भक्ति साधकाला परमपदापर्यंत नेते.

निष्काम भक्ति आपल्या जीवनाच्या सर्व कक्षात केव्हा मुरते, दृढ होते? जेव्हा आत्मनिवेदन तथा आत्मसमर्पण नि:शेषपणे घडते तेव्हा. तसे झाल्याशिवाय भक्तीला गोडवा-रसता-मधुरता प्राप्त होत नाही. निर्मलता, एकाग्रता, समर्पितता, एकविधता ज्या वेळी स्थायी भावाने नांदतात, तेंव्हा मग भक्ति निष्काम-निश्चल दृढ आणि रसाने ओथंबलेली रसाळ अशी होते. **अमृतस्वरूपा** होते. त्यासाठी आपण आपले आचार, विचार, प्रेरणा, भावभावना, आशा-आकांक्षा सर्व काही भगवद्अर्पण अथवा भगवंताच्या आपल्या प्रिय देवाच्या/श्रीगुरूंच्या संबंधित केले पाहिजेत. थोडक्यात म्हणजे **"मी-माझे"** गळून पडले पाहिजे व **"तोच-त्याचे"** हे उगवले पाहिजे.

अशा भक्तिप्रेमासाठी ब्रह्माला सगुण-साकार व्हावे लागते; आणि तसे ते सगुण-साकार होते बर कां! या भक्तिप्रेमसुधेची गोडीच एवढी अवीट आहे नां की तिचा रसास्वाद-अमृतपान करण्यासाठी, घेण्यासाठी ब्रह्मच साक्षात सगुण (म्हणजे त्रिगुणात्मक नव्हे तर षड्ैश्वर्ययुक्त) होते/झाले. स्वत: प्रेममय-प्रेमस्वरूप झाले. एवढे मोठे भगवत्पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्य, पण पंढरीस गेले असतांना समचरण, साजिरा, गोजिरा, घवघवीत-घनसावळा, पांडूरंग पाहून म्हणाले; अगदी सहजोद्गार निघाले त्यांच्या मुखातून **"परब्रह्म-लिङ्गं भजे पाण्डुरंगम्"** नामदेवराय सांगतात **"या सुखाकारणे देव लांचावला। वैकुंठ सोडूनि भक्ताघरी धावला।।"** भगवंताला भक्ताच्या भक्तीप्रेमसुखाची आवड आणि भक्ताला अगदी तशीच भगवंताच्या प्रेमसुखाची. श्रीरामकृष्णपरमहंस तर नेहमीच म्हणत असत; **"जगदंबे, मला निश्चल, जड अशी गोड साखर व्हावयाचे नाही तर ती साखर (म्हणजे परमप्रेमलक्षणा अमृता भक्ती) चाखणारा असा तुझा भक्तच राहू दे!"**

काय गंमत आहे बघा नां! परमभक्त आपल्याला श्रीहरीचा नगण्य दासच म्हणवितो. पण दास कोण आणि स्वामी कोण असा पेचच/प्रश्नच पडतो. परमात्म्याला अजित म्हणतात. पण आश्चर्यातील आश्चर्य असे की अजित भगवंत स्वत:स दास म्हणविणाऱ्या परमभक्ताकडूनच जिंकला जातो आणि अशा भक्ताचा दास नाही तर दासानुदास होऊन राहतो. आमच्या **जनाईने**

ह्याला कोंडून ठेवला नां! कशाने? तर "**प्रेमे बांधोनिया दोर.**"

सारांश "**हरिभक्ती–हरिप्रेमा**" या एकाच मंगल, उदात्त, निर्मळ आणि दिव्यातिदिव्य भक्तीप्रेमभावामध्ये भक्तिच्या उत्कट महाभावावेशामध्ये समग्र शास्त्राभ्यास, सगळे ब्रह्मज्ञान, सर्वंकश योगसाधना, निर्विकल्प समाधिस्थिती आणि कितीतरी सर्वच्या सर्व काही वितळून जाते, विरघळून जाते. **परमप्रेमस्वरूप** होते. म्हणून तर नारदासारखे भक्ताचार्य म्हणाले "**परमप्रेमरूपा–अमृतस्वरूपा च।**"

"**रसो वै स:**" म्हणजे ते अनिर्वाच्य ब्रह्म तर्कशुष्क नसून, रसमय, चिन्मय, आनंदमय आणि अमृतमय आहे, असे जे श्रुतीमातेने म्हटले आहे ते नि:संशय **परमप्रेमामृताने** ओथंबणाऱ्या परा–परमप्रेमलक्षा अशा भक्तिविषयीच. कारण या अशा **निर्व्याज**, निष्कपट, निरामय, निर्मळ भक्तिप्रेमभावामुळे **ब्रह्मचैतन्य** सुद्धा, अमृतमय, सुशांत होते. अशा भक्तिप्रेमाचा चिन्मय झरा आपल्या हृदयात–अविरत वाहू लागण्याचे साधन एकच – "**गोड तुझे रूप, गोड तुझे नाम। देई मज प्रेम सर्वकाळ।।**"

****



# चिंतन १६३

भक्तीचा विचार करतांना किंवा भक्तीच्या विविध छटांचा विचार करतांना एक गोष्ट सातत्याने आणि प्रभावितपणे सहज लक्षात येते, की छटा कोणती पण असो; भाव **एकच**. उदाहरणार्थ शरणागती. शरणागती म्हणजे दुसरे तिसरे काही नाही तर **सख्य** भक्ति म्हणजेच शरणागती. त्यांत भगवंत/देव/श्रीगुरू करील ते मानावे, त्यांचे मनोगत तेच आपले असावे, हा भाग, हा भाव भक्ताकडे/साधकाकडे. (**Thy will be done**) भक्ताने त्याच्या इच्छेने वर्तावे. नामस्मरण हा भक्तीतला क्रियात्मक (Active) भाग आहे.

देव कृपेचा सागर आहे, दयेचा जलधर आहे, तो भक्ताला विसरणार नाही; आणि विसरत पण नाही; पण याच बरोबर भक्ताच्या कर्तव्याबरोबर त्याच्या भगवंताकडून काही अपेक्षाही असतात. त्यांची परिपूर्ती ज्या ज्या प्रमाणांत होत जाते, त्या त्या प्रमाणांत शरणागती अधिकाधिक अनन्य होते, वाढत जाते, सूक्ष्मातिसूक्ष्म होत जाते.

मग अशा घट्ट शरणागतीतून या अपेक्षाही अध्यात्मिक्र गुणवत्तेच्या दृष्टीने वाढतच जातात/बदलत जातात. प्रथम-प्रथम प्रापंचिक अडचणीतून, देह-दु:खापासून सुटणे, मग भाव-भक्ति-प्रेम भावना वाढती चढती व्हावी अशा बदलत-बदलत एक **भक्तीप्रेमसुखभावाचीच** अपेक्षा वाढीस लागते.

अगदी टोकापर्यंत शिल्लक राहणारी आणि अपेक्षेनुसार मिळाले तरी कधीच पूर्ण न होता वाढतच जाणारी अपेक्षा एकचं असते. ती म्हणजे भगवंतावर-देवावर-श्रीगुरूंवर आपले परमप्रेम असावे; आणि त्यांचेपण आपल्यावर तितकेच गाढ, अत्यंतिक, भक्तिप्रेम असावे हीच. श्रीतुकाराम महाराज देवाजवळ हेच वारंवार मागतात "**प्रेम सुख देई। प्रेम सुख देई। प्रेमेंविण नाही समाधान।।**"

एका **भक्तिप्रेमभावात** सर्व काही अंतर्भूत आहे. हे जाणवूं लागते; कळूं लागते आणि मग हा भक्तिप्रेमभाव चढता-वाढता असा प्रत्यक्ष अनुभवास यावयास लागतो. येथे शरणागती पूर्णतेला गेलेली असते. या शरणागतीत **मी** जातो आणि उरतो तो फक्त **भगवंत/देव/श्रीगुरू.** शरणागती ही एकांगी नसते; तशी केवळ (Passive) ही (सहन करणे ही) नसते. ही शरणागति मानसशास्त्राच्या नियमांना धरूनच असते. गुरूदेव असं म्हणत, "**Man is a psychological animal not merely rational**" म्हणजे मनुष्य हा मन:प्रधान प्राणी आहे; तो केवळ बुद्धिप्रधान नाही. त्याचे जीवन **भावनामय** आहे; म्हणून **भक्तिप्रेमभाव** हा बुद्धिप्रधान नाही तर तेथे **भावप्राधान्यच** अत्यंत मूल्यवान आहे. होय नां?

म्हणून भक्तिशास्त्रात भगवंतापेक्षा त्याचे **नाम** नामापेक्षा नामाविषयी/

भगवंताविषयी **भावबुद्धी** आणि या भावबुद्धिपेक्षा भक्ताला सातत्याने येणारा **भावानुभव, भावावेष** हा चढत्या-वाढत्या प्रमाणात श्रेष्ठ-श्रेष्ठतम आहे.

दुसऱ्या एका अंगानेही अशा शरणागतीचा विचार फार महत्वाचा. आनंदाच्या-आनंदानुभवाच्या प्रमाणातच शरणागती वाढत जाणार; हे अगदी स्वाभाविक आणि उघड आहे. हे मानवी स्वभावाला धरूनच आहे.

या शरणागतीतच शुद्ध परमानंद; विशुद्धप्रेमभाव; अत्यंत निर्मळ अशी भक्तिप्रेमसुखाची आनंदानुभूती. भक्तीशास्त्राच्या दृष्टीने ही आनंदप्राप्ती हीच जीवन साफल्यता. हीच श्रेष्ठतम जीवनमूल्ये.

असं पहा, असा परमानंदाचा/परमसुखाचा ''**अनुभव**'' येऊ लागल्यावर मग ''**मला अत्यंत आनंद झाला**'' ''**मी आनंदरूपता अनुभवत आहे**'' यातूनच ''**कृतज्ञता**'', उपकृती उदयास येते.

या कृतज्ञतेतून, उपकृतीतूनच शरणागती म्हणजेच सख्य भक्तिचा जास्तीत जास्त विकास होऊ लागतो. नाही कां? यातूनच पूजा, अर्चा, सेवा, दास्य या साऱ्यांचा उगम होतो.

साधा-भोळा शेतकरी ''**धरतीमातेने कृपा केली, पावसाने कृपा केली**'' अशी भाषा जर निसर्गाविषयी करतो तर मग भगवंत तर चैतन्यघन, प्रेममूर्ती, प्रेमस्वरूप आहे. श्रीगुरू तर काय या सगळ्यांचे चालते-बोलते स्वरूपच ! मग दिवसेंदिवस त्याच्याविषयी विकसित-वृद्धिंगत होणारा **भक्तिप्रेमभाव,** की जो त्याला आनंदच देतो. आनंदस्वरूप करून सोडतो; वाढतच जाणार नां!

* * * *

# चिंतन १६४

देव हा बुद्धिला कळत नाही; तर त्याचे आकलन, नुसते आकलनच नाही तर लाभ हा भक्तीप्रेमभावाला होत असतो. या प्रमेयाचा विचार करत असतांना त्यात (Metaphysics of Mysticism) म्हणजे साक्षात्काराचे तत्वज्ञान अंतर्भूत आहे हे लक्षात यावयास हवे. एक मूलभूत सिद्धांत आहे. साध्य हे नेहमीच साधनांतच सामावलेले असते. आपली बुद्धि आपल्याला द्वैताचे ज्ञान देते.

ईश्वराच्या साक्षात्कारांत ईश्वरच व्हावयाचे आहे/असते. आपल्या बुद्धीला भगवंताच्या/ईश्वराच्या गुणांचे ज्ञान होते, पण तो तर खरा गुणातीतच आहे. त्याच्या दर्शनाने लाभलेल्या तादात्म्यातून खाली उतरल्यावर मग संत त्याचे वर्णन करतात. ते वर्णन म्हणजे त्यांच्या अनुभूतीचे त्यांच्या बुद्धीने केलेले विवरण असते.

अनुभव व बौद्धिक ज्ञान यात प्रत्यक्ष व्यक्ती आणि त्या व्यक्तीची छाया इतका फरक आहे. भगवंताचा अनुभव आपले सर्व जीवन व्यापतो; आणि केवळ बौद्धिक ज्ञान हे त्याचे एक लहानसे अंधुक-पुसट-अस्पष्ट असे केवळ चित्रच असते. साध्या व्यवहारातही सहज समजू शकणारी ही गोष्ट. पण ती परमार्थात लक्षात न आल्याने मोठ-मोठे पंडित **"ज्ञानयोगाने" "मी ब्रह्म"** या बौद्धिक ज्ञानानें आपल्याला ब्रह्मत्व लाभते असे मानतात व प्रतिपादन करतात. अस का होत म्हणाल तर त्याचे एकच उत्तर. भक्तिप्रेमाचे तत्वज्ञान जीवनात आणण्याचा प्रयत्न होत नाही म्हणून. म्हणूनच हा भ्रम राहू शकतो. भक्तिप्रेमभाव जगण्याचा प्रयत्न केला म्हणजेच ह्या भ्रमाचा निरास होण्यास मुळीच वेळ लागणार नाही. भक्तिप्रेमभाव हा नुसता बोलण्याचा विषय नाही, तर तो जगण्याचा-जीवनाचा-प्रत्यक्ष अनुभवावयाचा **भाग** आहे.

भक्ती, प्रेम, आनंद एकच आहेत. ब्रह्म आनंदस्वरूप आहे, तसेच ते **परप्रेमस्वरूप** आहे. मग अशा परब्रह्माच्या/भगवंताच्या साक्षात्काराने (म्हणजे अनुभवाने) साधकाला-भक्ताला-शिष्याला स्वत: **आनंदस्वरूप** व्हावयाचे आहे. ज्या साधनात आनंदाकार होण्याची प्रक्रिया नाही, अशा साधनाने आनंदाकारतेची पूर्णता कशी लाभणार? म्हणून आनंदस्वरूप भक्तिप्रेमभाव हेच एक सच्चिदानंद भगवंत्प्राप्तीचे साधन होऊ शकते.

आणि याच दृष्टीने नामस्मरण पुढे-पुढे रूप-नामानुसंधान हेच मुख्य भक्तिसाधन आहे. नाम ब्रह्म आहे याचाच अर्थ असा की त्यात **आनंद** देण्याचे, प्रतिक्षणी देण्याचे सामर्थ्य आहे. नाम, नामी भगवंत व ते नाम देणारा श्रीगुरू यांच्या ठिकाणी अपरंपार भक्तिप्रेमभाव हवा, श्रद्धा आणि दृढ विश्वास हवा. नाही कां? आपले श्रीगुरूच आपल परमकल्याण करतील. "**तेचि माझे हित करिती सकळ। जेणे हा गोपाळ कृपा करी।।**" असा दांडगा विश्वास, असा अत्यंत बळकट भाव, निष्ठा हवी.

सर्व चांगल्या गोष्टींची म्हणजेच जीवनमूल्यांची परिणती ही हा **भक्तिप्रेमभावच** आहे. या भक्तिप्रेममार्गाने जाणाऱ्या नामसाधकाला हा भक्तिप्रेमभावच मार्गदर्शन करत असतो. त्यांना आपल्या कडेखांद्यावर उचलून त्यांच्या प्रेमस्वरूप अशा भगवंताजवळ आणत असतो. नामधारकाच्या जीवनात त्याचे श्रीगुरूच हे कार्य स्वत: तळमळीने, आस्थेने, आणि **न सांगता** करत असतात. हा भक्तिप्रेमभाव सदा प्रमाणिकपणे साह्यच करतो, कल्याणच करत असतो. कधीही तो नामधारकाला दगा देत नाही आणि या भक्तिप्रेमभावात कधीहि, कोठेही कसलीच विकृति नसते आणि होत नाही.

अशी श्रद्धा, दृढ अतूट श्रद्धा हा या भक्तिप्रेमभावाचा मूलभूत पाया आहे. श्रद्धा ही अंत:करणात सत्याचे-आनंदाचे-भगवंताचे दृढीकरण करते. आशा ही श्रद्धा व भक्तिप्रेमभाव यांना शक्ती देणारी आहे. (आशा म्हणजे भगवंताची, आनंदाची, सच्चिदानंदाची आशा) अशी आशा, श्रद्धा व भक्तिप्रेम यांच्या डाव्या-उजव्या बाजूस उभी असते; सदैव उभी असते. भगवंत/श्रीगुरू हेच श्रद्धा ठेवण्यास किती योग्य आहेत, भक्तिप्रेमभावाचे योग्य

स्थान आहेत हे शिकवते, दाखवते आणि हाताशी धरून नामधारकाला भगवंताजवळ आणते आणि अखेर **आनंदरूप** करून टाकते.

आत्मानंदाच्या महासागरातील आनंदामृत, श्रीगुरू आपली दातखिळ उकलून आपल्याला पाजण्यासाठी सदैव सिद्ध असतात. फक्त आपण ते प्राशन करण्यासाठी सदैव ओठ, तोंड, पोट उघडले पाहिजे. दातखिळ उघडणाऱ्या श्रीगुरूंची बोटच दांतात धरावयाची नाहीत, तर परमार्थ साधना यावर त्यांचे बोट आपल्या हाती धरायचे किंवा आपला दात त्यांच्या हाती देऊन आपण त्यांनी दिलेले नाम घ्यावयाचे.

* * * *



# चिंतन १६५

ज्या क्षणी जड दृष्य जगत म्हणजेच काही सर्वस्व नव्हे, आपण ज्या प्रकारचे आयुष्य जगतो, अनुभवतो त्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ असे जीवन आहे अशी खात्री पटते, त्याच क्षणी नित्य-नूतन, निरामय, अज, अव्यय, अमर अशा आत्मानंदाची उंची कळते, पटते.

या क्षणापासून या निजानंदाचा स्वत:ला प्रत्यक्ष अनुभव येईपर्यंत मग तो बेचैन होतो. स्वांनदाची ही अगदी अनावर इच्छा, ही तीव्र तृष्णा, हा उन्माद यालाच संत आत्मजागृती म्हणतात.

रामकृष्ण म्हणत असत की, एका खोलीत एक चोर आहे आणि त्याला असे समजले की शेजारच्या खोलीत अपार सुवर्णराशी आहेत आणि ह्या दोन खोल्यात एक पातळशी मातीची भिंत आड आहे. अशा वेळी त्या चोराची काय अवस्था होईल? त्याला खाणे-पीणे काही सुचणार नाही, त्याला झोप येणार नाही, काही अन्य सुचणार नाही. त्याचे सारे लक्ष फक्त त्या सुवर्णराशीकडे (न दिसणाऱ्या पण असणाऱ्या) होय नां? ते सोने आपल्याला

कसे, कधी, किती जास्तीत जास्त मिळेल याच्याकडेच राहील ना?

भव्य, दिव्य, उदात्त, सर्वसुखाची, परमानंदाची खाण असा जो भगवंतच (जो दिसत नसला तरी आहे) आहे. असा खराखुरा विश्वास, ज्ञान असल्यावर मग ईश्वरप्राप्तीच्या प्रयत्नाशिवाय नामसाधकांनी (नामधारकांनी) रहावे काय?

सारी अनुष्ठाने, विधी-विधान, प्रार्थना, तीर्थयात्रा, जपजाप्य, ग्रंथ, भगवंताच्या प्रतिमा, पूजासंभार ही ह्या आत्मजागृतीची पूर्व तयारी आहे. ह्या सगळ्या साधनांमुळे जीवाच्या ठिकाणी असणारी अपवित्रता नाहीशी होते आणि अशा रीतीने जेंव्हा जीव शुद्ध-अत्यंत शुद्ध होतो तेंव्हाच त्याला पावित्र्याची, सर्वमांगल्याची, महानंदाची खाणच असा जो भगवंत त्याच्या प्रत्यक्ष प्राप्तीची तीव्र इच्छा होते. ज्याप्रमाणे शेकडो वर्षांच्या धुळीने माखलेला लोखंडाचा तुकडा अगदी सतत लोहचुंबकाच्या जवळ पडलेला असला, तरीही त्याच्याकडे तो काही ओढला जात नाही; परंतु ज्या वेळी त्याच्यावरील ही धूळ सारीच्या सारी झाडून-झटकून टाकली जाते, त्यावेळी मात्र मग तो जसा लोहचुंबकाकडे ओढला जातो तसाच जीव भगवंताकडे ओढला जातो. **श्रीगुरू** हे सफाईचे काम करत असतात आणि या श्रीगुरूंच्या कार्यवाहीमुळे साधकाला आत्मारामाचे आनंदचिद्‌घन भगवंताचे स्वाभाविक आत्मिक आकर्षण निर्माण होते आणि तो जास्तीत जास्त साधन करतो, प्रयत्नांची पराकाष्ठा करून साधनच वाढवतो (नामसाधन).

अशी साधना म्हणजे उपासनेची फक्त सुरुवात/श्रीगणेशा आहे. खरा भक्तिप्रेमभावाचा हा केवळ ओनामा आहे इतकेच काय ते. सर्वच जण भगवंतावरील भक्तिप्रेमाविषयी आपापल्या परीने बोलतच असतात. प्रत्येकजण म्हणतो मात्र **''ईश्वरावर प्रेम करा''** पण भक्तिप्रेमभाव म्हणजे नेमके काय ते कळत नाही. ते जर का कळले नां तर तो भक्तिप्रेमाविषयी अशी बडबड करणारच नाही.

भगवंताविषयी/देवाविषयी/श्रीगुरूविषयी नितांत **भक्तिप्रेमभाव** असणं ही फार-फार कठीण गोष्ट आहे. असा भक्तिप्रेमभाव काय, कुठे असतो?

त्याचे अस्तित्व कसें कळते? अवघड-अवघड आहे. पण एक लक्षात ठेवा अशक्य मात्र अजीबात नाही हे!

भक्तिप्रेमभावाचे पहिले ठळक लक्षण असे आहे की हे **दिव्यभक्तिप्रेम ''सौदा करणे जाणत नाही.''** जोपर्यंत काही मिळवण्यासाठीच प्रेमभाव असतो, तोपर्यंत तो खरा-खुरा भक्तिप्रेमभाव नाहीच असं घट्ट समजा. ती केवळ एक दुकानदारी असते.

जिथे खरेदी-विक्रीची वृत्ती असते तिथे प्रेमभाव नसतो. म्हणून जेंव्हा एखादा मनुष्य ईश्वराची प्रार्थना-पूजा-पाठ करतो व म्हणतो की, **''देवा मला हे दे, मला ते दे, असं दे, इतकं दे''** तेंव्हा तो प्रेमभाव नसतो. ते भक्तिप्रेम कसे असू शकेल?

भक्त म्हणतो, मला काही-काही नको. मी त्याच्यावर प्रेम करतो याचे कारण एकच की मला त्याच्यावर प्रेम करावेसे वाटते. तो **श्रीगुरू/भगवंत** प्रेमस्वरूप आहे. एवढी एकच गोष्ट भक्त म्हणतो, **''मला पुरेशी नाही-नाही तर पुरून उरणारी आहे.''**

नाम म्हणजे भगवंत-म्हणजेच भक्तीप्रेम-आनंदभाव, म्हणजेच श्रीगुरू. नाम-श्रीगुरू-भगवंत म्हणजेच भक्तीप्रेमभाव.

* * * *




भक्तिप्रेम हा एक भव्य, उत्कट, दिव्य असा भाव आहे. या विलक्षण भावाच्या योगाने भक्तांनी भगवंतालासुद्धा आपलासा केला. नव्हे-नव्हे वश केला आणि म्हणूनच तर भगवंताला पण म्हणावे लागले, **''अहं भक्तपराधीन:''** खरे तर भगवंताला आपल्या या लाडक्या **अंतरंग** भक्तांचे निष्काम समर्पण, अनन्य आणि उत्कट दिव्य, विशुद्ध भक्तीप्रेमच अत्यंत प्रिय

आहे. या प्रेमभावांत भक्त आणि भगवंत यांची लोकोत्तर विलक्षण एकता आहे. हा भक्तीप्रेमभाव (सख्यभाव) सगळ्या अन्य भक्तिभावांहूनही फार उच्च दर्जाचा आहे. इथे भक्त आणि भगवंत हे दोनपणे प्रतीत होऊनही एकच-एकरूप-एकरस असतात. हीच तर भक्तीप्रेमाची विलक्षण एकता आहे.

श्रीमद्‌भागवत या ग्रंथात भगवान् श्रीकृष्ण स्वतः म्हणतात, **''मन्मनस्का मत्प्राणा:''** त्या व्रजांगना या प्रेमभावभक्तीचे तत्व ज्याप्रमाणे जगत होत्या, तसे तत्व, त्यांच्याविना अन्य कुणासच समजले नाही.

भक्तीप्रेमभाव ही गोष्ट अनिर्वचनीय आहे. तिथे देव आणि भक्त अशा दोन गोष्टी राहूच शकत नाहीत; दिसायला मात्र केवळ दोन असतात; पण दोन दिसून सुद्धा एकच-एक असते.

वेदान्ताच्या सिद्धांताप्रमाणे वस्तुत: एकच आहे. पण या भक्तीप्रेमरसभावात एक असूनही दोन आहेत आणि दोन असूनही एक आहेत.

उच्चकोटीच्या या प्रेमभावात वेदान्ताहूनही विलक्षण अशी एकता आहे. अलौकिक असा रसभाव आहे.

या दिव्य प्रेमभावात, प्रेम, प्रेमी आणि प्रेमास्पद तिन्ही वेगवेगळे नसून एकच आहेत. यात भगवान् आणि भक्त दोघेही भक्तीभावप्रेमी आणि दोघेही भक्तीभावप्रेमास्पद आहेत. हा असा अभेदभाव ही हि अभेदाची पराकाष्ठा आहे. भगवान्, भक्ती आणि भक्त हे एक होऊन जातात.

या भक्तीप्रेमभावांत भगवंत आपला संकोच करतात आणि भक्तांत विलीन होतात; भक्त भगवंतावर विजय मिळवतात. भक्त तर भगवंताशी केव्हाच तद्रूप होऊन गेलेला असतो.

भगवान आणि भक्त हे येथील शब्द फक्त वेगवेगळे आहेत. खरं तर एकमेकांच्या दृष्टीने दोघेही भगवान आहेत आणि दोघेही भक्त आहेत. भगवान आणि भक्त यांचे मिलन, तुलसीदासजी म्हणतात ''राम-भरत'' भेटीसारखे नाही तर आनंदच आनंदाला भेटावा असे आहे. आनंद-आनंदात एकरूप व्हावा असे आहे. भक्ताचा विलक्षण प्रेमभाव-भावकृती ही उत्तरोत्तर

भगवंताला वाढता-चढता आनंद देणारी आहे आणि भगवंताचा भक्तीप्रेमभाव भक्ताचा आनंद वाढवणारा आहे. अशा भगवान-भक्त भेटीत त्यांचे सगळे अंग-प्रत्यंग प्रेममय होऊन जाते. अंगी-अंगभाव-क्रिया-ज्ञान सगळेच्या सगळे एकच भक्तीप्रेममय होऊन जाते. मग वाणीच्या द्वारा तो आनंद कसा सांगणार नां?

ह्या भक्तीप्रेमभावात भगवान आणि भक्त, दोघांची दशा/अवस्था एकच होते. हा भक्तीप्रेमभाव जड नाही, देहबुद्धीवर अधिष्ठीत नाही तर तो पण सद्-चिद्-आनंदच आहे. ह्या भक्तांत प्रेमच भगवंत आहे, प्रेमच भक्त आहे आणि प्रेमच प्रेम आहे.

भगवंताची क्रिया भक्ताच्या आल्हादासाठी आणि भक्ताची क्रिया भगवंताच्या आल्हादासाठी आणि प्रेमसुखासाठीच असते. परंतु एवढ्यावरच न थांबता पुढे जाता-जाता आल्हाद आणि भक्तीप्रेमभाव यांच्या व्याख्या वेगवेगळ्या न राहता एकच होतात. तसेच मग भगवान आणि भक्त यांची व्याख्या पण वेगळी राहात नाही.

ज्या कोणाला हा दिव्य भक्तीप्रेमभाव लाभतो, प्राप्त होतो, त्यानाच हा **भाव** कळतो. त्यांनाच कळतो हे सुद्धा सांगण्यापुरतेच. खरा तर **सांगताच** येत नाही. मग काय होते? काय समजते? काय प्राप्त होते? तर एक फक्त प्राप्त झाल्यावर आणि प्राप्त झालेल्यालाच कळते.

असा भक्तीप्रेमभाव लाभलेल्याची स्थूल शरीराची दशा अशी होते की ती पाहून अन्य जीव **भक्तीप्रेमभावमग्न** होतात. असा भक्त प्रेमस्वरूपच असतो; त्याला पाहून, त्याच्याशी भाषण केल्याने, त्याच्या स्पर्शाने, लोकांमध्ये भक्तीप्रेमभाव निर्माण होतो, आणि निर्माण माळेत वाढतो.

भगवंत-भक्त-भक्ती आणि त्याचे गोड नाम हे सगळेच प्रेममय आहे.

* * * *

# चिंतन १६७

**“पैल तो गे काऊ कोकताहे”** हा अभंग श्रीगुरूराज ज्ञानेश्वर महाराजांचा आहे. हा अभंग **“विरहिणी”** या स्वरूपाचा आहे. भक्तीशास्त्रांतील एक नितांत सुंदर भावरम्य अशा प्रमेयाचा विचार या अभंगातून केला आहे. रूपक या साहित्य अलंकारातून माऊलींनी भगवत्प्रेमामधील एक अनुभूती विस्तारपूर्वक अनुवादली आहे.

ज्ञानियांचे राजे पण भक्तीप्रेमभावामुळे एका अगदी सामान्य अशा कावळ्याशी बोलत आहेत. **भगवंताच्या, आनंदघनाच्या** भेटीची तीव्र तळमळ व भक्तीप्रेमाची उत्कट अवस्था निर्माण झाल्यावर कोणला विचारावे याचे भानच उरत नाही; कारण एकच-एक वेध असतो **“पुसावेसे हेचि वाटे। जें जें भेटे तयासि।।”** तो भेटेल कां? बोलेल कां? आपलं म्हणेल कां? जवळ करील कां? बस्! एक त्याचाच वेध.

भगवंताच्या विरहाने व्याकूळ होऊन बसली होती एक गोपी. ती आपल्या बुद्धिरूप मायेला (आईला) म्हणत आहे की, हे माय, पलीकडे एक कावळा सतत काव-काव करत आहे. तो शुभ शकुन सांगत आहे बघ.

कावळा शकुन, शुभ शकुन सांगतो अशा भावनेने ती गोपी कावळ्याला म्हणत आहे, तू उडून जा, तू उडून जा; पंढरीराय माझ्या घरी पाहुणा म्हणून कधी येणार असा शुभशकुन दाखविलास तर तुझे पाय सोन्याने मढवीन म्हणजेच तुझ्या पायात सोन्याचे अलंकार घालीन. जीवाच्या पलीकडे आवडणारा तो आनंदघन कधी लाभेल ते बाबा; लवकर-लवकर सांग नां! तो जीवाचा सखा कधी भेटेल ती गुह्य गोष्ट सांगितलीस तर मी वाटीभर दूध तुला प्यायला देईन. काय, किती ओढ नां? त्याच्या दर्शनाची, भेटण्याची, बोलण्याची इतकेच नाही तर त्याच्या स्वरूपाशी पूर्णत्वाने समरस होण्याची.

ज्ञानेश्वर महाराज बुद्धीला **"माये"** म्हणत आहेत. ज्याप्रमाणे माता मुलाचे कल्याणच करते त्याप्रमाणे जी बुद्धी भगवंताकडेच जाते ती बुद्धी आईच समजावी व ती मोठी श्रीमान्, ऐश्वर्यवती आहे. हरिपाठात पण ज्ञानोबाराय हेच सांगताहेत. **"बुद्धीचे वैभव अन्य नाही दुजे। एका केशवराजे सकळ सिद्धी।।"** आणि ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अध्यायात पण म्हणतात, **"तैसे ईश्वरावाचूनि काही। जिये आणिक लाहाणें नाही। ते एकचि बुद्धि पाही। अर्जुना जगी।।"** रजोगुणी, तमोगुणी, बुद्धि कंगाल, दरिद्री; पण सत्वगुणी वैभवसंपन्न. अशा बुद्धीशी ज्ञानेश्वरमहाराज संवाद करत आहेत. एका अभंगात ते बुद्धीला साजणी (सखी) म्हणत आहेत.

भक्त/संत/महावैष्णव जरी जगाशी, मनाशी, देवाशी बोलले तरी एका **देवा** विषयीच बोलतात.

भक्ती प्रेमात रागाच्या (म्हणजे भक्तीप्रेमाच्या) तीन अवस्था आहेत. १) पूर्वराग; २) मिलनराग आणि ३) विरहराग.

राग म्हणजे भगवंतासंबंधी प्रेमभाव, आसक्ती. श्रीगुरू/भगवंताविषयी आसक्ती ही दु:खाला कारण, बाधक नसून, सुखाला-सर्वसुखाला कारण-साधकच आहे. आपले ज्ञानोबाराय म्हणतात ना, **"तो मज व्हावा, तो मज व्हावा"** म्हणून मग झाले तर! अधिक काय प्रमाण पाहिजे? परमात्मा-श्रीगुरू प्रेमभावसक्ती संबंधात ?

देव भेटण्याच्या आगोदर, देव भेटावा म्हणून जो **प्रेम-भक्तिभाव** निर्माण होतो त्यास **"पूर्वराग"** असे म्हणतात. उदाहरणार्थ, एकनाथ महाराजांनी रूक्मिणी स्वयंवरात त्याच्या या पूर्वराग अवस्थेचे सुंदर वर्णन केले आहे. रूक्मिणीचे अंग-अंग रोमांचित झाले आहे; डोळ्यातून प्रेमाश्रू वाहत आहेत, शरीर कंप पावत आहे व शेवटी ती मूर्च्छित झाली; पडली, त्यावेळी तिच्या सख्यांनी तिला सावरून धरलं; कोणी पदराने वारा घातला; त्यात काहीजणी अंतरंग तर काही बहिरंग. ज्या बहिरंग होत्या त्या म्हणू लागल्या, "हिला घुरे (म्हणजे फीट) आले; कांदा फोडून नाकाला लावा." पण अंतरंग म्हणाल्या,

"हिला जबरदस्त अशी भूतबाधा झाली." कारण खरच भूतबाधा झाली. शास्त्रकारांनी भगवंताला "**एको विष्णुर्महद्भूतम्**" म्हटले आहे. आपले तुकोबाराय पण "**पंढरीचे भूत मोठे**" असं म्हणतात. नाथराय पण म्हणतात, "**भूत जबर मोठं गे बाई**" रूक्मिणीचे भाग्य मोठे तिला अशा भगवंतस्वरूप भूताने धरलं! आपण या महद्भूताचे स्मरण अहर्निश करावे आणि या भूताचे स्मरण, याचे झडपणें लागण्या/होण्यासाठी एकच साधन, त्याचे नाम, त्याचे रूप.

* * * *




श्रीनिळोबारायांची एक विरहिणी आहे -

**खेळी खेळतां वो विकळ सुंदरा।**
**झाली आठवितां नंदाचिया कुमरा।**
**स्वेद, कंप, खेद दाटला शरीरा।**
**झाला विरह नेणती इतरा वो।**
**धरा आवरोनि म्हणती वो साजणी।।धृ।।**

परमात्मा भेटला नाही, परंतु तो भेटावा अशा प्रकारचा प्रेमभावाचा प्रचंड कल्लोळ ही पूर्वरागाची भूमिका आहे.

आता भगवंताची भेट होणे यास भक्तीशास्त्रकार मिलनराग असे म्हणतात. एक गोपी अकस्मात झालेल्या नंदकुमाराच्या भेटीबाबत आपला अनुभव सांगत आहे, "**आजी नवल मी आले येणे राने। भेटी अवचित नंदाचिया कान्हे।।१।।**" पुढे ती म्हणत आहे, "**माझे केले समाधान। रूप गोजिरें सगुण। निवविले मन। आलिंगन देऊनि।।**" बाळवेषात भगवान आले व आलिंगन देऊन माझे समाधान केले असे श्रीतुकोबाराय

गोपीभावातून सांगतात. यास **"मिलनराग"** अवस्था म्हणतात.

आता ३रा - विरहराग. काही वेळेस संयोग हा वियोगाकरिता असतो. भगवंताची भेट झाली; पण प्रतिबंधामुळे त्याचा वियोग झाला. यास नारद, गर्ग, शांडिल्य असे भक्ताचार्य **"विरहराग"** असे म्हणतात.

या विरहरागाचे आणिक ३ प्रकार. १) भाविविरह; २) वर्तमान विरह व ३) भूतविरह. वियोग झाला नाही पण वियोग होणार हे कळाले यास **भावि विरह** म्हणतात.

उदाहरणार्थ, श्रीकृष्णाला मथुरेत नेण्याकरीता अक्रूर आला, दारापुढे रथ उभा आहे; त्या समयाला गवळणी यशोदेस विचारतात, कृष्ण कुठे आहे? त्यावर यशोदा उत्तरली -

**बोले नंदाची पट्टराणी सद्‌गदित होऊनि।**
**मथुरेसी चक्रपाणी जातो गे साजणी।**
**विव्हळ झाले मन, हे वचन ऐकोनी।**

कृष्ण आता मथुरेला चालला आहे, पण अजून गेलेला नाही, पण जाणार खरा. हे कळले यास **भावि विरह** म्हणतात.

आता वर्तमानविरह - त्या गोपींनी भगवंताला अक्रूरासोबत जातांना प्रत्यक्ष पाहिले हाच **वर्तमान विरह.** श्रीनाथरायांनी त्याचे वर्णन केले आहे -

**रथी चढले वनमाळी आकांत गोकुळी।**
**भूमी पडल्या व्रजबाळी कोण त्या सांभाळी।**
**नयनीच्या उदकाने भिजली धरणी।।**

जेंव्हा भगवान रथात बसून निघाले, तेंव्हा एकच आकांत झाला. सर्व गोपि भूमीवर गडबडा लोभत आहेत (दुःखानी हं) डोळ्यातून आसवांचा पूर लोटून जमीन ओलीचिंब झाली आहे. अशाश्वत नश्वर, दुःखस्वरूप संसाराकरिता माणसें वाटेल तितके रडतात; पण देवाकरिता, त्याच्या भेटीकरिता, वियोगासाठी कोण रडतो? ज्याला देवाकरिता-आनंदकंदासाठी, श्रीगुरूभेटीसाठी रडता येते तो **भाग्यवान** समजावा.

हा गोपींनी नंदकुमाराचा प्रत्यक्ष वियोग अनुभवला तोच **वर्तमान विरह.**

आता तिसरा ''भूतविरह'' - भगवान निघून गेले. ज्या भगवंतावर/श्रीगुरूंवर प्राणापलीकडे भक्तीप्रेमभाव आहे ते निघून गेल्यावर त्याची आठवण वारंवार सातत्याने होणे; त्यांचेच गुणानुवाद गाणे; त्यांच्या-आपल्यातील अनेकानेक हृद्य भावक्षण आठवणे यास **''भूतविरह''** म्हणतात. मुलगी सासरी गेल्यावर आई जशी शेजारी-पाजारी ''माझी गंगा अशी; माझी गंगा तशी'' असं सारखी तीची आठवण करून सांगते, बोलते, हा भूतविरह.

असा हा विरहराग (म्हणजेच विरह प्रेमभक्तीभाव) हा भक्तीप्रेमाच्या राज्यातला अनभिषिक्त सम्राटच आहे. अशा प्रकारच्या विरहरागाने भक्तीप्रेमाला जास्तच सूक्ष्मता; पावित्र्य, सौंदर्य, निर्मलता, उंची, व्याप्ती प्राप्त होते आणि **त्याचे** स्मरण अखंड होण्यास या विरहरागाची मदतच होते. त्याचे स्मरण अखंड होण्याच्या साधनांत (त्याचे गुण, लीला, चरित्र, रूप, स्वरूप आणि **नाम**) नाम हेच एकमेव सर्वश्रेष्ठ साधन. नामस्मरणानी तो नामी परत प्रगट होतो. त्याचा पुनःपुनः संयोग होतो.

* * * *




गोपीका श्रीकृष्णाचे अखंड स्मरण करीत होत्या, सतत त्या नंदलालाचे गुणानुवाद गात होत्या. त्यांना गोकुळातून कन्हैय्या मथुरेला गेल्यावर जो ''भूतविरह'' झाला त्या भूत विरहाला भक्तीशास्त्रकारांनी दहा अवस्थातून वर्णन केले आहे. म्हणजे या भूतविरहात १० अवस्था आहेत.

१) चिंता; २) जागर; ३) उद्वेग; ४) तानव; ५) मालिन्य; ६) प्रलाप; ७) व्याधी; ८) उन्माद; ९) मोह व १०) मृत्यु. अशा त्या दहा अवस्था आहेत.

**१) चिंता :-** भगवंताच्या वियोगात चिंता (काळजी) निर्माण होते. रावणाने सीतामाईचे हरण केले; त्यामुळे तिला मोठेच दुःख झाले -

**अशोकाचे वनी सीता शोक करी।**
**कां हो अंतरले रघुनाथ दुरी।**
**येऊनि गुंफेमाजी दुष्टे केली चोरी।**
**कां हो मज आणिले अवघड लंकापुरी।।**

बुद्धी ही सीता आहे; आत्माराम हा तिचा पती आहे; अहंकार या रावणाने बुद्धिरूप सीतेचे हरण केले व देहरूपी लंकेत आणून ठेवले; त्यामुळे जीवाला दुःख भोगावे लागते. सीतेच्या रक्षणासाठी रावणाने देहवृत्तीरूपी राक्षसीणी नेमल्या होत्या; त्यात त्रिजटा नांवाची राक्षणीस होती. तिला सीतेने नेहमी विचारावे,

**सांगवो त्रिजटे सखिये ऐसी मात।**
**देईला कां नेदी भेटी रघुनाथ।**
**मन उताविळ झाला दूरी पंथ।**
**राहो न शके प्राण माझा कुडीआंत।।**

त्यावर त्रिजटा म्हणाली, ''सीते, तूं मुळीच काळजी करूं नको; श्रीराम येतील, तुला अयोध्येला पुन्हा घेऊन जातील.'' राक्षसीण खरी, पण मोठ्या सात्विक विचाराची होती. पूर्वी राक्षसात माणसे होती, आता सध्या माणसात राक्षस निर्माण झाले आहेत.

**२) जागर :-** या चिंतेमुळे भक्ताला झोप लागत नाही; यासच (निद्रानाशास) जागर अवस्था असे म्हणतात. एक गोपी आपल्या सखीस म्हणते आहे, ''मला निळ्या रंगाचा श्यामसुंदर भगवान स्वप्नात दिसला; मोठ्या टपोऱ्या कमलाकार अशा डोळ्याचा, हिऱ्याप्रमाणे चमकणारे दांत अशी जणू मदनमूर्तीच मी पाहिली.

**रूपे श्यामसुंदर नीलोत्पल गाभा।**
**सखये स्वप्नी शोभा देखियली।**
**नेत्र विशाळ भाळ, दंत हिरे ज्योती।**
**बाईयें मदनमूर्ति मी देखियली।।**

त्यावर सखी म्हणाली, ''तू खरोखरच मोठी भाग्यवान गं, स्वप्नांत कां होईना तुला त्या गोपीजनप्रिय सावळ्याचे दर्शन झाले; पण माझी अवस्था बघ नां कशी झाली आहे ती -

**याः पश्यन्ति प्रियं स्वप्ने, धन्यास्ता सखियोषितः।**
**अस्माकं तु गते कृष्णे, गता निद्रापि वैरिणी।।**

भगवान कृष्ण माझ्या डोळ्यात भरून राहिल्यामुळे झोप वैरिण कुठे गेली, काही पत्ताच नाही. याचाच अर्थ मला झोपच लागत नाही. काय श्रेष्ठ अशी भावावस्था नां? आपले तुकोबाराय म्हणतात, ''**तुका म्हणे डोळा। विठो बैसला सांवळा।।**'' यास जागर अवस्था म्हणतात.

**३) उद्वेग :-** मन उद्विग्न होणे, काळजीने व्यापणे (संसारातील उद्विग्नतेत दुःख असते) ही भक्तीप्रेमातील उद्विग्नता आहे. त्यात परमप्रिय भगवंताचे एक प्रकारे चिंतनच घडते. त्यामुळे त्यात भक्तिप्रेमसुखाचाच भाव आहे. ''**कै येता देखेन माझा मायबाप। घटिकां बोटे दिवस लेखी धरोनिया माप।। डावा डोळा लवे, उजवी स्फुरतसे बाहे। मन उताविळ भाव सांडोनिया देहे।।**'' असे तुकोबारायांनी या उद्वेग अवस्थेचे वर्णन केले आहे.

**४) तानव :-** देवाच्या वियोगामुळे भक्ताला अन्नपाणी जात नाही. त्यामुळे त्याला कृशता प्राप्त होते ही तानव अवस्था.

**झुरोनि पांजरा होऊ पाहे आतां।**
**येई पंढरीनाथा भेटावया।।**

अशी तुकाराम महाराजांची अवस्था, या शरीर अस्थिपंजर होणे यालाच तानव अवस्था म्हणतात. या सगळ्या भूत वियोगातील भावावस्था भक्तीप्रेमरसाच्या उद्दीपन भावावस्था आहेत. ज्यांना अनुभवास येतात नां? ती भक्तमंडळी भाग्यवान.

* * * *

# चिंतन १७०

**''फुटो हे मस्तक तुटो हे शरीर''** पण, व्रताचा वाणवसा घेतला की तो **''वसा''** प्राणापलीकडे चालवावयाचा. आज वसा घ्यावयाचा, उद्या टाकावयाचा असं नाही करायचं. अत्यंत दृढपणे व्रत वाचवावयाचे. ही वैष्णवांची परंपरा. या व्रतासाठी परमार्थ प्रक्रियांचे चिंतन घडते. श्रीपांडूरंगाच्या कृपेने. तो विचारांना चालना देतो. शस्त्र वापरल्याने त्याची धार जास्तच धारदार होते; वाद्य वाजवले तरच चांगले राहते, भांडे घासावे तसे अधिकच उजळते, एखादा कपडा जसजसा धुवावा तसतसा त्याचा पोत, रंग, झळाळी अधिकच खुलून उठते. तसंच ह्या आत्मविचाराचे पण! या लिहिण्याच्या निमित्ताने सुंदर चिंतन होते; एक प्रकारे हे भगवंताचे उपकारच म्हणावयास पाहिजेत नाही कां?

भगवत् वियोगाचा विचार मला वाटतं आपण सखोल करतो आहोत नाही कां? मला वाटतं **''मलिनांगता''** येथवर आपण आलो होतो होय ना?

**५) मालिन्य :-** शरीरावर मालिन्य येते. जेथे खानपानाची आठवण राहत नाही, मग तेथे शरीराची स्नानाने होणारी स्वच्छता, कपड्या-लत्त्याची स्वच्छता कशी राहील? त्याचे भान कसे असणार?

**६) प्रलाप :-** ही भक्ति शास्त्रातील ६ वी अवस्था आहे. या अवस्थेत बोलण्यात ताळमेळ राहत नाही; आपण काय बोलतो? कोणाशी बोलतो याचे भान रहात नाही.

भागवतात महारासाचे वर्णन आहे. सर्व गोपीका रासलीलेचा आनंद अनुभवत असतां त्यांना अभिमान झाला. भगवंताला अभिमान सहन होत नाही; भगवंताला अभिमान नाही; भगवान् अदृश्य झाले. सर्वांना मग फार-फार दुःख झाले. मग सर्व गोपिका रानावनात दिसेल त्याला/त्यांना, देवाबद्दल

विचारूं लागल्या. त्यांना अशोकाचे झाड दिसले. त्या म्हणाल्या, ''बा अशोका तूं कृष्णाला पाहिलेस कां?'' तो अशोक वृक्ष काही बोलेना; मग त्या म्हणाल्या ''तू कसा बोलणार? तू शोकरहित आणि आम्ही सगळ्याजणी शोकाने व्याकुळ झालेल्या. तेंव्हा तुझे आमचे कसे जुळणार ? तूं बोलणार नाहीसच.'' पुढे चालू लागल्या, वाटेत भेटला वटवृक्ष. ''बा वटवृक्षा, तू बाबा पाहिलेस कां आमच्या नंदलालाला?'' तर ते झाड पण बोलेना; या मग म्हणू लागल्या, ''तू कशाला बोलशील? साधी माणसे ज्यांचा **वट** असतो ती माणसे जर गुर्मीत कोणाशी बोलायला तयार नसतात; तू तर प्रत्यक्ष वटवृक्षच नां?'' पुढे त्यांना दिसले तुळशीचे झाड. त्या म्हणाल्या, ''बाई तुला तर त्याचे रोज सान्निध्य आहे; तू तरी या व्रजभूषणाचा ठाव ठिकाणा सांग.'' परंतु तीही बिचारी बोलेना. तू कशाला बोलशील म्हणा! तुला **झालाय सवतीमत्सर**; आपण देवाचा पत्ता सांगितला, तर देव आपल्यालाच **अंतरेल म्हणून** तूं बोलत नाहीस. या प्रकारच्या बोलण्याला **प्रलाप** अवस्था असे म्हणतात.

जेव्हा रावणाने सीतेचे हरण केले, राम-लक्ष्मण पर्णकुटीत आले; पण सीता नाही तेंव्हा प्रभूरामरायांना फार दुःख झाले. रामराय रानावनांत जे जे समोर येईल त्या झाडे, झुडपे, पशू, पक्षी, भ्रमर या सर्वांना विचारूं लागले, हरणाच्या डोळ्याप्रमाणे जिचे डोळे आहेत, अशा सीतेला तुम्ही कोणी पाहिलेत कां?

भगवान कृष्ण रांगत रांगत बाहेर गेले, दिसेनासे झाले, मग काय? यशोदामैया विचारत सुटली, ''**माझा कृष्ण देखिला काय?**''

आपले तुकोबाराय देखील असेच विचारतात नां! -

**कोणे गांवी आहे सांगा हा विठ्ठल ?।**
**जरी ठावा असेल तुम्हा कोणा ?।**
**लागतसे पाया येतो लोटांगणी।**
**मात तरी कोणी सांगा याची।।**

किंवा

**पुसावेसे हेचि वाटे। जे जे भेटे तयासी।**
**देव कृपा करील मज। काय लाज राखेल।।**

ज्ञानेश्वरमहाराज ज्ञानियांचे राजे, त्यांची सुद्धा अशीच अवस्था झाली बघा. समोर कावळा होता, त्याच्याशीच बोलावयास लागले. **''हे बुद्धि-माये, पलिकडे कावळा कांव कांव करतो आहे तो बहुतेक शुभ शकुन सांगत आहे.''** (कावळा कांव काव करतो, तेंव्हा माणसे कोणीतरी पाहुणे येणार असे समजतात.) या ठिकाणी देवालाच पाहुणा म्हटलं आहे. हा पाहुणा सामान्य नाही; तर **पंढरीराव** आहे. राव म्हणजे राजा. **''राजते असौ शोभते''** तो राजा. जो आपल्या अंगभूत ऐश्वर्याने शोभतो तो राजा.

आतां ज्ञानियांचे राजे, पण कावळ्याशी बोलतात. हाच प्रलापाचा सुंदर नमुना.

सारांश काय, तर ही जी भगवंताच्या भेटीविषयी तळमळ आणि अशा तळमळीत मग कोणाला विचारावे, बोलावे याचे भान नाही. भान एकच, **त्याची** सच्चिदानंदाची भेट, म्हणून हा **प्रलाप**.

* * * *




भगवंताच्या भूतविरहाच्या १० अवस्थापैकी ७ वी अवस्था ''व्याधी.''

**७) व्याधी :-** व्याधी म्हणजे संताप-दाह. कितीही उपचार उपलब्ध असले; सर्व भौतिक सुखे हात जोडून समोर हजर असली तरी दाह-संताप, व्याधी जात नाही. हा संताप त्या श्यामसुंदराची, निष्काम परब्रह्माची भेट झाली तरच जातो. या ''व्याधी'' अवस्थेचे वर्णन एका गोपीभावावर आरूढ होऊन श्रीज्ञानोबाराय करतात पहा -

**चंदनाची चोळी माझे सर्व अंग पोळी।**
**कान्हो वनमाळी वेगी भेटवा कां।**
**सुमनाची शेज शितळ वो निकी।**
**पोळे आगीसारखी भासे मज।**
**चंद्रमा उबारा करितो गे माये।।**

सगळी ही ''विरहिणीच'' (अभंग) एक भक्तिप्रेमाचा उत्कट नमुना आहे.

८) **उन्माद :-** भक्त या अवस्थेत गातो, नाचतो, रडतो, हसतो, उड्या मारतो. अशा क्रिया नकळत, सहजासहजी, घडतात. भागवतकार वर्णन करतात, ''**हसत्यतो रोदिती रौति, गायन, उन्मादवत् नृत्यति लोकबाह्या.**'' संतांनी वर्णन केले आहे, ''**नाचति आनंद कल्लोळ पवित्र गाणे नामावळी रे।**''

९) **मोह :-** मनाला भुरळ पडते. ''**भूलविले वेणू नादे**'' ''**मै भूली घर जाने बाट.**'' ''**मज भूल पडली करूणाघना**'' इत्यादी.

आणि आता शेवटची १० वी अवस्था ''मृत्यु.'' आता काही भगवंत भेटत नाही या दु:खाच्या तीव्रतेने मृत्यू देखील येतो.

१०) **मृत्यू :-** ज्ञानेश्वर माऊलींच्या ''**पैल तो गे काऊ**'' या अभंगाचा विचार करतांना एवढा शब्दांचा, भावाचा विचार झाला. आता या पदा-शब्दा-अक्षरामागील **खोल** असा अध्यात्मविचार. या ठिकाणी अहंब्रह्मास्मिवृत्ती हा कावळा आहे. मी ब्रह्म आहे, मी ब्रह्म आहे, हे त्या कावळ्याचे कांव कांव करणे आहे. पुन: पुन: सातत्याने असे स्फुरण होते हे कावळ्याचे उडणे आहे. उडी मारणे आहे.

व्यवहारात दोन होकार म्हणजे एक नकार आणि दोन नकार म्हणजे? एका मुलाने वडिलांस विचारले, बाबा मी सहलीला जाऊ का? वडील म्हणाले, तुला जायचे असेल तर तू खुषाल जा. याचा खरा अर्थ तूं सहलीला जाऊ नको. त्याचप्रमाणे ''तू उडून जा, तूं उडून जा'' याचा अर्थ तू एका जागी ''स्वस्थ'' बस, गप्प रहा असा आहे.

"मी ब्रह्म" ही स्फुरण पावणारी वृत्ती, एकाच **स्व** च्या ठिकाणी स्थिर झाली; म्हणजेच **स्वानंदाची** अनुभूती येते. याचाच दिग्दर्शक पदप्रयोग "तुझे सोन्याने मढवीन पाऊ." पाय म्हणजे अंत:करण व सोने म्हणजे सुख-स्वसुख. चित्त समाधानाने ओतप्रोत भरलेले असले म्हणजेच चित्त स्थिर व निर्मळ असते.

चित्त निर्मळ व स्थिर असल्यावर भगवंत लांब नाही तर तो अगदी जवळ आहे.

**तुका म्हणे चित्त करावे निर्मळ।**
**येऊनी गोपाळ राहे तेथे।**
**हृदयी प्रगटे रामरूप।।**

आपले ज्ञानोबाराय म्हणतात, "**तरी जयाचे चोखटे मानसी। मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी।।**"

आता पैल शब्दाचा गुढार्थ पण फारच छान आहे पहा. शब्द शास्त्रदृष्ट्या पैल शब्द हा ऐल शब्दाच्या सापेक्ष आणि विरोधी अर्थाने येतो. ऐल म्हणजे अलिकडे; याचा अर्थ देहाच्या ठिकाणी "**मी**" ही समजूत म्हणजे ऐल यालाच देहाहंकार म्हणजेच ममाध्यास/देहाध्यास/अहंअध्यास असे म्हणतात.

आता पैल म्हणजे परमात्म्याच्या ठिकाणी "**मी**" अशी अहंता असणे, "**मी वासुदेव तत्वता**" म्हणजेच मी ब्रह्म आहे. हीच अहं ब्रह्मास्मि वृत्ती.

"मी ब्रह्म" "मी ब्रह्म" मग बाकीचे सगळे राक्षस कां? म्हणून "**मी** ब्रह्म" अशी घोकणी गर्जना म्हणजेच कावळ्याचे कांव कांव करणे म्हणजे भ्रमच.

मी देह हा विसंवादी तर "मी ब्रह्म" हा संवादी. एक अज्ञानाचा तर दुसरा ज्ञानाचा पण बंधच, भ्रमच. ज्याप्रमाणे कीर्तिमुख राक्षस प्रथम इतर राक्षसांना खाऊन व मग स्वत: स्वत:ला खाऊन नष्ट झाला, किंवा अग्नि इंधन जाळून मग स्वत:पण संपतो तसेच ज्ञानाने प्रथम अज्ञान संपते व मग ज्ञान पण

मावळते. मी ब्रह्म ही वृत्ती मात्र साक्षात्काराला जवळची म्हणून या वृत्तीलाच महाराज शुभ शकुन म्हणतात. ही वृत्ती स्थिर-संथ झाली म्हणजेच भगवंताचे दर्शन घडते. जसे जलाशयातील पाणी निर्मळ व शांत, स्थिर झाल्यावरच आपले प्रतिबिंब स्पष्ट अनुभवास येते. अशी ब्रह्मवृत्ती स्थिर होण्यास एकच उपाय, त्या भगवंताचे **नामस्मरण**. माऊलींनी या विरहिणीतून सुंदर अध्यात्मप्रमेय भक्तिशास्त्रातील उच्चतम भूमिकेवरून वर्णीले आहे.

* * * *




नामस्मरणाने, आनंदकंदाचे/भगवंताचे सगुण रूप पाहिल्यावर त्या आनंदाने मीपणाचा, देहभावाचा विसर पडतो व मन त्या आनंदस्वरूपातच गढून जाते; स्थिर होते; तदाकार तद्रूप होते. सुमनांच्या सुवासात भ्रमर बाकी सर्व विसरला व त्याचप्रमाणे आनंदचरणी संतोष पावल्याने बाकी भाव विसरतात.

नामाच्या अनाहत नादाच्या अनुसंधानात, आनंदानुभवात मन गुंतल्यामुळे वृत्ती मावळतात. आनंदाने वृत्तिनिरोध होतो.

साक्षात्काराच्या आनंदाचे शारीरिक परिणाम म्हणजे अष्ट सात्विक भाव. विश्वरूपदर्शनामुळे अगदी **अंतरंग** अशा अर्जुनाच्या ठिकाणी अष्ट सात्विक भाव निर्माण झाले. आत आनंदाचे भरते आले; व बाहेर गात्रांचे बळ हारपले. सर्वांग पुलकित होऊन रोमांच उभे राहिले. शरीरावर स्वेदकणिका दाटल्या; आंतल्या **आनंदाने** देह कापू लागला; नेत्रावाटे आनंदाश्रूंचा पूर लोटला; आणि अंत:करण भरून येऊन कंठ सद्‌गदित झाला. या सगळ्याचा परिपाक कशांत झाला? कशांत होतो?

तर मनांत जे थोडे-फार दुजेपण! भेदभाव-द्वैत उरलेले असते तेही

मावळून चिदानंदाशी पूर्णत्वाने, सर्वांगाने एकरूपता.

अशा एकरूपतेने तन शीतल होते. **त्यावेळी अंतरीची** खूण पावून वृत्ती स्थिर होते; प्राणाचा लय होतो; नेत्र सतेज-तेज:पुंज होतात. दृष्टी अर्धोन्मीलित होते. चित्त भगवंताला चिकटून बसते. ते आनंदात सुखरूप होऊन राहिल्याने बाहेर यावयास तयार होत नाही (भगवंताला सोडून) भगवंताचा प्रकाश जाणवतो. भक्तिप्रेमामृताचेच प्राशन होते. सुवर्णाचा दिवस उजाडतो. एक नवीनच आनंदमय जीवनकला प्राप्त होते. जिकडे तिकडे केवळ आनंदच आनंद दाटतो.

या आनंदाने, आनंदानुभवाने मन वेडे होते. भगवंताचा-आनंदकंदाचा-सच्चिदानंदाचा आनंदअनुभव अनुभवत असतां, मग मन तेथून मागे वळावयास कसं राजी होणार? या सारखा आनंद त्रिभुवनांत नाही.

आनंदानुसंधान लागल्यावर देहाभिमान आठवत नाही. मन पांगुळते व स्वत:ला विसरून निजानंदस्वरूपी मग्न होते; तेथे शब्द कुंठीत होतात. ''**रूपी जडले लोचन। पायी स्थिरावले मन।।**'' मग दु:ख, चिंता, काळजी, व्यथा कुठून राहणार? ''**चिंता ते पळाली गोकुळां बाहेरी। प्रवेश भितरी केला देवे।।**'' होय की नाही?

या आनंदानुभवाने सर्व दु:खाचा शेवट होतो; तापत्रय दूर होतात व मनाला पराशांती लाभते. निश्चिंतता व पराशांती मिळण्याचे आणखी एक अत्यंत महत्वाचे कारण हे की, देवाने/श्रीगुरूने आपला सर्व भार घेतला आहे; तोच आपल्याला पाहिजे ते सर्वच्या सर्व पुरवितो व आपले दु:ख, आपल्यावरील सर्व संकटे दूर करण्याला नेहमीच तत्पर असतो असा प्रत्यक्ष, रोकडा अनुभव; खरं नां?

हा केवळ तात्विक सिद्धांत नाही; तर हा सर्व संतांचा, भक्तजनांचा प्रत्यक्ष स्वानुभव आहे. भक्तिप्रेमभावांने भगवंत भक्तांचा ऋणी होतो. आपला सांगाती होतो. आपला सर्व भार ''तो'' आपल्या मस्तकावर घेतो. भक्तांचा भार हलका करतो. उत्तमातला उत्तम घास भगवंत भक्ताच्या मुखात घालतो. आपल्या हातांनी आपल्या प्रिय भक्ताला भरवतो.

भरून गुण!! गाणारे, अण्णावर प्रेमाचा वर्षाव करणारे ग्रामस्थ; (तरी आतां आनंद म्हणून हाका मारणारी थोडीच मंडळी, वय ८०-८५ च्या दरम्यानची) आनंदच आनंद.

जन्म, मृत्यू, जरा, व्याधी व दु:ख या शब्दांनी जीवनांतील दोषांचे वर्णन श्रीमद्‌भगवद्‌गीतेत केलेच आहे. या श्लोकावरील श्रीज्ञानेश्वर महाराजांची टीका फारच हृदयस्पर्शी आहे. यापैकी जन्म नाही (म्हणजे दु:ख असून भय वाटत नाही) पण जरा, व्याधी व मृत्यू यांचे भय प्रत्येक प्राणिमात्राला नेहमीच वाटत असते. या तीन आपत्तींच्या दर्शनाने उद्विग्न व विषण्ण होऊन गौतम बुद्धाने अगदी तरूण वयात पत्नि, पुत्र, मातापिता व राज्य यांचा त्याग करून परतत्व शोधण्याचा मार्ग स्वीकारला.

तरूणपणी, शरीराला जरा टेकली नाही तोचं, मनुष्याला वार्धक्य आल्यावर होणाऱ्या यातनांची व विटंबनांची कल्पना यावयास पाहिजे व त्यातून सुटण्याचा काही मार्ग आहे कां? असा विचार त्याने केलाच पाहिजे.

जरेप्रमाणेच व्याधींची गोष्ट आहे. या स्थूल देहाला कोणता रोग होईल याचा नेम नाही. मग त्यापासून केंव्हा, कुणाला, किती दु:ख सोसावे लागेल कोणी सांगावे नां? आणि यापेक्षा खूपच मोठे व अटळ संकट मरणाचे. जरा व व्याधी यांपासून मनुष्य ''कदाचित्'' सुटू शकेल. परंतु मृत्यू मात्र अटळ आहे; मात्र देहाला बर कां!

**''एक पाहतसा एकाची दहने। सावध त्या गुणें कां रे व्हाना।।''** असं आपले तुकोबाराय आपल्याला धक्का देऊन विचारतात. श्रीसमर्थरामदास स्वामी म्हणतात त्याप्रमाणे जगात आलेले सर्व गेले; गेले आणि गेलेच. विद्यावंत, बळवंत, रूपवंत, धनवंत, सत्तावंत, सर्व-सर्वजण गेले. तेंव्हा आपण स्वत:च्या मृत्यूचे स्मरण ठेवावे आणि त्याचबरोबर या अशाश्वत विश्वाकारांत शाश्वत असे काही आहे कां याचा विचार करावा, हाच सर्व संतांचा सांगावा आहे. सर्व स्नेही-सोबती, निकटचे आप्तइष्ट, मृत्यूसमयी दूरच राहणार. त्यावेळी आपल्या सोबतीला एक **नामच**. (आयुष्यभर त्याचे

स्मरण केले, तरच) मृत्युकाळी आपण एकटे कसे राहातो/पडतो याचे हृदयद्रावक वर्णन नामदेवांनी एका अभंगांत केले आहे. ‘‘**अंतकाळी मी परदेशी। ऐसे जाणोनि हृषीकेशी। शरण आलो तुजपाशी**’’ नवमास कष्ट सोसून मला जन्म देणारी माता शेवटी दूर राहील; मुखींच्या घासांतील घासाने माझे पोषण करणारा बाप मला दूर टाकील; (पण श्रीगुरूमायबाप मात्र यावेळी पण सांभाळतात; दूर लोटत नाहीत) सगळी घरीच राहतील. असा विचार आला. चारी बाजूला केवळ अंधकारच दिसू लागला; मग मला काहीच सुचेना!

मरणाची अशी जाणीव झाली तर अशी अवस्था होते; परंतु महद् आश्चर्याची गोष्ट ही की ही आठवणच होत **नाही आणि** स्मशान वैराग्याप्रमाणे एखादे वेळी झालीच तरी टिकत नाही.

या वरील दोषांप्रमाणेच जीवनांत आणखीही उणीवा आहेतच. त्या म्हणजे सर्व गोष्टींची अस्थिरता; चंचलता आणि अशाश्वता. देह व देहाचे आरोग्य, धनसंपत्ती, कीर्ती, आप्त जनांचे लौकिक प्रेम यापैकी काय म्हणून स्थिर व काय शाश्वत आहे? ‘‘**कोण वेळ येईल कैसा। याचा नाही भरवसा। जैसे पक्षी दाही दिशा उडोनि जाति। तैसें वैभव हे सकळ। कोण जाणे कैसी वेळ। पुत्र कलत्रादि सकळ। बिघडोनि जाती।।**’’

या समर्थवचनांतील अनुभव सर्वांना सुपरिचित आहे. मातेच्या उदरातच असतांना, गर्भाला मृत्यु शोधित येतो; मंगलाला मोड उगवत असतांनाच, त्यावर अमंगलाची कीड पडते.

या असल्या जीवनात एकच शाश्वत आहे; अविनाशी आहे; अचंचल आहे ‘‘**हरिनाम**’’ आणि ज्याचे नाम आहे तो नामी; परमात्मा/भगवंत आणि भगवत्स्वरूप असणारे श्रीगुरूतत्व/श्रीगुरूस्वरूप; आणि गुरूबोध.

* * * *

# चिंतन १७४

व्यक्ती म्हणलं की त्या प्रत्येकाचे या ना त्या प्रकारचे ध्येय असतेच. त्या त्या ध्येयाचे तो सतत ध्यान करतच असतो. ध्येयाचे असे ध्यान करणारास ध्याता असं म्हणतात. पैसा, लौकिक, सत्ता, पद आदि गोष्टींचे ध्यान किती झाले तरी ध्येय आणि ध्याता यात अंतर राहतेच राहते. फक्त भगवंतच एक अशी **"वस्तू"** आहे; की त्याचे ध्यानानेच मात्र ध्याता ध्येयाशी म्हणजे भगवंताशी/श्रीगुरूंशी एकरूप होतो.

जे जीवनमुक्त, आत्मज्ञानी संत/श्रीगुरू/महात्मे/वैष्णव/भगवदभक्त झाले; ज्यांनी याची देही याची डोळा ब्रह्मसुखावर किरिटासारखें शोभणारे भक्तीप्रेमसुख अनुभवले, ज्यांनी द्वैतरेषा पुसूचन टाकल्या, प्रचंड **समाधान** साक्षात अनुभवले व आपल्या निकट सान्निध्यातील अंतरंगाला ते दिले.

या महात्म्यांनी एकरसता, एकात्मता, एकाकारता प्रत्यक्ष अनुभवली आणि या त्यांच्या एकटेपणातील स्पंदनेही अवघ्या जगाला आनंददायी, मार्गदर्शक ठरतात. आपल्या वाक्‌वैभवाने असे महात्मे/श्रीगुरू प्राणीमात्रातील सत्त्व आणि ओजशक्तीला आवाहित करतात; जागृत करतात; एवढंच नाही तर आपल्या अंतरंगीयास पूर्ण आनंदस्वरूप करतात.

अशा श्रीगुरूंना पूर्णत: अनुसरल्याने स्वानंदानुभव लाभतो; स्वसुखरूपताच आपल्यावर स्वानंदाचा अखंड वर्षाव करते. मग मांगल्य, पावित्र्य, सत्य, भक्तिप्रेमसुख, दिव्य प्रेमभाव हे सारे केवळ शब्दच नसून त्या फार मोठ्या आनंद प्रदान करणाऱ्या जीवन निष्ठा आहेत हे कळते. या जीवननिष्ठा केवळ जीवनदायीच नसतात तर त्या सच्चिदानंददायी होत असतात.

लौकिकात जितक्या व्यक्ती, तितकी ध्येये असतात. या लौकिक ध्येयांना स्थल, काल, वस्तू सापेक्षता असते; त्यांना तात्कालिकता असते;

त्याचबरोबर या ध्येयांना व्यथा; वेदनाही असतातच. म्हणून ध्येयच मुळी अमृतमय असावे.

अशा अमृतमय ध्येयाकडे वाटचाल करताना "**अथा तो ब्रह्मजिज्ञासा**" असा उद्घोष करून पहिले पाऊल उचलावे आणि "**अथा तो भक्तिप्रेमरस जिज्ञासा**" म्हणत-म्हणत प्रत्येक पाऊलागणिक भक्तिप्रेमसुखाचा आनंद लुटतच रहावा.

या महाप्रवासाच्या सुरुवाती-सुरुवातीला अतृप्ती, विचारांची अवर्तने; अविश्वास आणि देहात्मभावातून निर्माण होणाऱ्या व जीवभावालाच बळकट करणाऱ्या अनेक गोष्टी, पांथस्थाला सारख्या सतावतात व या सगळ्याचा परिणाम आपली गाडी **चुकते** की काय? असे वाटावयास लागते. पण चालत असतांना चालणाऱ्याने घाबरावयाचे, भ्यावयाचे कारण नाही. एक भगवंतावर/श्रीगुरूंवर पूर्ण निष्ठा ठेवून, त्याला आठवत, आळवत, त्याचेच बोट धरून निर्धास्तपणे चालत रहावे हा एकच मार्ग. परमवैभवसंपन्न, परमकल्याणकारी, प्राणीमात्रहितदक्ष, शाश्वत, आनंददायी, अक्षयबोधप्रधान आणि देवाची प्रचिती आणून देणारा असा हा आहे.

हा भक्तिमार्ग म्हणजे उत्तम धर्ममार्ग, श्रेष्ठ कर्ममार्ग, देश-काल-परिस्थितीला पुरून उरणारा मार्ग, चिद्‌विहार घडवून तद्द्वारा चिदाकाशांत प्रस्थापित करणारा मार्ग; उत्तम, उदात्त, महन्मंगल मार्ग; संघर्षमय अशा **बाह्य जीवनांत** राहून देखील संघर्षातीत करणारा मार्ग आहे.

या अशा मार्गाची नांवे, धर्म-पंथ-संप्रदाय यानुसार वेगवेगळी असोत. त्यांतून शाखा-उपशाखा, उपपंथ निघालेले असेनात कां? अनेक देव-देवता, अनेकानेक उपासनापद्धती आणि काहीबाही काहिही असो. **चैतन्य** एक आहे; परमतत्व एक आहे. भगवंत **एकच** आहे. तो **भगवंतच** या मार्गावरील पांथस्थाच्या जीवनांत **श्रीगुरू** स्वरूपात प्रगट होतो. चालणाऱ्याच्या पुढे-पुढे, आपल्या हातात आत्मबोधाची मशाल धरून, पांथस्थाला सतत वाट दाखवतो; अज्ञानांधकार नाहीसा करतो.

मग असा मशालजी (म्हणजे श्रीगुरू) असल्यावर ध्येयाप्रत जाण्यास काय अडचण? आपण त्याचे बोट सोडावयाचे मात्र नाही. त्या पाऊलांचा मागोवा घेत चालत राहिल्यावर थकवा येत नाही; कंटाळा येत नाही आणि आलाच तर "**भागलिया मज वाहतील कडिये।**" या वचनानुसार आपल्याला कडेखांदी घेतच असते श्रीगुरूमाऊली. हो नां?

* * * *




आपले ध्येय आपण प्रथमत: निश्चित करावयास हवे. आता ध्येय निश्चित करावयाचे म्हणजे नेमके काय करावयाचे? असा प्रश्न सामान्यत: सर्वसामान्यपणे परमार्थेच्छू माणसाच्या मनात निर्माण होतो. या प्रश्नाचे तसे अगदी सरळसरळ उत्तर असे आहे की, देव हेच/भगवंत हेच आपले ध्येय पाहिजे.

आजच्या बुद्धीवादी जगात, विज्ञानवादाचे वारे वहात असतांना देव या संकल्पनेविषयी नाना चर्चा, वादविवाद असतांना साधकाने भगवंतावरचा विश्वास, श्रीगुरूतत्व व श्रीगुरूउपादिष्टीत साधनमार्गावरील विश्वास बळकट धरला पाहिजे.

साधकाने संतप्रणित, साक्षात्कारी महात्म्यांनी आपल्या प्रचितीतून सांगितले की, श्रीगुरूंनी आपल्या स्वानुभवातून वर्णन केलेला, न दिसणारा पण साधनेने दिसू शकणारा, न अनुभव पण अनुभवता येणारा, मोक्षप्रद, **आनंदमय,** परिपूर्ण, बंधनमुक्त करणारा, आनंदीआनंद देणारा, एवढेच नाही तर आपल्यालाच आनंदस्वरूप करून टाकणारा भगवंतच/श्रीगुरूच आपल्या उराशी घट्ट धरावयास हवा.

माणसांची हजारो नांवे आहेत तशीच सगुण साकार भगवंताचीही. आपण

मात्र श्रीगुरूंकडून अनुग्रहसहित प्रेमशक्तियुक्त मिळालेल्या सिद्ध नामानेच, निष्ठापूर्वक, हळूवारपणे, अत्यंत आपुलकीने, जास्तीत जास्त भक्तिप्रेमभावाने, आपल्या श्रीगुरूंनी दिग्दर्शीत केलेल्या देवास सतत आठवावयास हवे.

या आठवातून, प्रेमभावाने आळवण्यातून आपल्या अंत:करणात भावशक्ती वाढीस लागते; मग या भावातूनच वृत्तीमध्ये भक्तिप्रेमरस सतत पाझरत राहतो. हा रस जसजसा साठत जातो; तसतशी **भावोत्कटता** वाढीस लागते. ह्या उत्कट भावाचा फार मोठा उपयोग आहे. यामुळेच भगवंताचा **खरा** छंद जडतो आणि या छंदाची सर्वांगीण जोपासना म्हणजेच साधना/उपासना.

अशा प्रकारे उपासना उत्कटभावाने प्रेरित झाली की मग ती उपासना विडा रंगल्याप्रमाणे जास्तीत जास्त रंगतच जाते. हा दाखला देखिल कमीच आहे. विडा रंगला तरी त्याचा रंग काहीच काळ टिकतो नां? पण हा भक्तिप्रेमसुखाचा रंग कमी होत नाही तर वाढतोच.

या रंगाचे दुसरे नांव आत्मरंग, रामरंग, **कृष्णरंग**. हा रंग कधीच विटत नाही तर तो नित्यनूतन हळूहळू अधिकाधिक खुलतच जातो. जसे एखादे वस्त्र धुवत जावे तसा तसा त्याचा रंग खुलतो; पण वस्त्र जीर्ण होते. या रंगाचे/ भक्तिप्रेमवसनाचे तसे नाही.

या एका दिव्य उत्कट रंगात दंग होण्यासाठी, आपण नवविधा प्रकारची जी भक्ती आहे, तिची कास धरावी. या सगळ्या नऊ प्रकारच्या भक्तीचा आपण सुंदर मिलाफ करावा; म्हणजे कधी ग्रंथ वाचावा, कधी अभंग म्हणावेत, कधी ऐकावेत, कधी सत्संग करावा, कधी प्रेमाने भजन करावे; कधी सगुण पूजनात रंगून जावे, कधी भगवंताशी गुजगोष्टी कराव्यात; कधी कधी त्याच्याशीच भांडावे, रूसावे, रागवावे; पण या सगळ्यात भक्तीभावाचा एकच एक धागा, अस्तर असावे आणि **नाम** मात्र अखंड घ्यावे.

उपासनेत आळस, कंटाळा, तमोगुण यांना अजिबात शिरकाव करू देऊ नये. उपासनेचा कधी कंटाळा करूं नये. "**उपासनेला दृढ चालवावे**" असं समर्थ सांगतात. "**देह जावो अथवा राहो**" अशी नामदेवरायांची शिकवण.

**"तुका म्हणे करा सेवा। आले जीवावरी तरी।।"** म्हणून सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वेसर्वा, आनंदस्वरूप अशा करूणासागर, दयाघन प्रभूला कधी उच्चरवाने (वैखरी राम आधी वदावा) कधी मनातल्या मनांत (अगदी आतल्या-आतल्या खोल कप्प्यात) कधी सखोल चिंतनपूर्वक तरी कधी अगदी सहजभावातून त्याच एकाचं सतत स्मरण करावं. हे करत असतांना आपल्या आतच एक **आनंदाचा** स्त्रोत-महास्त्रोत वहात आहे याची जाण-आनंदानुभव घेत घेत त्याला आळवावा. कधी डोळ्यांनी त्याला प्यावे, म्हणजेच त्याच्या रूपाची आपल्या डोळ्यात आणि तद्द्वारा आपल्या हृदयांत साठवण करावी; तर कधी ध्वनी तत्वातून कानांच्या द्वारा, भगवंताचा शब्द आपल्या मनोमंदिरात कायमचा उमटवावा. (ध्वनीफितीसारखा) त्याचा स्पर्श, रूप, रस, रंग, नाद आपल्या ज्ञानेंद्रियांतून अनुभवावा. मग काय होते? तर **"मन रंगले रंगले। तुझ्या चरणीं विसावले। केली या विठ्ठले। ऐसी कृपा जाणावी।।"**

* * * *





उपासनेचे ध्येय काय? तर जीवावस्थेचा त्याग व शीव अवस्थेची पूर्ण जाणीव. या शिवावस्थेची शुद्ध जाणीव म्हणजेच स्वरूपस्थिती. त्यासाठीच भक्ताने उपासनेचा/साधनेचा अंगीकार मोठ्या अस्थापूर्वक करावयाचा असतो. भूकेने करंजळलेल्यास जशी अन्नाची आस्था; तशी भक्तास साधनेची/भक्तिप्रेमसुखसेवेची हवी. नाही कां? हा अंगीकार नेमकेपणाने करणं परमार्थात फार-फार महत्वाचं आणि हा अंगीकार कसा करावयाचा हेच फक्त श्रीगुरू आपल्याला वारंवार सांगतात; वेगवेगळ्या प्रकारे सांगतात-शिकवतात.

म्हणूनच बहुतांशी सर्व साधना-संप्रदायामध्ये श्रीसद्गुरूंचा महिमा, अपार, अगम्य, सर्वश्रेष्ठ म्हणून वर्णन केलेला आढळतो.

साधकाने प्रवासास (पारमार्थिक) सुरवात केल्यावर श्रीसद्गुरू त्याच्या पुढे बोधाची मशाल घेऊन चालतच असतात; त्याचबरोबर खरे तर पाहतां श्रीगुरू त्याच्या हृदयसिंहासनावर बसून त्याला आतूनच यथार्थ मार्गदर्शन करतच असतात. श्रीगुरू त्याला मागे-पुढे-आंत-बाहेर, सर्वांगाने-सर्वतोपरी सांभाळत असतात.

तथापी सत्शिष्याला आपले साधन बरोबरच आहे आणि मी जे जे करतो ते योग्यच आहे अशी पक्की धारणा करणे पुष्कळवेळा अवघड/नाही कठीणतम, दुरापास्त होऊन बसते. कां तर साधनेतील प्रथम अडथळा व साधनमार्गात साधनेत वारंवार पायात पाय घालणारं हे त्याचे मनच असते.

त्या वेळी साधकाने आपल्या साधन अवस्थेमध्ये आणि आपल्या **अभ्यासयोगात** श्रीगुरूंनी सांगितल्यानुसार **त्यांचेच** सर्वच्या सर्व ऐकून मोठ्या दृढ निश्चयाने, मनाच्या मुसक्या बांधून श्रीगुरूवचनावर पूर्ण विश्वास टाकून आपला भक्तिप्रेममार्गावरील प्रवास नेटाने चालूच ठेवावा लागतो. एवढ्यासाठी आपले तुकोबाराय म्हणतात, "**मन करा रे प्रसन्न। सकळ सिद्धीचे कारण।**"

आपल्या मनानेच मनाला, निष्फळ चिंतनांतून बाजूला काढावयाचे. यासाठी आपल्या सगळ्या वृत्तीप्रवाहात भगवंताचाच संकल्प निश्चयाने मिसळून टाकावयाचा.

आपण भक्तांनी, साधनप्रवण होऊन आपल्याच ध्येयाशी म्हणजेच परमात्म्याशी/भगवंताशी/श्रीगुरूंशी तीव्र अनुसंधान ठेवावयाचे असते. अनुसंधान तीव्र-तीव्रतर होण्यासाठीच एकाच रूपातील दैवताची निवड करावयाची. या निवडीच्या बाबतीत साधकाला त्याच्या-त्याच्या श्रीगुरूंचे बहुमालाचे मार्गदर्शन मिळत असते.

असे तीव्र अनुसंधान टिकण्यासाठी एक अक्षर, अव्यय, चिरंतन धारणा

अशी करावी की, परमश्रेष्ठ-परमात्मा; **आनंदकंदच, सच्चिदानंद** परमप्रेमस्वरूप फक्त श्रीहरीच मला हवा आहे आणि तो प्राप्त करून घेऊन ''**मी**'' आत्मनिष्ठ, आत्मतृप्त, आत्मरती, आत्मक्रीड अशी अवस्था निश्चितच अनुभवणार आहे. अशी आनंदकारता हाच माझ्या साऱ्या जीवनाचा एकमेव उद्देश आहे; मग त्यासाठी हवे तितके कष्ट सोसावयास लागोत आणि हवे ते साधन करावयास लागो तरी काहीच हरकत नाही असा दृढ आत्मविश्वास, आत्मनिर्भरता पाहिजे. या ना त्या, कोणत्याही प्रकारची साधना आपण सातत्याने, साधनेसच प्राधान्य देऊन चालू ठेवावी की ज्याने आपल्या आनंदानुभवात वाढच होत राहील.

या विश्वातील यच्चयावत् तत्ववेत्ते एका मूलभूत आनंदतत्वाचाच उद्घोष करीत आहेत. म्हणून तर भगवद्भक्ताने देहबुद्धीच्या वावटळीत सांपडू नये. आपली **भावशक्तिच** आपल्याला त्या सच्चिदानंदघन परमात्म्याशी एकरूप करेल अशीच आपली पक्की धारणा असावी. म्हणूनच मनोभावाच्या प्रत्येक आवेगात एका भगवंताचा/श्रीगुरूंचा वेग अनुभवत रहावा.

असा भावानुभव, परमार्थपथावरील प्रवास मोठा सुखद करण्यास उपयोगी पडतो; तसाच तो भक्ताचे **भावजीवन** पुष्ट करीत-करीत त्याला आतून भावविश्वास, भावाधार देत राहतो.

अशा टप्प्या-टप्प्याने आनंदाची प्रचिती हा भक्ताचा अगदी जन्मसिद्ध हक्कच आहे. खरे तर या आनंदाची प्रचिती घेण्यापासून श्रुतीमातेने, शास्त्रांनी, पुराणांनी कोणालाच वंचीत केलेले नाही. सर्वच मनुष्यमात्रास हा मूलभूत हक्क आहेच. पण या हक्काची जाणीव मात्र श्रीगुरूकृपेतूनच होत असल्याने, श्रीपरमात्म्याचीच कृपा श्रीगुरूमाध्यमातून आपल्यावर होत आहे अशी आपली दृढ धारणा हवी. आपले श्रीतुकोबाराय पण सांगतात, ''**माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव। आपणचि देव होय गुरू।**''

* * * *

# चिंतन १७७

परमार्थपथावरील भक्ताचा प्रवास/साधकाचा प्रवास असं नेहमी म्हटलं जातं; पण यातला प्रवास हा शब्द केवळ सोयीचा म्हणून वापरला जातो. हा प्रवास दैहिक नाही; तर या प्रवासात एक आधारभूत वस्तू म्हणून देहाचा वापर करावयाचा असतो आणि अत्यंत महत्वाची गोष्ट म्हणजे देहाच्या कोणत्याही व कशाही अवस्थेत असतांना हा प्रवास करता येतो. साधनमार्गामध्ये याचा अडथळा येत नाही. मात्र दृढ प्रयत्न, जिद्द व अत्यंत आवड मात्र पाहिजे. निश्चय हवा **''निश्चयाचे बळ। तुका म्हणे हेचि फळ।।''**

श्रीतुकाराम महाराजांचा हा विचार केवळ चिंतनीयच नव्हे तर अनुकरणीय आहे. या विचाराचा आचार, आधार भक्ताने या साधनपथावरून चालत असतांना अवश्य घ्यावयास हवा.

आपला प्रवास व्यवस्थित चालला आहे की नाही; हे ज्याला त्याला (म्हणजे साधन करणाऱ्याला) आपल्या स्वत:च्या मानसिक अवस्थेवरून कळत असते. या प्रवासाचा एक खास विशेष आहे. लौकिक, शारिरीक प्रवासात एका स्थानावरून दुसऱ्या स्थानाकडे जावे लागते. पण या भक्तिपेक्षा प्रवासाची गंमतच आहे. या प्रवासात एकदा श्रीगुरूची भेट झाल्यावर कोठे जायचे नसते; कोठे जावे लागत नाही; तर सर्वांतर्गत **आनंदाचा** झरा आपल्या आत कोठे आहे अणि तसाच तो सर्व विश्वाला व्यापून आहे, अशा आपल्याच मूलभूत **आनंदस्वरूपाची** प्रचिती घ्यावयाची.

जगामध्ये उपासनामार्गाचे विविध मार्ग आहेत. उदाहरणार्थ भक्तियोग, राजयोग, हठयोग, ध्यानयोग, लक्षयोग, ज्ञान इत्यादी. पण हे सर्व योग जरी असले तरी या सर्व प्रवाहात भक्तियोग श्रेष्ठ आहे. कां म्हणाल तर, या सर्वच मार्गांना भक्तियोगाची नितांत आवश्यक्ता असतेच. या भक्तियोगाचे अस्तर सर्वच मार्गात आहे.

भक्तियोगासाठी प्रेम विशुद्ध, निरपेक्ष, निरामय, निरलस, निखळ, निर्मळ, निर्निमित्यच असावयास हवे. तरच तो भक्तिप्रेमभाव! साधनेचे सर्व प्रकार आपल्या अंत:करणात **भावजागृती** होऊन भक्तिप्रेमरस निर्माण होण्यासाठीच आहेत. म्हणून आपले उपास्य दैवत तसेच आराध्य श्रीगुरू दोन्ही एकच, ''**माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव। आपणचि देव होय गुरू।।**'' याच्याविषयी अधिकाधिक भक्तिप्रेमभाव वाढण्यासाठी, **नेम,** निश्चय, निष्ठा, निर्भयता या चारी गोष्टी अत्यंत महत्वाच्या आणि अती उपयोगी आहेत.

या वरील चार गोष्टींचे पोषण, **आठवणीने** आणि अनुसंधानाने होत असते. आठवण आणि अनुसंधान या दोन्ही गोष्टी आत्मानात्मविवेकाने साध्य होतात. हा विवेक हे मन **स्वच्छ** करण्यासाठी वापरावयाचे उपकरण आहे.

कधी या मनाची गोड शब्दांनी समजूत घालून, कधी त्याला अटकाव करून, कधी-कधी गोडी-गुलाबीने थोडंस चुचकारून, कधी त्याला बोध करून, कधी मोठ्या निर्धाराने तर प्रसंगी शासन करून सुद्धां, त्याला सच्चिदानंदाच्या आठवात ठेवावयाचे असते. हेच नामस्मरण!

यासाठी पोषक म्हणून संतचरित्रे मनाला बोध करतात. भगवत्‌चरित्र श्रवणाचा, चरित्रगानाचा, मननाचा पण यासाठी फार मोठा उपयोग होतो. ह्या सगळ्याचा परिपाक चित्तशुद्धी **निर्मळ चित्त.** तुकोबाराय म्हणाले, ''**नाही निर्मळ जीवन। काय करील साबण।।**''

आणिक एक सुंदर उपाय सांगितला भक्तिशास्त्रकारांनी, ''**आत्मनिवेदन.**'' या आत्मनिवेदनात मनोबाध अनुस्यूतच आहे. याचा फार उपयोग होतो. यासाठी निष्ठा, **नेम,** श्रद्धेची वाढ आणि भगवंताविषयी अपरंपार प्रेमभाव फार अगत्याचा.

ही सगळी वाट आपल्या अंतर्मनातच आहे आणि चालही आतच आहे. या वाटचालीने, आपली साधना अधिक व्यापक, अधिक सूक्ष्म, अधिकाधिक **जाणीव** (समर्थांच्या भाषेत शुद्ध जाणीव) देणारी, अत्यंत

अंतर्मुख करणारी, भगवत्प्रेमाचा ओघच नाहीतर प्रचंड धबधबा निर्माण करणारी अशी आहे.

आपले लक्ष सतत या अलक्षाकडेच असावयास हवे. भक्तिप्रेमसुख हा केवळ शब्दाचा खेळ नसून स्वानुभवाचा भाग आहे. अमर्याद, अखंड, सनातन, चिरंतन अशा आत्मानंदाच्या/स्वानंदाच्या बागेतील मधूर, रसाळ गोमटी फळे आपल्याला आपल्या साधनेनुरूप मिळतच असतात. साधन मात्र सुटता कामा नये. अगदी साध्य हाती आल्यावर सुद्धा. ते साधन म्हणजे **नाम**.

* * * *



# चिंतन १७८

आपल्या उपासनेत श्रद्धा दिवसेंदिवस वाढती-चढती होत राहणं हा अत्यंत महत्वाचा भाग आहे. जसजशी आपली श्रद्धा चढत्या-वाढत्या आलेखाप्रमाणे हिमशिखरासारखी वाढत जाते, उत्तुंग होते, तसतशी भगवंताची ओढ अधिकाधिक वाटू लागते; मग त्यातूनच भगवत्‌भक्तिप्रेमभाव व्यापक होत जातो. आपल्या अंतर्यामी भक्तिप्रेमभावाचा एक अखंड, अद्‌भूत असा निर्झरच पाझरू लागतो. त्याचा ओलावा, मंद-मंद नाद, झुळझुळणारा प्रवाह आपला आपल्यालाच जाणवू लागतो आणि ही जाणीव मात्र अतिंद्रिय स्वरुपाची असते; हळूवार असते. नाजूक, मऊमुलायम अशा मखमलीसारखी सुखद, ह्रदयस्पर्शी असते.

आपली साधना वाढावी म्हणून आपण उपासनेशी लौकिक फळाचे नाते कधीच जोडू नये. तर **"पिटू भक्तीचा डांगोरा"** या श्रीतुकोबारायांच्या विचारसरणीला अनुसरून **उपासनामत्त** आणि **मस्त** होण्याचा सातत्याने प्रयत्न करावा. आपल्या प्रयत्नशीलतेस भगवंताची कृपा आणि श्रीगुरूंचे आशीर्वाद आहेतच अशी सतत धारणा करावी, असावी आणि ठेवावी.

**श्रद्धा** हा साधनेचा आत्माच आहे; या श्रद्धेची जोपासना उपासनेतून होत असते. म्हणून आपला साधकाचा अट्टाहास हा उपासनेचा असावा. **''मारेन किंवा मरेन''** हा जसा लढवय्या सैनिकाचा वीरभाव असतो तसाच वीरभाव आपला साधनेच्या क्षेत्रात/रणांगणात असावा. या वीरभावाने अखंड भगवंताकडेच आक्रमण करणारा साधक खरा-खरा आक्रमक.

आपल्या उपासनेला तडा जाऊ नये म्हणून आपण साधकांनी व्यापक प्रमाणात मोठी दक्षता घ्यावयास हवी. मग काय करावे? आपल्या भक्तीभावास तडा जाईल अशा ठिकाणी जाऊ नये; देहात्मभावातच रमणाऱ्या, चिंताग्रस्त असणाऱ्या **निष्फळ चर्चा**-प्रतिचर्चा करणाऱ्या, ईश्वरनिंदा करणाऱ्या, अर्थ आणि दंभ यांच्या ओझ्याखाली राहून सतत बाष्कळ बढाया मारणाऱ्या बुद्धीभेद करणाऱ्या, संत-उपासना यांची निंदा करणाऱ्या, धर्मनिंदा करणाऱ्या मंडळींचा सहवास टाळावा. संतांच्या विविध वाक्यांचा आपणाला अनुकूल असाच अर्थ काढून सदैव प्रपंच-चिंताग्रस्त राहणे साधनमार्गाला बाधक आहे.

अभिमान (मग तो कोणत्याही प्रकारचा) टाकून अनन्यभावाने भगवंतास/श्रीगुरूंस शरणागती करावी. आपल्या कथिक, वाचिक, मानसिक कृतीतून अतीव मृदूता असावी. प्रत्येक जीवात असणारा **''शिव''** लक्षात घ्यावा. रज आणि तम या गुणांचा त्याग करून सत्त्वगुणाची जोपासना करावी व मग सत्त्वगुण पण न उरता **''शुद्धसत्व''** उरावे.

आपणाला साधन जमणार नाही अशी नकारात्मक भावना न करता, आपल्याला साधन निश्चित जमेल अशीच सकारात्मक भावना सदैव असावी. आपल्यात काहीच अर्थ नाही, आपल्या हातून काय होणार ह्या विचारमालिन्याची जाळी-जळमटे, आपल्या अंत:करणातून श्रद्धेच्या सहाय्याने/उपकरणांनी काढून टाकावी. विचार अखंड असा असावा, असा दृढ विश्वास नित्य बाळगावा की आपले **श्रीगुरूच** आपल्याकडून साधन पूर्ण करून घेतीलच. **''भागलिया मज वाहतील कडीये'' असा** श्रीसद्‌गुरूकृपे-बाबत भक्कम-भरभक्कम विश्वास असावा. होय **की नाही?**

तत्वाप्रत पोहोचण्यासाठी एक योजना असते. ती योजना म्हणजे एक भगवंतच आपल्या मनाचा विषय करावयाचा. यासाठी आपला **भावसेतू** दृढ-दृढतर करावयाचा.

आपल्या साधन प्रवासात शब्दांचा अडथळा निर्माण न होऊ देता, विनाकारण व्यर्थ वेळ जाऊ न देता आपल्या अंत:करणकमलातील, इतकच नाही तर आपल्या गात्रा-गात्रातील "**भावगंध**" कसा वाढेल, त्यातून तरल भाव निर्मिती होऊन आपली अध्यात्मशरण्यावस्था कशी व्यापक होईल आणि या अनन्यशरण भावातून भगवंताची/श्रीकृष्णभगवानाची जास्तीत जास्त जवळीक सर्वांगाने कशी साधता येईल ते पहावे आणि या शरण्यभावासाठी उपयोगी पडणाऱ्या, पोषक असणाऱ्या, सर्वच गोष्टींचा खूप-खूप उपयोग सर्वतोपरी घ्यावयाचा.

लौकिकातून अलौकिकाचा/भगवंताचा वेध घेण सोपे नाही असे वाटत असले तरी समृद्ध अशा **भावभूमिकेला, भावबळाला** ते अवघडही नाही हे नित्य लक्षात ठेवा आणि या भावाची कास पकडा - घट्ट पकडा. त्यासाठी साधन-उपासना-**नामसाधना** हाच खराखुरा आश्रय आहे, एका नामाशिवाय सर्व व्यर्थ आहे अशी आपली नामाविषयी मानसिकता आपण करावयास हवी.

या भावातून **अभाव** नाहीसा होतो. या भावबळाने साधक आत्मबलसंपन्न व ओजयुक्त होतो हे ओजतत्व त्याला तेजस्वी करते; अंतर्मुख करते. शूरवीर करते. निर्भय करते एवढेच नाही तर अभय देते.

* * * *

# चिंतन १७९

नामसाधना दृढ होऊ लागल्यावर, नामसाधकाला हळुहळु मनाची एक आगळी वेगळी उपचार आणि उपाधिरहित अशी अंत:तृप्ती अनुभवावयास मिळते. याच तृप्तीमधून पुढे समाधान वाढीस लागते. नामधारकाच्या प्रत्येक कृतीतून त्याला स्वत:ला आणि त्याच्या सहवासातील (अंतरंग) लोकांना एक लयबद्धता जाणवते. बाह्यरंगातल्या लोकांना सुद्धा ती जाणवते; पण अंतरंगी जनांना ती नुसती जाणवत नाही तर त्यातली भावोत्कटता, भक्तीप्रेमभाव, तरल, निर्मल भावप्रकाश जाणवतो.

नामाने (नामसंकीर्तनाने) स्थूलशरीरावर सात्विक भाव प्रकट होतात; मग अंतर्गत बदल होतील यात नवल ते कसले? नाही कां? शरीराच्या त्वचेचा रंगही बदलावयास लागतो. भ्रूमध्यामधे एक पांढरट-तांबूस असा तिलक प्रकट होतो. काळा, गोरा, सावळा असा जो काही त्वचेचा वर्ण असेल त्या रंगाला एक तजेलदारपणा येतो. व्यासपीठावर असतांना अशा साधकाच्या ठिकाणी ही तेज:पूंजता अधिक जाणवते (श्रोत्यांना आणि दर्शनार्थींना) नामधारकाच्या आवाजात, स्वरात बदल होतो.

नामधारकाला, भगवंताच्या चरित्र-लीला-गुण यांची वारंवार आठवण येते. त्याचबरोबर आपल्याला सबीजनाम देणाऱ्या श्रीसद्‌गुरूंच्या प्रेमाने त्याचे अंत:करण सतत सद्‌गदित होऊ लागते. भगवंतापाशी भक्ताविषयी असणारी भाववत्सलता त्याला अगदी अंतर्मनातून प्रत्ययास येते. भक्तीप्रेमभाव नित्यनूतन वाढतच जातो.

नामसाधकाला याबरोबरच एक प्रकारच्या दिव्य शक्तीचा प्रत्यय येत जातो. गोंगाट, गलबला, व्यर्थ गप्पा, आवाज, कर्कश ध्वनी यांचा त्याला आतूनच स्वाभाविक कंटाळा यावयास लागतो. जास्तीत जास्त काळ

नामचिंतनात जावा असं त्याला **प्रामाणिकपणे** जाणवू लागतं आणि मग जाणिवपूर्वक तो आपला बहुमूल्य काळ एका नामस्मरणासाठीच खर्च करू लागतो. जसा कंजूष मनुष्य पै-पैशाचा खर्च अगदी जपून, विचारपूर्वक करतो.

नामसंकीर्तनाने त्याची वाचा, काया, इंद्रिये, मन आणि बुद्धी आतूनच अलंकृत होतात. कपडे व अलंकार यांनीच सुशोभित होण्याची त्याला गरजच रहात नाही; मग उलट या नामधारकामुळे कपडे आणि अलंकार यांनाच शोभा प्राप्त होते. खरं नां?

अशा नामधारकाच्या बोलण्यातील आपुलकी, श्रद्धा, विशुद्ध असा प्रेमभाव, भावभक्ती ऐकणाऱ्याला जाणवते; एवढंच नाही तर ती **ऐकणाऱ्याच्या** हृदयातील भावशक्तीला जागृत करते. नामस्मरण, भगवत संकीर्तन, पूजा-नित्यपाठ वगैरे गोष्टींनी मार्गक्रमण करणारा नामसाधक कर्मठापेक्षा जास्त पवित्र-निर्मळ, **आनंदस्वरूप,** आनंददायी, शुद्ध-सरळ-भव्य-दिव्य उदात्त विचारांनी नटलेला असतो.

अशी नामसाधना होत असतांनादेखिल विकल्पांचा हल्ला, जबरदस्त हल्ला होण्याची दाट शक्यता नाकारता येत नाही. साधन करत असतांना संसारविषयक संकल्प कमी जास्त प्रमाणात होतच असतात आणि आपल्या संकल्पानुसार सिद्धि झाली नाही तर जबरदस्त उदासीनता, वैफल्य, कशात काही अर्थ नाही अशी मानसिक स्थिती होते.

ज्या वेळी अनुभव येतात, त्यावेळी असलेली मानसिकता व ही मानसिकता यात महदअंतर असते; होय की नाही?

अशा वेळी नाऊमेद न होता, आलेल्या अनुभवांचा आनंद आठवत-आठवत अधिक अंतर्मुख होऊन, जास्त नेटाने साधन (नामसाधन) करावयाचे. साधकाची संकल्पशक्ती प्रापंचिक आघाताने संसारातल्या मायावी मोहाने अशक्त होण्याची, क्षीण होण्याची दाट शक्यता असते.

आणि म्हणूनच साधकाने साधनेतून मिळणाऱ्या दिव्य अशा शक्तीचे जतन करणे, ती शक्ती साठवत राहणे; त्या शक्तीचा भगवत्प्रेमभावासाठी

वापर करणे व भगवंत, नाम आणि श्रीसद्गुरू यांच्याविषयी निष्ठा जोपासण्यासाठीच या दिव्य-अद्भूत शक्तीचा वापर करणे फार फार महत्वाचे आहे.

अशी विफलता आल्यावर, अशा वेळी पूर्वेकडे जावयाचे असते तर प्रवास चालू होतो दक्षिणदिशेला तोंड करून. साधकाची अमृतमय वाटचाल वैराण करणाऱ्या अशा गोष्टी प्रपंचात-संसारात घडतच असतात. पण अशावेळी देखील आपण साधकाने दक्ष, सावध आणि आपल्या साधनेशी-नामसाधनेशी, भगवंताशी आणि श्रीसद्गुरूंशीच एकनिष्ठ राहून नाम सोडता कामा नये. बरोबर नां?

* * * *




श्रीगुरुज्ञानेश्वर महाराजांचे "संजीवन समाधी" स्थान म्हणून संपूर्ण महाराष्ट्रात, इतकंच नाही तर सगळ्या भारतवर्षात, आळंदी (देवाची) हे तीर्थक्षेत्र म्हणून प्रख्यात आहे. या ठिकाणी आल्यावर "**नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी।**" या संतवचनाप्रमाणे भाविकांच्या अंत:करणात ज्ञानज्योती प्रज्वलित होतात. "**नाम गाऊ, नाम ध्याऊ। नाम विठोबासी वाहू।**" अशी संपूर्ण **समर्पण** भावना उद्दीपीत होते. विशुद्ध परमार्थासाठीच माऊलीच्या भेटीसाठी येणाऱ्याला प्राप्त होणारे फळ पण तसेच श्रेष्ठ आहे.

या क्षेत्राचे प्राचीन नाव अलंकापुरी. संजीवन समाधी सोहळ्याच्या वेळी, जगच्चालक जगदीश्वर या स्थानाचे माहात्म्य साक्षात् अलंकापुरीलाच सांगत आहेत आणि थोर-थोर संत सत्पुरूष सप्रेम अंत:करणाने ते श्रवण करण्यास बसले आहेत. श्रीनामदेवरायांनी हे वर्णन फार सुंदर केले आहे. वैकुंठपीठ म्हणून ख्यातनाम असलेली ही अलंकापुरी १८ वरिष्ठ अशा धर्मपीठांमध्ये श्रेष्ठ

आहे. येथील पंचक्रोशीत कोट्यावधी यज्ञ-याग संपन्न झाले असून, सप्तऋषींनी या क्षेत्रात महान तपस्या केली आहे. खुद्द ब्रह्मदेव आणि नारद यांना या पुरातन क्षेत्राची महानता पूर्णत्वाने ज्ञात होती.

या प्राचीन तीर्थक्षेत्राचे महिमान अनेक पुराणात व्यासांनी गायले आहे. स्कंध पुराणातील सह्याद्री खंडाच्या ६४ व्या अध्यायात अलंकापुरीचे, करूणा, अलका, कर्णिका, आनंद व सिद्धक्षेत्र अशा विविध नामांनी माहात्म्य वर्णन आले आहे. आळंदी हे आदिपीठ-शिवपीठ असून **आनंदवन** म्हणून ते जगविख्यात आहे. हे ब्रह्मदेवाचे वचन आहे. बर कां!

या प्राचीन शिवपीठी इंद्राने अनेक यज्ञ केले. ‘‘**शिवपीठ हे जुनाट। ज्ञानाबाई तेथे मुकुट।**’’ असं नाथ म्हणतात. यामुळेच येथील नदीला इंद्रायणी असे नामाभिदान प्राप्त झाले. त्रिवेणी येथे गुप्तस्वरूपात वास करून आहे.

जगाच्या कल्याणाकरिता आलेल्या या चारी भावंडांनी समाधी सोहळ्यासाठी आलेल्या परब्रह्म परमात्मा श्री पांडुरंगाजवळ काय मागणे मागितले? समाधीपूर्वी, लोकोद्धारासाठी यांनी जगच्चालकाला केलेली विनंती फारच थोड्यांना ज्ञात आहे. पसायदानातील प्रार्थना सर्वज्ञात आहे. या सगळ्या विश्ववंद्य बंधुंचा विश्वेश्वर श्रीहरीशी झालेला संवाद अपूर्व व संस्मरणीय आहे.

आळंदीला कोटीतीर्थ आणून त्यात स्नान करणाऱ्याला वैकुंठपदाची प्राप्ती व्हावी अशी विनवणी यांनी त्रैलोक्य स्वामी केशवास केली. विश्वोद्धारासाठी मागितलेले हे मागणे ऐकून भगवंतालापण मोठी धन्यताच वाटली. दीनोद्धारासाठी तळमळणाऱ्या, स्वत:साठी काही एक न मागता आनंदाचे आवर जगासाठी घालण्यासाठी सर्वस्व वेचणाऱ्या या माहात्म्यांची ही आलौकिक इच्छा पांडुरंगाने पूर्ण न केली तरच नवल नां? आळंदीत येऊन जो कोणी भगवंताचे प्रेमभावभक्तीने नाम संकीर्तन करील, त्याला हे सिद्ध क्षेत्र आनंदनिधाना-स्वानंद साम्राज्याचा चक्रवर्ती करील. अनंतकोटी ब्रह्मांड नायकाने अलंकापुरीला प्रदान केलेला हा अमोघ **प्रेमार्शीवाद लक्षात ठेवा.**

"**विश्रांतीचे स्थान संतांचे माहेर। ते या भूमीवर अलंकापूर।**" आळंदीचे केलेले हे वर्णन अतिशयोक्त नसून ते यथार्थच आहे; हे आपल्या अंत:करणावर बिंबावयास हवे.

श्रीगुरुज्ञानदेवांच्या अभूतपूर्व अशा संजीवन समाधीमुळे मूळच्याच पवित्रनिधान असलेल्या अलंकापुरीला "**अधिकस्य अधिकं फलं**" या उक्तीप्रमाणें विशेष माहात्म्य प्राप्त झाले आहे. ते **नित्यतीर्थ** आहे. वाराणसी (काशी) ही ज्याप्रमाणे कोणत्याही युगात, कधीही नष्ट न होणारे अक्षयतीर्थ आहे; विख्यात आहे. तशीच ही आळंदी.

आळंदीवल्लभ श्रीज्ञानेश्वरमहाराज संजीवन समाधिस्थ आहेत, त्यांच्या हृदयकमलांतून चैतन्यपरब्रह्माचा प्रकाश नित्य बाहेर प्रकाशत असतो. या दिव्य, तेजस्वी ज्ञान-प्रकाशाच्या योगाने, या समाधिस्थ ज्ञानराजांची भक्ती करणारा साधक (नामसाधक) त्यांच्याच कृपेने "**पूर्ण**" होतो. माऊलीची ही नित्यतेजोमय प्रभावी प्रभा (ज्ञानसूर्याची) शुद्ध, सात्विक अशा सूर्यकांत-मणीरूप हृदयद्वारे, शरणागत दीनांना-साधकाला, सतत मार्गदर्शन करीत आहे.

श्रीगुरुज्ञानेश्वर माऊली आपल्याला मांडीवर घेऊन, नाममंत्र देतात, अर्थासह बोध करतात; नामस्मरणाच्या गुह्य अशा खुणा समजावून सांगतात.

ज्ञानदेव पहावा डोळा, अशी आळी या गेल्या ७५० वर्षात अनेकांच्या, भाग्यवंताच्या अंत:करणात उमटली; व त्यांच्या प्रेमाचा हट्ट माऊलीने पुरवला.

**चला आळंदीला जाऊ। ज्ञानेश्वर डोळा पाहू।।१।।**
**होतील संताचिया भेटी। सांगू सुखाचिया गोष्टी।।२।।**
**ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वर। मुखी म्हणतां, चुकतील फेर।।३।।**
**जन्म नाही रें आणिक। तुका म्हणे माझी भाक।।४।।**

"**यात्रे अलंकापुरा येती। ते आवडती विठ्ठला।। पांडूरंगे प्रसन्नपणे। दिधले देणे या ज्ञाना।।**"

* * * *

# चिंतन १८१

राग म्हणजे प्रेम आणि अनुराग म्हणजे उत्कट, निष्काम प्रेमभक्ती. अशा भक्तीप्रेमाचे दीर्घकाल आचरण झाल्यावर भक्ताच्या अंत:करणात निर्माण होणारी, न तुटणारी, न सुटणारी **ओढ**. अगदी कमालीची **आसक्ती**. हा शब्द भक्तीशास्त्रकारांनी वापरला आहे; एवढं लक्षात असू द्याव म्हणजे झालं.

भगवंताबद्दल/श्रीगुरूबद्दल वाटणाऱ्या या अनुरागाचे स्वरूप कसे असते? तर केवल म्हणजे निर्भेळ; अत्यंत शुद्ध; एकमात्र हरिभक्ताच्या भावनेने प्रेरित झालेली एकजिनसी वृत्ती. ही भक्तीप्रेमवृत्ती कोणत्याही मोह, दु:संग, फलाशा, भोगकामना, द्वंद्व व विकार यापासून सदैव अलिप्त असते. सदा-सर्वदा एका भगवंताशीच संपर्क साधणारी.

अशी भक्ती अविच्छिन्न म्हणजे तैलधारावत् अखंडपणे एकच दिशेने वाहणारी असते आणि अशी अवच्छिन्न भक्ती हृदयांतून वाहू लागल्यावर मग मन, बुद्धी, नसानसांतून, रोमारोमातून, पंचप्राणांतून **भक्तिप्रेमरसभावच** वाहू लागतो.

असे भक्तिप्रेम सतत उसळणे म्हणजेच रागानुराग भक्ती होय. अशा भक्तिप्रेमभावामुळे मन सामान्य स्तराच्या वर **उन्मन** असते. अतीन्द्रिय प्रत्यय/अनुभव घेण्याची क्षमता या मनात असते. या उन्मनीत भक्ताला अनुपम आनंदाचा, दृशचैतन्याच्या रोमहर्षक झोताचा/**प्रकाश झोताचा** अमृतप्रवाह अनुभवास येतो. असा अनुभव येत असतांना **करंटे!** कशाला म्हणावे नां? भक्तिप्रेमसुख न मागता मुक्ती मागणारा कपाळ करंटा बर कां!

आम्रवृक्षाला मोहोर यावा, त्याचा मंद-मधुरमद सौरभ आसमंतात पसरावा, तसेच घडते. कारण ही अनुरागभक्ती भक्ताला स्वस्थ बसूच देत नाही. सहजच भक्त **"मत्तो भवति"** असा मस्त होतो. तो महावेशाने धुंद

होऊन भजन, कीर्तन, नर्तन करतो. कधी हासत सुटतो; तर कधी **उदास** होतो; कधी-कधी अगदी निश्चेष्ट पडतो; तर काहींना काही वेळी **काव्यस्फूर्ती** सुद्धा होते/येते.

असा हा अकथनीय अनुभव ज्या भक्तिरतांना येतो, ते-त्या-ती सर्वजण भाग्यवंतच, होय की नाही? भक्त हा भगवंताकडे/श्रीगुरूंकडे आपोआपच खेचला जातो! लोहचुंबकाचा गुणधर्म म्हणजे तो लोखंडाचे खिळे आकर्षित करूं शकतो, तसेच परमात्म्याचे/श्रीसद्‌गुरूंचे. मग भगवंतानेच आकर्षित केल्यावर भक्ताच्या हृदयात भक्तिप्रेमभावाची ओढ (इतकी ओढ) निर्माण होते त्यात आश्चर्य ते काय? आणि ही ओढ, हे अनुराग भक्तिप्रेमसुख अवर्णनीयच. उकलून दाखवण्याची-बोलण्याची गोष्टच नाही आणि मौज-आनंदाची गोष्ट म्हणजे भगवंताच्याही हृदयात असाच विलक्षण ओढा असतो. भक्तासाठी-आपल्या प्रिय भक्तासाठी भगवान् १२व्या अध्यायात सांगताहेत, **''या सद्‌भक्त:, भक्तिमान् मे, भक्तिमान्य स मे प्रिय:''**

हे भक्तिप्रेम सुख दुर्मिळ. कळण्यास, मिळण्यास तर कठीणच कठीण. श्रीतुकाराममहाराज तर म्हणतात, ''**भक्तिप्रेम सुख नेणवे आणिकां। पंडिता, वाचका, ज्ञानीयांसी।।**'' एवढंच सांगून थांबले नाहीत, तर ''**आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त। तरी भक्तिप्रेमसुख दुर्लभ त्या।**'' असं म्हणाले. मग ते कुणाला मिळेल?

फक्त आणि फक्त त्यानांच ''**तुका म्हणे कृपा करील नारायण। तरीच हे वर्म (भक्तिप्रेमसुखाचे) पडे ठायी।।**'' मग ज्या कुणा भाग्यवंताला **मिळाले**, अनुभवास आले ते भाग्यवंत की करंटे?

हे वर्म कोणते? तर भक्ताची काम्यकर्मे, रूक्ष-व्यावहारिक चर्चा; कोरडी तत्त्वचर्चा यांची ओढ ओसरते. व्यावहारिक कर्मेसुद्धा अगदी जरूरीपुरतीच देहनिर्वाह एवढची उरतात. एका **भक्तिप्रेमसुखसेवेशिवाय** काही रूचेनासे होते.

भगवंताचा/श्रीगुरूंचा कृपानुग्रह भक्तावर झाल्यावर, श्रौत-स्मार्त कर्मे, लौकिककर्मे, रूढ आचार, बंधने यांचा आपोआपच त्याग होतो. सोडावी

लागत नाहीत तर सुटतात-कमी होतात. शिथील होतात; आणि केंव्हा गळून पडली याचा पत्ताच लागत नाही.

अजोड अशा या भक्तिप्रेमामुळे भक्त आणि भगवंत, श्रीगुरू आणि शिष्य यांच्यात एक विलक्षण तादात्म्य, एकरूपता, एकरसता, तन्मयता, तल्लीनता, तद्रूपता, एकाकारता प्रस्थापित होते. यातूनच तदनंतर दिव्यत्वाचे तेज ओसंडू लागते. या दिव्य भक्तिप्रेमाच्या ज्योती. असंख्य ज्योतींच ज्योती-पंक्ती तेवू लागतात. अखंड तेवतात आणि जीवन अंतर्बाह्य दिव्य भक्तिप्रेमतेजाने तेजोमयच होते. ही दिवाळी.

* * * *




नामसाधनेच्या प्रांतात, बुद्धी, भावना आणि क्रियाशक्ती या साधनेला उपकारक, पोषक व साधना तीव्र, अधिक तीव्रतर होईल अशा आहेत आणि त्यांचा तशाच रीतीने वापर व्हावयास हवा.

व्यावहारिक स्तरावर त्रास होऊ लागला आणि जर त्या त्रासांचे निवारण करण्यास, व्यवहार उपयोगी ठरला नाही तर मग साधक त्रास आणि कटकटी कमी होण्यासाठी, धर्मसत्तेच्या/ईशसत्तेच्या प्रांताकडे वळतो आणि ह्या प्रांतात **योग्य** व्यक्ती भेटली तर ठीक अन्यथा त्याचा वेळ वाया जातो, तसेच द्रव्यही निष्कारण अनाठायी खर्ची पडते. त्यास यथायोग्य मार्गदर्शन मिळतेच असे नाही.

मग कोणी म्हणतो, कुलदोष आहे, तर कोणी सांगतात, नारायण नागबली, त्रिपींडी श्राद्ध वगैरे करा. हे शब्द जरी कुणी संचार होणाऱ्या माणसाने वारंवार वापरले/सांगितले तरी साधकाने या सगळ्या शब्दांचा अर्थ आपल्या ठिकाणी निर्माण झालेला असंतुलीत वृत्तीप्रवाह, देहात्मभावाची अनिष्ट वाट असाच घ्यावयास हवा.

साधनेच्या प्रांतात बुद्धी आणि भाव यांचा अतिनिकट संबंध प्रत्ययास येत असतो. बुद्धी विपरीत व्हावयास लागली तर भावही तसेच विपरीत व्हावयास लागतात. म्हणून साधकाने आपली इच्छाशक्ती वाढवून (आणि तीपण **सद्बुद्धीतून**) ती इच्छाशक्ती एका भगवंताशी, श्रीगुरूंशी जोडावयास हवी, की ज्यायोगे, आपल्या बुद्धीमध्ये, भगवद्विषयक संकल्पच दृढ होत राहतील व ते सारे संकल्प शुद्धभावात मिसळता येतील.

असे संकल्प भावनेत मिसळल्याने, उच्च असा भक्तीप्रेमभाव नित्य जागृत होत राहून तो वाढावयास लागतो. याच जागृत भावातून भगवत् तत्वाचे/ज्ञानाचे स्फुरण व्हावयास लागते. सर्व विश्वाला व्यापून असणाऱ्या चिद्शक्तीविलासाचा काही काही भाग प्रचितीस यावयास लागतो. मनाची शुद्धी व्हावयास लागते. आपल्या शरीरातील आत्मतत्व जाणवू लागते. आपल्या आतच ते प्रकट व्हावयास लागते. नामसाधकाचा श्वास मंद-मंद होतो, आणि दृष्टी भगवत्प्रेमाने मस्त, धुंद होते, आनंदस्वरूप होते. नामधारकाचे सभोवती चिद्स्पंदनाचा वावर-कल्लोळ सुरू झाल्याने वातावरण प्रसन्न होते.

अशावेळी मानवानांच नाही तर इतर जीवांनाही समाधान मिळते. आता या अपूर्व समाधानाचे कारण भगवत्प्रेमा आहे असे सर्वांनाच कळेल असे मात्र नाही.

अशा नामसाधनेतून एक तृप्तता, अनोखी तृप्तता अनुभवास येते. या अनुभवातूनच एक रम्य समाधान वाढत जाते. भक्तीप्रेमा वाढत राहतो. एक प्रकारची दिव्य आत्मशक्ती प्रत्ययाला येते.

काही वेळा साधक आपल्या साधनेतील ताकद संसाराला लावतो. यात धोका आहे. साधनेत संसारविषयक संकल्प करीत गेल्यास आणि संकल्पानुसार लाभ/प्राप्ती झाली नाही तर विकल्पांचा जबरदस्त हल्ला होण्याची शक्यता असते. अशा वेळी मग उदासीनता, वैफल्य आणि कशात काही अर्थ नाही अशी नकारात्मक मानसिक स्थिती येते.

जेंव्हा आत्मानुभव येतात, त्यावेळी असलेली मानसिक स्थिती व ही वरील घोरनिराशाजनक मानसिक स्थिती यात महद अंतर असते. मग अशा वेळी नामधारकाने/साधकाने आलेल्या आत्मानुभवाचा **आनंद–महानंद** आठवत अधिकाधिक अंतर्मुखता साधावयाची. साधकाची संकल्पशक्ती प्रापंचिक आघाताने, अडचणीने, त्रासाने, संकटाने आणि संसारातील मायावी प्रेमाने अशक्त होत असते.

आणि म्हणून आपल्या नामसाधनेतून मिळणारी शक्ती साधकाने जतन करावयास हवी; साठवावयास हवी. तिचा वापर भक्तिप्रेमासाठीच करावयास हवा. त्या शक्तीतून आपली भगवद्निष्ठा/श्रीगुरूनिष्ठाच जोपासली पाहिजे.

साधना प्रगल्भ व्हावी म्हणून साऱ्या निराशाजनक विक्षेपशक्तींचा पुरता बिमोड व्हावयास हवा/करावयास हवा. एका भगवंताकडेच नि:संशयपणे चालत राहिलं की सत्संकल्पच दृढ होतात. साऱ्या शंका नाहीशा होतात.

आपली बुद्धी, मन, कर्म, काया, वाचा सर्व काही एका भगवंताप्रित्यर्थ पणास लावले/एका श्रीगुरूसाठी पणास लावले तर नामधारक साधनपथावरील वाटचाल मोठ्या मजेत करीत राहतो. मग साधनाविषयी कणखर भूमिका लाभते. कोणत्याही प्रकारची सबब न सांगता ठेवता सम्यक व सर्वांगसुंदर साधन करण्याविषयी निष्ठा प्रगल्भ होते. ही प्रगल्भता एका नामचिंतनातून आणि श्रीगुरूंविषयी असणाऱ्या विश्वास, भक्तिप्रेम, श्रद्धा यातूनच वाढत राहते.

* * * *

# चिंतन १८३

नामसाधना करीत असतांना, साधकाला अनुभवास येणारा आनंद हा अगदी **अलौकिक,** वेगळ्याच अतिउच्च दर्जाचा असून एका विलक्षण तन्मयतेतून प्राप्त होणारी अशी ती निरामय, नित्यनूतन आनंदावस्था आहे. कधी कधी ही अवस्था बराच दीर्घ-प्रदीर्घ काळ टिकते, तर कधी ती अजिबातच हरवून जाते.

साधक कधी कधी विमनस्क स्थिती, वैफल्य, घोर निराशा या गोष्टींनी ग्रस्त होतो. याचे कारण त्यास कळत नाही पण त्याचे निश्चित कारण शास्त्रकारांनी सांगितले आहे.

व्यथा, विकल्प, अपुरेपणा, निराशा, संसारातील अपयशाच्या गोष्टी, नित्य दैनंदिन जीवनातील बोचरे अनुभव, घरात, समाजात, जगात वावरत असतांना आपल्या मनात निर्माण होणारे भाव, प्रपंचातील व्यस्त स्थिती, काळज्या, चिंता, या आणि अशा कित्येक गोष्टी जरी भगवत्‌चिंतनाने तात्पुरत्या बाजूला गेल्या असे वाटत असले तरी त्या सर्व गोष्टींनी मनाच्या खोल कुहरात कुठेतरी ठाण, खोल-खोल ठाण मांडलेले असते. मनाइतकी प्रचंड खोल दुसरी गुहा अस्तित्वातच नाही.

बंधन आणि मोक्ष यांना कारणीभूत असणारे मन, अती शक्तिमान आणि म्हणूनच काबूत ठेवण्यास अती कठीण असेच आहे हे खरे; पण अशक्य मात्र बिलकुल नाही हं! सर्व आत्मसाक्षात्कारी संतांचा आपल्याला सतत उपदेश आहे, ''संसार सोडून नाही तर संसारव्यथा-सत्यता-आसक्ती सोडून भगवंताचे/एका श्रीगुरूतत्वाचे चिंतन करीत रहावे.

संसारातील चिंता व हे भगवंताचे, श्रीगुरूबोधाचे चिंतन यात मूलभूत फरक आहे. हा फरक काय आहे? तर आनंदकंद अशा भगवंताचे चिंतन,

त्याचे स्मरण करणाऱ्याला (नामधारकाला) अक्षय, अविनाशी, अखंडानंदाकार करते; याच्या उलट संसाराची चिंता, क्षय, विनाश, दुःख देते. त्याने आपल्या आत्मबलाचा क्षय होतो. ओजशक्तीवर सतत प्रहार होऊन ती निकामी ठरते; मतीभेद होतो; विकल्पच वाढतात. काय न् काय, म्हणून तर अध्यात्म मार्गाला **अमृतपथ** म्हणतात; तर संसारचिंतनाला **मृत्यूपथ** म्हणतात. अध्यात्ममार्गातील चिंतन चैतन्यास प्रदीप्त करून साधकाला चिदावस्थेची प्रचिती देते; आणि संसारातील चिंता, संसारग्रस्तास रोजच जाळत असते.

नामधारकाच्या अंतर्मनात भगवंताविषयी प्रेम निर्माण होण्यासाठी, त्याची काया भगवंत्/श्रीगुरूसेवेसाठी; मन भगवंताचे गुणानुवाद करण्यासाठी; वाचा (वैखरी) त्याच्याच नामाचा जल्लोष-हलकल्लोळ करण्यासाठी, नुसते आतुर असून भागत नाही, ते अत्यंत आतुर तर असावेच लागते.

या आतुरतेतून एक दिव्य भक्तीगंध, भावसुगंध, भक्तिप्रेमलहरी, परमप्रेमयोग या गोष्टी प्रगल्भ, प्रगट होऊन त्यांनी नामधारकाचे हृदय ओतप्रोत भरून वहावयास लागले पाहिजे.

मग काय होते पहा नां! नामस्मरण करणाऱ्या नामधारकाच्या हृदयात अपूर्व अशी भगवत्सुधा/भावसुधा ओतप्रोत भरून ती त्याच्या अंतरंगात सातत्याने अमृतस्त्राव करत राहील/राहते यात नवल नाही.

नामसाधना करावयाची म्हटले तर त्यासाठी प्रथम आवश्यक असलेली गोष्ट म्हणजे **निश्चय. "निश्चयाचे बळ। तुका म्हणे हेचि फळ।।"** या निश्चयाबरोबर तेवढीच महत्वाची दुसरी गोष्ट म्हणजे **सत्संग.** सत्संग हा शब्द साधनेच्या प्रांतात आपल्याला नेहमीच ऐकावयास मिळतो; पण त्याचा खरा अर्थ काय? सत्तत्वाची म्हणजेच भगवंताची जाणीव म्हणजे सत्संग. साधकाने-नामसाधकाने अशा देहाची संगत करावयास/धरावयास हवी की, त्या संगतीतून भगवत्प्रेमभाव निर्माण होईल आणि तो दिन-प्रतिदिन वाढतच राहील. येता-जाता, उठता-बसता साधना करावीच.

तरीसुद्धा शरीराला आणि मनाला वळण लागण्यासाठी, साधकाने नेमाने, निश्चयाने आणि प्रसंगी हट्टाने (साधनेच्या) रोज ठराविक वेळी, ठराविक काळ, ठराविक जागी साधना करावीच. नामसाधना मनोभंजनासाठी आहे अणि मनोभंजन आत्मरंजनासाठीच आहे.

आत्मरंजन तादात्म्य, तद्रूपता ह्यासाठी आणि यातून आपल्याला भक्तिप्रेमसुख अनुभवावयाचे आहे. हे नामसाधकाने नेहमीच लक्षात ठेवावयास हवे. त्यासाठी (लक्षात राहण्यासाठी काय तर एक भगवंत) पूजा, अर्चा, नाम, जप, भजन, प्रवचन, संकीर्तन, श्रवण यांचे निरंतर आचरण करावे आणि श्रीगुरूंनी सांगितल्यानुसार **अभ्यास** करावा.

* * * *



## चिंतन १८४

नामसाधनेत दमदारपणा हवा. या दमदारपणातून, तितिक्षा जोपासली जाते. तितिक्षा म्हणजे सहनशीलता. यामुळे वृत्तीचांचल्य कमी होते. ज्येष्ठांचे, श्रेष्ठांचे आशीर्वाद; श्रीगुरूंची कृपादृष्टी यानी साधकाचे मन बळकट होते. नामसाधना अनन्य भावाने करावयास हवी. या साधनेलाच निष्काम कर्मयोग असे म्हणतात. अशा साधनेनेच भगवंताविषयक सर्व विकल्प नाहीसे होतात; अशा विकल्परहित अवस्थेनंतरच आत्मज्ञानाचा लाभ होतो.

परमेश्वर हाच एकमेव सिद्धांत आहे; श्रीगुरूकृपा, सेवा, विश्वास, हाच त्याचा एकमेव मार्ग आहे; असे एकदा नामसाधकाने पक्के गृहित धरले की, भगवंताशी ऐक्य सहजच साधते. जगातील सर्व गणित, साहित्य, ज्योतिष, विज्ञान इत्यादी शास्त्रे ही एका ईश्वराधीनच आहेत. ही संकल्पना भगवंत या **पूर्ण** संकल्पनेशी जोडून टाकते. ही पूर्णता हाच भक्ताला साधनेतून मिळालेला अखंड विजय आहे. या विजयांत, म्हणजे लाभलेल्या पूर्णतेत पराजयाची सर्व बीजे दग्ध होतात. नामसाधक सर्व सुस्वरूप होतो.

साधकाच्या चिदाकाशांत सच्चिदानंदाचे अवतरण होते. या अवतरणातूनच मग साधक (**नामसाधक**) मत्त व मस्त होतो. ही मस्ती त्याला व्यवहारभावाच्या सुस्तीपासून कायम दूर ठेवते. तो नामधारक शून्याचाही भेद करण्यास सर्वसमर्थ ठरतो.

असा साधक/भक्त मग एका भगवत्‌तत्वापासून/भगवंतापासून/सगुण-साकार श्रीगुरूपासून कधीच, कोणत्याच अंगानी विभक्त होत नाही. त्यामुळे भक्त ही पदवी त्याला शोभून दिसते. त्याला लाभणारी ही शोभा त्याच्या स्थूल शरीरावरही ईश्वराची आभा आणते. त्याची आत्मप्रभा सतत-कार्यरत राहते. आत्मविद्या आणि विनय यांचेच जणू काही त्याच्या रूपाने प्रत्यक्ष अवतरणच झालेले असते.

असा महाभक्त, वैष्णव जरी दृष्टीने जगाकडे पाहत असला तरी, त्याच्या आत्मदृष्टीला, जगाला सुशोभित करणारा एक ईश्वरच/परमात्माच गोचर होत असतो. मग तो स्थूल दृष्टीने काहीही पाहो. भक्ताचा हा अनुभव अद्वयानंददायी असल्याने, अशा भक्ताची आठवण, स्मरण, नाम घेणाराही हाच आनंद उपभोगू शकतो.

नामधारकाला ही अशी नामसाधना त्याचा भगवद्‌विषयक भाव अधिकाधिक घट्ट करण्यास उपयोगी पडते. मग यातूनच नामधारक साधनेशी एकरूप होतो; या एकरूपतेतून येणारा स्वरूपानुभव अती विशेष, अती सुंदर, अतीव मधुर आणि अती गोड असतो.

साधनेचा प्रवास म्हणजे भगवंताचा/श्रीगुरूंचा अनुनय. पण हा अनुनय एकतर्फी मात्र कधीच नसतो; तर नामसाधनेच्या परिपक्वतेतून भक्त भगवंताचा व भगवंत भक्ताचा अनुनय करत असतात. ''**तुका म्हणे येथे जैसे। तेथे तैसे(च) असेल**।।'' एकमेकांनी एकमेकावर केलेली भक्तीप्रेमरंगाची ही खरी **रंगपंचमीच** म्हणावयास हवी. भक्ताच्या पंचज्ञानेंद्रियात भगवद्रस भरल्यावर, ब्रह्मरसालाही लाजवणाऱ्या भक्तिप्रेमरसाची प्रचिती नामधारकाला रंगवून टाकते. या रंगाला भक्तिशास्त्रकार **आत्मरंग** म्हणतात. अवघा रंग एक होतो.

श्रीरंगरंगी भक्त व भक्तरंगी श्रीरंग रंगून जातो. या रंगापुढे जगातील बाकी सर्व रंग विटलेले आणि फिकेच वाटतात.

नामधारकाच्या साधन प्रवासातून, साधकाची श्रीगुरूंशी झालेली संगत, त्यातून प्रचिती, या प्रत्ययातून वाढणारी शरणागती, शरणागतीतून आत्मवल्लीची/नामवेलीची झालेली जोपासना, यातून घट्ट झालेली भक्ती, याच माध्यमातून मनातील मंगलमयता, आशा-निराशेतून मुक्ती, कृतार्थता या सर्व गोष्टी कळसाप्रत जातात. सारी जिकिर संपते. उरते फक्त अखंड चिन्मय, आनंदमय, अस्तित्व! या अस्तित्वाचा अनादि-अनंत अशा सच्चिदानंदाशी संबंध असतो व तोही त्याच्या समरसतेतून!

साधना ही समरसतेसाठीच असते. **भक्तिप्रेमरस** हा फक्त एकच समरस आहे. एकाच भगवंताचा पुरस्कार विविध तऱ्हेने, विविध स्तरावर केला जातो. ''**एक गहू, प्रकार बहू**'' अगदी तसाच ! भक्ती हेच एक असे क्षेत्र आहे की ते सर्वसमावेशक आहे. या भक्तिक्षेत्राला सकस भावभक्तिप्रेमाच्या खताची नितांत आवश्यकता असते. माणसांनी बुद्धीचा अभिनिवेश कितीही दाखवला तरी भावनेशिवाय त्याला जीवन शक्यच नाही. **भावरस** हा साऱ्या विश्वाचा स्थायीभाव, स्थायीरस आहे.

या **भावाकडे-भक्तिभावाकडे** पाहण्याची दृष्टी नामस्मरणाने दिवसेंदिवस खुलत जाते, हा भाग मग जास्तीत जास्त भावतो. याच भक्तिप्रेमभावातून अध्यात्मज्ञान विकसित होते. पराकोटीची सम्यक् अवस्था प्राप्त होते. जीवनाची सर्वतोपरी धन्यता अनुभवास येते. या भावातूनच भगवंताचा प्रभाव सातत्याने अनुभवास येतो. **हा भाव दृढ धरा आणि भगवंत आपलासा करून घ्या!**

* * * *

# चिंतन १८५

कोणतीही आध्यात्मसाधना असो, नामसाधनेचा तर प्रश्नच नाही, ती केवळ **समरसतेसाठीच** असते. ही समरसता कोणाशी? म्हणाल तर भगवंताशीच/ब्रह्मस्वरूप श्रीसद्‌गुरूंशी. ब्रह्मरस हा एकच समरस आहे. आणि नामाने भगवंताशी/श्रीगुरूंशी किती कसे समरस झालो आहोत याचा त्यांच्याच कृपाप्रसादाने आपल्याला, आपल्या या साधनेतून अनुभव अगदी वारंवार येत असतो; होय की नाही?

एकाच सत्य तत्वाचा पुरस्कार म्हणजे ईश्वराचाच पुरस्कार विविध तऱ्हेने या अध्यात्मक्षेत्रात केला जातो. अध्यात्म हे एकच असे क्षेत्र आहे की जे सर्वसमावेशक आहे. या क्षेत्राला भक्तिप्रेमसुखाचे भरघोस पीक येण्यासाठी सकस अशा **भावभूमीचीच** नितांत गरज, आवश्यकता आहे. मनुष्य जरी स्वत:ला बुद्धीवादी म्हणवत असला, जरी बुद्धीचा अभिनिवेश दाखवत असला तरी **भावा** शिवाय त्याला जीवनच शक्य नाही. हा "**विलक्षण गोड**" भावरस हा या विश्वाचा स्थायीभाव आहे. या "**भावा**"कडे, भक्तिप्रमभावाकडे पहाण्याची दृष्टी जशी जशी जास्त गहिरी होत जाते तसा तसा तो भाव खुलत जातो व भावलाही जातो.

याच भावातून आत्मज्ञान विकसन होत होत पराकोटीची सम्यक् अवस्था प्राप्त झालेले व तुर्यातीततेतून जीवनाची पूर्णता अनुभवणारे, लोककल्याणकारी विश्वास तृप्तीपद ठरलेले, लोकमंगलासाठी, कल्याणासाठी न दमता झटणारे, महात्मे या विश्वात प्रकट होतात, गुप्त होतात (श्रीगुरूज्ञानदेवांसारखे संजीवन समाधित स्थित होतात) तरी आनंदाची पखरण, आनंदाचं आवार जगताला घालत राहतात.

आकाश कोसळो, धरती भंग पावो, वा प्रत्यक्ष मृत्यू सामोरा येवो, मी श्रीगुरुउपदिष्टीत साधन (नाम) सोडणार नाही, असाच दृढ भाव नामाच्या

ठिकाणी, नामरूप श्रीगुरूंच्या ठिकाणी हवा हं! हा भावच आयुष्यातील सर्व अभावच नष्ट करतो; भगवद्भाव जास्तीत जास्त स्पष्ट होत जातो. यातून भगवत्प्राप्ती आणि प्राप्तीतूनच तृप्ती आहे; तृप्तीतून साक्षेप आहे; साक्षेपातून (समर्थांचा अत्यंत आवडता शब्द) सर्व विक्षेपांचा नाश आहे. सद्गुणांचा मेवा आहे. यात आत्मक्रीडा आहे; आत्मरती आहे; आत्मतृप्ती आहे. या तृप्तीतून देवभाव/आत्मभाव आनंदभाव प्रत्यही वाढतच जातो.

नामाने हा आनंदभाव जसा जसा घट्ट होईल, तसतशी एक जाणीव होते की सर्वच्या सर्व औपचारिक आणि अनौपचारिक गोष्टींपेक्षा **भगवंत** महत्वाचा आहे; आपण महाराज, महाराज करतो, पण ज्या क्षणाला आपल्याला एक भगवंतच महत्वाचा वाटेल तेंव्हाच आपण महाराजांचे म्हणवून घेण्यास पात्र. खरं नां?

नामसाधकाच्या सर्व व्यथा दूर करण्याचे सामर्थ्य हे त्याच्या आतच दडलेले आहे, हे साधनेतूनच कळते. हा प्रत्यय विलक्षण **आनंददायी,** घट्ट, दृढ, आश्वासक, मोठ्या समाधानाचा आणि मृदुमुलायम असा भावस्पर्शी असतो. हा एक लोकविलक्षण **भक्तीप्रेमसुखभावच** असतो. आपल्या अंत:करणात निर्माण होणाऱ्या या आनंदलहरी स्वानंदप्रणित असतात. यामुळे **आनंदप्रेमभक्तिप्रेमसुखभावाची** अपूर्वाई वेगळीच असते; त्यातील जीवन-दायीत्व, सौभाग्यदायी असते; याचे कारणच असे आहे की स्वानंदाची अमृतावस्थाच त्यातून पाझरत असते.

हा पाझर/स्त्राव म्हणजे केवळ अत्यंत विशुद्ध असा भक्तिप्रेमरस. या भक्तिप्रेमभावाची तुलना अन्य कशाशीही करता येत नाही. शब्दांनी त्याचं वर्णन करणच अशक्य. नाही कां?

आनंदरसभक्तीप्रेमभावानी निसर्गही पुलकीत होतो. तृणचरे लुब्ध झाली! वृक्षवल्ली, दगडमाती, वारा, पाणी या सर्वच गोष्टी नामधारकाला सुखावतात, आनंद देतात. त्याच्या जीवनातील वैराणपणा नष्ट होतो, एकांतात-लोकांत व लोकांतात-एकांत साधतो. हेच विश्वात्मकत्व.

या स्वानंदातून झालेला साक्षात्कार नामाच्या द्वारे, नामीशी समरस झालेल्या वैष्णवाच्या सूक्षम काय पण स्थूलदेहातूनसुद्धा आनंदाच्या लक्ष-लक्ष धारांची कारंजीच समस्त विश्वावर उडवत राहतो.

**संताचिया गावा जावे (अलंकापूरी जावे)।**
**भगवंताचे नाम घ्यावे।।**
**असे नाम अखंड घेता।**
**साधक होईल भगवंतच तत्वता।।**
**परमपवित्र भगवद्नाम।**
**नामधारक होईल आत्मकाम।।**
**भगवंताला आठवत राहावे।**
**त्याचे रूप डोळा पहावे।।**
**आनंद म्हणे सदा, सर्वांसी।**
**नाम घ्या हो अहर्निशी।।**

* * * *



# चिंतन १८६

उपासनेत नामस्मरणाला अद्वितीय महत्व आहे. या नामस्मरणाच्या बाबतीत सबीजनामाला तर फार-फार महत्व आहे; बीजामुळे धारणा होत असते. ज्या नामाच्या स्मरणामुळे आपल्या अंत:करणात ईश्वरभावाची धारणा होते त्या नामास सबीज नाम असे म्हणतात. अशा या सबीजनामामुळे नामधारकाची वृत्ती अंतर्मुख होते. त्याचे भगवद्प्रेम प्रतिक्षणी खूप-खूप बळावत जाते. लौकिकाचा उबग येऊ लागतो. अध्यात्माची गोडी वाढत जाते.

असे सबीज नाम, साधकाला स्वानंद देते. हा आनंद तात्कालीक नसतो. तो सतत वाढणारा असतो. निरूपाधिक, निरूपचार, निर्विषय, निरामय, नित्य असा स्वरूपानंदच असतो.

व्यवहारात, दैनंदिन जीवनात वावरत असतानाही हे नाम-**सबीजनाम** नामधारकास अनुसंधान राखण्यास मोठीच मदत करीत असते. या नामानेच नामधारकाचा देहात्मभाव कमी-कमी होत जातो. साधकाला आपले अविचार, आत्मानात्म विवेकाच्या अधिष्ठानाने काबूत ठेवण्यास हे नाम खूपच सहाय्य करत असते.

अशा या सबीज-नामस्मरणाने, पारमार्थिक अनुभव येऊ लागतात. स्वरूपाची/स्वात्मसुखाची/स्वानंदाची, आनंदाची चव हीच खरी **गोडी** असे या नामामुळे वाटू लागते. नामधारकाचा प्रेमभाव अधिकाधिक विस्तार पावतो. भगवंताविषयी आस्था आणि गोडी अशा या सबीज नामानेच दृढतर होत जाते.

श्रीसद्गुरूकडून मिळालेल्या नामासही सबीजनाम असेच म्हणतात. असे सबीज नाम घेण्याने साधकास जास्तीत-जास्त फायदा होतो. (साधनेच्या प्रांतात, देवाकडे जाण्याच्या मार्गावर) कारण या नामाच्या मागे सारे गुरूतत्वच, गुरूबल एकवटून उभे असते.

भगवंताच्या सर्वच नामात ताकद आहे, अचाट-अफाट सामर्थ्य आहेच आहे, पण पिंडधर्मानुसार, ज्याच्या त्याच्या आवडीच्या भगवत्स्वरूपाचे नामच, श्रीसद्गुरूकडून मिळत असते. अशा या नामाचा एकाग्रता साधण्यास अधिकच उपयोग होत असतो. सबीज नामाने सुषुम्ना नाडीतून सुरेख रीतीने कार्य होऊ लागते. या नामातूनच अद्वयानंद वैभव लाभते.

ज्याप्रमाणे बीजातून वृक्ष आकाराला येतो, त्याचप्रमाणे सबीज-नामाच्या स्मरणातून भगवदाकारता निर्माण होते. हा भगवद्भाव वृक्षासारखा वाढता-वाढता या भावातूनच साधकाला ब्राह्मीस्थितीची प्राप्ती होते आणि अशा ब्राह्मीस्थितीलाही भक्तीप्रेमसुखाच्या पारंब्या फुटून, त्या पुनः जमिनीत रूजून, प्रेमभावाची अनिर्वचनीय मधुर-रसाळ फळे या सबीज नामवृक्षाला येतात.

अशा नामस्मरणाने एकंदर वृत्तीतच पालट होतो. वृत्तीत पालट झाला की आपोआपच, अगदी आपल्याच नकळत कृतीत पालट होतो. या वृत्ती आणि कृतीतील बदलामुळे नामधारकाला "**भगवद्प्रेमप्रसाद**" प्राप्त होतो.

सबीज नामाच्या स्मरणातूनच एकंदर **कर्तेपणा** मोडतो. कर्माचा अहंकार उरत नाही. या अशा नामातच भगवद्भाव/गुरूभाव अधिकाधिक प्रदीप्त करण्याची शक्ती असल्याने, ते नाम आपल्याला भगवंताच्या आदिशक्तीचा परिचयही करवून देते.

माया आणि ब्रह्म या नामाच्या धारणेतूनच नामधारकाला कळू लागतात. मग माया नामधारकाला कशी भेडसावणार? या अशा नामधारणेतूनच अनुग्रहीत साधक हा गुरूकृपांकित, गुरूप्रिय **असा होत** असतो. गुरूकृपाप्रसादाने पुनीत होतो. गुरूकृपामृताने त्याची **साधना, भक्तीप्रेमभाव** अमर होतो.

या नामस्मरणातून निर्माण होणारी भावसरिता त्याला श्रेयस् मार्गाने थेट आत्मारामरूप सागराशी मिळवून, एकरूप करून टाकते. सगळ्या अडचणीवर मात करून हे सबीजनाम कल्याणच करते. आत्मकल्याण करते. या नामस्मरणातूनच अगम्य वाटणारा भगवंत नामाधारकाचा बंदीजन होऊन राहतो. नामधारक भगवद्रूपच होतो. सर्वंकष सामर्थ्य, अभय, आणि आत्मसत्ता देणारे असे हे सबीजनाम, तृप्ती, शांती, परमशांतीचा लाभ करून देते. नाम काय-काय देते? हे शब्दात काय सांगणार नां? सबीजनामाचा लाभ हे केवढे महद्भाग्य!

* * * *

# चिंतन १८७

भक्तीचे स्वरूप काय ? नारदारसारख्या श्रेष्ठ भक्ताचार्यांनी, गर्गाचार्यांनी, शांडिल्यांनी तर सूत्ररुपाने भक्तीशास्त्राची स्वतंत्र रचना केली आहे. व्यवहारात एखाद्या वस्तू, विषय, व्यक्ती, देश, स्थळ याबद्दल आपणास आवड असते, फार फार आवड असते. मग सुरूवातीला जाणीवपूर्वक नंतर सवयीने व पुढे पुढे स्वभावत:च त्याचेच चिंतन अगदी सहज (श्वासोश्वासासारखे) आपोआपच होऊ लागते. तसेच प्रत्येकाच्या जीवनात काही अत्यंत सुखद प्रसंग येतात (भाग्यवशांत येतात) मग असे प्रसंग पुन:पुनः यावेत, पुष्कळ यावेत असे अगदी मनापासून वाटत राहते. त्यामुळे गत व भावी आनंदसुख प्रसंगात मन रमून, नाही-नाही तर पूर्ण विरमून जाते. मग थोडासा जरी अवधी मिळाला तरी मनुष्य या आनंदानुभवाचे चिंतन करीत राहतो.

आपलं भारतीय मानसशास्त्र असे सांगते की, कसले ना कसले चिंतन करणे हा तर मानवी मनाचा "**स्व-भाव**"च आहे. एक-अर्धा क्षणसुद्धा माणसाला चिंतनावाचून राहता येत नाही आणि याच ईश्वरदत्त (अथवा नैसर्गिक म्हणा) भावाचाच उपयोग करून भक्तियोग आकाराला येतो !!! कसा म्हणाल तर, आपल्याला कसले ना कसले तरी चिंतन (चिंता नाही हं) केल्यावाचून राहता येत नाही/नसले तरी चिंतनाचा विषय बदलता येतो. मग जर एक भगवंतच/ श्रीगुरु हाच जर चिंतनाचा विषय करता आला तर मनाच्या चिंतनरुप वृत्तिप्रवाहासच "**भक्ति**" असे म्हणता येईल.

कोणी तार्किक एक प्रश्न विचारील की भक्तिमध्ये चिंतनासाठी आनंदघनराम असा एक भगवंतच हाच एकमात्र विषय का करावा ??? जीवनातील अत्यंत सुखाचा, भाग्याचा प्रसंग (श्रीगुरुभेट हा अपवाद) सुंदर

वस्तू, यावर अवधान का केंद्रीत करू नये ? तर उत्तर अगदी सोपे आहे. या सृष्टीतील प्रत्येक वस्तू, पदार्थ नाश पावणारा आहे आणि या उलट भगवंत/श्रीगुरुतत्त्व अ-जर, अ-व्यय, अ-विनाशी, नित्यचैतन्य आणि नित्यनिरतिशय सुख-आनंदस्वरूप आहे आणि त्यानेच हे विराट ब्रह्माण्ड, त्यातील सर्व सूक्ष्म-स्थूल चराचर पदार्थ निर्माण केले आहेत. त्या **आनंद-स्वरूपाशी** संपर्क साधल्यानेच मनुष्य दुःख, शोक, चिंता मुक्त होऊन, दुःखाचा लवलेश नसणाऱ्या निर्भेळ आनंदात अखंडपणे राहील.

नश्वर वस्तू/पदार्थ जर अल्पकाळ सुख देऊ शकतात (ते सुख सुद्धा प्रक्रिया पाहता आत्मारामीच असते. आपण मात्र भ्रांतीने पदार्थ-वस्तूवर आरोपित करतो) तर प्रत्यक्ष आनंदच असणारी परमात्मवस्तू चिरंतन आनंद देईलच हे अगदी उघड उघड सत्यच ना !!! म्हणजे जो आनंदनिधान भगवंताशी/श्रीसद्गुरुंशी संबंध जोडतो, तो आपल्याच हृदयांत सर्व सुख प्राप्त करून घेईल, नाही-नाही, असलेल्याच आनंदाचा प्रत्यक्ष अखंडपणे अनुभव घेत राहील.

सारांश काय म्हणाल तर, आपले सर्वच्या सर्व विचार व भाव एका श्रीगुरु/भगवंताकडे वळविणे म्हणजे नश्वरातून अविनाशी सत्तेकडे, दुःख-निराशेच्या अंधःकारातून स्वयंप्रकाशी चैतन्या/ब्रह्म/आनंदचैतन्याकडे जाणेच आहे !!! म्हणून वेदांची प्रार्थना आहे, "**असतो मा सद्गमय। तमसो मा ज्योतिर्गमय। मृत्योः मा अमृतं गमय।**" आणि हे गमन कार्य विशुद्ध, पवित्र, आनंदमय, सुखस्वरूप, रसमय अशा भक्तीनेच संपन्न करता येते. म्हणून आपल्या समग्र जीवनातील विचार, विकार, आचार, उच्चार, वृत्ती, क्रिया यांचा चेतन प्रवाह एका भगवंताकडेच कसा वळवायचा, जडवावयाचा याचे शास्त्र व कला म्हणजेच वेद-शास्त्र-पुराण प्रतिपादित "**भक्तियोग**".

भक्ति अत्यंत उत्कट हवी. हा **भक्ति-भाव** क्षणिक ऊर्मि नसावी तर सतत वाहणारी **भाव-रस-धारा** असली पाहिजे. आस्तिक भाव असणे व उगाच थोडेसे भजन-पूजन-वाचन-श्रवण-स्मरण एवढ्याने भागत नाही !!!!

सर्व अंत:करणच या भक्तिभावाने व्यापून गेले पाहिजे, त्याचबरोबर मन-बुद्धी एका परमात्म्याच्याच विचारात-चिंतनात आत्मीयतेने **रसस्वाद-अमृतपान** करणारी/घेणारी झाली पाहिजे. **आनंदरस** चाखता आला पाहिजे आणि असे होण्यासाठी भगवंताबद्दल, त्या आपल्या एकमेव आनंदनिधानाबद्दल परम **भक्ति-प्रेमानुराग** असणे अत्यंत आवश्यक आहे.

भक्ति प्रेमयुक्त झाल्यावाचून ती उत्कट, एकाग्र, एकांती व चिरस्थायी होत नाही. उत्कट प्रेमभक्ति ही परमेश्वराची शक्तिरुपा होते. अशा प्रचंड शक्तिरुपा भक्तिचे काय सामर्थ्य आहे बघा ना !!! अशा परमभाग्य महावैष्णवाच्या निकट जे जे येतील ते सुद्धा केवळ निकट सहवासाने, संगतीने मोठेच हरिभक्त होतात. नारद म्हणतात, "**सा भक्तिः परानुरक्तिः ईश्वरे।**" आहे की नाही भक्तित प्रचंड ताकद ???!!!

* * * *




प्रेम करणे ही पण मनुष्याची एक स्वाभाविक प्रेरणाच आहे. हा प्रेमभावदेखील त्याच्या स्व-स्वरूपाकडे असलेल्या ओढीचाच सुंदर, निर्मळ आणि परमपवित्र असा आविष्कार आहे. उपनिषदे असे सांगतात की, मनुष्याचे खरे-खरे प्रेम आत्मारामावरच आहे. इतर वस्तूंवर व व्यक्तींवर असलेले त्याचे प्रेमभाव/भक्ती म्हणजे एका **आनंदघन** आत्म्यावरील प्रेमभावभक्तीचाच अंश, आविष्कार किंवा एक पैलू आहे. या भक्तिप्रेमाची पूर्णता, साक्षात्काराने घडणाऱ्या जीवब्रह्माच्या, देव-भक्तांच्या, गुरु-शिष्याच्या ऐक्यात होते. **अभेद** हे भक्तीचे विरोधाभासात्मक परंतु अगदी सत्य, श्रेष्ठ असे पूर्णस्वरूप आहे. आपल्या श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी या अभेदभक्तीचे सुंदर वर्णन केले आहे.

**''तैसा मी एकवाचूनि काही। तया तयाहि सकट नाही। ही चौथी भक्ती पाही। माझी तो लाहे।। एऱ्हवी तिजी ना चौथी। हे पहिली ना सरती। पै माझिये सहज स्थिती। भक्ती या नांव।।''** ब्रह्मसाक्षात्काराने भक्त भगवंतच होतो. एकमेव **पांडूरंगच** या अवस्थेला पोहोचतो. एका भगवंतावाचून/श्रीगुरुवाचून अन्य काही उरतच नाही. ही भगवंताशी/श्रीगुरुंशी/आनंदघनाशी एकरसता म्हणजेच पराभक्ती, ज्ञानीभक्ती, अभेदभक्ती. भक्तीप्रेमभावाची प्रेरणा येथे पूर्णत्त्वाला पोहोचते. अशा भक्ताची लक्षणे ज्ञानेश्वरमहाराजांनी प्रसन्न प्रेमभावाने वर्णिली आहेत. **''तैसा निरुपचारु। संतोषी जो।।'', ''जो निजानंदे धाला। परिणामी आयुष्या आला। पूर्णते जाहला। वल्लभु जो।।'', ''सुखासी चढावा। जयाचे असणे।।'', ''तैसा सतत जो सुखें। काहीही टंवच न देखे।'', ''जो भोगिता उन्मनि। आरायेना।। अशी आणि अशी कितीतरी गुणलक्षणे, वर्णने.'' नामस्मरण** साधनाची ही श्रेष्ठ फलश्रुती आहे.

अशा भक्तांचा समाजाला काही उपयोग आहे का ? असा प्रश्न नेहमीच विचारला जातो. समाजाला सुखाच्या साम्राज्याचा म्हणजेच आत्मप्राप्तीचा मार्ग, स्वानुभवाने दाखवून त्याला ईश्वरोन्मुख करणे, खऱ्या हिताच्या व आनंदाच्या वाटेला लावणे हे परममंगल कार्य असे साक्षात्कारी भक्त करतात. हेच त्यांचे श्रेष्ठ सामाजिक कार्य आहे. **''सेवितो हा रस। वाटितो आणि कां।''** असे आपले श्री तुकारामबुवा सांगतात. नुसते सांगत नाहीत तर त्याजसाठीच कृतकृत्य झाल्यावरसुद्धा आटापिटा करतात. **''तैसे माते कथित। कथिते नि तोषे कथूं विसरत। तया विसरामाजी विरत। जीवें प्राणें।।''** अशी सेवा हाच भक्ताचा स्थायीभाव. सर्वात्मभावामुळे त्यांच्या ठिकाणी अपरंपार **प्रेमभाव**. त्यांचे ज्ञानोत्तर/कृतार्थी जीवन केवळ उपकारासाठीच आहे.

भगवंतासाठी सर्वस्वाचा होम केलेल्या भक्ताला देवाप्रमाणेच सदा विषयाचा व परम मांगल्याचा लाभ झाला तर त्यात काय आश्चर्य !!!??? ते जेथे वास करतात, तेथे सारे मंगलच ना !!! मेघाप्रमाणे गर्जना करून, अनंत

काळात उत्तर ध्रुवापासून थेट दक्षिण ध्रुवापर्यंत, पूर्वेपासून-पश्चिमेपर्यंत बाहू उभारून अवघ्यांना एकच सांगणे की, "**ईश्वराची भक्ती करा, भक्ती हेच जीवन साफल्य आहे.**" विश्वशांती व विश्वकल्याणाला एकच मार्ग आहे, तो म्हणजे भगवंताची "**परमप्रेमलक्षणाभक्ती**" म्हणजेच **नाम**.

अशा परमप्रेमलक्षणाभक्तीचा महत्त्वाचा परिणाम म्हणजे महानंद व पराशांती. हा महानंद, पराशांती म्हणजेच साक्षात्कार. एकाच नाण्याच्या दोन बाजू. सच्चिदानंदाचा अनुभव आनंदमयच असतो हे अगदी उघड उघड सत्य आहे. "**सच्चिदानंदघन। पंढरिये परिपूर्ण; आनंदाचा कंद। तो हा देवकीनंदन।।**" हा आनंद आत्मकेंद्रिय, बुद्धिग्राह्य, नित्य, निरतिशय असतो/नाही **आहे**. या आनंदाचा लाभ झाल्यावर, प्रारब्धवशात अत्यंत दु:ख जरी झाले तरी या महानंदाचा भंग होत नाही. **अर्थात दु:ख जाणवत नाही**.

तुकाराममहाराज या आनंदाचे अगदी भरल्या अंत:करणाने वर्णन करतात, "**सुखाचे ओतले। दिसें श्रीमुख चांगले।। लागले भरतें। ब्रह्मानंदाहि वरतें।। न कळें दिवस कीं राती। अखंड लागलीसे ज्योती। आनंदलहरीची गती। वर्णू किती तया सुखा।। आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।**"

आनंद व पराशांती यात विरोध नाही; तर आनंदानुभवाचे अत्युच्च्य शिखर म्हणजे पराशांती. "**देहाचा विसर। केला आनंद संचार।।**" असा या आनंदाचा प्रभाव.

"**आनंद, अद्वय, नित्य, निरामय। जे कां निजध्येय योगियांचे।।**" तो परमानंदाचा पुतळा, चैतन्याचा गाभा, विटेवर सावळे रुप धारण करून उभा आहे. "**रामकृष्णहरि**" नाम म्हणजेच प्रत्यक्ष ईश्वर/ईश्वरबीज. नामच विटेवर सगुण स्वरूपांत उभे आहे. हे एक नामच पूर्ण आनंदाचा/परमानंदाचा/पराशांतीचा लाभ करून देईल !!! होय की नाही ???!!!

* * * *

# चिंतन १८९

साधकाच्या साधनेतला मुख्य उद्देश काय हवा ? तर **"मी-तू"** पणाचा नाश करून आपल्या बुद्धित भक्तीप्रेम भरणे आणि भक्ती-भाव-प्रेम व बुद्धी यांची संतुलीत अवस्था करून त्या द्वारा **"भगवद् प्रेमभाव वैभव"** वाढीस लावणे हा असावा. या उद्देशाने काय साधते ? भगवंताची प्रचिती घेत घेत भगवंतमय होता येते. या साधनेतून खत-पाणी मिळत मिळतच भक्त हा तृप्त आणि निरीच्छ होतो.

प्रार्थना कोणती का असेना, त्यातून आस्ते-आस्ते **"मी"**पणा नाहीसा होतो. आपल्या जीवनात भगवंताला/श्रीसद्‌गुरुंना अनन्यसाधारण महत्त्व येते; आपल्या संकल्पात भगवत्‌संकल्पाचा शुद्ध प्रेमभावी प्रवाहाचा संगम होतो. आपलं मागणं चिद्‌तत्त्वात भिनतं; आणि आपल्या संकल्पाला पूर्तता भगवंताच्या कृपाशीर्वादसत्तेने आली असून **"हे काम भगवंतानेच केले आहे"** असा अकर्तात्मयोगभाव वाढू लागतो. म्हणजे तरी काय म्हणाल तर कर्ता मी नसून एक भगवंतच आहे हा भाव अंतरी वाढू लागतो. हा भाव वाढणे भक्ताच्या जीवनात फार महत्त्वाचे आहे नाही कां ???

प्रार्थना भगवद्‌भाव जागृतीसाठी असते; शरणागतीचा भाव जास्तीत जास्त दृढ होण्यासाठी असते. यातूनच देहात्मभाव कमी कमी होत जातो. देहात्मभाव कमी होत असतानाच एका अंगाने विवेकबळ वाढत जात असते. जेवढ्या प्रमाणात **"मी"**पणा नाहीसा हातो तेवढ्या-तेवढ्या प्रमाणात श्रीगुरुभाव/ भगवद्‌भाव दृढ होत असतो.

प्रार्थनेचा मुख्य उद्देश असतो, **"भगवंताची, प्रेमस्वरूप सच्चिदानंद भगवंताची प्रचिती"**. असा प्रार्थनेत सर्वोत्तम अशा सर्वमंगल, सर्वप्रसन्न, सर्वकल्याणकारक अशाच गोष्टींचा विचार केलेला असतो. अशा प्रार्थनेच्या

उच्चाराने, करुणापारावार, दयाघन, परमप्रेमस्वरूप मंगलमय भगवंताची/श्रीगुरुंची जवळीक साधता येते. या सगळ्या प्रार्थनांत बीजमंत्र असतात. त्या बीजमंत्रांच्या प्रेमपूर्वक, उदात्त, घनगंभीर उच्चारांतून परमात्त्वतत्त्वाची जाण येते. अशी प्रार्थना विचारांना बलवान करते तर विकारांना आळा घालते. प्रार्थनेच्या उच्चारातून परावाणीपर्यंत वाणीचा विकास होत असतो. यातूनच मग स्वरोदय होतो ??? स्वरोदयांतून मांगल्याची वाढ होते. वाणी सर्व स्तरावर पवित्र होते. मग अशुभाचे उच्चारण आपोआपच थांबते ना ???

प्रार्थना करणाऱ्या भक्ताला शरीरशुद्धी, वाचाशुद्धी, मनशुद्धी, संकल्पशुद्धी/विचारशुद्धी आणि याच बरोबर आपल्या नित्य शुद्धच असणाऱ्या आत्मशुद्धीचा अनुभव येत राहतो; अनुभव चढता-वाढता असतो मग शुद्धा-अशुद्धीच्या अमंगल अशुद्ध कल्पनांची लक्तरे आपोआपच गळून पडतात. म्हणूनच भक्तीने प्रार्थना कशा कराव्यात ???

आपल्या दैनंदिन साधनेत सत्त्वभाव वाढवणाऱ्या, मनाचे मालिन्य दूर करणाऱ्या, शुभविचार निर्माण करणाऱ्या, भगवद्भाव समृद्ध करणाऱ्या; आपलं भगवत्‌चिंतन चित्ताच्या अंत:स्तरापर्यंत पोहोचविणाऱ्या, भक्तीप्रेमरसाची वाढ-**कल्लोळ** करणाऱ्या, त्याच्या ? आठवणीने (? भगवंताच्या/श्रीगुरुंच्या) भगवंता/श्रीगुरुविषयीची व्याकुळता वाढविणाऱ्या अशा स्वरूपाच्या असाव्यात.

अशा प्रार्थना आपल्या श्रीगुरुंना विचारून अथवा भक्तीवाङ्मयात विशेषत्त्वाने अनन्यसाधारण मान्यता पावलेल्या (उदा. पसायदानासारख्या) साक्षात भगवद्दर्शनाला उपयोगी पडणाऱ्या; देहभाव कमी करणाऱ्या अशा निवडाव्यात; आणि नित्य अशा प्रार्थनांतून भगवंताला शरणागतभावांनी आळवत राहावे. या साधनेतूनच आपल्याला आनंदमय/ईश्वरमय व्हावयाचे आहे हा विचार आपल्या अंत:करणात आपण नित्य जोपासलाच पाहिजे नाही कां ???

आणिक एक मोठ्या महात्म्यांनी केलेल्या प्रार्थनाच आपण करावयास

हव्यात असे नाही हं !!! तर आपण आपले म्हणणे भगवंताला/श्रीगुरुंना **आपल्या शब्दात** सांगू शकतो. अधिक चांगले सांगू शकतो !!! आपण जसे त्याला आळवू **तसा** तो आपल्या जवळ घेतो; म्हणून **त्याला** सांगत असताना **तो आपले नक्की ऐकतो असाच दृढ भाव असावा**. त्याला सांगताना मनात संशय/विक्षेप मुळीच नसावा. आपण निवेदन करावयाचे **"निवाडा-न्याय-उपाय"** त्याने करावयाचा नाही कां ??? शेवटी काय, आपले **हवे-नकोपण** हे भगवंतापर सोपवावयास ही प्रार्थनाच आपल्याला शिकवत असते आणि या प्रार्थना पुष्पमाळेमध्ये नामस्मरणाचा दोरा हवाच नां ?

* * * *




अध्यात्मिक प्रगतीच्याबाबतीत स्वत:चे प्रयत्न अत्यंत अपुरे पडतात. एखादे संकट आपल्या प्रयत्नाने केवळ दूर होणार नाही हे कळते. परिस्थितीने आपले दु:ख, चिंता जेव्हा माणसाला सहन होत नाही; तेव्हा मग देवाची मोठी काकुळती, आर्त अंत:करणाने विनवणी मनुष्य करत असतो. प्रार्थना हा शब्द याच अर्थाने, इंग्रजीतील Prayer चा प्रतिशब्द म्हणून आपण सर्रास वापरतो; वापरला जातो; परंतु त्यात प्रार्थना या शब्दात असणारा उत्कट भाव पूर्णत: प्रगट होत नाही.

ज्ञानेश्वर, नाथराय, नामदेवराय, श्रीतुकाराम महाराज, सूरदास, मीराबाई इत्यादी संतांचे अभंग, पदे आणि श्रीसमर्थ रामदास स्वामींची करूणाष्टके यातून भगवंताला विलक्षण आर्तभावाने, काकुळतीने विनविले आहे. वैदिक धर्मात रोज स्तोत्रे म्हणण्याचा प्रघात आहे. ख्रिश्चन, इस्लाम धर्मात रोज ४-५ वेळा प्रार्थना करण्याचा नियम आहे.

परमार्थमार्गात अशा फार काकुळतीने, अंत:करणाला पीळ पडून,

मन:पूर्वक केलेल्या काकुळतीच्या विनवणीला फार-फार महत्त्व आहे. मानसशास्त्राच्या अंगाने याचा विचार केला असताना त्यात कोणती प्रक्रिया सामावलेली आहे ?

स्वत:ची परवशता/अवशता, आपली अत्यंत मर्यादित अशी शक्ती, बुद्धी-संपत्ती, यांची तीव्र जाणीव व ईश्वराच्या सर्वशक्तिमत्त्व, सर्वज्ञत्त्व, कृपा/करुणाभाव या गुणांवरची श्रद्धा, यातूनच विनवणीचा/प्रार्थनेचा जन्म होतो.

अशा या भाववृत्तीवाचून कळवळ्याची प्रार्थना होणारच नाही. अशा कळवळ्याने अहंकार, ''मी-माझं'' क्षीण होते. भगवंतावरील अपार श्रद्धा, त्याच्या यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य या श्रेष्ठ गुणांविषयी प्रेमादर, भक्तिभावप्रेमा हे गुण वाढत जातात. मग या सवयीने स्वभाव बनतो; सवयीने भावशीलता बनते. "Habit is character" हे ॲरिस्टॉटलचे वचन स्वानुभवाने अगदी सहज पटण्यासारखेच आहे.

नित्य-नैमित्तिक प्रार्थनात हे वरील सर्व सद्‌गुण क्रियाशील होतात; अर्थात वाढीस लागतात. भगवंताच्या साक्षात्काराला या सर्व गुणांची फार मदत होते. तेव्हा अहंकार, ''मी-माझे'' कमी व्हावे आणि भक्तीभाव वाढावा यासाठीच प्रार्थनांचा धार्मिक आचारात अंतर्भाव आहे.

ऐहिक वैभव, सुख-संपत्ती मागणे हा प्रार्थनेचा हेतू नाही आणि नसावाच. त्यामुळे हव्यास वाढेल. अशा सकारप्रार्थना परमार्थाला विशेषत: भक्तिसाधनेला अपकारकच ठरतील नाही कां ? ''देवा, भक्ती-प्रेम-ज्ञान-वैराग्य दे'' हे किंवा याच स्वरूपाचे प्रार्थनेतील मुख्य सूत असेल तर ती प्रार्थना परमार्थाला उपकारक ठरेल.

अशी विनवणी, अंत:स्फूर्तीने, तळमळीने, कळवळ्याने जर अंतरी उदयास आली तर ती अत्यंत उपकारक ठरते; ती अगदी जिवंत, प्रभावी ठरते. नाहीतर मग सवयीने केल्या जाणाऱ्या रोजच्या प्रार्थना यांत्रिक, भावनाशून्य, एक वरकरणी कवायत होण्याची शक्यताच फार.

स्वयंस्फूर्त प्रार्थनांची उत्कटता मुळी त्यात क्वचितच. तरी या प्रार्थनादेखील भगवंताच्या अलौकिक गुणांचे स्मरण-पुन:स्मरण देणाऱ्या असतात बरं कां !!! काही प्रमाणात कां होईना त्यात भाव-भावनांचा उदय होतोच. तेवढा तरी त्याचा फायदा अवश्य करून घ्यावा.

हे पुन:स्मरण, भाव-भक्तीची वाढ, प्रार्थनेसारख्या नियमित भक्तिआचारावाचून होणे कठीणच. नवविधा भक्तीत अशा प्रकारची चर्चा खूप केलेली आहे. या प्रार्थनेत काय शक्ती आहे याचे प्रत्यंतर पहाण्याचा एक मार्ग आहे.

एक दिवस प्रार्थना करीत असता व केल्यावर आणि एक दिवस प्रार्थना मुळीच केली नसता, आपल्या मनोवृत्ती कशा प्रकारच्या असतात ? याचे आपले आपणच सूक्ष्म असे निरीक्षण करावे. आपल्याला काय आढळेल ? तर पहिली परमार्थाला/भक्तीसाधनेस पोषक आणि दुसरी भगवंताचा विसर पाडणारी आहे असे दिसून येईल. प्रार्थनाच करा तर कोणतीही **पारमार्थिक**, शारीरिक किंवा मानसिक क्रिया आपल्या परमार्थाला उपकारक आहे की नाही हे पडताळून पाहण्याला वरील निकष उपयोगी पडतो. तीच गोष्ट नामस्मरणाची. ती कवायत न होता नामस्मरण तळमळीने, प्रेमाने, उत्कटतेने, श्रद्धेने, भावभक्तीने, अंत:करणास पीळ पडून झाले पाहिजे. नियमाने, नेटाने झाले पाहिजे.

* * * *




भक्तीप्रेमसुखानुभवासाठी प्रथम मनाची तयारी लागते. मन व्यग्र, त्रस्त असेल तर त्यात भक्ती कशी उदयाला येणार ? भक्तीभावासाठी मन निर्मळ, प्रसन्न, शांत पाहिजे.

भक्ती म्हणजे निखळ परमप्रेम. आपल्यासकट सर्व विश्व प्रेममय आहे,

असा बोध, असा भाव. भगवंत, मानव, प्राणी, भूतमात्र हे सारेच प्रेमस्वरूप आहे असा भाव. या साऱ्यांच्याविषयी मनात अत्यंत प्रेमभाव. प्रेमामध्ये विकार नाहीत आणि विकारामध्ये प्रेम असूच शकत नाही. प्रेमभाव म्हणजे प्रेमभाव ! भक्ती; दुसरे काही एक नाही. शुद्ध निष्काम प्रेम. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी एकच एक भगवंत आहे; असे जाणून सर्वांवर प्रेम. भक्तीप्रेम म्हणजे फक्त सगुण भगवंतावर प्रेम एवढाच मर्यादित अर्थ नसून अदृश्य, निर्गुण, निराकार आत्मा/परमात्मा सर्वत्र, सर्व प्राणीमात्रात भरून उरला आहे असे जाणून, असा भाव ठेवून सर्वांवर प्रेम. सगळ्यांच्यात आपला हृदयस्थ पांडूरंग पहावा आणि तो समजण्यासाठी विटेवरचा "**सावळा घननीळ**" पाहावा, आठवावा.

असा हा भक्तिप्रेमभाव अमृतस्वरूप आहे. ज्याला हा भाव कळेल, पटेल, ठसेल, अनुभवास येईल त्याला अमृतत्त्व प्राप्त होते. भगवंताचे सहज अंगभूत स्वरूप आहे तेच जीवाला या प्रेमभावाने प्राप्त होते. त्यामुळे देहभाव विवर्जित होतो.

भक्ती ही भक्तीच आहे, त्यात बहिरंग काही नाही. भक्ती ही अंतरंग बाब आहे. तीला बाहेरचा वारा सोसतच नाही. हृदयाच्या अत्यंत खोल-खोल अंतरंगातला सूक्ष्मभाव आहे. आतूनच ती उदयाला येते, बाहेर फाकते.

भक्तिप्रेमभाव ही अंत:करणाने जाणण्याची वस्तू आहे, त्या भावाचे वर्णन करणे शक्यच नाही. म्हणून हा भक्तिप्रेमभाव अनिर्वचनीय असतो. भगवंताशिवाय त्या नंदनंदन नंदलालाशिवाय/पांडूरंगाशिवाय **क्षणभरही चैन पडत नाही** असा भाव, नाही तर अनुभव म्हणजे परमप्रेमभक्ती. आपण सवडीने "**रामकृष्णहरि**" म्हणतो, ते परमप्रेम तर नाहीच, पण त्याला प्रेमही म्हणता येणार नाही.

रामकृष्णादि सगुण स्वरूपावर प्रेम करणे एकवेळ सोपे, सोपे म्हणजे अवघडातले सोपे; कारण ते सगुण-साकार, त्यांचे लीलाचरित्र आपल्या समोर. पण आत्मारामाला गुण-आकार तर काहीच नाही. अशा आत्मस्वरूपावर प्रेम पाहिजे.

हा परमआनंदस्वरूप, परमप्रेमस्वरूप, परमप्रेमास्पद असा आहे. आस्पद म्हणजे, या जगामध्ये जेवढा म्हणून प्रेमभाव आहे त्याचे केंद्रस्थान. राहण्याला योग्य ठिकाण. प्रेमभाव-भक्तिभावाचे एकमेव ठिकाण म्हणजे आत्मा. **आत्मस्वरूप श्रीगुरु** - आत्मस्वरूप पांडुरंग सर्व भक्तिप्रेमाचे वसतीस्थान म्हणजे आत्मा. या **आत्मस्वरूपावर** ज्याचे प्रेम जडले तो भक्त. आत्मस्वरूप जेवढे सूक्ष्म तेवढाच हा भक्तिप्रेम अतिसूक्ष्म.

असा अतिंद्रिय, अगोचर, अचिंत्य, अलक्ष असूनही सर्व ठिकाणी व्यापून असणारा, सच्चिदानंद असणारा, संतांनी स्वत: ज्याचा अनुभव घेतला, घेतात त्या आत्मारामी परमप्रेम म्हणजे भक्ती. अशी भक्ती कळसाला पावली की, तो भक्त अमृतत्त्वाला पावतो. मृत्यूचा मृत्यू तो पाहतो. म्हणून अमृतत्त्व हे भक्तीचे स्वरूप आहे.

परमप्रेमस्वरूप भक्ती ही अखंड असते. रागा-लोभात, इतकेच काय पण भांडणात भक्तिप्रेमभाव अखंडच असतो. कधी कमी-जास्त होतच नाही. ज्याचे अंत:करण ''**प्रेमळ**'' आहे तोच हा भक्तिप्रेमभाव जाणू शकतो. त्यासाठी अंत:करणात माझे-तुझे, कोणाविषयी गैरसमज, गोंधळ, शत्रूभाव असता कामा नये. सरळ भाव पाहिजे. मगच ही भक्ती होऊ शकते. अशी भक्ती जीवाला स्वरूपबोधावरच नेऊन स्थानापन्न करते. अशा भक्ताचे व्यवहार पण **प्रेमस्वरूपच** असतात. कारण प्रकृतीनुसार कर्म करीत असतानादेखील त्याचे, भगवंताचे अनुसंधान यत्किंचितदेखील ढळत नाही.

आपण पूजा करतो, नाम घेतो, गीता-ज्ञानेश्वरी-भागवत थोडं-थोडं वाचतो. म्हणजेच आपण भक्ती करतो असे आपल्याला वाटते; पण खरी-खरी भक्ती काय ? सर्वत्र एक भगवंतच आहे, असे जाणून ''**भरला घनदाट हरि दिसे**'' असं पहाणे म्हणजे भक्ती.

अशी भक्ती अमृताहून गोड आहे. भगवंत गोड आहे, भगवंताचे नाम तर गोडाहूनही गोड आहे. पण आपण नाम घेत नाही, घेतले तर सवडीने घेतो, सवडीने न घेता अत्यंत आवडीने घ्यावे.

* * * *

# चिंतन ११२

ज्ञानी भक्त हा अद्वैतभक्तीने, भगवंताशी एकरूप होतो. "देव-भक्तांचं ऐक्य" हे परमोच्च पद, अंतिम कैवल्यप्रतिष्ठा प्राप्त झाल्याने **भक्त** जडमनी होत नाही तर त्याउलट तो **मेधावी** सर्वज्ञ होतो !!! असा भक्त, अद्वय, प्रज्ञानघन, आप्तकाम, स्वानंदरत, जीवन्मुक्त असतो.

अशा सच्चिदानंदस्वरूप भगवद्भक्ताचे जीवनदर्शन वर्णावे तरी कसे ? आणि कोणत्या शब्दात ना ! येथे तर भक्तच भगवंत होतो. ज्ञानाच ज्ञेय होते, द्रष्टा हाच दृष्य व भोक्ता हाच भोज्य होतो !!! कल्पनेलाही कुंठीत करणाऱ्या पण अनुभवगम्य अशा "देव-भक्त", "श्रीगुरु-शिष्य" यांच्या **अद्वैत** अशा स्थितीचे वर्णन करण्यास शब्द असमर्थ ठरतात.

तरी श्रीगुरु ज्ञानदेवांनी वर्णन केल आहे. सुगंध हाच नाक झाला आणि मग आपलाच सुवास घेऊ लागला, शब्द हेच कान झाले, आरसा डोळ्यांशी एकरुप झाला, वारा हाच पंखा होऊन वारा घेऊ लागला, मस्तकच सोनचाफ्याची फुले झाले; चकोर चंद्र झाला, फुलेच भ्रमर झाली, झोपणारा हाच शय्या झाला, सोनेच (घडणावळ न करता) अलंकार झाले, आम्रमोहोर हाच कोकीळ झाला, तसंच भक्तच "**विषयविषयी**" द्वैत लोपून, भगवंत होतो, शिष्यच गुरुत्वाला पावतो.

तरी मग तो सामान्यांप्रमाणे खाणे-पिणे-निद्रा-संभाषण-गमनागमन करतो कसा ? तर शेवंतीच्या एकाच फुलास अनेक पाकळ्या असल्या तरी त्या फुलाचे एकत्त्वास बाध येतो काय ??? तसेच भक्त जगत्पदार्थाचा अनुभव घेत असला तरी त्याच्या ऐक्यभावाचा भंग होत नाही. जसा आरसा पाहणाऱ्याला त्याचेच दर्शन घडवत असतो, त्यामुळे अन्यत्त्वाची भावनाच उद्भवत नाही, तसेच देवभक्तांचे, ब्रह्म आत्म्याचे, ऐक्य जाणणारा हा सुद्धा

मन-इंद्रियांद्वारे पुढ्यातील वस्तूमात्रांस स्पर्श करताना, त्या-त्या नाम-रुपात्मक पदार्थ-वस्तू-व्यक्ती रुपाने, आपणच आपणास भेटत आहोत असेच अनुभवत असतो, होय की नाही ???!!!

स्त्रियांच्या केशरचनेला भूषवणारा "सुवर्णनाग", बोटांमध्ये घालावयाची "अंगठी" आणि मनगटावर चढवावयाचे "कंकण" यांच्यात जरी व्याकरणभेद असला, नामभेद, उपभेद व प्रयोजनभेद असले तरी मूळ सुवर्ण एकच. या सर्व अलंकाररुपांनी एक काय ते निखळ सोनेच असते. जलाशयाच्या पृष्ठभागावर लाटा, फेस, तरंग, बुडबुडे सतत उद्भवतात, त्यांना हातात धरण्याचा यत्न केला तर हातामध्ये केवळ एक पाणीच येते; तसा एक भगवंतच अगणित नाम-रुप-गुणांनी प्रतीत होत असतो. तसंच "देव-भक्त" आणि "गुरु-शिष्य", दिसावयास भिन्न पण असतात मात्र एकच.

अशा भगवद्भक्ताचं नित्य आचरण **दैनंदिन सर्व व्यवहार** हे मोक्षसुखावरही वरताण करतात. कारण या पराभक्तीच्या निधानात (परमसुखात) अनन्य, अहैतुकी भक्ती करणारा भक्त आणि भजनीय-सेवनीय भगवंत हे एकच झालेले असतात. मनुष्याने घरातच चालण्याच्या कितीही फेऱ्या केल्या तरी तो जसा सर्वकाळ घरातच असतो, पाऊलही बाहेर टाकीत नाही, तसेच एकरुप भक्तीने परमात्म्याशी एकरुप होऊन, ज्ञानी भक्ताने नित्य व्यवहार (काया-वाचा-मन-बुद्धी, इंद्रिये यांच्याद्वारा होणारे सर्वच्या सर्व) जरी केले तरी तो सर्वकाळ अंत:करणाने एका भगवद्सदनातच असतो. शिष्य पण असाच सर्वार्थाने श्रीगुरुस्वरूपांतच असतो.

भक्त आणि देव, श्रीगुरु-शिष्य यांची एकात्मता, एकरुपता हाच प्रत्यय नित्यनूतनपणे अनुभवास येत असतो.

काही वेळा नंतर देवच प्रेमाने, आनंदाने, भक्तरुप होतो. भक्ताच्या केवलाद्वय ऐश्वर्याचे-प्रतिष्ठेचे हे वैभवच आहे.

अशा तुलनारहित परा-भक्तीत भक्त कोण ? आणि भगवंत कोण ?

भक्त देवाधीन आहे कां भगवंतच **भक्तांकित** आहे ? हेच कळेनासे होते !!! आहे की नाही मौज ??? पण असे अतर्क्य लाघव या प्रेमलक्षणा-पराभक्तीतच घडते.

"श्रीगुरु" हे मनुष्यरुपाने साकारलेले परब्रह्मच आहे, जो कोणी **"मी-तू"** ? या भेदाच्या पलिकडे जातो, तो त्यांना सोयरा वाटतो, आप्त वाटतो, नाही-नाही आपणच वाटतो. श्रीगुरुंशी अशा जवळिकेने शिष्य कृतार्थ होतो, भगवंताच्या जवळिकेने भक्त कृतार्थ होतो. आत्मस्वरूपी तृप्त होतो आणि ही ऐक्याचळाची स्थिती प्राप्त करून देणारा दुवा एकच आहे, श्रीगुरुंकडून मिळालेले सबीज नाम.

* * * *




हे अगदी खरे-खरे आहे की, केवळ अव्यक्त-निर्गुण-निराकार-अमूर्त-निर्व्यक्तिक अशा परब्रह्माच्या-अनंताच्या मागे लागल्याने, अनुसरल्याने-भक्तिभावाने आपल्याला भक्तीच्या भावप्रकाशप्रेमाचा अनुभव (विविध प्रकारचा) आणि त्याच्या (आनंदब्रह्माच्या) अतिसलगीचा-सहवासाचा-सानिध्याचा-संगतीचा अनुभव मिळूच शकत नाही.

अशा अनुभवासाठी अनंत असा तो उत्तमपुरुष-भगवंत आपल्या अगदी निकट सानिध्यात असणारा, व्यक्तिरुपानेच आपल्यातल्या व्यक्तित्त्वाला भेटणारा, आपण ज्याची यथास्थित पूजा-अर्चा-सेवा करू शकू असा सगुण-साकार-सानंद-व्यक्तिस्वरूप म्हणजेच भगवंत झाला पाहिजे.

भक्तिमार्गाची सुरुवात, व्यक्तिस्वरूप भगवंताच्या-श्रीगुरुंच्या पूजेपासून-शरणागतीतून होते; आरंभित झालेला हा भक्तिप्रेममार्ग चढत जातो, वाढत

जातो, रुंदावत जातो आणि शेवटी परमप्रेमस्वरूप अशा प्रेमलक्षणा भक्तीचे रूप घेतो.

भगवंत-ईश्वर-श्रीगुरु म्हणजे केवळ भावनात्मक, **अवास्तविक** असे अस्तित्व नाही; किंवा केवळ देश-कालशून्य अशी नुसती कल्पना नाही तर भगवंत-श्रीगुरु-परब्रह्म हे मूळचे आनंदमय अस्तित्व आहे. ह्या अस्तित्वापासून आपली जाणीव (त्या आनंदस्वरूपापासून) विभक्त असू शकत नाही.

आपल्या स्वतःच्या अस्तित्वाची व स्वतःच्या मूलभूत आनंदाची जाणीव (समर्थांच्या भाषेत शुद्ध जाणीव) यालाच शास्त्रकार आनंदब्रह्म-भगवंत-ईश्वर म्हणतात आणि हे म्हणणंच अगदी योग्य आहे.

अशा या भगवंतापासूनच सर्व विचार, आचार, भाव-भावना निघतात आणि या सर्व गोष्टी त्याच्याकडेच परत जातात. असा सगळ्याच विश्वाचे उगमस्थान असणारा परमात्मा अनंत नामरुपांनी प्रगट होतो.

भक्ताने-साधकाने आपल्या जीवनाच्या सर्व अंगांनी भगवंताला-ईश्वराला कवटाळावे म्हणून देवतेचे जास्तीत जास्त गुण असतील असा आकार, भक्तिमार्गात त्या-त्या आपल्या उपास्य आराध्याला आलेला असतो.

निराकार-निर्गुण देवाची पूजा करणारादेखील आपल्या देवाला कोणत्या तरी गुणांचे, कोणतेतरी मानसिक, कोणतेतरी निसर्गदृष्ट रुप देत असतो आणि याच रुपाच्यामध्ये तो आपला भगवंत पहात असतो. त्याची सेवा करतो, त्याच्या सन्निध राहतो; त्याच्या स्वरूपाशी समरस होऊन जातो आणि ही समरसता-एकरुपता मधुर होण्यासाठी भक्ताला भगवंत हा प्राणमय अशा चेतन स्वरूपांत-आकारात आपल्या **निकट** असावा लागतो.

भगवंत-श्रीगुरु आपला जसा शिक्षक आहे तसाच तो आपला मालकपण आहे. भक्तिप्रेमभावांतील हे मालकपण फार-फार मधुर आहे. त्यात कठोरतेला स्थानच नाही. इथे आहे ती केवळ **मृदूता**. मालक-सेवक यामध्ये असणारे अंतर-भीती येथे नाहीसेच होते.

**दास्य** ही भगवंताच्याबाबतीत भक्तीमार्गातील अगदी प्रथमची, तळाची

अवस्था आहे. तंतूवाद्यपटू संगीतज्ज्ञाच्या बोटांनी तंतुवाद्याच्या तारेला स्पर्श केला म्हणजे ती तार जशी प्रतिसाद देते तशी भगवंताच्या-श्रीगुरुंच्या बरोबर आपली अवस्था होते. भगवंताचे-श्रीगुरुंचे असे **वाद्य** होणे ही श्रीभक्तीप्रेमातील अत्यंत उच्च हृद्य अशी अनुभूती आहे. यांत आत्मसमर्पण/आत्मनिवेदन आहे.

भगवंताचे-श्रीगुरुंचे प्रभुत्त्व भक्ताला आनंदमयच असते. भगवंताने-श्रीगुरुने आपल्यावर प्रभुत्त्व गाजवावे असेच भक्ताला वाटत असते. आपला परमप्रेमास्पद भगवंत आपल्याला जे जे सुख-दुःख देईल ते-ते सर्वच्या सर्व, जसेच्या तसे भोगणे हेच भक्ताला आनंददायक असते; भक्त आनंदाने भोगत असतो.

देव-भक्तांच्या ऐक्याचा आनंद भक्ताच्या सर्व अंगात भरून वाहतो. मन-प्राण या आनंदाने भरून जातात. भौतिक शरीरालादेखील या आनंदाचा अनुभव येतो. भगवंताचा स्पर्श शरीरालाही जाणवतो. सगळेच शरीर या आनंदामृताने भरून जाते आणि मग या दिव्य भक्तिप्रेमामृतानंदाने ज्या सगळ्या मन-बुद्धी-प्राण-इंद्रियांच्या हालचाली होतात यालाच कलेच्या भाषेत **नृत्य** असे म्हणतात.

* * * *




श्रीगुरुज्ञानोबारायांचा हरिपाठ, त्याला वारकऱ्यांची संध्या म्हणतात. या हरिपाठाच्या अभंगांतून त्यांनी नामस्मरणाचे महत्त्व विशद केले आहे पण त्याचबरोबर यातून श्रीज्ञानदेवांच्या प्रस्थानत्रयीचे सारही प्रकट झाले आहे !!! माऊलीच्या वाङ्मयात, तत्त्वज्ञानांत एक अनुबंध आहे. याची जाणीव या सगळ्या **पाठाचे** चिंतन केल्यास सहजच अनुभवास येते.

हरिपाठाच्या सुरवातीलाच **"देव"** शब्द आला आहे. ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीही गणेशस्तवन करताना "देव" शब्द आहेच. पसायदानाची सुरवात "आता विश्वात्मके देवे" अशीच आहे ना. अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणात "देवोदेवी" अशी योजना आहे. या सगळ्यांतून एक औपनिषद् प्रमेय लक्षात घ्यावयास हवे की **"देव"** एकच एक आहे आणि तो **विश्वात्मक** आहे. हा आपला देव, सर्व जगाचे आदिकारण, वेदांचे प्रतिपाद्य, स्वसंवेद्य, आत्मरुप, विश्वात्मक आणि विश्वोत्तीर्ण असाआहे.

या देवाविषयी कुठे त्याच्या सगुण रुपाबद्दल, कुठे त्याच्या निर्गुण रुपाबद्दल, कधी त्याच्या निकराच्या अद्वैत स्वरूपाबद्दल, कधी 'हरी'च्या रुपात, तर कधी 'हर' रुपात ते बोलतात आणि **"हरिहरऐक्य"** तर सर्वच संतांचा अनुभव आहे. सार काय **देव** एकच आहे. समर्थही हेच सांगताहेत **"अनेकी सदा एक देवासी पाहे ।।"**.

चार वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे एका **हरीचेच** वर्णन करतात. **आत्मरूप** असलेला हा "श्रीहरी" म्हणजेच श्री पांडूरंग जीवाशिवात सारखाच वास करतो. वेद, पुराणे, शास्त्रे यातील सर्व कथांचे सारभूत तत्त्व म्हणजे आपला "श्रीहरीच" आणि म्हणून "श्रीहरी-पांडूरंग-गुरु" तत्त्वाचाच स्वीकार करावा आणि इतर सर्व मतमतांतरांचा त्याग करावा. त्रिगुणात्मक विश्व असार म्हणजे मिथ्या आहे (खोटे नाही). मात्र या जगताचे अधिष्ठान असणारा "निर्गुण-निराकार पण कर्तुम्-अकर्तुम् अन्यथा कर्तुम, स्वतंत्र, सर्वज्ञ, सर्वेसर्वा, सर्वशक्तिमान्, समर्थ, सर्वज्ञ" परमात्मा हाच सारभूत आहे.

हा सारासारतेचा निश्चय (म्हणजे सारासार विचार, म्हणजेच **"आत्मानात्मविचार"**) एक हरिनामाचा पाढ केल्यानेच होतो. अव्यक्त, निर्गुण, निराकार अशा एका परमात्म्याचीच प्रतीती हरिपाठ (म्हणजे नामस्मरण) केल्यानेच येते. तात्पर्य आपल्या श्रीहरीचेच **सगुण स्वरूपांत** ध्यान करावे, भजन-पूजन करावे आणि स्मरण तर करावेच करावे.

नामस्मरण हा भगवद्प्राप्तीचा सहज सुलभ मार्ग; "एकमेव मार्ग आहे".

यात तीळमात्रसुद्धा संशय नाही; हे जरी खरे-खरे असले तरी त्यात क्रियेपेक्षा **भावाला** फार-फार महत्त्व आहे; हे कधीच विसरता कामा नये. भावाशिवाय भगवंत कळणार नाही, श्रीगुरुंशिवाय अनुभव येणार नाही, तपश्चर्येशिवाय दैवत प्रसन्न होणार नाही, त्याग केल्याशिवाय, दिल्याशिवाय काहीएक मिळत नाही. तसा भावाशिवाय भगवंत नाहीच नाही. श्रीशंकरांचा आत्मा असा जो नामस्मरण मार्ग हाच जीवाचा **भाव**-स्थायीभाव व्हावा असा आपल्या श्रीगुरुज्ञानोबारांचा आग्रह आहे.

''**भाव**'' या शब्दातच एक सहजता आहे पहा. नामस्मरण इतके सहज व्हावे की, आपल्या वाचेला त्याचे स्मरणही असू नये. म्हणजे काय ??? तर, ''मी भगवंताचे नामस्मरण करीत आहे'' ही जाणीव लोप पावून जेव्हा सतत आणि सहजगत्या नामस्मरण होऊ लागते तेव्हा तो जीवाचा सहज, सुंदर, नितांत भाव होतो. मग नामस्मरण करावे लागत नाही तर ते सहज, सतत, अखंड होत राहते.

आणि जर हा भाव नसेल तर तीर्थ-व्रत, नित्यनेम ही सर्व उपाधीच होईल. भगवंत हा केवळ भावानेच आकळता येतो. सर्व साधनेचे ध्येय भगवंताची प्राप्ती हेच आहे; असाच एक शुद्धप्रेमभाव अंत:करणात असावा. कोणत्याही प्रकारचा संदेह न धरता ''रामकृष्णहरी'' नामाचा टाहो फोडावा. जात, वित्त, कुळ, शील यांचा अभिमान सोडून भावनेने, प्रेमाने हरीभजन (नामस्मरण) करावे. ज्याच्याजवळ ही **भावरुपी** नाव आहे, तो मायानदी तरून जातो. ''**तोच आपला आहे आणि आपण फक्त त्याचेच आहोत**'', असा एकविधभाव असावा. अशी दृढ श्रद्धा असावी. कारण भावाशिवाय भक्ती नाही आणि भक्तिशिवाय मुक्ती म्हणजे परमानंद नाही.

* * * *

# चिंतन ११५

संतसंगतीमुळेच या घोर-खोल-दुस्तर अशा संसारसागरातून तरून जाता येते. "**साधुबोध/गुरूबोध**" झाला की "**अहंब्रह्मास्मि**" ही वृत्तीही अखेर लोप पावते. "**साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला। जेथ जगचि ब्रह्मत्वे भरे। तेथ मी ब्रह्म हे तो विसरे।**" अशी व्यापक, अमर्याद अनुभूती प्राप्त होते. साधु श्रीगुरूअंकित झालेल्या भगवद्‌भक्ताला अशा स्वानंदसाम्राज्याचा/मोक्षाचा लाभ होतो; तो पण याचि देही, याचि डोळा! संतसंगतीने प्रापंचिकांना रम्य समाधान प्राप्त होते, आणि भगवंताला लवकर आपलासा करून घेता येतो.

साधुबोध म्हणजे ह्या साधुसंतांनी/श्रीगुरूंनी केलेला/करून दिलेला **आत्मबोध.** "आत्मबोध" म्हणजेच आत्मस्वरूपाची प्रत्यक्ष ओळख. श्रीसमर्थ ह्यालाच दासबोध असं म्हणतात. असा आत्मबोध झाल्यावर, मग माणसाच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारचे संकल्प-विकल्प उरत नाहीत. उठत नाहीत. "**संकल्प तो नाही दुजा। महाराजावीण तो।।**" एका फक्त भगवंताविषयीच संकल्प आणि ह्या भगवद्‌संकल्पातच आत्मानंदाची खाण. असा बोध, असे ज्ञान फक्त साधुसंत/श्रीगुरूच देऊ शकतात. आपले श्रीज्ञानोबाराय म्हणतात, "**ते ज्ञान पै गा बरवे। जरी मनी आथि आणावे। तरी संता या भजावे। सर्वस्वेसी।।**" मग "**अपेक्षित जे आपुले। तेंहि सांगतील पुसिले। जेणे अंत:करण बोधले। संकल्पा न ये।।**"

संसारात राहून, संसारातील कर्तव्ये करीत असतानाच, (मात्र कर्तव्य आणि मोह, यातील भान असावयास हवे बरं) केवळ नामस्मरणाने भगवंताची प्राप्ती करून घेता येते. हरी-हरी असा जप केल्याने प्रपंचाचे धरणे आपोआपच सुटते. पण हरी-हरी न म्हणता संसारविषयांवर बरळत राहिल्यावर, मग गोपाळ कसा प्राप्त होणार नां? **अद्वैताच्या** वाटा

जाणल्यानेच, खुणा समजल्याने-**अनुभवल्याने** रामकृष्णाचा लाभ होतो. नामस्मरणाने **द्वैत** उरतच नाही; मग बाधणार कसे? हे **अद्वैतज्ञान** श्रीगुरूमुळेच प्राप्त होते. एक भगवंत/श्रीपांडूरंगच आपलासा करून घेणं, हेच बुद्धीचे वैभव आहे. भगवंताशिवाय सर्व उपाधीच आहेत. श्रीहरी आणि हरीचे नाम एकच आहे. अशी अद्वैत बुद्धी ठेवून नामस्मरण करावे. नाम-नामी आणि नाम देणारा श्रीगुरू यांची नामधारकापासून तत्वतः थोडीसुद्धा वेगळीक नाहीच.

नामस्मरणामुळे अगणित पुण्य निर्माण होते, मात्र हे पुण्य स्वर्गाला नेणारे पुण्य नाही बरं कां; हे अलौकिक नच खर्ची पडणारे, वाढणारे पुण्य नामधारकाला नामी भगवंताशी तद्रूप करते. नामाने तिन्ही लोकांचा उद्धार होतो. अनंत पातकांचा सहज नाश होतो. "**तृण अग्नि मेळे समरस झाले। तैसे नामे केले जपता हरी।।**" भूतबाधा होत नाही. चेडे-चेटके नासतात. कळिकाळ त्याला बाधा करू शकत नाही. नामाने मनाला उन्मनता प्राप्त होते. वैकुंठवास लाभतो; सर्व तीर्थात सुस्नात होण्याचा लाभ एका नामस्मरणांत होतो. सर्व दोषांचे हरण होते. लक्ष्मीवल्लभ तर या नामधारकाजवळच राहतो. नामधारकाच्या घरात भक्ति-मुक्तीच वास करतात. वैष्णव निरंतर राहतात आणि असं हे **हरिनाम** स्मरण करण्यास काय सायास-प्रयास-कष्ट लागतात सांगा बरं! नामस्मरण केवढं सुलभ साधन नाही कां?

नाम सुलभ, सोपं आणि गोड. अमृताहूनही गोड. आपल्याच हृदयातील सर्व सुखाचा आराम, असा आत्माराम, आपल्याला अभेद बोधाने दाखवून देणारी खूण म्हणजे नाम. दृढ भावाने हरीचे नामस्मरण केल्यावर हरी आपला होतोच. नामधारकाने एका नामस्मरणाशिवाय अन्य मार्गांचा अवलंब कधीच करू नये. हरीशिवाय सर्व व्यवहार व्यर्थ आहे. लौकिक भ्रमाचा भोपळा आहे. भगवंताचे नाम हेच एकमेव "**संजीवन समाधीचे**" साधन आहे.

श्रीगुरूंकडून प्राप्त झालेल्या नामाच्या ठिकाणीच निजवृत्ती असावी. नामाला कधीच विसरु नये. अखंडपणे नामस्मरण करणं हे भक्ताचे अत्यंत महत्वाचे लक्षण आहे. असं नामस्मरण करणारा भक्त भगवंताला अतिशय प्रिय असतो. भगवंत अशा भक्ताच्या हृदयांत सतत वास करीत असतो.

त्याच्या सर्व चिंता निवारण करतो; तेही न सांगता. त्याला सांगावे लागतच नाही. तो सगळं जाणतो नां! "**भक्त समागमे सर्व भावे हरि। न सांगता करी सर्व काम।।**"

अशा भगवंताचे नाम सोडून व्यर्थ खटाटोप कां करावयाचा? एवढंच करायच बघा, "**आले भागा तें करितो। तुझे नाम उच्चारितो।।**"

* * * *



# चिंतन १९६

माणसाच्या वैयक्तिक, सामाजिक आणि सांस्कृतिक, इतकंच नाही तर जीवनातल्या सगळ्याच स्तरांवर विचार करता संतांची कामगिरी फार-फार मोलाची आहे. या सर्व संतमंडळीत आपले ज्ञानेश्वरमहाराज तर अग्रस्थानीच शोभतात. वयाच्या (लौकिक दृष्ट्या) अवघ्या सोळाव्या वर्षी त्यांनी "**भावार्थदीपिका**" अथवा ज्ञानेश्वरी ही गीतेवरची अनुभवसंपन्न टीका लिहिली. उत्कृष्ट आर्त काव्य, तत्वज्ञान व प्रापंचिकांच्याही मनाला शांती व समाधान प्राप्त करून देण्याची शिकवण यांचा अपूर्व त्रिवेणी संगमच या ब्रह्मसाम्राज्यदीपिकेत झाला आहे.

यामुळेच "**ज्ञानेश्वरी**" हे मराठी माय माऊलीचे चिरंतन वैभव झाले आहे. किंबहुना हा ग्रंथ मराठी भाषेचा आत्मप्राण आहे. महाराष्ट्राच्या धार्मिक आणि सांस्कृतिक जीवनावर तसेच मराठी वाङ्मयावर या ग्रंथाचा मोठाच प्रभाव आहे. महाराष्ट्रातील अध्यात्मिक वारसा याच ग्रंथाने अखंडित जोपासला आहे. नुसता जोपासलाच नाही तर वर्धमान केला आहे.

भक्ती, वैराग्य, ज्ञान, योग, उपासना, कर्माकर्मविचार इत्यादी विषयांचे विवेचन या धर्मसंकीर्तनात आहेच आहे, पण त्याचबरोबर **गुरूशिष्यप्रेमा,** नम्रता, आत्मविश्वास, भक्ताची **निर्भयता,** श्रोत्यांबद्दलचा आदर आणि अखिल भूतमात्राविषयीचा **कळवळा** इत्यादी नानाविध भावछटा त्यात

उमटलेल्या आहेत; नाना भाव छटांतील सुरंगतेच्या वैविध्या, आगळिकतेसह धर्म नीती व ग्रंथकालीन समाजजीवन यांचे स्पष्ट-सुस्पष्ट असे प्रतिबिंबही या ग्रंथात जागोजागी पडलेले आपल्याला आढळते.

महाराजांनी आपल्या भाष्यग्रंथाला "**धर्मसंकीर्तन**" म्हटले आहे. "**किंबहुना तुमचे केलें। धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें। एथ माझें जी उरलें। पाईकपण।।**" ह्या ओवीने, त्यांनी आपल्या भाष्यग्रंथाच्या गाभ्यावरच प्रकाश टाकला आहे. गीतेवर भाष्य करण्याच्या निमित्ताने त्यांनी वेदाचे परिपक्व, रसाळ फळ असणाऱ्या **भागवतधर्माचेच** संकीर्तन केले आहे.

"**सर्वाभूती भगवद्भाव**" या आत्मसाक्षात्कारी उन्नत परिपूर्ण विचारावर-आचारावर भागवतधर्ममंदिराची इमारत उभी आहे. अशा भागवतधर्माचे व्याख्यान अथवा कीर्तन म्हणजे "**ज्ञानेश्वरी.**" कीर्तन हा प्रबोधनाचा, लोकशिक्षणाचाच नव्हे तर आत्मजागृतीचा पारंपारिक प्रकार आहे. कीर्तनद्वारा धर्मप्रचाराचे, प्रसाराचे, धर्मसंरक्षणाचे कार्य होत असते. "**नाचूं कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी**" अशी नामदेवरायांची पण ग्वाही आहे की ज्यांनी भागवतधर्ममंदिराचा विस्तार केला. या कीर्तनाच्या माध्यमातून धर्माचे मूलभूत सूक्ष्म स्वरूप अगदी जनसामान्यांपर्यंत पोहचू शकले. ज्ञानेश्वरी हे असे श्रेष्ठ दर्जाचे धर्मकीर्तन-हरिकीर्तन आहे.

या धर्मकीर्तनामागील प्रेरणा, अत्यंत व्यापक आणि विशाल आहे. "**विश्वाचे आर्त प्रकाशले माझे मनी**" या उदात्त, परमकल्याणकारी हेतूनेच ज्ञानेश्वरीची रचना झाली. ज्ञानेश्वरमहाराज कवी तर आहेतच; नाही नाही तर कवी पोषक आहेत. पण त्यांचे हे काव्य नुसते काव्य नसून **आत्मकाव्य** आहे. ज्ञानेश्वरी हा उत्तमोत्तम असा साहित्यग्रंथ असला तरी आशयाच्या दृष्टीने तो तत्वज्ञानाचा ग्रंथ आहे. सर्वसामान्यांना निखळ असा **आत्मबोध** करून देऊन, तद्द्वारा **आनंद**-साम्राज्याचा राज्याभिषेक करणारा हा ग्रंथ. त्यांच्या या अक्षर-साहित्यातून त्यांची आत्मानुभूतीच नाही तर सच्चिदानंदाची अखंड प्रचितीच अविष्कृत होत असते. "**एक तरी ओवी अनुभवावी**" असं नामदेवराय उगीचच कां म्हणतात? ज्ञानेश्वरी वाचा, पाठ करा, चिंतन मनन करा आणि अनुभवांनी सुस्नात व्हा. मग आनंद-आनंदी-आनंदच अनुभवाला येईल.

वारकरी तर श्रीज्ञानेश्वरमहाराज आणि ज्ञानेश्वरी एकच अनुभवतात. ज्ञानेश्वरांना आणि ज्ञानेश्वरीलाही आम्ही ("आम्ही" म्हणजे अहंकारार्थी नव्हे, तर बहुवचनार्थी सगळे वारकरी) माऊली म्हणतो. आपल्या ज्ञानोबारायांच अंत:करण माय-माऊलीपेक्षा, जन्म देणाऱ्या जन्मदात्रीपेक्षाही विशाल आहे. महाराज म्हणजे मूर्तिमंत कारूण्य, करूणापारावार, दीन-दुबळ्या अनाथांबद्दल अपार करूणा.

यामुळेच या कीर्तनात हळुवारपणा, ऋजुता, माधुर्य, प्रसाद, स्नेह, वात्सल्यभाव, आदर, नम्रता, यांचे कोवळे पल्लव, वसंतातील कोंवळी नूतन आम्रपल्लवीच. या सगळ्यातून त्यांनी ब्रह्मविद्येचा सुकाळ केला; भक्तीप्रेमाचे मळेच्या मळे पिकविले. ब्रह्मरसाचे-प्रेमसुखाचे मंगल-शांत-झरे वाहविले. **या ग्रंथाला नजरेआड करू नका. श्रवण करा "गुरूमुखातून", मनन करा, चिंतन करा आणि मोक्षावरही किरीटासमान असणारा भक्तीप्रेमसुखाचा अलंकार धारण करून या दिव्यतेजालंकाराने अलंकृत होऊन, भक्तीप्रेमाने नटून, भगवद्मस्तीप्रेमात रंगून जा.**

* * * *




बऱ्याच वेळा ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरमहाराज यांची फारकत केली जाते आणि त्यामुळे काय होतं की, ज्ञानेश्वरीच्या आत-गाभाऱ्यात प्रवेश करता येत नाही. चंद्र आणि चांदणे, सूर्य-प्रकाश, साखर-गोडी, भगवंत आणि भक्त, श्रीगुरू-शिष्य यांची जशी वेगळीक करता येत नाही; कारण मुळातच एकमेकाहून यत्किंचितही **भिन्न नाहीच**. तसंच ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरांच. ज्ञानेश्वरी म्हणजे ज्ञानेश्वरमहाराजांचं ओवी-ओवीतून माऊलीचच प्रत्यक्ष दर्शन होतं.

ज्ञानेश्वरी हा अध्यात्मग्रंथ आहे. यातील मुख्य विषय अध्यात्म आहे. आनंद-आनंदस्वरूपता हे या ग्रंथाच्या श्रवण-पठण-मनन-निदिध्यासाचे फळ

आहे. जीवाला आपल्या मूलभूत अशा शिवस्वरूपाची (आनंदाची) भेट करून देऊन त्याला अखंड एकरस अशी आनंदस्वरूपता प्राप्त करून देण्याचा हा राजमार्ग आहे. "**अवघाचि संसार (म्हणजे जीव) सुखाचा करीन। आनंदे भरीन तिन्ही लोक।।**" ही ज्ञानदेवांची प्रतिज्ञा आहे.

भगवंत आणि भक्त असा काल्पनिक भेद, भगवंताची यथार्थ ओळख-प्राप्ती होईपर्यंत असतो. शिष्य-गुरू यांत भेद नाहीच. भक्ताचं भगवंतरूप झाल्यावर वेगळीक कोठे? शिष्यच गुरूत्वाला पावतो. भेद कोठला? कशाचा? इतकंच नाही तर भक्तच भगवंतावर, शिष्यच-श्रीगुरूंवर सत्ता गाजवतो नाही कां? मीठ जसे पाण्यात टाकल्यावर तद्रूप होऊन राहते; त्याला वेगळे स्वतंत्र अस्तित्व उरतच नाही; त्याचप्रमाणे भक्ताला भगवंताहून वेगळेपण उरत नाही.

वास्तवत: आपले ज्ञानोबाराय श्रीगुरूपरंपरेने नाथपंथी आहेत. नाथपंथात शक्तीसाधनेला, योगाचरणाला अधिक महत्व आहे. पण कलियुगातील सामान्य लोकांना योगमार्गाचा अवलंब करता येणं अवघड आहे हे जाणून ज्ञानराजांनी भक्तिमार्गाचा **पुरस्कार** केला. हा भक्तिमार्ग साधा, सोपा, सहजसुलभ आणि सर्वांना आचरता येईल असाच आहे. योगी आणि संन्याशी यांच्यापेक्षा भगवंताला भक्त अधिक आवडतात. प्रभू हा भावाचा भुकेला आहे. निर्गुण-निराकार असणारा परमेश्वर भक्तासाठीच सगुण साकार होतो. भक्तांना भेटण्यासाठी तिष्ठत उभा राहतो. महावैष्णव अशा माऊलींनी ज्ञानदेवीतून भक्तीचा महिमा गाईला आहे.

कर्म-ज्ञान-योग-भक्ती या सगळ्यांचाच हृदयंगम संगम म्हणजे ज्ञानियांचे राजे, संतसम्राट ज्ञानेश्वर महाराज. वरील गोष्टीपैकी कोणतीच एक गोष्ट एकांगी असत नाही. जसं कापूर म्हटले की, मृदूता, शुभ्रता, सुगंध आलेच तसेच वरील कोणत्याही एका मार्गाचे ज्ञानोबाराय म्हणतात, "**अर्जुना गा भक्तु तोची योगी, तोची मुक्तु।।**" आणि असा महात्मा "**तो वल्लभा मी कांतू। ऐसा पढीये।।**" असा भक्तराज भगवंताला आपल्या प्राणापलीकडे प्रिय. होय की नाही?

माऊलीच्या तत्वज्ञानातील मुख्य सिद्धांत हा औपनिषदिक् **"अद्वैत"** सिद्धांतच आहे. सर्वत्र एकच परमात्मा भरून राहिला आहे. त्याच्याखेरीज दुसरे काही नाही. विश्व म्हणजे या परमात्म्याचेच चैतन्यस्वरूप स्फुरण. **चैतन्यब्रह्म** म्हणजे अवघे विश्वच. आरती करतांना भाव असा हवा की चैतन्यानेच चैतन्याची केलेली आरती. तर आरती होते. नाहीतर नुसतीच कवायत. दीपज्योती दोन अगर असंख्य असोत प्रकाशतत्व जसे **एकच एक** असंच अद्वैताचं लेणं. हेच आपल्या माऊलींनी तुम्हा-आम्हा सर्वांना एकच एक देणं दिले, **"देणारा-घेणारा"** हे द्वैत न ठेवता.

आपल्या एकंदर सगळ्याच ओवी-अभंगातून भक्तिभावाचा-माणुसकीचा उद्घोष सगळ्याच संतांनी केला. नुसता उद्घोष करणारे नाहीत; तर मूर्तीमंत **माणुसकी** ते हे संत. भगवद्रूप होऊन सुद्धा समाजाकडं पाठ नाही फिरवली संतांनी. ज्या समाजाने अवहेलना केली, बहिष्कार टाकला अशा समाजावर त्यांनी अफाट प्रेम केले. ते पण निरपेक्ष-निरामय. असा **प्रेमभाव** तेथेच असतो जिथ भगवंतावर नितांत प्रेम असते.

असा हा भक्तिप्रेमभाव सूक्ष्म-तरल-विलक्षण संवेदनात्मक असतो; पण खूपच घट्ट-बळकट असतो. मोठ्या जाड-जूड अशा दोरखंडापेक्षाही हा भक्तिभावप्रेमाचा रेशमी धागा खूपच बळकट असतो. किती पक्का असतो? तर कर्तुम्-अकर्तुम्-अन्यथा कर्तुम् सर्वज्ञ-सर्वसत्ता, सर्वज्ञ-सर्वशक्तिमान्, सर्वे-सर्वा अशा परमात्म्याला बांधून ठेवतो. एकदा त्याला ह्या अतूट धाग्यांनी बांधला ना की मग तो भगवंतसुद्धा हा धागा तोडू शकत नाही. ज्ञानोबारायांनी अशा भक्तिप्रेमाच्या नाजूक पण अतिशय बळकट धाग्याची लडीच आपल्या हाती उलगडून दिली आहे. ज्ञानेश्वरीतून, अभंगातून, हरिपाठातून, अमृतानुभवातून, पासष्टीतून. केवढं हे देणं?

* * * *

# चिंतन ११८

जो भगवंत प्राप्त करून घ्यावयाचा, त्याच्याबद्दल अत्यंत जिव्हाळ्याचे भक्तिप्रेम असल्यावाचून, त्याच्या प्राप्तीबाबत उत्कट, अखंड, प्रयत्न होत नाहीत. नाही कां? माता आपल्या अपत्त्यासाठी अनिवार कष्ट करते, या मातेच्या कष्टाचे बीज तिच्या पुत्रप्रेमात आहे. ''वीट नाही, किळस नाही, कंटाळा नाही'' पुत्राच्या/कन्येच्या सुखासाठी माता सर्व सोसते; (सोसते असे म्हणणेसुद्धा चुकीचेच आहे; खरं तर आपण आपल्या लाडक्या आपत्त्यासाठी एवढं असं काही करतोय याची तिला जाणच नसते) आपल्या सेवनाने तहानेल्याची तहान आणि भुकेल्याची भूक भागते याची पाण्याला व अन्नाला कुठे जाण असते?

त्याचप्रमाणे परमार्थ प्रेमावर, वचनांवर, प्रक्रियांवर, भगवंतावर/ श्रीसद्गुरूंवर निश्चल गाढ भक्ति-प्रेम-विश्वास, श्रद्धा हे परमार्थाच्या प्रयत्नांचे मूळ बीजच आहे. अर्थातच **भक्तिप्रेम** हा साधकाच्या अनेक सद्गुणांतला मुख्य सद्गुण आहे. गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या शेवटच्या काही श्लोकात **''यो मद्भक्त: स ते प्रिय:; भक्तिमान् मे प्रियो नर:''** अशी वचने अनेक वेळा आली आहेत. एवढंच काय तर गीतेत जागोजागी भक्तीची थोरवी सांगितली आहे.

अनन्य भक्ती, श्रीगुरूंवर निरामय श्रद्धा-विश्वास, भगवंतावर निष्काम, निश्चल **भक्तिप्रेम** हाच सर्व सद्गुणांचा-नीतीधर्माचा-आचाराचा मुकुटमणी आहे.

भक्तिप्रेमा वाढण्यासाठी, **श्रीगुरू**-संतसंगती ही फार-फार उपयोगी. जशी संगती तसेच संस्कार व जसे संस्कार तशीच वृत्ती. श्रीगुरू-संत सदा भगवद्प्रेमात रंगलेले; **''विषय तो त्यांचा झाला नारायण तेथे अवगुण न मिळे सर्वथा''** ते देही उदास; त्यांना धन-वित्त यांचा लोभ नाही; सदा भक्तिप्रेमाने भगवद्गुणगान गाणारे, नाचणारे, नामांत रंगलेले; अशांच्या

संगतीत **भक्तिप्रेमाचे** संस्कार मनावर होतात. असा **श्रीगुरू-सत्संग** अनन्य भक्तीला सर्वतोपरी पोषक असतो. श्रीगुरूसंग हा उच्चतर आहे. समर्थ म्हणतात "**मिळतां प्रत्ययाचे संत। तो एकांतापरीस एकांत।।**"

परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते; त्याप्रमाणे श्रीगुरूसंगतीने नारायण भेटतो. श्रीगुरू शिष्याला आपणासारखे करतात; "**आपणासारिखे करिती तात्काळ। नाही काळ वेळ तयालागी।।"(तु.म.)** जे कोणी श्रीगुरूंना आवडतात, प्रिय असतात ते देवालाही आवडतात. जड जीवांच्या उद्धारार्थ व सर्व सुखाचे साधन अशी जी प्रेमभक्ती तिच्या प्रचारा-प्रसारार्थ श्रीगुरू-संतांचा अवतार. तुकाराम महाराज तर म्हणतात, "**तीर्थी धोंडा पाणी। देव रोकडा सज्जनी।**" रोख ठोक भगवंत श्रीगुरू-संतांमध्येच दिसतो-असतो; नव्हे नव्हे तर प्रत्ययाला येतो. श्रीगुरू-संत भक्तिप्रेमाचे-आनंदाचे भोजन करतात, प्रेमामृतपान करतात आणि संगतीत असलेल्यांना पण करवितात; "**तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू। नका चडफडूं घ्या रें तुम्ही।।**"

संत-श्रीगुरू देहधारी दिसले तरी ते केवळ थोर सद्गुणी मानव नाहीत. त्यांच्या ठिकाणी भगवंताचा प्रकाश इतका उज्ज्वल असतो की ते दैवीच असतात. त्यांचा अंतरात्मा भगवंताशी एकरूप झालेला असतो. भगवंत हा जर सागर तर श्रीगुरू त्यावरील तरंग. दोन्ही मिळून समान गुणधर्माचे एक पाणीच.

संत भगवंतच आहेत. त्यांच्यांत साधकाचा-भक्ताचा आदर्श व भगवंताचे गुण, दोन्हीपण एकदमच दृष्टीस पडतात. ज्याची श्रीगुरूंवर व तशीच भगवंतावर, पण कांकणभर जास्त श्रीगुरूंवरच, पराभक्ती असते तोच साधक, अशी उपनिषदांनी महती सांगितली आहे.

श्रीगुरू-संतांचे दर्शन-स्पर्शन, म्हणजे प्रत्यक्ष भगवंताचेच दर्शन-स्पर्शन. कबीर महाराज म्हणतात, "**जाको दरसे, साहिब दरसे**" जगाला न दिसणाऱ्या अशा भगवंताच्या "**गुप्त रूपाशी**" ऐक्य पावलेले पुरूष म्हणजे "**श्रीगुरू**" अशी एका थोर सत्पुरूषाने (कर्नाटकातील) श्रीसद्गुरूंची व्याख्या केली आहे.

"श्रीगुरू-संत" ही देवाचीच रूपडी; त्यांना देवच अनुभवून जो भक्तिप्रेमभाव भगवंतावर तोच-तसांच, नाही तर त्यापेक्षा जास्तच भाव संतांवर ठेवावयाचा. जोग महाराज म्हणावयाचे की, तुम्ही आपल्या श्रीगुरूंना मनुष्य समजता; म्हणून तुमचे साधन चांगले होत नाही; मी आपल्या **श्रीगुरूंना देव** म्हणून अनुभवतो.

खरी सगुण भक्ती म्हणजेच श्रीगुरू-संतावर भक्तिभाव. या भक्तिभावानेच भगवंतावरील, त्याच्या **नामावरील** भक्तिप्रेमभाव वाढतो. **नामसाधनावरील** श्रद्धा दिवसेंदिवस जास्तच दृढ होते आणि **नाम आठविता** रूपी प्रकट होतो.

* * * *




भगवंत अगाध आहे. त्याचा विचार फार-फार प्राचीन कालापासून सगळ्या थोर-थोर महात्म्यांनी केला आहे. तो सगुण आहे; निर्गुण आहे; साकार आहे, निराकार आहे, स्थूल आहे, सूक्ष्म आहे, व्यक्त आहे, अव्यक्त आहे, विश्वंभर आहे, विश्वातीत आहे. "**एकमेव**" सर्वातीत साक्षी आहे. परंतु असा असून तोच भक्तिप्रेमासाठी सगुण-साकार होतो; हा भक्तिचा नवलाव आहे.

"**अचेत चेतले भक्तिप्रेम सुखे ।।**" भक्ताला अशा सगुण, षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताचेच प्रेम आहे. निर्गुणाची भक्ती करता येत नाही. कशी करता येणार नां? भक्ताचे अंतीम ध्येय **आनंदमय भगवंताशी** एकरूप होऊन पुन्हा त्याचे भक्तिप्रेमसुख अनुभवणे, त्यासाठी पुन्हा-पुन्हा जन्म घेणे हेच आहे. भक्तांना मुक्ती नको; मुक्ती हे तर आपले निजस्वरूप आहे. "**घेईन मी जन्म याजसाठी देवा। तुझी चरण सेवा साधावया ।।**" हे भक्तांचे ब्रीद आहे; ही प्रतिज्ञा आहे.

"**स्वानंदसाम्राज्य**", स्वराज्य अनुभवावयाचे आहे. याबद्दल अजिबात दुमत नाही; परंतु हे ध्येय गाठण्याचा मार्ग सगुणाचे भजन/सेवा; भक्ति-प्रेम हा आहे. समर्थांनी सांगितले, "**सगुणाचेनि आधारे। निर्गुण पाविजे निर्धारे।।**"

हा सगुण परमात्मा अनंत नामांनी, गुणांनी, स्वरूपानी, वेशांनी नटला आहे. याच्या गुणश्रवणकीर्तनाने, निदिध्यासाने भरून-भरून जाऊन भक्त आपल्या देहाला, देहबुद्धीला विसरतात. भगवंत हा आनंद व नंदन आहे.

असा आनंदघन, सर्वव्यापी, सर्वभूतात्मा, सर्वगत, सर्वेसर्वा भगवंत **दयाघन** आहे. तो भक्तीने वश होतो. "**भक्तिविणा वश नोहे**" असा सर्व संतांचा निर्वाळा आहे. तो दीनदयाळ, क्षमाशील, पतीत-पावन, भक्तकामकल्पद्रुम, भक्तवत्सल, भक्तांचा वज्रपंजर आहे. अशा त्याच्या भक्तानुकूल स्वभावा-गुणांमुळेच तर भगवंताचे व भक्ताचे अपूर्व; शब्दांच्या पलीकडले नाते जुळते-वाढते; मग या उत्कट, खोल, विशाल, भक्तिभावरसात भगवंत व भक्त, एकमेकाहून **वेगळे** राहातच नाहीत. एकच होऊन जातात.

भगवंतावाचून/श्रीगुरूशिवाय, काहीही गोमटे नाही; असा प्राणपणाने, मनाने, वाचेने, बुद्धीने आणि शरीराने भक्ताचा/शिष्याचा निश्चय असतो. एका श्रीगुरू/भगवंतावाचून इतर कोणाची व कशाचीही आशा त्याच्या ठिकाणी नसते. कोणाच्या तोंडाकडे पाहत नाही अशा भक्तांशी देवाचे नाते कसे असते? याचे वर्णन भक्तिशास्त्रकारांनी, सर्व प्रेमळ संतांनी, मोठ्या प्रेमाने व कृतज्ञतेने केले आहे, पण शेवटी या सगळ्यांना "**प्रेम न ये सांगता, बोलता दाविता। अनुभवे चित्ता चित्त जाणे।।**" असंच म्हणून थांबावे लागले आहे. नारदांसारखे भक्ताचार्य पण त्यांनीही "**मूकास्वादनवत्**" म्हणून अखेर मूग गिळले.

भक्ताची दृढ श्रद्धा असते की कांही संकट आले तर मागे-पुढे उभा राहून भगवंत आपले रक्षण करतो. "**मागे पुढे उभा राहे सांभाळीत। आलिया आघात निवाराया।।**" मग आपण कशाला चिंता करावयाची? समर्थ

म्हणतात, "**आपल्या मनोगता कारणें। देवावरी क्रोधासि येणें। ऐसी नव्हेत की लक्षणे। सख्य भक्तीची।।**" भगवंत सर्वसमर्थ आहे, तसाच तो परम कृपाळू आहे. तो जें जें करील ते ते माझ्या परम कल्याणाचेच आहे. हाच भक्ताचा विश्वास.

भक्तीप्रेमभावसेवेत उल्हास, प्रपंचामध्ये साक्षेप; श्रीगुरू/भगवंताबद्दल अखंड प्रेमभाव म्हणून भक्तच खरे-खरे **सोवळे**. मग भय, चिंता, काळजी, उद्वेग यांचा स्पर्शच होत नाही भक्ताला. भक्त सदा आनंदनिर्भर! पण किती? तर "**काळ देहासी आला खाऊं। आम्ही आनंदे नाचूं, गाऊं।।**" हीच भक्ताची प्रतिज्ञा. निष्कामपणे हृदयी श्रीगुरू/भगवंताचे चरण व वदनी त्याचेच मंगल, गोड नाम हीच भक्ताच्या जीवनाची कृतार्थता.

भगवंतपण/श्रीगुरूपण आपले थोरपण विसरून भक्तांची सद्‌वासना तत्काळ पूर्ण करतात. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चारी पुरूषार्थ भक्ताला अर्पण करतो. भक्त **अंकित** असेल तर तेथे देव स्वत: तिष्ठत उभा राहतो; "**न सांगता करी सर्व काम**" अशीच सर्व संतांची/भक्तांची साक्ष आहे.

भक्तिप्रेमाच्या सुख-लालसेनेच तो निर्गुणाचा सगुण, निराकाराचा-साकार होतो. **संत थोर-देव धाकटा** ! भक्त प्रेमाने भगवंतावर, शिष्य-श्रीगुरूंवर हक्क सांगतात, इतकंच काय पण भगवंत हा आमचा ऋणको आहे, आम्ही त्याचे सावकार आहोत म्हणतात. पण भक्तिप्रेमाचे ऋण देतांना त्याचे चरण गहाण ठेवून घेतात. भक्ताने निर्वाण मांडावे. भगवंत कधीच उपेक्षा करणार नाही. "**नुपक्षी कदा राम दासाभिमानी।।**"

* * * *

# चिंतन २००

मुक्ती मनाला मिळते. मनाची उन्मन अवस्था म्हणजे मुक्ती. मनाचे अमनीकरण म्हणजेच मुक्ती. मन कृष्णस्वरूप होणे हीच मुक्ती. मनाला मुक्तता. मनाने मुक्तता. मनाला मनानेच बद्धता. आत्माराम बद्ध नाही. मुक्तपण नाही; तर मग **आत्मा** नित्यमुक्त आहे. सुख-दुःख, बरे-वाईट हा अनुभव/निवड, मनाला, आत्म्याला नाही. तरीही आत्मारामावर त्यांचा आरोप केला जातो. मुक्ती तर त्यांना मिळते; की **ज्यांचे मन** कृष्णस्वरूप झालेले असते. पूर्वजन्मीच्या स्थूल शरिराचा नाश होतो; पण कृष्णस्वरूप झालेला जीव त्याचे अनंत पूर्वजन्मीचे मन सोबत घेऊन नूतन जन्माला येतो.

मनाचे मनपण घालविण्यासाठी त्याला कृष्णकथेत गुंतवून टाकावे. हाच कथेचा हेतू आहे. कृष्णकथा श्रवणाने, मननाने, चिंतनाने, निदिध्यासाने, ज्ञान, वैराग्य यांची सुमाता भक्ती वाढवणारी आहे. भगवतकथा भक्तिप्रेम-भगवतप्रेम-श्रीगुरूप्रेम वाढविणारी आहे. **कृष्णप्रेमा** असा आहे की जगालाही भूल पडते. जाऊ तेथे संसार/प्रपंच (म्हणजे शरीर) आपल्याबरोबरच आहे. हा संसार टाकावयाचा नाही/सोडावयाचा नाही, पण त्याला मनातून मात्र काढून टाकावयाचा. **"मनदल्ली नामामृत तुंबी"** कृष्णकथेत-लीलेत-स्मरणात सगळ्याचाच विसर पडतो.

राजा परीक्षिती म्हणाला, तहान-भूकेने व्याकुळ होऊन मी ऋषींच्या गळ्यात मृतसर्प टाकला. पण आता आपल्या मुखांतून स्त्रवणाऱ्या ह्या अमृतापेक्षा रसाळ असणाऱ्या कृष्णकथेच्या रसपानाने मला तहान-भूक याची दखलच नाही. कृष्णकथा श्रवणात अशी राजासारखी तन्मयता हवी; होय की नाही? ही कथा आनंद देणारी आहे. नाही-नाही तर **आनंदस्वरूप** करणारी आहे. ह्या कथेत सर्व रसांचा सुमधुर समन्वय आहे. श्रीकृष्ण रसराज आहे; रसभोगी आहे; पण रोगी नाही तर **योगयोगेश्वर** आहे. साहित्यात नवरस

आहेत; पण या कृष्णकथेत मात्र या नऊ रसांच्या माथ्यावर मुकुटासमान शोभणारा दहावा असा **भक्तिप्रेमरस** आहे.

इतर सगळेच रस नश्वर, प्रथमत: गोड वाटतात, पण पुढे-पुढे ते रस विटतात किंवा या रसांचा आपल्याला कोणत्या ना कोणत्या एक अथवा अनेक कारणांनी वीट येतो. आपले संत सांगतात "**वीट नाही पांडूरंगी। वाटे अंगी आर्त ते।।**" श्रीज्ञानोबाराय तर प्रतिज्ञापूर्वक सांगतात "**अवीट गे माय, विटेना।**" एक भक्तिप्रेमरस मात्र गोड आहे. अवीट आहे. श्रीकृष्ण हा केवळ "**प्रेमस्वरूप**" आहे. त्याच्या संगतीत-सहवासात-स्मरणात '**मी**' व '**माझेपणा**' उरत नाही. जीवाने या अगाध-अथांग-अमर्याद कृष्णप्रेमभावाने वेडे होऊन जावे. ब्रह्मचिंतन करतां-करता मृत्यू आला तर माणूस मुक्त होतो; आणि भक्तिप्रेमभावाने प्राणप्रिय, प्रियाची परमसीमा असणाऱ्या कृष्णस्वरूपाचे चिंतन करतां-करतां देह पडला तर काय होत? तो महावैष्णव, भगवतभक्त, भागवतोत्तमोत्तम म्हणून, भक्तिप्रेमसुख अनुभवण्यासाठी सतंत्र (म्हणजे जन्म-मरण त्याच्या ताब्यात) अशा हवं तेंव्हा जन्म घेऊ शकतो.

भगवान श्रीकृष्णांनी गृहस्थाश्रम व संन्यासाश्रम यांचा उच्च पातळीवरील समन्वय आपल्या सर्व चरित्रांतून जगासमोर ठेवला. श्रीकृष्णाचे आपल्या १६१०८ पत्नींवर आणि गोपीजनांवर प्रेम होते; पण ते कुणात जरा सुद्धा आसक्त नव्हते. तर पूर्ण निष्काम आणि निर्विकार जेथे विकार व वासना आहेत तेथे भक्तिप्रेम असूच शकत नाही तर मोह असतो. निजधामगमनाच्या वेळी सुद्धा साक्षित्व कायम.

सगळेच्या सगळे महापुरूष श्रीकृष्णलीलेला **निरोधलीला** म्हणतात. मनाचा लय फक्त भगवंतातच/श्रीगुरूस्वरूपातच होऊ शकतो. अन्य कोणत्याही वस्तूत नाही. कारण दृश्य संसार-प्रपंच जड आहे; मन जड नाही तर चेतन आहे. मग मन जड पदार्थांशी कसं एकरूप होणार? होणारच नाही.

उघड्या डोळ्यांनी व उघड्या कानांनी जी समाधी लागते ना? ती खरी समाधी. अर्जुन रणांगणावर युद्ध करत असतांना त्याची समाधी भंगली नाही.

कां तर त्याचे मनच कृष्णस्वरूप झाले होते. मन सज्जन आहे; पण मनाला स्वत:ची सत्ता, आकार, रंग, रूप हे काहीच नाही. मन पाण्यासारखे. अशा मनाला नामाने, प्रभूप्रेमाने, श्रीगुरू निष्ठेने, विश्वासाने वश करावे. अर्जुनाची गोष्ट सोडा, गोपींची समाधी चेतन समाधी. त्यांनी आपल्या उघड्या डोळ्याच्यायोगे आणि उघड्या कानांनी एक श्रीकृष्णच पाहिला, ऐकला; कृष्णध्यानात त्या तन्मय झाल्या. तदाकार झाल्या. ''**यत्र यत्र मनो यति, तत्र तत्र माधव:।।**'' या गोपींना पाहूनच उद्धव विरघळला. समाधी गोपींसारखी **सहज लागली** पाहिजे. गोपी गृहस्थाश्रमी असून **महापरमहंस** होत्या. श्रीकृष्णप्रेमात तन्मय होतात ते परमहंस. परिव्राजकाचार्य, भक्ताचार्य, महाभागवत, महावैष्णव गोपी अशा आहेत. म्हणून मंगलस्नानानंतर गोपी चंदनाचा टिळा भालप्रदेशी विराजमान होतो.

* * * *



## चिंतन २०१

गोकुळात श्रीकृष्ण जन्माची वार्ता हां-हां म्हणता पसरली. त्याच्या दर्शनासाठी गोपी धावू लागल्या. सर्वचजणी आनंदाने वेड्या झाल्या. त्यांचे डोळे, हात, पाय, कान, हृदय इत्यादी सर्वच इंद्रियांना आनंदच होत होता. गोपी आनंदाच्या भरात बेभान झाल्या होत्या. त्यांनी कृष्णाला पाहिला, डोळे भरून पाहिला, कृष्णरुप झाल्या, कृष्णाला कुरवंडी केली, बाळलेणी, आहेर केले.

काय मौज आहे बघा, सर्व गोप (पुरुष) नंदाच्या वाड्यात बाहेरच थांबले आणि गोपी मात्र आत. पुरुष हा अभिमानाचे, अहंकाराचे स्वरूप तर स्त्री ही नम्रतेचे स्वरूप. गोपींसारखी नम्रता हवी. यशोदेने गोपींना विचारले, ''तुम्हाला पुत्रजन्मोत्सवाचे काय देऊ ?'' एक गोपी म्हणाली, ''यशोदे, खरंच द्यायचेच असेल तर मला फक्त हा एक कन्हैयाच दे.'' गोपीला झाला आनंद, बस्स्! फक्त आनंद आणि आनंदच.

नंदाघरी हा ‘‘लाला’’ आला. वाणी, वर्तन व व्यवहार आणि विचारांनी जो सर्वांना सदैव फक्त आनंदच देतो तोच नंद होय. आनंददान हे सर्वोत्तम दान होय. नंदबाबा सदासर्वदा आनंदात आणि आनंद होऊन रहात होते आणि दुसऱ्यांनाही आनंद देत होते. जिथे आनंद तेथेत परमानंद-नंदलाल !!!

कान्हा प्रकट झाला मथुरेत आणि काय गंमत बघा, नंदोत्सव झाला गोकुळात. आपणसुद्धा रोज नंदोत्सव केला पाहिजे. केव्हा ??? तर रोज प्रात:काळी चार ते साडेपाच पर्यंत. उत् म्हणजे ईश्वर, सव म्हणजे प्राकट्य. ईश्वराचे प्राकट्य म्हणजेच उत्सव. देहभावाचा विसर पडला तरच खरा उत्सव आणि या अशा उत्सवांत धन नव्हे तर मनाचीच प्रधानता. लौकिक नाही तर नितांत भक्तिप्रेमाची गरज. आपले शरीर हीच मथुरा आणि हृदयाला गोकुळ करावे. गोकुळातील गोपी साते (म्हणजे बाजारला) निघाल्या तरीपण ‘‘गोविंदू घ्या, कोणी दामोदरु घ्या गे’’ म्हणावयाच्या आणि मथुरावासीनी त्यांना हसावयाच्या. गोपांगना देहभावरहित आणि मथुरावासीनी देहतादात्म्यात. मग हसणारच ना ??? !!!

मथुरेत वास नसावा, गोकुळवासी व्हावं, असावं. होय की नाही ? गो नाम इंद्रिय. गोकुळ म्हणजे या इंद्रियांचा समुदाय. ‘‘गो’’ शब्दाचे अनेक अर्थ आहेत, इंद्रिये, भक्ती, गाय, उपनिषद इत्यादी. आपल्या प्रत्येक इंद्रियाकडून भक्ती झाली पाहिजे म्हणजे मग आपले हृदयच गोकुळ बनते आणि नंदोत्सव गोकुळातच, मथुरेत नाही.

गोपी जेव्हा कृष्णाच्या स्वरुपाचे वर्णन करीत असत, तेव्हा त्या देहभान विसरत; मग कृष्णदर्शन झाल्यावर काय बात ??? कृष्णदर्शनाशिवाय, भेटीशिवाय, त्यांना चैनच पडत नसे. या समस्त गोपी भक्तीमार्गाच्या आचार्या. भक्ती काय आहे हे गोपींनीच भक्ती करून दाखविले आहे. भक्ती करावयाची तर त्या आनंदघनाच्या अंगप्रत्यंगाचेही चिंतन करावयास हवे. भक्तीच्या विविध तरल छटा सांगताना भक्तीशास्त्रकारांनीसुद्धा ‘‘स्वरूपासक्ती’’ सांगितली आहे. या स्वरूपात, स्वरूपाच्या चिंतनात सगळ्या जगाचा विसर पडतो.

आमचे गोत्रप्रमुख गर्गमहामुनी जेव्हा गोकुळात या बालकांचे नामकरण करण्यासाठी आले नां ? तेव्हा काय म्हणाले माहित आहे ? ते म्हणाले, ''नारायण श्रीकृष्णासारखा आहे.'' नारायणासारखा कृष्ण आहे असं म्हणाले नाहीत तसं तर श्रीकृष्ण व नारायण यांच्यात तत्त्वत: काहीच अंतर नाही हं !!! वेद-पुराण ग्रंथांनी नारायणात साठ तर श्रीकृष्णांत चौसष्ट गुण वर्णिले आहेत.

आता श्रीकृष्णांत जे चार गुण एकापेक्षा एक अधिक आहेत ते कोणते ? म्हणाल तर (१) रूपमाधुरी (२) लीलामाधुरी (३) वेणुमाधुरी आणि (४) प्रियामाधुरी. चार हाताचा नारायण काहीसा बेढप भासतो; पण दोन हाताचा कृष्ण सर्वांगसुंदर. कोणतही, कुणाचही गुटगुटीत बाळ पाहिलं की म्हणतात, ''कसा कृष्णासारखा आहे.'' बरोबर ना ??? !!!

आपल्या या कृष्णात उगीचच ऐट, बडेजाव, आढ्यता नाही. तो सर्वांशी बोलतो, खेळतो, फिरतो, खातो, पितो. मग सर्वांचाच लाडका; सर्वांनाच हवा-हवासा वाटणारा. गोपाळाच्या मुखातील अंबटढाण ताकाचा घोटसुद्धा अमृतापेक्षा गोड करून प्राशन करणारा असा भक्तजनवल्लभ. मग असा हा आपला श्रीकृष्ण-नंदानंद का बर प्रियाची परमसीमा असणार नाही ??? खरं ना ??? तो प्रिय, त्याचे नाम प्रिय, त्याचे सर्व काही प्रियच.

* * * *




भगवंताचे व भक्ताचे जे नाते आहे ते या विश्वातील सर्वश्रेष्ठ नाते आहे. या नात्यात भक्तीप्रेम ही एकच वस्तू मागण्यात येते. हे भक्तीप्रेम नाहीसे होणार नाही ना ? ही एकच भीती या नात्यात असते. भक्तीप्रेम विरहाचे (क्षणभरसुद्धा) दु:ख हे एकच दु:ख या नात्यात असते. परमप्रेमास्पद, प्रियाची परमसीमा असणाऱ्या भगवंताला एका भक्तीप्रेमाखेरीज दुसरे काहीच लागत

नाही. लागलेच तर केवळ भक्तीप्रेमाच्या निदर्शक/खूण म्हणून लागतात. भक्तीप्रेमाचा हेतू किंवा शर्त/अट म्हणून लागत नाहीत.

हा भक्तीप्रेमभाव स्वभावत: अगदी स्वयंभू आहे. कारण आत्मारामाचा तो एक गूढरम्य स्थायीभाव आहे. भगवंत आणि भक्त यांच्यामध्ये परस्परांविषयी एकतेची, एकाकारतेची संवेदना असते आणि याच संवेदनेतून भक्तीप्रेमाचा उगम होतो. एकरुप असूनही आपण एकमेकांपासून वेगळे आहोत अशी कल्पना हे परस्परात करू शकतात !!! कशासाठी, तर केवळ भक्तीप्रेमसुखानुभवासाठीच.

स्वयंभू, निर्हेतूक आनंद, भक्त आणि भगवंत, शिष्य आणि श्रीसद्‌गुरू अनुभवत असतात. या **अपूर्व** नात्यात आरंभापासून अगदी शेवटपर्यंत एकमेव भक्तिप्रेम हेच साध्य असते. भक्त आणि भगवंत या दोघांना (दिसायला दोन पण असायला एकच) अपूर्व असे समाधान असते. या भक्तिप्रेमभावात भक्ताला भक्तिप्रेमविषय भगवंत आपल्या सतत हातात असावा, राहावा अशीच एक इच्छा असते. हे स्वयंभू भक्तिप्रेम पूर्णतेस गेले म्हणजे मग भक्त येवढेच मागणे मागतो की, ''माझी भक्ति केंव्हाहि न संपो; केंव्हाहि जरा सुद्धा कमी न होवो.'' मग हा स्वर्ग मागत नाही; मोक्ष मागत नाही, जन्मापासून सुटका मागत नाही; उलट ''**घेईन मी जन्म याजसाठी देवा। तुझी चरणसेवा साधावया ।।**'' अशी प्रतिज्ञा करून, भक्तिप्रेमसुखाठीच पुन: पुन: जन्म घेतो.

भक्तिप्रेम हा एक अत्यंत उत्कट आणि तितकाच पवित्र सर्वांगसुंदर, नितांत रम्य असा भाव आहे. विचार आहे. नित्यता व तीव्रता, या दोन गोष्टी या भावात अत्यंत गरजेच्या, या भावाला पुष्ट करणाऱ्या; जोपासणाऱ्या. हा भक्तिप्रेमभाव स्वभावज व स्वयंजात आहे. भगवंत आणि भक्त/श्रीसद्‌गुरू आणि शिष्य यांच्यात एकरूप होण्याची धडपड जेंव्हा पराकोटीस पोहोचते, तेंव्हा तळमळीच्या दृष्टीने **एकता** शिगेला पोचते व या एकरूपतेने पराकोटीचा आनंद अनुभवावयास येतो.

भक्तिप्रेम हे सुद्धा सगुण-साकाराच्या अनुभवासाठी आसुसलेले असते. अगदी हपापलेले असते असे म्हटले तरी काहीच हरकत नाही; आणि अशा

भक्ताला भगवंताचे/श्रीगुरूंचे नित्य दर्शन घडत असते; सहवास, सेवा, लाभत असतेच. भगवंताचा/श्रीगुरूंचा स्पर्श भक्ताला नित्य लाभत असतो. भगवंताच्या आनंदात तो नित्य डुंबत असतो. भक्तिप्रेम हे आनंदाच्या शोधात/बोधात रमणारे निरागस बालक आहे आणि या भक्तिप्रेमभावात भक्ताला सर्वश्रेष्ठ आनंद हमखास सापडतोच.

**भक्तिप्रेम** हे ज्या सत्यज्ञानानंद अशा तत्वाचे मानवी प्रतीक आहे. भगवंत व भक्त, श्रीसद्गुरू व शिष्य यांच्यामध्ये हे अभूतपूर्व **नाते** प्रस्थापित होते तेंव्हा भक्तिप्रेमभावाच्या सर्व स्वाभाविक प्रेरणा **दिव्य** रूप धारण करतात. ज्या विकसित होतात, उन्नत होतात, विशाल होतात, व्यापक होतात या प्रेरणात मग मालिन्य, विकार, अमांगल्य अजिबात उरतच नाही.

या एका भक्तिप्रेमाच्या आनंदातूनच पूर्ण, शाश्वत खरे अंतरिक समाधान लाभते, या आनंदातूनच आपले जीवन आकाराला येते. हा आनंद म्हणजे ईश्वरी जीवनाचा आनंद. या **आनंदातील** भक्तिप्रेमभाव सर्वदा निरपेक्ष व पूर्ण असतो; शाश्वत असतो. त्यात कसलीहि यत्किंचित भेसळ नसते.

या भक्तिप्रेममार्गाने, आपल्या भक्तिभावाची परिपूर्ती प्रेममय भगवंताच्या दिव्य आनंद समाधीत होते. आपल्या भावाला भगवंत/श्रीगुरू हे सुरक्षित धाम मिळते की जेथे **भय** नाही; शंका नाही आणि हे धाम अव्यंग, आनंदधाम असते.

* * * *




भगवंताच्या भेटीसाठी जो प्रयत्न केला जात असतो, तो भगवंताचे व जीवाचे पूर्ण ऐक्य व्हावे यासाठीच केला जात असतो. या पूर्ण ऐक्यात भगवंत आणि आपण यांचे वेगळेपण, व्यक्तित्व पूर्णपणे नष्ट होतात. पूजा करणारा आणि पूजा घेणारा दोन्ही वेगळ्या रूपाने शिल्लक राहात नाहीत. मग काय

राहते? तर राहातो तो फक्त ऐक्याचा, अद्वैताचा, अनंततेचा अनुभव आणि याच अखंड अनुभवाचा अखंडानंद.

प्रथमत: भगवंताचे/श्रीगुरूचे सान्निध्य जेंव्हा आपल्याला भासते, लाभते, तेंव्हा ते आपल्यातील मर्यादित व्यक्तित्वाला, अनंताचा स्पर्श या स्वरूपात भासते आणि यावेळी आपले संकुचित व्यक्तित्व या स्पर्शाला, दिव्य स्पर्शाला जो प्रतिसाद देते, तो या सच्चिदानंदाच्या विषयी **भक्तिप्रेमभावाचाच** प्रतिसाद देणारे असते. या प्रतिसादातून अनिर्वचनीय अशा परमप्रेमास्पद भगवंताची जवळीक अतिशय हळुवारपणे जाणवू लागते व उत्तरोत्तर ही जाणीव स्थिर होते.

अशा जाणीवेतून मग भक्त, भगवंत आणि भक्तिप्रेम आनंदातिशयाच्या अनुभवात विसरले जातात. पण हे विसरणे ऐक्याच्या पोटी असते. भक्ताचे भगवंताशी, शिष्याचे श्रीगुरूशी भक्तिप्रेमाने घडणारे ऐक्य, एकरूपता, समरसता अनिवार्यपणे याच स्वानंदमहोदाधी स्वरूपाचे असते. भगवंत आणि भक्त, श्रीगुरू आणि शिष्य यांजमध्ये जी अनेक **अध्यात्मिक** नाती व त्यांचे नाना प्रकारचे अनुभव संभवतात, त्या सर्व नात्यांचा व अनुभवांचा कळस म्हणजेच भक्तिप्रेमाने घडणारे भक्त व भगवंत, शिष्य व गुरू यांचे **आनंदमय** ऐक्य.

**निर्व्यक्तिक** भगवंताच्या मागे लागण्याने दिव्य भक्तिप्रेमभावाचा विविध प्रकारचा अनुभव आणि भगवंताच्या **अतिसलगीचा,** जवळिकेचा अनुभव मिळू शकत नाही. अशा अतिसलगीच्या अनुभवासाठी तो अनंत परमात्मा, आमच्या सन्निध, अति निकट असणारा, **व्यक्तिरूपाने** आमच्या व्यक्तित्वाला भेटणारा, आपण यथाविधी-यथासांग भक्तिप्रेमाने त्याची पूजा करू शकू असा भगवंत पाहिजे/श्रीगुरू झाला पाहिजे.

व्यक्तिरूप भगवंताच्या पूजेपासून प्रारंभ करून, हा भक्तिमार्ग वाढत-चढत जातो. भगवंत हा उत्तम पुरूष आहे, केवळ भावनात्मक अवास्तविक अस्तित्व नव्हे आणि या वास्तविक अस्तित्वाच्या जाणिवेतून भक्तिमार्ग रूंदावत जातो आणि शेवटी शुद्ध प्रेमस्वरूप-भक्तिप्रेमस्वरूप रूप घेतो.

या गोड रूपाच्या द्वारा भक्त भगवंताला आपल्या हृदयात साठवतो. याच रूपाने भगवंत भक्ताच्या सन्निध राहतो. हे सान्निध्य अगदी निकटचे व अतिमधुर व्हावयाचे तर भक्ताला, भगवंत प्राणमय, मानसिक दिव्य अशा व्यक्तीशरीरात दिसावा लागतो, भेटावा लागतो, मिळावा लागतो.

आपल्या आत, आपल्या प्रियाची परिसीमा असणाऱ्या प्रियभगवंताची सचेतन मूर्ती आपल्या अंतर्दृष्टीला सतत दिसत राहीली पाहिजे/पाहता आली पाहिजे. आपण या प्राणाहून प्रिय असणाऱ्या भगवंताचा राजवाडा बनले पाहिजे. या राजवाड्यातील नितांत सुंदर भव्य दिव्य अशा हृदयाच्या महालात राहून भगवंताने आपल्या स्वरूपाचे माधुर्य ओतप्रोत भरले आहे, आपल्या मनाच्या व जीवनाच्या सर्व व्यवहारात तो आमचा मालक, मित्र, सखा म्हणून भरून राहिला आहे असे आपल्याला सतत अनुभवता आले पाहिजे. आपल्या आंत-बाहेर, आपण भगवंताशी नेहमीच सलगीचे, हळुवार नाते ठेवले पाहिजे आणि या नितांत प्रेमळ-शुद्धभक्तीप्रेममय सलगीचा आनंद आपण अगदी अखंडपणे अनुभवावयास हवा.

आपले विचार, उर्मी, भावना, कृती आपण त्यालाच अर्पण कराव्यात. याने काय होते? तर आपली इच्छाशक्ती, सामर्थ्य, आपला प्रकाश व ज्ञान, आपले भक्तीप्रेम व आनंद यात अधिकाधिक भर पडेल. आपले आंतर जीवन भगवंमय होऊ लागेल. आपल्याला सर्व घटनात आपल्या प्रिय भगवंताचा **चिदानंदाचा** हात दिसू लागेल. भगवंताचा हस्त-स्पर्श हा किमयागार आहे. तो आपल्या साऱ्या जीवनातच अद्‌भुत रूपांतर घडवून आणतो. मग दुःख हा सुद्धा ईश्वराचाच स्पर्श आहे अशी मानसिकता दृढ होते. अशा भावनेने सर्व दुःखाचे दुःखपण जाऊन त्याचे सुखातच रूपांतर होते.

भगवंताशी, **आनंदकंद नंदनंदनाशी** पूर्ण ऐक्य झाले, म्हणजे त्याच्या विश्वव्यापक आनंदाची दुःखरूप आवरणे त्या आधारभूत आनंदाला झाकू शकत नाहीत. ती सगळी आनंदाचीच आवरणे (दुःखासहित) स्वतःच आनंदरूप होतात.

* * * *

# चिंतन २०४

भगवंताची प्रेमभक्ति एकाच तत्वाची व स्वरूपाची असूनहि लौकिक दृष्टीने तिची अकरा प्रकारांनी अभिव्यक्ती होत असते. त्या सगळ्या प्रकारात परमविरहासक्ति हा एक अत्यंत श्रेष्ठ प्रकार. पराभक्तीच्या प्रकर्षाने प्रकट होणाऱ्या, आणि अखिल जीवन व्यापणाऱ्या, त्याचबरोबर अत्यंत स्थिर अशा प्रत्ययकारी महाभावाला नारदांनी जाणीवपूर्वक एक विशेषण योजले आहे. ते म्हणजे "**आसक्ति**" होय.

"**सक्त**" म्हणजे जोडले जाणे; वज्रलेप होणे; यावरून आसक्ति म्हणजे "आपल्या आवडत्या विषयाबद्दल मनास वाटणारी अनिवार्य ओढ" आणि या "**दिव्य**" ओढीमुळेच मनुष्य त्या विषयाशी, विचारांनी व भावनांनी आणि त्यामुळे कृतीनेही आसक्त होतो. प्रत्येकाचा आवडता विषय वेगळा-वेगळा असतो.

अनन्य भक्ताचा "**हरि**" हाच आवडता विषय असतो. शिष्याला एका श्रीगुरूचीच आवड! मग त्यापुढे भगवंतही कमीच. असा आसक्त भक्त भगवंताशी/श्रीकृष्णाशी/श्रीहरीशी अतूटपणे जोडला जातो. त्यामुळे तो श्रीगुरू/श्रीहरिचिंतनावाचून अर्धक्षणसुद्धा राहू शकत नाही.

सामान्यपणे वाईट गोष्टींची सवय दर्शवण्यासाठी "**आसक्ति**" हा शब्द व्यवहारात योजला जातो. जसे धनासक्ति, सत्तासक्ति, व्यसनासक्ति, द्युतासक्ति इत्यादि. अशा आसक्त माणसाला आपल्या आवडीच्या विषयाबद्दल अनिवार्य, आत्यंतिक ओढ असते. परीपूर्तीसाठी तो वाटेल तेवढे कष्ट, साहस करतो.

परंतु जेंव्हा भगवंत/श्रीगुरू हाच एकमात्र आवडीचा विषय होतो व परमप्रेमभक्तीने ओथंबलेली अत्युत्कट भावधारा हृदयात सतत उचंबळते तेंव्हा तिला मान्यप्रद "**भक्ती**" असे म्हणतात.

भगवंताच्या/श्रीगुरूंच्या ठिकाणी चित्त आसक्त होणे, ही प्रशंसनीय गोष्ट आहे, लज्जास्पद नाही; भक्तीप्रेमाची अत्युच्च कोटी आहे. दृढनिष्ठता, क्रियाशीलता, तडफ, उत्साह, एकाग्रता, यत्नशीलता, अखंड स्मृती, **अनुसंधान** हेच ''**आसक्ति**'' शब्दामागील प्रयोजन आहे. विसर कसा चालेल. ''**भोजना मागती तूप पावशेर। पडिला विसर स्वप्नामाजी।।**'' श्रीगुरूंनी मागितले आणि विसर पडला, केवढी दु:खाची बाब!

अशा अखंड भक्तिसाधनेने ब्राह्मीभाव प्राप्त झाल्यावर, ज्ञानी पुरूष, सर्वात्मभावात असतो. त्याच परमोच्च शिखर अवस्थेत भक्त भक्तियोगाने आरूढ असतो. श्रीरामकृष्ण म्हणत, ''**आई, मला निर्विकल्प समाधीचा निश्चेष्टपणा नको, मला तुझ्या सृष्टीत मुक्तपणे नाचू दे, गाऊ, भजन–पूजन करू दे, तुझ्या अंगावर लोळून अमृतपान करू दे.**''

भगवंताच्या/आनंदकंदाच्या दिशेकडे वाहणारी एकाग्र, उत्कट, परमपवित्र **प्रेमभावना** म्हणजेच **भक्ती** होय. अशी सुसंस्कारीत भक्ती ही सर्वदा एकाच स्वरूपाची व एकजिनसी असते. तथापि भक्ता–भक्तांच्या प्रकृतिधर्माप्रमाणे त्यांच्या त्यांच्या उपासनाक्रमात प्रतिभिन्नता होते. मात्र आपापल्या **दृढभावाने प्रगती** करीत भक्त अनन्यभाव होऊन भगवंताशी एकरूप होतो, तृप्त होतो, सिद्ध होतो. पण याहीनंतर तो काही **विशिष्ट स्नेहसंबंध, नाते** स्वीकारून भगवंताशी/श्रीगुरूंशी, आमरण अतूटपणे अखंड अनुसंधान राखतो. अशा विविध स्नेहभावामुळे एका भक्तीभावाचे अकरा प्रकार नारदांनी केले.

या अकरा प्रकारात ''**परमविरहासक्ति**'' हा महाश्रेष्ठ भाव. हा भाव सर्व–अवस्थातीत, अगदी स्वतंत्र, कोणत्याही तर्क, उपपत्तीच्या चौकटीत न बसणारा असा अत्यद्भुत आहे.

कल्पनाशक्तीलाही कुंठीत करणाऱ्या या सर्वदा रहस्यमय, पण नितांतरम्य, श्रेष्ठ अशा भावानुभवात श्रीशंकराचार्य, श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज विहार करतात. श्रीचैतन्यमहाप्रभू हे तर या भावात दीर्घ–प्रदीर्घ काळ राहिले.

तीच गोष्ट संत मीराबाईंची, जनाबाईंची. श्रीरामकृष्णपरमहंस या अवस्थेत खूपच रमून जात. अशा वेळी राकृष्णांची होणारी अनाकलनीय स्थिती योगी, पंडित, चिकित्सक, वैद्य, डॉक्टर यांनी पाहिली.

या सगळ्यांनी व स्वत: रामकृष्णांनी याबद्दल माहिती दिली आहे. या अवस्थेत त्यांचे अंग एवढे उष्ण होई की त्यांच्या समीप गेले तरी प्रचंड दाहक झळा लागत. त्यांची कांती मुशीत आटत असलेल्या तप्त सोन्याप्रमाणे होई. ही परम विरहभावावस्था आहे. परमविरहभाव आहे. त्यातून स्मरणाची तीव्रता, आठवणीची धार वाढतच असते.

* * * *




नारदांनी सांगितले, "**त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी, भक्तिरेव गरीयसी।**" परमप्रेमस्वरूपा भक्तीच श्रेष्ठ आहे असा अंतिम सत्याचा तीन अंगांनी आणि एकमुखी निर्णय आहे. त्रिसत्य म्हणजे तीन सत्ये नाहीत तर त्रिवार सत्य. वास्तविक सत्य हे एकच-एक असते. सत्य हे एकसंध असते. त्याचे तीन-तेरा; नऊ बारा असे तुकडे होतच नाहीत. सत्य हे शाश्वत, अ-विकारी आणि अबाधित असते. भगवंत आणि त्याची परमप्रेमस्वरूपा भक्ती ही एकमेकापासून वेगळी नाहीत. म्हणून परमप्रेमभक्तीस्वरूप आनंदघन भगवंतच फक्त सत्य आहे.

त्रिसत्य याचा आणखी अर्थ असा - "त्रिकालातीत सत्याची तीन कसोट्यांतून तपासणी, छाननी करणे. कालचक्र एकचएक असताना आपण मात्र भूत, वर्तमान, भविष्य असे तीन व्यावहारिक भेद करतो. भगवद्भक्ताची, अनन्य एकविध भक्ताची जन्ममरणयात्रा संपलेली असल्याने "भविष्यकाळ" आणि संचित कर्माचे पाश तुटलेले असल्याने "भूतकाळ" नष्ट झालेला

असतो. आता जो काय उरतो तो फक्त "वर्तमानकाळ". या कालखंडात भक्त सदैव जागृत राहून अव्यावृत भजनाच्या/भगवद्स्मरणाच्या/सेवेच्या अवीट आनंदात सदैव मग्न असतो. या काळात तो अखंड, अंतर्बाह्य श्रीहरि-श्रीगुरु यांचा संपर्क/आनंद अनुभवित असताना "**लोकसंग्रह**" करतो. या चिन्मय आनंदावस्थेत "**भक्तिः एक गरीयसी**" अशा एकाच परमसत्याचा आनंदकारी प्रत्यय अविच्छिन्नपणे घेत असतो.

हा भगवद्भक्त आपली "**अखिल आचरता**" श्रीपांडूरंगचरणी समर्पित करतो. या भूमिकेनंतरही जो काही क्रिया-व्यवहार-व्यापार होत असतो त्याचा कर्म-हेतू, क्रिया-कर्तृत्व आणि कर्मफळे ही सुद्धा हरिचरणी, श्रीगुरुचरणी अर्पण करून "**इदं न मम**" म्हणत त्या आनंदघनाच्या सतत अनुसंधानात राहतो.

जागृत-स्वप्न-सुषुप्ती या तीन अवस्थांचा अनुभव आपल्या जीवनात प्रत्येकजण घेतच असतो. जेव्हा एका अवस्थेचा अनुभव घेतो तेव्हा दुसऱ्या दोन अवस्था तेथे नसतात. पण या तीन्ही अवस्थांच्या अतीत अशा श्रीहरीची प्राप्ती झाल्यावर, सर्व मिथ्याभासच अदृष्य होतो. आपले श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज सांगताहेत, "**जागृती-स्वप्न-सुषुप्ति नाठवे।**" मग काय आहे ? तर "**पाहता रूप आनंदी आनंद साठवे।।**" मग हा भक्त तीन्ही अवस्थांचा साक्षी होतो. भगवंताच्या सत्तेची, चैतन्याची, आनंदाची अखंड प्रचीती घेता येण्याची अखंड जागरित स्थिती त्याला प्राप्त होते. अध्यात्मिक अनुभवाची ही सर्वोच्च अवस्था "**भक्तीप्रेमभावाने**" सुलभतया साधता येते. म्हणून तर नारद "**भक्तिः एक गरीयसी**' असा ठाम सिद्धांत सांगतात.

ही झाली सिद्धभक्ताची/सिद्धभक्तीची गोष्ट. परंतु भक्ति अगदी प्राथमिक अवस्थेत असतानाही, अध्यात्मीक प्रगती योग्य दिशेने व वेगाने होण्यास "निर्मळ भक्ती" हेच श्रेष्ठ साधन आहे असे अगदी ठामपणे श्रीशंकराचार्य सांगतात, "**मोक्षकारण सामग्र्यां भक्तिः एव गरीयसी।।**"

साध्यभक्तीचा पूर्ण विकास झाल्यामुळे, विकसित झालेल्या भक्तीमुळे तो

भक्तसुद्धा मोठा होतो, धन्य होतो. ज्याच्या अंत:करणात एकमात्र **हरिभक्तीच** केवळ चिरस्थायी झालेली आहे, ज्याचे अंत:करण अशा प्रेमस्वरूप भक्तीभावाने प्रेममयच झालेले आहे, तो भक्त निर्धन असला तरी अखिल त्रिभुवनांत धन्य-धन्य असतो.

फार काय, पण अशा परमभक्ताच्या प्रेमासाठी जगदीश्वर वैकुंठनाथ असा श्रीहरि/लक्ष्मीनाथ आपले नित्य निवासस्थान जे वैकुंठ, ते सोडून, जणू काय भक्तीप्रेमसूत्राने ओढला जाऊन या भूलोकी अशा अकिंचन भक्ताच्या हृदयात प्रवेश करतो आणि मग तेथेच वास करतो. कायमस्वरूपी !!! आपले श्रीतुकाराम महाराज काय म्हणतात पहा ना, ''**प्रेम सूत्र दोरी। नेते तिकडे जातो हरि।।**'' संत पण ग्वाही देऊन सांगत आहेत, ''**या सुखाकारणे देव लाचावला। वैकुंठ सोडूनि भक्ताघरी राहिला।।**''.

भगवान् उद्धवाला सांगताहेत, ''उद्धवा, व्रजांगनांचे चित्त माझ्या ठिकाणी निर्मळ प्रेमभक्तीभावाने एवढे दृढपणे जडले आहे, एवढेच नाहीतर अरे, भाव-भावना व प्राणसुद्धा जणुकाय माझ्यातच अडकले आहेत !!! माझ्यामध्ये त्यांचा नित्य तन्मयभाव आहे. त्यासाठी त्यांनी सगळे धर्म, फार काय तर स्वदेहप्रेमसुद्धा मलाच समर्पित केले आहे. अरे, जडदेहाने त्या जरी व्रजदेशात असल्या तरी अंत:करणाने सदैव माझ्याच चैतन्यात/आनंदात सामरस्य पावल्या आहेत.''

अशा ह्या तन्मय, तदाकार, तल्लीन, तद्रूप भक्तांचे, भरण, पोषण, रक्षण, मीच करतो, सर्वथा, सर्वतोपरी त्यांना सांभाळतो, असे भगवंताचे आश्वासन आहे. आपण फक्त त्याचे असे भक्त होऊन रहावे !!!

* * * *

# चिंतन २०६

नारद आपणा सर्वांना ज्ञात आहेत; नाही का ? पण नारद या नामात काय छान अर्थ आहे बघा ना !!! तर ''नारं'' म्हणजे भगवंतविषयक ज्ञान आणि ''द'' ददाति यः इति नारदः। म्हणून अर्थ काय झाला बघा, ''जो परमात्मविषयक समग्र ज्ञान, काही हातचे न राखता, मुक्तपणे सर्वांना देऊन टाकतो तो **नारद**'' काय छान अर्थ आहे ना ???

श्रेष्ठांमध्ये वरिष्ठ किंवा वरिष्ठांमध्येसुद्धा सर्वश्रेष्ठ, त्याला ''श्रेष्ठ'' असं म्हणतात आणि ही श्रेष्ठता श्रेष्ठ अशा पराभक्तीने लाभते. या श्रेष्ठ अशा लाभानंतर भक्ताला/उपासकाला/साधकाला अधिक काहीही जाणावयाचे, मिळवावयाचे उरत नाही, त्याचबरोबर शोक, भीती, दुःख यातून कायमची सुटका होते.

मात्र यासाठी भक्ताने या भक्तीमार्गातील सर्व साधने, स्वाध्याय, उपाय, सेवा व तप करारीपणे करावयास हवे आणि या सर्वांतून सर्वश्रेष्ठ-वरिष्ठ अशी अखंडपणे श्रीगुरु/आनंदघन श्रीहरीशी अव्याहत साधणारी पराभक्ती आपल्या हृदयांत स्थिर करावयास हवी.

''**भक्ती**'' ही ''शिव-अनुशासनम्'' आहे. ''**शिव**'' याचे दोन अर्थ प्रचलित आहेत. शिव म्हणजे मंगल, पवित्र, हितकारक यावरून वरील पदाचा अर्थ ''अखिल मानवांचे परमकल्याण, आत्मोद्धार करणारे परममंगल भक्तिशास्त्र'' असा होतो. त्यामुळे ही भक्ती संपादन करणाऱ्यास अर्थातच, परमात्मप्राप्ती, पराशांती व मुक्तीवरील श्रेष्ठ असे भक्तिप्रेमसुखसर्वस्व यांचा लाभ होतो.

तसेच शिव या पदाचा दुसरा अर्थ-शिव म्हणजे शंकर. ''**अनुशासन**'' म्हणजे सूत्र-दर्शन. म्हणून ''शिव-अनुशासन'' म्हणजे भगवान शंकरांच्या

आज्ञेने रचलेले भक्ति-शास्त्र-सूत्र-दर्शन. सर्व शास्त्रे, विद्या व कला यांचे प्रकाशक म्हणजे आदिनाथ शंकर हेच आहेत. श्रीगुरू ज्ञानेश्वर महाराज **आपली** गुरूपरंपरा सांगताना म्हणतात, "**ना आदिगुरू शंकरा। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसारा। जाला जो आमुते।।**"

परंतु कडव्या, एका टोकाच्या वैष्णवांना मात्र शिवस्थान कनिष्ठ वाटते. श्रीविष्णुच आदिदेव आहेत असा त्यांचा दुराग्रह आणि भक्तियोग तर श्रीविष्णूचे हृदयच आहे. अशा आग्रही नाही-नाही तर दुराग्रही वैष्णवांना श्रीशुकमहामुनिंसारखे श्रेष्ठ वैष्णव स्वानुभवाने सांगताहेत, "**यथा शिवमयो विष्णु: एवं विष्णुमय: शिव:। यथान्तरं न भेद: स्यु: शिवकेशवयो: तथा।।**" मात्र ब्रह्मदेवाचे मानसपुत्र श्रीनारद यांचं म्हणणं आहे की हे श्रेष्ठ भक्तिशास्त्र श्रीशंकरांनी प्रथम प्रसृत केले.

अशा सर्व श्रेष्ठ भक्तिशास्त्रावर अढळ विश्वास आणि अतूट श्रद्धा हवी, विश्वास व श्रद्धा हे शब्द व्यवहारात समानार्थक मानले जात असले तरी अध्यात्म शास्त्राच्या दृष्टीने त्यांत सूक्ष्म अंतर आहे पहा.

आता विश्वास म्हणजे काय? तर एखादा विषय नीट समजावून घेतल्यावर, साधक त्याचे यथाशक्ती आचरण करण्याचा प्रयत्न करतात. आपण या मार्गाचे परिपालन करू शकू, अंतिम ध्येय गाठूच गाठू असा त्यांना "**विश्वास**" वाटतो. नंतर श्रवण, अभ्यास, मनन, तप, पूजा, नामस्मरण, ध्यान, प्रार्थना आदीमुळे प्रगती होऊन त्यास "**आत्मविश्वास**" वाटू लागतो.

आता श्रद्धा काय? तर प्रत्येक माणसाचे जीवन काही विशिष्ट ध्येयावर, मार्गावर, जीवनमूल्यांवर आधारलेले असते. याच दृढ निष्ठेस "श्रद्धा" असे म्हणतात. ज्याच्या-त्याच्या श्रद्धेनुसार प्रत्येकाचे सर्व व्यवहार घडतात. चित्तात विश्वास निर्माण होतो ही पहिली पायरी आणि त्यातून ओढ वाटून चित्तात **श्रद्धाभाव** निर्माण होणे ही नंतरची पायरी.

मानसशास्त्रदृष्ट्या विश्वास हा मनुष्याच्या बुद्धिनिष्ठेचे लक्षण आहे, विचार, मनन, चिंतन व सत्यशोधन हे त्याचे क्षेत्र आहे. तर अंत:करणाच्या

सर्व भावना, प्रेरणा, आचार व कृती म्हणजे श्रद्धामार्गाचा कार्यविस्तार आहे.

सारभाग काय? तर विश्वास अणि श्रद्धा जेंव्हा एक होतात (आणि व्हावयासच पाहिजेत) तेंव्हा, श्रीगुरू-शिष्य, देव-भक्त एक होतात. अशी देव-भक्तांना एकरूप करणारी श्रीहरिभक्ती श्रेष्ठ आहे.

* * * *




कोणताही कार्यक्रम/कार्य हाती घेण्याच्या आधी ''यात आपला काय लाभ आहे?'' याचा मनुष्य प्रथम विचार करीत असतो. शहाणा करेल यात नवल ते काय? पण अगदी महामुर्खसुद्धा हा विचार करतो. ''मला काय मिळणार?'' ''**प्रयोजनम् अनुद्दिष्य न मंदः अपि प्रवर्तते**.'' मग या भक्तिप्रेमामुळे, त्याच्या अभ्यासाने, मननाने व प्रत्यक्ष आचरणाने भक्तास काय मिळेल? तर भक्तिशास्त्राकार अस सांगतात की तो उपासक/साधक ''**परम भक्तिमान्**'' होईल.

यावरून असे अनुमान निघते की, ''**परमप्रेमभक्ति**'' ही अमोल व अलभ्य आहे. या त्रिभुवनातील धन, सुख, ऐश्वर्य, सत्ता यांपेक्षा ही ''**भक्ती**'' अधिक मोलाची, अधिक दुर्लभ आहे. अशी हरिभक्ती आणि श्रीहरि यांचा संबंध **प्रकाश व प्रदीप (ज्योती)** यांच्याप्रमाणे एकजातीय अभेदस्वरूप असतो आणि ही अलभ्य हरिभक्ती मिळवून भक्त हा भगवंताचाच/श्रीगुरूंचाच **(श्रीगुरूंचाच)** स्फुलिंग होत असतो. अव्यक्त, अगाध, अनंत, अविनाशी भगवंत आणि व्यक्त, अल्पमती, मर्त्य मानव यांची सांगड घालून देण्याचे अचिंत्य कार्य ही परमप्रेमस्वरूपा निष्कामभक्तीच करू शकते.

भक्तिप्रेमाशिवाय अन्य सर्व दुर्बोधज्ञान, कठीण मार्ग, दीर्घ कालावधी

लागणाऱ्या उपासनापद्धती यांच्या नादी न लागता, निष्कपट, निर्मल, परमपवित्र आणि महन्मंगल "**हरि-गुरू-भक्ती**" करा. सर्वांना आचरता येईल असा ह्या भक्तिएवढा **सुलभ** अन्य अध्यात्मयोग नाही. फलदृष्टीने, कठीण अशा ज्ञानमार्गाने जी अखण्डाद्वय चिदैकप्रत्यय ब्राह्मीस्थिती प्राप्त होते, तीच या भक्तियोगाने अनन्यभक्तास "**सर्वम् विष्णुमयं जगत**" अशा स्वरूपात अनुभवास येते.

म्हणून सार काय? तर सर्वांनी या अमृतस्वरूपा भक्तीच्या साधनेस या क्षणापासून प्रामाणिकपणे, निरलसपणे लागावे. प्रथम अनन्य भक्त व्हावं. यथाकाल मग सर्वकाही प्राप्त होतच-होत. नारायण उपनिषदात सांगतात, "**सर्वोपायान् परित्यज्य भक्तीं एकं आश्रय। भक्तिनिष्ठो भव, भक्तिनिष्ठो भव। भक्त्या सर्वे सिद्धय: सिध्यंति। भक्त्या असाध्यं न किंचित् अस्ति।**" शब्द अगदी सोपे अर्थवाही आहेत.

आपल्याला जी वस्तू/व्यक्ती प्राणापलीकडे आवडते त्याला भक्तीशास्त्रकार "**प्रिय**" असे संबोधतात, या प्रिय शब्दाचा पराकोटीचा उच्चतम भाव म्हणजेच "प्रेष्ठ". "**स प्रेष्ठं लभते**" म्हणजे जो सर्वात वरिष्ठ, श्रेष्ठतम असा असूनही सर्वांना प्रिय असणारा परमात्मा/भगवंत/श्रीगुरू, त्याची प्राप्ती तो भक्त साध्य करून घेतो. मग या भगवत्प्राप्तिनंतर अखंड त्याच उच्चतम अवस्थेत राहात असल्याने असा भाग्यवान भक्त "व्यक्तस्वरूप प्रेष्ठ" तत्वत: होतो. म्हणजे तरी काय तर भक्त भक्त न राहता तो **भगवंतच** होतो, शिष्य-शिष्य न राहता तो **श्रीसद्गुरूस्वरूपच** होतो.

मात्र हे परमपद केवळ आपल्या प्रयत्नांनी साध्य होत नाही; तर त्यासाठी हरिगुरूकृपेचीच नितांत आवश्यकता. कठोपनिषद् सांगते, "**यं एव वृणुते तेन लभ्य:।**" अर्थ - **सर्वेश्वर, सर्वेसर्वा ज्याचा स्वीकार करतो त्यालाच हे परमपद लाभते.**

आता भगवंताने/श्रीगुरूंनी आपल्यावर कृपादृष्टी करावी यास काय उपाय करावा? तर अनन्य भक्तीने श्रीगुरूला-भगवंताला जाणावे, ओळखावे,

पाहावे, सेवा करावी आणि त्या श्रीगुरूहरिस्वरूपात प्रवेश करावा. असा प्रवेश करणं अनन्य **परमप्रेमस्वरूप** भक्तीनेच शक्य आहे अस भगवान अर्जुनाला सांगताहेत.

एकदा का ही **''अमृता–भक्ती''** प्राप्त झाली की आपण पुनः पुनः जन्म घ्यावा, पावक हरिभक्तीप्रेमाचा आनंद लुटावा आणि या पावन हरिभक्तीचाच प्रचार–प्रसार करावा असे वाटते.

मग भक्त वारंवार प्रार्थना करत असतो पहा. पण काय प्रार्थना? तर **''भवे भवे यथा भक्ती: पादयो: तव जायते। तथा कुरूष्व देवेश, नाथस्त्वं नो यत: प्रभो।।''** म्हणजे हे देवाधिदेवा, माझी अंतिम भावना/कामना येवढीच आहे की मला तुझ्या अमृतचरणाची भक्ती (तुझ्या अपार वात्सल्यभावाचे, तारकशक्तीचे गुणगान, **नामसंकीर्तन** व प्रसार) करता यावी. श्रीतुकाराम महाराज पहा काय मागताहेत, **''हेचि व्हावी माझी आस। जन्मोजन्मी तुझा दास। हेचि मज घडो जन्मोजन्मांतरी। मागणे श्रीहरि नाही दुजे।।''**

* * * *




भक्तीमार्ग हा भक्तीप्रेम व आनंद यांच्या द्वारा भगवंताची भेट घेण्याचा मार्ग आहे. भगवंताच्या अस्तित्वाचे सर्व प्रकार, आनंदाने आत्मसात करणे हेच या भक्तीमार्गाचे स्वरूप आहे. भक्तीप्रेमाच्या पूर्ण एकतेत प्रभूशी सगली करणे हा या मार्गातील आनंदाचा अपूर्व ठेवा आहे.

हा आनंद, हा स्पर्श, हा ब्रह्माचा, आनंदस्वरूप अस्तित्वाचा असतो. हा आनंद स्पर्श, आनंदब्रह्माची आपल्याला आलेली हाक असते. मात्र ही हाक, दिव्य हाक आपण ऐकावयास हवी आणि त्या हाकेला तेवढाच प्रतिसाद द्यावयास हवा; मग या आनंदाला तोटाच नाही.

ही हाक एकदा का आली; हा स्पर्श एकदा का घडला; की मग हे आनंदब्रह्म (आनंद अस्तित्व) नेहमीच आपल्या जवळ असावे, त्याच्या सान्निध्याचा आनंद नेहमी मिळावा असे आपल्याला मोठ्या निकडीने वाटू लागते. श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणताहेत, **''तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडुरंग।।''** आपल्या जीवनाची ती एक अत्यंत निकडीची गरज बनते. निदान गरज वाटावयास तरी हवी. नाही का?

हे आनंदब्रह्म भक्ताने जाणून घ्यावयास पाहिजे; बुद्धीला आणि मनाला या आनंदब्रह्माच्या शाश्वत सत्याची, भावाची खात्री पटवावी; या भावाशी आपले अस्तित्व पूर्ण संवादी करावे आणि या आनंदब्रह्माला आपले अंतरंग खुले करून द्यावे. यात निजसुख आहे, निजानंद आहे आणि शेवटी या आनंद ब्रह्मात प्रविष्ट होऊन पूर्णत्वाने उरावे.

हे आनंदब्रह्म अनिर्वचनीय वस्तू आहे. या वस्तुचा स्वभाव सर्वातीत भक्तीप्रेमभाव हा आहे. हा भाव मनाच्या कल्पनेपलीकडे व शब्दाच्या वर्णन-शक्तीपलीकडे आहे.

आनंदब्रह्म मोठ्या तळमळीच्या रूपात अभिव्यक्त होते. कधी आपल्याला दिव्य भक्ती-प्रेम-चैतन्य म्हणून साद घालते. कधी विश्वात, विश्वामागे, विश्वापलीकडील पण सर्व सहाय्यक दयामय-कृपामय अनंतचैतन्य, ब्रह्मचैतन्य म्हणून पाठीशी घालील; वरच्या प्रकाराखेरीज अन्य प्रकारेही हे आनंदब्रह्म आपल्या जवळ येते; मात्र ते नेहमीच भक्तीप्रेम, शांती, भावबळाने आणि कितीतरी अधिक गुणांनी भरलेले पूर्ण चैतन्यब्रह्मच असते. मात्र हा आनंद, सौंदर्य, भक्तीप्रेम, शांती यांचे सामान्यत: मनात जे आकार असतात, या सगळ्या लौकिक आकाराच्या, कल्पनेच्या पार पार पलीकडचे असतात.

त्याचे कारण आहे सर्वसुख, भक्तीप्रेम, शांती, आनंद या गोष्टी एका आनंदब्रह्मातून-चैतन्यब्रह्मातून येत असतात आणि हे ब्रह्म आमच्या अस्तित्वाच्या व जीवनाच्या सर्व प्रकारात-स्तरात आपल्याला स्पर्श करून, वरील सर्व दैवी भावांचा उपयोग आपल्यातील आत्मशक्तीला जागृत करून,

आपल्याला आनंदनिधान करण्यासाठीच करीत असते.

सामान्यत: मन, आपल्याला प्रतीत होणाऱ्या या आनंदब्रह्माच्या, स्वत:मधील प्रतिबिंबानेच समाधान पावते. म्हणून आपण काही उणीव न ठेवता, कसलीहि चिंता न करता, या अनंताच्या, आनंदब्रह्माच्या-ब्रह्मचैतन्याच्या प्रत्येक गोष्टीला-अनुभूतीला आपले अंत:करण सारखे खुले ठेवावे; या अनुभवातील तीव्रता जाणावी.

हीच अनुभूती आपल्या सतत विचाराचा, सतत ध्यानाचा विषय करावी. या ब्रह्मचैतन्याच्या ठिकाणी असणाऱ्या स्वाभाविक, निरपेक्ष, अकृत्रिम प्रेमभवाचा नित्य विचार करावा. अशाने हे अनंतब्रह्म आपल्याला कर्मयोगासाठी लागणारी मौलिक शक्ती बनते, आपल्या पूजेचा **देव** बनते. आपले सर्व अस्तित्व या देवाशी/भगवंताशी सुसंवादी होईल अशी खटपट करावी, मग हे आनंदब्रह्म आपल्या आत्म्याचाही आत्मा बनून राहते.

हे ब्रह्मचैतन्य आपल्या आत, आपल्या बाहेर, आपल्या सभोवार, सर्व पातळीवर समव्याप्त आहे. आनंदब्रह्माचा निरामय भक्तीप्रेमभाव हाच त्याच्या अथांग थोरवीचा दाखला आहे.

* * * *



## चिंतन २०९

श्रीसद्‌गुरू आपला डोळा देऊन शिष्याला भगवंत दाखवितात; आपली दृष्टि त्याला देऊन त्याची (शिष्याची) सगळी सृष्टिच चिन्मय करतात; दिव्य असे ज्ञानांजन घालून निजधन/आत्मधन दाखवितात; या सगळ्याचा निष्कर्ष असा निघतो की, केवळ व्यावहारिक, लौकिक सत्ये पाहण्यातच गुंग होऊन राहिलेल्या आपल्या शिष्याला, पारमार्थिक सत्य-भगवंत-ब्रह्म पाहण्याची शक्ती-बुद्धि-युक्ती-दृष्टि देतात.

बुद्धि, भावना, क्रियाशक्ती, इच्छाशक्ती (Reason, Emotion and Will) या सगळ्या मानवी शक्ती ईश्वराचे प्रत्यक्ष-अनुभवजन्य ज्ञान (म्हणजेच **साक्षात्कार**) करून देण्यास सर्वस्वी असमर्थ आहोत. असे ज्ञान केवळ प्रतिभाशक्तीलाच होऊ शकते. ती शक्ती शिष्यामध्ये केवळ बीजरूपानेच असते. विकसित अशा श्रीसद्गुरूंच्या प्रतिभाशक्तीने शिष्याच्या ठिकाणी बीजरूपात असणाऱ्या त्या शक्तीचा क्रमा-क्रमाने पूर्ण विकास होतो; आणि तद्द्वारा त्याला साक्षात्कार होतो. म्हणूनच श्रीगुरूशिवाय ही भगवत्प्राप्ती नाही. "**प्राप्य वरान्निबोधत**" असे उपनिषद् वचन आहे. अध्यात्मिक विकासात थोर श्रीगुरूंकडून आत्मज्ञान प्राप्त करून घ्या, असेच श्रुतींनी, पुराणांनी, दर्शनकारांनी आणि सर्व थोर महात्म्यांनी सांगितले आहे. पाणी ज्याप्रमाणे वरच्या पातळीवरून खालच्या पातळीकडे वाहते, त्याप्रमाणेच प्रतिभाशक्ती व साक्षात्कारसुख श्रीगुरूकडून शिष्याकडे वाहतात.

ही प्रतिभाशक्ती वाढविण्याचे श्रीगुरूकडून शिष्याला मिळणारे साधन एकच एक. ते म्हणजे **नाम** होय. नामाचा महिमा कितीही जरी गाइला तरी तो पुरेसा वाटत नाही; याचे कारण एका नामाच्याच प्रभावाने फक्त मनुष्य ब्रह्मरूप होऊ शकतो; असा सर्व संतांचा अनुभव आहे. त्यामुळे भगवत्नामाबद्दल वाटणारी कृतज्ञता, प्रेम, आदर "**सार, सार, सार। विठोबा नाम तुझे सार**" "**अठरा पुराणांच्या गोष्टी। नामविण नाही पोटी।।**" "**नाम पावन पावन, नामापरते तत्व नाही रे अन्यथा**" अशा प्रकारे नामाची महती अनेक संतांनी गाइली आहे. "**नामे संकटे नासती। नामे विघ्ने निवारती। नामे होय उत्तम गती। अंतकाळी।।**" असा निर्वाळा समर्थांनी दिला आहे.

श्रीगुरू साक्षात्कारसुखाने ब्रह्मरूपच झालेले असतात. या त्यांच्या ब्रह्मस्वरूपतेमुळे **त्यांनी दिलेल्या नामात** एक अगाध, अफाट, अतर्क्य शक्ती असते; अथवा त्यांना आपल्या शिष्याला (अंतरंग अधिकारी) जी शक्ती द्यावयाची असते तिला आधार किंवा वाहक म्हणून ते श्रीगुरू नामाच्या (सिद्ध) अक्षरांचा उपयोग करतात असे म्हणणे अधिक योग्य होईल. अशा श्रीगुरूंनी दिलेल्या नामाला

**सबीज** नाम म्हणतात व ही उपमा फारच अन्वर्थक आहे. बीज पेरले की शेतकऱ्याने जमीन नीट कसल्यावर त्यापासून तेच बीज उत्पन्न होते.

सबीज नामात भगवंताचे बीज आहे. ते अंत:करणात पेरून, त्यावर नामस्मरणाचे उदंड पाणी घातले आणि भगवद्प्रेमाचाराच्या आचरणाने ते क्षेत्र (अंत:करण) शुद्ध ठेवले की भगवंताच्या साक्षात्काराचेच विपुल पीक येते. जितके कष्ट करावेत तितके-तितके अमाप पिक येते.

शेत आहे, उत्तम कसून तयार केले; पाणी पाजण्याची व्यवस्था केली तरी **बीज** आणावेच लागते आणि बीज कोण देऊ शकतो? तर ज्याच्या शेतात ते अमाप पिकून चांगले परिपक्व झाले आहे तोच ते देऊ शकतो. हुरडा पेरून उगवत नाही; लाह्या पेरून उगवत नाही. चांगला शाळूचा दाणाच पेरावा लागतो.

त्याचप्रमाणे ज्यांनी आपल्या क्षेत्रात देव उत्तम प्रकारे चांगला दर्जेदार, दाणेदार पिकवला आहे; त्यांच्याकडून नामबीज मागून घ्यावे लागते. त्यावाचून इतर सर्व मेहनत, खते, पाणी, मशागत व्यर्थ!

''**शरीर आटे, संपत्ति आटे। परि हरि नाम न आटे बरवे।।**'' ते नाम अविनाशी स्वत:सिद्ध आहे. नामाने भगवंत नाही तर ''**नामच परब्रह्म**'' असा वेदार्थ श्रीगुरू (आपले) ज्ञानोबाराय सांगतात. हे नाम ईश्वराचे बीज आहे, याचाच अर्थ ते अर्थातच ईश्वर आहे म्हणून तर ''**आठव तो ब्रह्म। नाठव तो भवभ्रम।।**'' नामाची आठवण आहे तोपर्यंत अंत:करणात देव आहेच; मात्र नामाचा विसर पडला की देहभावाचे काहून उठते.

समर्थ सांगतात ''**सकळ धर्मामध्ये धर्म। स्वरूपी राहणे हा स्वधर्म।।**'' नाम व स्वरूप यात भेद नाही. ''**आत्मस्वरूप**'' म्हणून जी शक्ती आहे, तीच **नामात** आहे. म्हणून नामात राहणे म्हणजेच स्वरूपी राहणे. ''**नाम तेचि रूप, रूप तेचि नाम। नामरूपा भिन्न नाही नाही।।**'' नामाने जिव्हेवर अमृत स्त्रवते; नामोच्चाराबरोबर आपल्यापुढे पंढरीनाथ/ जगजेठी साक्षात उभा ठाकतो. नामाला म्हणजेच श्रीगुरूला मग विसरावे का?

* * * *

# चिंतन २१०

भगवंत आपला पिता व माता आहे. आपल्या अस्तित्वाचे तो मूळ आहे. आपल्याला सांभाळणारा, आपले सर्व लाड पुरे करणारा, आपल्याला हवे ते देणारा तो आहे. हा ईश्वर कधी आपले मूलही होतो. आपली भक्तीपूर्ण सलगी त्या जगत्नियंत्या, समर्थ ईश्वराला आमचे **बाळ** बनविते आणि या सगुण तान्ह्या, गोजिरवाण्या बाळाचे आपण भक्त सर्व लाड करतो. पण, भक्तीशास्त्रकार याच्यापुढे जाऊन अस सांगतात -

ही सर्व नाती, हा प्रियाची परिसीमा असणारा भगवंत, प्रियकर म्हणून आपल्या ठिकाणी एकत्र करतो. भगवंताचे हे प्रेम अत्यंत सलगीचे असते. ते आपल्याला व त्याला (म्हणजे भगवंताला) एकजीव करून सोडते; अर्थात ते पित्याची व मातेची जागा घेते. बंधू, सखा, जिवलग ही सर्व नाती या एका नात्यात अंतर्भूत होतात; एकत्र येतात; एक होतात.

हे नाते एकांतिक असू शकत नाही. भक्तीत आरंभापासूनच सर्वप्रकारच्या नात्यांचे रंग मिळलेले असतात. हे भक्तीप्रेम पूर्ण असते; तीव्र असते. परस्पर समागमाच्या, ऐक्यतेचा, एकरूपतेचा, परस्पराधीनतेचा आनंद हजारो प्रकारांनी अनुभवणारे असते.

ह्या प्रियाची परिसीमा असणाऱ्या भगवंताचे सगळेच अद्‌भूत. या भगवंताविषयी आपण कसलाहि विचार करीत नसताहि, तो आपल्या मागे लागतो. मग तो आपली इच्छा प्रथम-प्रथम असो, नसो, आपल्याला धरून आपल्या (म्हणजे त्या प्रेमळ भगवंताच्या/श्रीगुरूंच्या) परिवारात जमा करतो.

या भगवंताशी असणाऱ्या आरंभीच्या नात्यात लढा, संघर्ष असतो. या नात्यात प्रथम-प्रथम भगवंत व आपण यांच्यामधील अन्योन्य भक्तीप्रेमात गैरसमजाने तसेच गैरआचाराने, कोपाने, भक्तीप्रेमकलहाने, भक्तीप्रेमसंघर्षाने, आशेने, निराशेने, विसराच्या आणि अशा पुष्कळ कारणांनी आणि पुष्कळ काळपावेतो रंग-तरंग बदलत राहतात; कमी-जास्त होत राहतात. आपण आपल्या

परमप्रिय भगवंताच्या विरूद्ध आपल्या हृत्कमलातील तीव्र भावना, दुखावल्या गेलेल्या भावना, सर्वच्या सर्व त्याच्याजवळ प्रकट करून आपली तीव्र नाराजी व्यक्त करतो. हे आपले रूसणे, रागावणे तोवर चालूच राहते जोवर आपण त्याच्याशी एकरूप होऊन या ऐक्याच्या निरपवाद **परमानंदात** विलीन होत नाही.

पण या ऐक्याच्या परमानंदातही रूसणे/रागावणे (पण कृतक् कोपाने हं) चालतच बर का! गंमत काय पहा, परमानंदाचाही एकच प्रकार काही काळाने बेचव होतो. (जसा भोजनाचा-भाजीचा एकच प्रकार, नाही का?) अखंड समाधानासाठी ऐक्याचे व आनंदाचेही भिन्न-भिन्न प्रकार अनुभवावे लागतात. (बटाट्याची भाजी पण कधी काचऱ्या, कधी उकडून, कधी रस्सा तर कधी कधी कीस).

असे संपूर्ण ऐक्याचे प्रकार, शाश्वत आनंदाचे प्रकार भगवंताच्या या ईश्वरीय प्रेमात इतके काही भिन्न-भिन्न आहेत की, मानवी बुद्धी त्यांची गणनाच करू शकत नाही. मानवी भाषा त्यांचे वर्णनही करू शकत नाही. हा देव-भक्त/श्रीगुरू-शिष्य यांच्या ऐक्याचा आनंद भक्ताच्या संपूर्ण-सलग अस्तित्वाच्या सर्व संगोपांगात भरून वाहत असतो. मन व प्राण आनंदाने भरून जातात. आनंदावर आनंदाच्या लाटा उसळतात. आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात पहा, ‘‘**आनंदाच्या डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।**’’ केवळ एवढच नाही तर भौतिक शरीरावर देखील या आनंदाचे ठसे उमटतात. (यालाच शास्त्रकार **अष्टसात्विकभाव** म्हणतात). भगवंताचा सुखद स्पर्श या पांचभौतिक शरीरालाही जाणवतो. आपले ज्ञानराजमाऊली गोपीभावावर आरूढ होऊन, आपला स्वानुभव पहा कसा प्रकट करतात तो. ‘‘**अवचित परिमळू झुळकला अळुमाळु। मी म्हणे गोपाळू आला वो माये।।**’’

शरीराचे सर्व अवयव, सर्व शिरा, नाड्या इतकच काय पेशी न् पेशी या ‘‘**भक्तीप्रेमसुखानंदाच्या**’’ अमृताने भरून जातात.

हे भक्तीप्रेम, हा भक्तीप्रेमानंद, ही भक्ताची अंतिम मागणी, अंतिम पुकार, अंतिम सिद्धी आहे. भक्तीप्रेम व भक्तीप्रेमानंद हे गुपितांचे गुपित, रहस्याचे परमरहस्य आहे. शुकदेवांसारख्या योगीराजांनी ते आपल्यासाठी प्रकट केले आहे.

* * * *

# चिंतन २११

भगवंताची नामे-गुण अनंत आहेत. तसाच तो एकनामी, बहुनामी, सहस्त्रनामी, अनंतनामी आहे; पण शेवटी अनामीच आहे. कारण, त्याचे संपूर्ण वर्णन, गुणगान करताच येत नाही. अशा अनंत गुणांनी नटलेल्या सगुणाचा आपण अखंड विचार करावा; चिंतन करावे. या त्याच्या गुणांच्या चिंतनाने, भक्ताच्या मनात त्याच्याबद्दल आदर निर्माण होतो (पण भीतिरहित हं!) अंत:करण आश्चर्याने भरून जाते; नम्र होते.

भगवंत हा **आनंदघन** असून आनंद देणारा भक्ताला आनंदरूप करणारा, **भयाचा** नाश करणारा, सगळ्या सिद्धींचे साधन असून सिद्धींचा दाता आहे. पण खरा भक्त मात्र या सिद्धींकडे ढुंकून पाहात नाही. जसा राजहंस पाण्याचा स्पर्शसुद्धा करत नाही. भगवंत कल्याण करणारा, परम दयाळू, इच्छा पूर्ण करणारा, वासना नष्ट करणारा असून परमशांती प्रदान करणारा आहे. त्याचबरोबर तो परम **वत्सल** आहे.

असा दयाघन प्रभू भक्तीनेच वश होतो; भक्तीनेच आकळिला जातो. तो दीनदयाळ, क्षमाशील, पतित-पावन, भक्तकामकल्पद्रुम, शरणागताचा वज्रपंजर, भक्तवत्सल आहे.

या आणि अशा सारख्या अनंत गुणांमुळेच देवाचे/श्रीगुरूंचे व भक्तांचे/शिष्याचे **नाते** जुळते. हे नाते इतके हृद्य, पवित्र, परमश्रेष्ठ आणि व्यावहारिक सर्व नातेसंबंधाच्या पलीकडील व अत्यंत तरल, सूक्ष्म आणि हृदयस्पर्शी असते.

चिंता, भय, दु:ख, तळमळ, मळमळ इत्यादि अनेक गोष्टींपासून मुक्तता व्हावी व सुख, निर्भयता, विश्रांती, पूर्णसुस्वरूपता मिळावी असे अवघ्या मनुष्यमात्राला वाटत असते. मग हे सर्व लाभ भगवंतापासून/श्रीगुरूमाऊलीपासून होतात, त्यांच्याबद्दल प्रेम, कृतज्ञता, आदर निर्माण होतो. यामुळेच भक्त आपले प्रेम, आपली भक्ती एका देवाला/श्रीगुरूलाच वाहतो.

ज्याची अवघी माया देवावर/श्रीगुरूंवर तो भक्त. "**वैष्णव तो जया। अवघी देवावरी माया।।**" अस आपल्या श्रीतुकोबारायांनी वैष्णवाचे वर्णन

केले आहे. भक्ताची/शिष्याची अशी दृढ श्रद्धा असते की काही संकट आले तर मागे पुढे उभे राहून तो एक श्रीगुरूच/भगवंत आपले रक्षण करील. श्रीतुकाराममहाराज म्हणतात, "**मागे पुढे उभा राहे सांभाळित। आलिया आघात निवाराया।।**" असा **विश्वास** असतो. **अनुभव** असतो.

मग आपण वृथा चिंता करण्याचे काय बरे कारण? याच श्रद्धेतून तो करील तेच मान्य केले पाहिजे व **करावे** हाच भक्ताचा स्वधर्म. तो जे जे करील त्यातच आपले हित आहे; हीच परमश्रेष्ठ श्रद्धा. जन्मदाती आई आपल्या लेकराचे कधी अकल्याण करते का? भगवंत/श्रीगुरूचे आपले नाते माय-लेकराचे आहे ना! मग झाले तर. समर्थ आपल्याला समजावून सांगताहेत, "**आपल्या मनोगता कारणे। देवावरी (श्रीगुरूवरी) क्रोधासि येणे। ऐसी नव्हेत की लक्षणे। सख्य भक्तीची।।**" आणखी थोडे उलगडून सांगायचे तर भगवंत करील तेच होईल, ते बदलणे अशक्य, अशा परावशतेने, अवशतेने व निराशेने ते मान्य करणे म्हणजे भक्ती नव्हे; तर तेच माझ्या खऱ्या कल्याणाचे आहे या दृढ श्रद्धेने, आनंदाने, समाधानाने मान्य करणे, नाही-नाही गोड वाटणे या नावे भक्ती.

भगवंताच्या/श्रीगुरूंच्या प्रेमाचा अनेक प्रकारे **अनुभव** आल्यावर भक्त देवावर प्रेमाच **हक्क** गाजवतात. हा देव भक्तीप्रेमाच्या सुखानुभावासाठी, भक्तीप्रेमसुखामुळे निर्गुणाचा सगुण होतो. निराकाराचा आकाराला येतो. भक्तासाठी देवाचा अवतार; म्हणून भक्तीशास्त्रकार म्हणतात, "**भक्त वडील, देव धाकुटा**". आपले श्रीतुकारामहाराज तर यापुढेही जाऊन म्हणतात, "**देवा तू निर्गुण, निराकार असा परदेशी होऊन पडला होतास, तुला सगुण-साकार करून आम्ही माणसात आणला; पण याचे तुला काहीच कसे वाटत नाही रे; पण तू थोर बाबा! तुला कोणी दोष द्यावा नां?**" काय भक्तीप्रेमाची शक्ती, मातब्बरी आहे नां?

देवाला प्रियतम एक भक्तच! तो भक्ताला आपल्या माथ्यावरील मुगुट करतो. त्या आपल्या लाडक्या, प्राणापलीकडे प्रिय असणाऱ्या भक्ताला बसण्यासाठी आपल्या अंत:करणाचा गालिचा आंथरतो. केवढे हे देवाला भक्ताचे प्रेम आणि **भक्तालाहि** भगवंताचे तेवढेच **विलक्षण** प्रेम.

* * * *

# चिंतन २१२

परमार्थाचे परमध्येय भगवंत हेच आहे व भक्ती हे ह्या भगवंताची प्राप्ती करून घेण्याचे साधन आहे. पण या साधनाचा एक खास विशेष आहे; बाकीची सर्व साधने साध्य हस्तगत झाल्यावर थांबतात पण भक्तीचे अगदी उलट आहे. भगवंत मिळेपर्यंत तर हे साधन राहतेच पण भगवंताशी/श्रीगुरूंशी पूर्णांशाने एकरूप झाल्यावर तर या साधनाला म्हणजे भक्तीप्रेमसुखाला एक वेगळीच लज्जत/अवीट माधुर्य लाभते आणि भक्ती होतच राहते.

भगवंत/श्रीगुरू आणि भक्त यांच्यामधील या भक्तीप्रेमामुळे आयुष्याला खऱ्या-खऱ्या अर्थाने एक **अर्थ** प्राप्त होतो. ही भक्ती मग करावी लागत नाही तर **होतच राहते; होतच राहते.**

भगवंताचे नाम घेत असताना त्याची कृपा नामधारकावर होत असते; त्याच्या कृपेचा अखंड वर्षावच होत असतो. ही कृपा होते म्हणजे तरी काय होते म्हणाल तर तो भगवंत **आपलासा** होतो. मग ''तो'' व ''मी'' हे भाव-भेद मुळी राहतच नाही.

भगवंत आपला आणि मी भगवंताचा ही प्रचिती दृढ होता-होता, भक्त विरागी, तत्वज्ञ, योगारूढ आणि संतत्व यांचा अधिकारी होतो. तो सर्वाधिकारी होतो.

सत्यपरमतत्वाचा शोध घेण्याचा भक्ती हाच खरा-खरा मार्ग आहे. भक्तीच्या आधाराने मायेचे यथोचित ज्ञान होत जाऊन तद्द्वारा भक्ताला मायेच्या पलीकडे जाण्याची क्षमता लाभते.

नाम हा वेदार्थ आहे अस श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. **''नाम''**च परब्रह्म आहे अस प्रत्यक्ष वेदांचे तात्पर्य आहे. नामाने भक्ती दृढ होते. नामधारकाच्या भक्तीविषयक लागणाऱ्या चित्तशुद्धीस नामच अत्यंत उपयुक्त आहे.

या भक्तीयोगाचा अभ्यास नुसती पुस्तके वाचून वा नुसत्या चर्चा-संभाषणाने पुरा होत नाही. भगवंताकडे मन लावल्याने तो होत असतो. मन भगवंताकडे लावण्यास **नामा** सारखा दुसरा उपायच नाही.

"**भक्तीस मूळ विरक्ती**" असे एक संतवचन आहे. या वचनाचा भावार्थ असा आहे, "**भगवंतावरील/श्रीगुरूंवरील (दोन्ही एकच) परमोत्कट प्रेम म्हणजेच विरक्ती**". या भक्तीप्रेमातून पाझरणारा मध भक्ताने चाखल्यावर त्यास येणारी विरक्ती ही बोचक, रूक्ष न ठरता रोचकच, स्निग्ध, मधाळच ठरते. या विलक्षण विरक्तीत विफलता नसून, विफलभाव नसून सफलता असते; सफलभाव असतो.

नामाने आपल्या अंत:करणात सफल भावजागृती होते. नामाने मानसिकता उंचावत जाते, रूंदावत जाते, पैस होते. किती? तर त्यात भगवंत सामावला जातो. "**एवढा प्रभू भावे। तेणे संपुष्टी रहावे।।**" "**हृदयी बंदीखाना केला। आत विठ्ठल कोंडिला।।**"

आनंदकंद अशा मुकुंदाशी तन्मय, नादाकार, तद्रूप होण्यात जो आनंद आहे तो तसा आनंद अन्यत्र कोठे आणि कशातच नाही.

आपण आपल्या अंतरंगात भगवंत ठेवावा. भगवंताच्या भक्तीप्रेमसुखात आपण सातत्याने डुंबत राहावे; त्यासाठी आपल्याला आलेल्या प्रेमभक्तीसुखाच्या अनुभवांची आठवण करावी, उजळणी करावी, सातत्याने त्याच्या आठवात राहावे नाही तर आठवता-आठवता त्यात विरून जावे. भक्ती ही एक श्रेष्ठ जीवनधारा-जीवनकला आहे.

अशा भक्तीकलेने आत-बाहेर एका भगवंताचीच/श्रीगुरूंची आठवण होत राहिल्यास हा भक्तीप्रेमयोग सुलभ व सरस होत जातो. भक्त अखंड तृप्त राहतो; आणि या तृप्तीचे महत्व, मूल्य पदार्थजन्य तृप्तीपेक्षा फारच मोठे असते.

आपल्या वृत्तीत भगवंत मिसळता येतो. मग वृत्ती जेथे जेथे जाईल तेथे-तेथे एक आनंदाचा गाभा, आनंदकंद नंदनंदनच अनुभवास येतो. वृत्तीच आनंदमय होते.

* * * *

# चिंतन २१३

सगळ्या उपासनेचे महत्फल आहे भगवद्साक्षात्कारात. भगवंताचे ज्ञान, स्थूल इंद्रियांना, मनाला इतकेच काय तर बुद्धीला होऊ शकत नाही; त्याचे कारण असे की, हा भगवंत इंद्रिये, मन, बुद्धी यांच्या "**पर**" म्हणजे पलीकडे आहे. तर मग त्याचे ज्ञान होण्याचे साधन तरी कोणते? मनुष्याला अशी एखादी शक्ती आहे का, की जिला परमात्म्याचे प्रत्यक्ष ज्ञान/अनुभव होऊ शकेल?

मनुष्याला प्रतिभाशक्ती (Intuition) आहे. या शक्तीला ईश्वराचे अपरोक्षज्ञान होऊ शकते. परतत्व ज्ञानाची शक्ती म्हणून "**प्रतिभा/प्रज्ञा**" ही तत्वज्ञानात आणि मानसशास्त्रात मान्यता पावली आहे. कवि, शास्त्रज्ञ व तत्वज्ञ यांना ज्या स्फूर्तीमुळे काव्य, शास्त्रीय शोध व तात्विक सिद्धांत स्फुरतात तीपण बुद्धीच्या वरची (ऋतंभरा प्रज्ञा) एक शक्ती आहे.

सामान्य मनुष्य पाहतो तेच कमल, झाडावरून पडणारे फळ आणि एकंदरच दृष्यविश्व कवि, शास्त्रज्ञ व तत्वज्ञ पाहतात; पण त्यांना त्या अनुभवात/दर्शनात सामान्य माणसाला न दिसणारे असे काही अधिक दिसते; परतत्वाचा अंश दिसतो, भगवंत दिसतो व त्यावरून कवि काव्य निर्माण करतात; शास्त्रज्ञ (न्यूटन-गुरूत्वाकर्षणाचा नियम) शोधून काढतो.

भगवद्दर्शन घडवून आणणाऱ्या प्रज्ञेची उंची ही वरील बुद्धीच्या वरची सर्वश्रेष्ठ असते. अशी प्रतिभा/प्रज्ञा जागृत झाली की नामधारकाला/नामसाधकाला भगवद्दर्शन, साक्षात्कार होऊ लागतो व प्रज्ञा जशी जशी वाढेल तसा तिच्या वाढीबरोबर तो नित्यनूतन वाढत जातो. म्हणून साक्षात्काराला प्रातिभ (Intuitive) ज्ञान असे तत्ववेत्यांनी म्हटले आहे. दुसऱ्या एका दृष्टीने या ज्ञानाला अतींद्रीय व अंत:स्फूर्तज्ञान (Supersenseous experience and central intiation) असे म्हटले

आहे. संतांनी त्याचे वर्णन जरा वेगळ्या अलंकारिक भाषेत केले आहे. **"अंधळ्यासी डोळे, पांगळ्यासी पाय, तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे।। "आनंद तेथिचा मुकीपासी वाचा, बहिरे ऐकती कानी रे।। नाचत जाऊ त्याच्या (पंढरीरायाच्या) गांवारे खेळिया, सुख होईल विसावा रे।।"** आंधळ्याला देवाचे रूप दिसते; बहिऱ्याला भगवंताचा **अनाहत** नाद ऐकू येतो, मुका भगवंताचे गुणगान करतो, पांगळा देवाच्या मार्गावर चालू लागतो. म्हणजे साक्षात्कार इंद्रियातीत आहे. तरीही त्याचा अनुभव मात्र इंद्रियज्ञानासारखाच आहे. असा हा विरोधाभास अलंकाराचा (साहित्यातील) एक मौजेचा प्रकार आहे. "**पांगळ्या पाय देतो, नांदे पंढरपूरी।**" असा आपला पंढरीनाथ मौजेचा आहे.

जडवस्तूच ज्ञानात, बाह्यस्फूर्ति म्हणजे (Peripheral Initiation) आहे. बाहेरून प्रकाशाच्या व नादाच्या लहरी डोळ्याच्या किंवा कानाच्या मज्जातंतूवर आघात करतात व त्यातून मेंदूतील ज्ञानाच्या केंद्रांना ते आदेश पोहोचतात. नंतर उलट त्याच मार्गाने डोळ्यासमोर प्रतिमा दिसते किंवा कानाला नाद एकू येतो, त्वचेला स्पर्श जाणवतो, नाकाला सुगंध कळतो, जिव्हा रस चाखते. ही सगळी बाह्यस्फूर्ती झाली.

भगवंताच्या साक्षात्कारात, प्रकाशाच्या नादाच्या एकूण सगळ्याच लहरी बाहेरून येत नाहीत. तर **नामस्मरणाने** स्थूल आणि मग सूक्ष्म देहात उत्पन्न झालेल्या अध्यात्मिक शक्तीच्या लहरी मेंदूतील ज्ञानकेंद्रांना पोहोचतात व त्यामुळे श्रीकृष्णस्वरूपाच्या तेज, रूप, स्पर्श, रस, शब्द इत्यादिकांचे अनुभव येऊ लागतात. त्यालाच अंत:स्फूर्ति म्हणतात.

**नामस्मरणाने**, प्रतिभाशक्तीने भगवंत हा अनुभवाचा होतो. असा सगुण साक्षात्कार, मग निर्गुण साक्षात्कार. निर्गुण ह्याचा अर्थ शून्य नव्हे तर गुणातीत. भगवंताचे गुण प्रतिभेला, प्रज्ञेलाच होतात/कळतात. म्हणून शक्तीलाच अग्रबुद्धी असे म्हणतात.

* * * *

# चिंतन २१४

नामस्मरणाचा साधनमार्ग यशस्वी होऊन भगवत्‌दर्शन, साक्षात्कार होण्यासाठी भगवद्‌भाव अनन्य झाला पाहिजे. "**भाव तेथे देव**". चित्तात भाव असेल तर इतर गोष्टींची जरूरच नाही. "**ठेवी जाणीव गुंडून। तेथे भावची कारण।।**" जाणीव म्हणजे खोटा शहाणपणाचा अहंकार; इतकच नाही तर "**मी ब्रह्म**" ही सुद्धा जाणीवच. हा ताठा, वृथा सोवळा अहंकार म्हणजे जाणीव. म्हणून तर निष्ठावंत भाव हाच भक्तांचा स्वधर्म. असा ह्या साध्या-भोळ्या-भाबड्या **प्रेमभावाचा** महिमा सर्व संतांनी गाइला आहे.

हा भाव-भाव म्हणजे तरी नेमके काय? एका भगवंतावाचून गोमटे असे या जगात अन्य काही नाही; आणि अशा देवाची ओळख करून देणारा श्रीगुरू, श्रीगुरूसेवा. असा श्रेष्ठ भाव म्हणून आपले जीवनसर्वस्व भगवंताला वाहणे/श्रीगुरूंना वाहणे; भगवंत हेच जीवाला नाव ठेवणे, स्वतःला आपल्या सर्व वृत्तींसह एका देवाला/श्रीगुरूला उक्ते विकणे याचे नाव भक्त.

भगवंताच्या प्राप्तीसाठी नितांत तळमळ, उत्कंठा, व्याकूळता, त्याच्या प्राप्तीसाठी-सेवेसाठी प्राणपणाने, देहाची पर्वा न करता प्रयत्नांची पराकाष्ठा, त्याची भेट लवकर होत नाही म्हणून खंती, हळहळ, कासाविशी, भगवंताच्या/श्रीगुरूंच्या भेटीसाठी मनाची उतावीळता, त्यांच्या वाटेकडे डोळे लागलले (**पंढरीचे वाटे दृष्टि लागले चित्त**) एका भक्तीप्रेमावाचून जगणे म्हणजे लाजिरवाणे जिणे/विटंबना असे वाटणे. "भगवंता आता धाव घाल, तुझ्यावाचून मला कोणी नाही". (**तुजवीण सखा मज नाही कोणी। वाटते चरणी घालू मिठी**) अशा करूणावाणीने, आर्त स्वराने त्याला हाका मारणे, देहाचा भार सर्वस्वी भगवंतावर टाकून आपण केवळ त्याच्या दर्शनासाठी आसूसणे, एका देवा/श्रीगुरूवाचून अन्य कशाकडे, कशासाठीही न पाहणे इत्यादी-इत्यादी ही सर्व भगवद्‌भवाची लक्षणे आहेत. "**भाव**" हा शब्द

केवळ दोनच अक्षरी, लहान असला तरी या शब्दाची व्याख्या करणे कठीण-महाकठीण. शब्द लहान पण त्यातील शक्ती महान. त्याची म्हणजे या भक्तीभावाची शब्दांनी व्याख्या करावयाची तर एखादेवेळी त्या **भावातला** भाव प्रकट न होता त्यातील भावाची हानी व्हावयाचीच जास्त शक्यता. म्हणून वरील लक्षणे सांगून भावाचे थोडे फार वर्णन केले/करण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे.

हा भाव थोड्या-फार प्रमाणात उपजत असतोच. परंतु सर्वांच्या ठिकाणी इतका उत्कट नसतो. श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराजांच्यासारख्या महात्म्यात उपजतच तो इतक्या पूर्णत्वाने असतो की त्यांना साधनाचे श्रम करावेच लागले नाहीत; लागत नाहीत.

इतरांना मूळचा भाव साधनेनेच वाढवावा लागतो (**उपजला भावो। तुमचे कृपे सिद्धी जावो।।**) भगवंताची-श्रीगुरूंची-संतांची त्यासाठी प्रार्थना करावी लागते.

हा भाव एका साधनाने-**नामस्मरणानेच** वाढतो. हे पक्के लक्षात ठेवा. हा भाव पूर्णपणे अनन्य का झाला, की मग नामस्मरण पूर्णपणे फलद्रूप होऊन उच्च प्रतीचा साक्षात्कार (म्हणजे भगवंताची अनुभूती) होतो. तोपर्यंत मात्र **साक्षात्कार** व **भाव** दोन्हीही ज्या-ज्या प्रमाणात होतात; त्या-त्या प्रमाणातच ते परस्परोपकारितेच्या नियमाने, क्रमाक्रमाने वाढत जातात.

श्रीगुरू/सद्गुरू, सत्नाम, सत्स्मरण, सत्‌श्रवण, सत्संग, सद्भाव आणि सदाचार या सात सद्वस्तुयुक्त पुण्यपावन साधनमार्गाने हा भाव वाढण्यास पोषकता लाभते.

भावाची वाढ म्हणजे त्या आनंदघनाच्या प्राप्तीबद्दल तळमळीची वाढ. भाव जसा-जसा जास्त-जास्त परिपक्व देशेला येऊ लागतो, मग ही तळमळ फारच वाढते. डोळ्याला त्याच्या दर्शनाची व मनाला त्याच्या अनुभवाची, त्याच्या असीम कृपेची भूक असह्य होऊ लागते; सर्व जग देवाशिवाय शून्य भासू लागते.

आपली ही तळमळ, आपल्या चित्ताची अवस्था कोणाला सांगता येत नाही (एक श्रीसद्गुरू मात्र अपवाद) अन्य कोणाला समजत नाही; सांगून उपयोग होत नाही. "**एका पाऊलाची वाट। कोणा सांगावा बोभाट।।**"

मात्र आपण ज्याचे **नामाच्या** माध्यमातून सतत स्मरण करतो त्याला मात्र हे कळते, उमगते आणि तो कृपावंत, करूणाघन धावून येतो. "**नामासाठी देव घालीतसे उडी**". तो नामधारकाच्या भेटीसाठी त्या नामधारकाइतकाच आसुसलेला असतो.

* * * *




भगवंत सत्य आहे. त्याच्या प्राप्तीचा मार्ग थोर असे श्रीसद्गुरू दाखवतात. त्यामुळे सर्व भव-भ्रम दूर होतो. जन्ममरणाच्या बंधनाची दोरी तुटते. प्रारब्ध, क्रियमाण, संचितादि कर्माची कोठडी फुटून जाते. आनंदकंद श्रीपांडुरंगाशी एकरूप होता येते. परमहर्ष होऊन मन आनंदात बुडून जाते.

भगवद्साक्षात्कार तेज, वर्ण, अनेकविध आकार, अनाहतनाद, अमृतरस, गंध व स्पर्श या आणि अशाच नाद, बिंदू, कला, ज्योती या सर्व प्रकारांनी होतो. साक्षात्काराचे महत्व व मूल्य त्याच्या परिणामांवर अवलंबून आहे. साक्षात्कारामुळे मनुष्याच्या जीवनात अत्युच्च, भव्य, शुद्ध असा फरक पडून जीवनात क्रांती घडून येते.

साक्षात्काराने सर्व आशा-इच्छांची खंडणा होते; जन्ममरण यातना चुकतात; मुख्य देवाची आत्मत्वेकरून, अभेदबोधाने ओळख होते, "मी" कोण हे यथार्थपणे कळते; विश्व आणि विश्वात्मा काय हे कळून मुख्य कर्त्याची ओळख होते. थोडक्यात म्हणजे जीवन सर्वांगानी परिपूर्ण होते; जीवनाचे सार्थक होते. दुर्लभ नरदेहाला येऊन जे मिळवावयाचे ते मिळते.

त्रिविध तापांचे दहन होते. अंत:करणात दोष औषधालाहि उरत नाही; विश्वाचे कोडे उलगडते.

साक्षात्काराचा अत्यंत महत्वाचा परिणाम म्हणजे त्यापासून होणारा आनंद-परमानंद, या दिव्य आश साक्षात्काराने होणाऱ्या इतर अनेक शारीरिक, मानसिक व नैतिक परिणामांचे मूळ आनंदात आहे. या निरूपाधिक, निरतिशय, नित्य अशा आनंदाचे ते सगळे परिणाम आहेत.

उपनिषदात या आनंदाची मीमांसा मोठी छान केली आहे. त्यात, मनुष्य-आनंदाच्या शतपट गंधर्वांचा आनंद, असे यक्ष, पितर, देव यांच्या आनंदाचे प्रत्येकी शतपटीने वाढणारे कोष्टक देऊन, हे सर्व आनंद अनेक पटींनी वाढून, इच्छारहित झालेल्या जीवाला प्राप्त होतात, असा साक्षात्काराचा निरतिशय आनंद वर्णिला आहे. ''जेंव्हा आत्माराम परिपूर्ण, सर्वत्र भरलेला अनुभवास येतो (काहिही पाहतांना, खाताना, बोलताना, सेवन करताना, रसपान करताना सुद्धा) तेंव्हा जे सुख अनुभवास येते ते खरे थोर सुख'' असे साक्षात्काराच्या आनंदाचे वर्णन/स्वरूप आहे. हाच वेदांतात सांगितलेला आनंद आहे.

अशा आनंदाच्या प्राप्तीनंतर इच्छा करण्यासारखे काय उरणार? म्हणून साक्षात्कारी जीवाला कसलीही इच्छा उरत नाही. पण ''**भक्तीप्रेमसुख**'' हे मात्र याला अपवाद आहे. श्रीगुरूज्ञानेश्वमहाराजही ''**तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडुरंग।।**'' असे म्हणतात. इतकेच नाही तर ''**माझ्या जीवीची आवडी। पंढरपूरा नेईन गुढी।।**'' असे म्हणून न चुकता श्रीपांडुरंगास भेटण्यासाठी पंढरीस धाव घेतात. काय मौज आहे पहा भक्तीप्रेमाची!

अशा साक्षात्कारी पण भक्तांच्या भोवती आनंदमय ब्रह्म घिरट्या घालीत फिरत असते. असा हा साक्षात्काराचा आनंद निरूपम आणि दिव्य आहे.

''**अंतरी आनंदी आनंद झाला**'' पण कसा तर ''**मुकियाचे परी**'' जिव्हारी अमृत गोड लागले; हा आनंद म्हणजेच चालता-बोलता-जागता-हालता-डोलता पांडूरंगच आहे. तो सर्व सुखाचे आगर, निधी असा आनंदस्वरूप पांडुरंग पहावयाचा.

या आनंदस्वरूपाची गोडी स्वानुभवानेच सेवन करावयाची. अशा आनंदानुभवाने **समाधान** प्राप्त झाल्यार मग भक्त सदा भक्तीप्रेमानेच आणि भक्तीप्रेमसुखातच डुलत राहतो. **"प्रेमे, छंदे, नाचे, डोले।"** अशी अवस्था.

अशा आनंदकंदामध्ये मुरून राहायाचा आनंद **नामधारकालाच** मिळतो. देवगड हापूस आंब्याची फोड जशी साखरेच्या दोन तारी पाकात बुडून असते. पांडूरंगाचे श्रीमुख म्हणजे सुखाची ओतीव राशीच. आनंदाच्या कोटी सुखाचा झरा असा पांडुरंग. असा हा **काहीच्यावाहीच आनंद** त्याचे वर्णन कितीही केले तरी अपुरेच. वर्णनापेक्षा अनुभवच खरा. नाही का?

* * * *




नाद, रूप, ज्योती, गंध इत्यादी प्रकारे भगवंताचा अनुभव इंद्रियातीत असला तरी इंद्रियज्ञानासारखा वाटतो. या अशा अनुभवाच्या सत्यतेची काही गमके किंवा प्रमाणे म्हणा काही शास्त्रग्रंथात दिली आहेत. हा आनदंमय, अखंड, आत-बाहेर सारखा प्रत्यक्ष दर्शनाच्या स्वरूपाचा असतो.

आनंदमय याचा अर्थ तर स्पष्टच आहे. अखंड म्हणजे दिक्कालातीत. अवस्थातीत. आज आहे; उद्या नाही; आता आहे; मग नाही असा कालाने खंडित नाही. या ठिकाणी आहे; तर दुसऱ्या ठिकाणी नाही असा देशाने खंडित नाही. इतकेच काय पण जागृतीत आहे पण स्वप्नात नाही असा अवस्थांनी खंडित नाही. डोळे मिटून जो अनुभव येतो, तोच डोळे उघडे असताना पण येतो; असा हा आनंद आतबाहेर एकसारखा आहे. **"आत हरि, बाहेर हरि। हरीने घरी कोंदले।।"** असे आपले श्रीतुकोबाराय सांगतात.

**"देशकालवस्तुभेद हारपला। आत्मा निर्वाळला विश्वाकार।।"** जागृती, स्वप्न, सुषुप्ती, तूर्या या चारी अवस्थांत श्रीपांडुरंगाचे/भगवंताचे दर्शन

होते. कबीर महाराज असे म्हणतात, "**अंदर बाहर एक भया है।।**" हा अनुभव प्रत्यक्षज्ञानाच्या स्वरूपाचा आहे, म्हणजे अर्थातच ती कल्पना नाही.

हा अनुभव मनुष्याच्या बुद्धीने निर्माण करता येत नाही. हे "**सत्य-ज्ञान-आनंद**" वस्तूचे दर्शन (**म्हणजेच अनुभव**) आहे.

या अध्यात्मिक आनंदानुभवाच्या सत्यतेचे आणखी एक महत्वाचे गमक आहे. सर्व साक्षात्कारी पुरूषांनी (म्हणजे महिलांनी सुद्धा) केलेल्या आपापल्या अनुभवाच्या वर्णनातील एकरूपता. (Universality) सर्व कालातील, सर्व देशातील इतकेच काय तर सर्व संप्रदाय, पंथ आणि धर्मातील साक्षात्कारी महात्म्यांच्या आत्मानुभवात एकरूपता आहे. यावरून एकच-एक "**परमसत्यतत्व**" या सगळ्यांनी अनुभविले आहे. नाही का?

भ्रम अनेकांना अनेक प्रकारचे होतात-होतील. तसेच भ्रम आनंदमय, अखंड वा अवस्थातीत नसतात. पण सत्यवस्तू मात्र आनंदमय, अखंड आणि अवस्थातीतच अशी असते.

आणखी एक या अनंदानुभवाचे गमक आहे. साक्षात्कारी महात्म्यांची बुद्धी, भावना आणि क्रियाशक्ती यात सातत्याने सारखी वाढच होत असते. माणसाच्या जीवनावर (अगदी स्थूल, व्यावहारिक-प्रापंचिक स्तरावर सुद्धा) साक्षात्काराने/भगवंताच्या/श्रीपांडुरंगाच्या अनुभवाने होणारा "**सत्प्रभाव**" हा एक त्या अनुभवाच्या सत्यतेचे महत्वाचे गमक आहे. सर्वांच्या सर्वच शक्ती वाढतात असे जरी नसले तरी एखादी शक्ती खूपच वाढते व इतर काही थोड्या फार प्रमाणात वाढतात. उदाहरणार्थ, श्रीगुरूज्ञानेश्वर माऊलीच्या बुद्धी/प्रज्ञा, भावना, काव्यस्फूर्ती इत्यादी, श्रीतुकोबारायांच्या भावना व काव्यस्फूर्ती तर श्रीरामदास स्वामींच्या बुद्धी व क्रियाशक्ती यांचा उत्कट विकास साक्षात्काराने झाला. असे परिणाम भ्रमाने होत नाहीत तर फक्त आणि फक्त एका भगवंताच्या अनुभवानेच होतात.

असेच आणखी एक महत्वाचे गमक म्हणजे अशा साक्षात्कारी महात्म्यांची पूर्ण आत्मतृप्तवृत्ती. त्यांना कशाचीही आवश्यकता वाटत नाही;

कोणतीही वासना त्यांच्या चित्तात उरत नाही. त्यांचे मन अत्यंत पवित्र असून भगवंतावर त्यांचे नितांत प्रेम असते.

आनंदाने भरलेले असतात हे महात्मे! जगात अलिप्त असूनसुद्धा, जगाला खऱ्या शाश्वत सुखाचा मार्ग दाखवतात. सदा आत्मरति, आत्मक्रीड आणि आत्मतृप्त असतात. जसा आतून भरलेला पाण्याचा झरा बाहेर ओसंडून वाहात असतो; तसे अवघ्यांना आनंदच देत असतात.

असा साक्षात्कारी महात्मा पाहिल्यावर, "याला कसल्यातरी आनंदमय, संशयातीत, अखंड, नित्य, अवस्थातीत, देशकाळातील सत्य वस्तूची (म्हणजेच भगवंताची) प्राप्ती झालीच असली पाहिजे, त्यावाचून अशी अखंडाकारता येणारच नाही" याबद्दल तीळमात्र संशय उरत नाही. याला काही अलौकिक आनंदाचा ठेवा/निधान लाभला असला पाहिजे, त्याशिवाय अशी पराशांती व परमसंतोष त्याच्या ठिकाणी दिसणारच नाही अशी खात्री वाटते. असा महात्मा संगतीला लाभला, मग आनंदाला काय तोटा. नाही कां?

* * * *



## चिंतन २१७

भगवंतात तत्वत: सामरस्य पावलेल्या संतांचा सहवास एक क्षण जरी मिळाला, तरी त्याची तुलना स्वर्गसुखच काय पण मुक्ती निर्वाणाच्या महत्सुखापेक्षाही अधिकच असल्याने सत्संगाची तुलना अन्य कोणाशीही होऊच शकत नाही. तर मग भूलोकीच्या नश्वर, ऐहिक सुखाबरोबर, वैभवाबरोबर तुलना करणेच अयोग्य; अप्रस्तुत.

संत/श्रीगुरू हे सूर्य जसा आपल्या प्रकाशाने सर्व जडवस्तू प्रकाशित करतो; तसेच आपल्या कृपादृष्टीने **'सद्वस्तू'** म्हणजे ब्रह्म प्रत्यक्ष अनुभवास आणून देतात. श्रीगुरू/संत हेच आपले अत्यंत जिवलग मित्र, सखे, सोयरे

आहेत. किंबहुना ते आपले आत्मस्वरूपच आहेत. श्रीगुरू/संत हे या भूतलावर संचार करणारे सगुण साकार देवच म्हणावयास काहीच हरकत नाही. **"देव ते संत, देव ते संत। निमित्त त्या प्रतिमा।"** असे श्रीतुकोबाराय म्हणतात.

हे संत/श्रीगुरू सदा समतोल चित्ताचे, सर्वदा शांत व प्रसन्न, नि:पक्षपाती, क्रोधरहित, अत्यंत प्रेमळ अंत:करणाचे, दंभ-रहित, सर्वांचे खरे-खरे मित्र असतात, प्रियनर्म सखे सांगाती असतात.

श्रीगुरू "**महान**" असतात. मग महानता कशात? तर भक्तीयोगाच्या दृष्टीने, "**भगवंताचा आपल्या इष्टरूपात सगुण साक्षात्कार होणे**" या कसोटीस जो उतरतो तोच महान पुरूष. अशाच पुरूषाला/स्त्रीला भक्तीशास्त्रकार संत/श्रीगुरू म्हणतात.

श्रीगुरूंवर फार मोठी जबाबदारी असते. आपल्या शिष्याला वेदांतील तत्वज्ञान व अध्यात्मविद्या यांचे सारातील सार देऊन, त्याच्या जन्म-मरण स्वरूप प्रपंचाचा शेवट करणे हेच श्रीगुरूंचे कार्य/जबाबदारी. मग असा जन्म-मरण परंपरेतून मुक्त झालेला, कृतार्थ झालेला शिष्य भक्तीप्रेमसुखानुभवासाठी केवळ आपल्या सत्तेने भगवंताची सेवा करण्याकरताच जन्म/देह धारण करू शकतात. **"मुनी मुक्त झाले भेणे गर्भवासा। आम्हा विष्णुदासा सुलभ तो।।"**

अशा महापुरूषाची गाठ पडणे व त्यांचा आपल्यावर "**कृपानुग्रह**" होणे ही गोष्ट दुर्लभ खरी तरी ती एका कृपाळू, दयाघन भगवंताच्याच कृपेने प्राप्त होते. आपल्याला "**श्रीगुरू भेटले**" याचाच अर्थ आपल्यावर भगवंताची कृपादृष्टी आहेच; त्याशिवाय "**श्रीगुरूभेट**" शक्यच नाही.

पुष्कळदा काय होते पहा. शिष्याला महापुरूष शोधण्यासाठी शोधाशोध, भ्रमण, देशांतर, भटकंती करावी लागत नाही. मग! आपल्याला सत्पात्र अधिकारी साधक भेटावा यासाठी महापुरूषच उत्सुक असतात! आपल्या अनमोल अशा अध्यात्मसंपत्तीचे वारसदार होण्यास कोण योग्य आहे? असा साधक, उत्तराधिकारी भेटावा अशी त्यांना आस असते. एकूण काय,

महत्कृपा व भगद्कृपा या अन्योन्य संबंधी आहेत. भगवंतच श्रीगुरू-शिष्य, सिद्ध-साधक यांची जोड ठरवून तसा दोघांचा योग घडवून आणीत असतो. श्रीगोस्वामी तुलसीदासजी काय म्हणतात पहा, "**अब मोही भरोस हनुमंता। तिनु हरिकृपा मिलहि नाहि संता।।**"

असा महापुरूष भेटला तर त्याच्याशी सतत संपर्क साधणे दुर्लभ. संपर्क साधला, संगत दुलर्भ; संगत लाभल्यावरसुद्धा तो ओळखता येणे त्याहीहून कठीण; महापुरूषाला/श्रीगुरूला काही शिंगे फुटत नाहीत; शेपूट येत नाही; डोळे मोठे होत नाहीत; वजन/उंची वाढत नाही; रंग बदलत नाही. तो सर्वसामान्याप्रमाणेच दिसतो, वागतो, खातो, पितो, बोलतो, चालतो, उठतो-बसतो, झोप घेतो, हिंडतो-फिरतो, सगळे जीवन व्यवहार करतो आणि यामुळेच ओळखणे कठीण.

खरा महापुरूष आत्मप्रौढीपासून दूर-दूर असतो आणि अतिशय प्रसिद्धी-पराङ्मुख असतो. आपले तप, ज्ञान, अध्यात्मअनुभव याचा उच्चार करीत नाही तर मग गाजा-वाजा करण्याची गोष्टच सोडा! आपले अनमोल असे अध्यात्मधन तो गुप्त ठेवण्याची पराकाष्ठेची दक्षता घेतो. तो विवेकी, मितभाषी व अंतर्मुख असतो. सदा आत्मचिंतनात निमग्न असतो आणि त्याचबरोबर आपल्या संगतीत असणाऱ्यास चिंतन करण्यास (चिंता नव्हे) सदा प्रवृत्त करत असतो; प्रोत्साहन देत असतो.

या सर्व गुणांमुळे त्याच्या अध्यात्मिक अधिकाराची दूरून काहीच कल्पना येत नाही. पण त्याच्या सततच्या सहवासात सूक्ष्म निरिक्षण करून आपल्या अंगभूत दैवीसंपदेनेच त्याची ओळख पक्की होते. इतकी पक्की होते की आपण त्या आत्मरूपाशी स्वरूपत: समरस, एकरस होऊन राहतो.

* * * *

# चिंतन २१८

भक्तीप्रेमसुख कसे आहे? तर मुक्या माणसाने आस्वाद घ्यावा तसे हे भक्तीप्रेमसुख अनिर्वचनीय आहे.

ही अनुराग-भक्ती अनिर्वचनीय कशी आहे, याबाबत भक्ताचार्य श्रीनारदांनी एक दृष्टांत दिला आहे. मुक्या माणसास पंचपक्वान्नाचे, सुरस, स्वादीष्ट, सात्विक भोजन घातले, मधुर-रसदार, शीतल, सुगंधी पेय पाजले व नंतर त्रयोदशगुणी तांबूल/विडा खावयास दिला, तर त्याला आनंद तर निश्चित झालेला असतो. तथापी वाणीच्याद्वारा त्याला तो अभिव्यक्त मात्र करता येत नाही. त्याचप्रमाणे भगवद्-प्रेमाचा आस्वाद सातत्याने घेत असतानाही, त्याचे यथार्थ वर्णन करणे अशक्यच असते. "**प्रेम नये सांगता, बोलता, दाविता। अनुभवे चित्ता चित्त जाणे।। तुका म्हणे बरे विचारावे मनी। आणिक भल्यांनी पुसो नये।।**" श्रीज्ञानराज तर म्हणतात, "**हे अनुभवाचि जोगे। नोहे बोला ऐसे।।**"

जो मुका नाही, त्याची गत काय होत असते? आस्वादन म्हणजे मुखाने सेवन, भक्षण करणे. ते चालू असताना कोणा वाचस्पतीलाहि बोलता येत नाही; आणि जेंव्हा आपण बोलत असतो, त्या वेळेपुरते अन्नसेवन व चर्वण बंद पडलेले असते! हा तर आपला प्रत्येकाचा अगदी सामान्य अनुभव आहे.

तथापी भगवद्-प्रेमाची गोष्ट अगदी वेगळी आहे. भक्तीप्रेमसुखाचा दिव्य, पवित्र, अमृतअनुभव घेत असताना, तसेच त्यानंतरही त्याबद्दल कसलेच वर्णन करण्यास भक्त केवळ असमर्थ असतो. तो स्तब्ध होतो; मुग्ध होतो. मुंगी पर्वत चढू लागली तर वर्णन काय व कसे करणार नां? म्हणूनच परमात्म्याचे यथातथ्य वर्णन न करता आल्याने वेदांना पण "**न इति, न इति**" असे म्हणून मौन धरावे लागले. नदीत, तलावात, विहिरीत स्नान करणारा बोलत असेल, तर त्यावेळी त्याचे डोके निश्चितच पाण्याच्या वर असणारच; आणि

जर डोके पाण्यात बुडाले असेल, तर त्यावेळी त्याची वाचा खात्रीपूर्वक बंदच पडलेली असणार. नाही का?

ज्याला या अलौकिक, पवित्र ईश्वरी प्रेमभावाचा प्रत्यक्ष अनुभव नाही, तो शब्दांची उधळण तर खूप करेल आणि ज्याने हा भक्तीरस सेवन केला तो! कबीर म्हणतात, "**डुबै सो बोले नही। बोले सो डुबै नही। गहरा भक्तीप्रेमसमुद्रमें। जो कोई डुबै, वो चतुर सुजान।।**"

मुक्यास रसास्वादाचे वर्णन करता येत नाही, हे तर सगळ्यांनाच ठाऊक आहे. मग नारदासारख्या भक्ताचार्यांनी त्यासाठी एवढे सूत्र रचण्याचे काय प्रयोजन?

या प्रश्नातूनच मोठा सूचितार्थ प्रकट होतो. मूक म्हणजे वाग्-इंद्रिय निकामी असणे. सूत्राचे वैशिष्ठ्यच असे असते की, एका गोष्टीचा स्पष्ट निर्देश असतो व बाकीची अंगे जाणकारांसाठीच अर्धस्फुटरीतीने सांगितलेली असतात. याच न्यायाने नेत्र, कर्ण, घ्राण, मन व बुद्धी ही सर्वच ज्ञानेंद्रिये मूक होतात. या दिव्य प्रेम-भक्तीरसाचा ठाव घेण्यास असमर्थ ठरतात. भगवंताचे सत्य-स्वरूप आणि त्या भगवंताची/श्रीगुरूची गूढ-प्रचंड **भक्तीप्रेमशक्ती** ही मानवी ज्ञानाच्या कक्षेत आणणे शक्य नाही.

ऐश्वर्य, चैतन्य, संपन्न-सगुण-साक्षात्कार आणि भगवंताची ढग-फुटीसारखी अफाट-अचाट प्रेमामृतवृष्टी अनुभवणाऱ्याची अशीच कुंठीत स्थिती होते. "**तुका म्हणे वाचा। राहिली कुंठीत।।**" मात्र या अनुभवातून तो भक्त शांत, तृप्त, आनंदनिर्भर आणि अखंडत्वाने भगवद्प्रेमाच्या प्रवाहात सचैल डुंबत असतो.

जर या अनुभवाला इंद्रियांनी, मन-बुद्धीने मापण्याची, वर्णनाची कसोटी लागू पडत नाही तर मग हा श्रेष्ठ अनुभव आला आहे हे ओळखणार तरी कसे नां! काही प्रमाण (Evidence), काही गमक नसेल तर, कोणी गप्पा/थापा मारत असला तरी कळणार कसे?

मुक्या माणसाला बोलता येत नसले तरी तो खुणांनी, हावभावांनी आनंद

व्यक्त करू शकतो. त्याचप्रमाणे ही अनिर्वचनीय **प्रेमभक्ती** लाभलेला भक्त आपला **आनंद–परमानंद** अनेक प्रकारे व्यक्त करत असतो. अधिक स्थूल खूणेने सांगावयाचे तर "ज्याचे पोटभर भोजन झाले तो लागलीच भोज्य वस्तूंकडे पाहणार नाही. **अमृतप्राशन** केलेला, अमृततुल्याची अपेक्षा करणार नाही." त्याप्रमाणे भक्तीप्रेम–अमृताची ज्याला प्राप्ती झाली तो अन्य काहीच मागणार नाही. भगवद्‌भक्ताला, गुरूभक्तालाच ह्या अवीट अशा भक्तीप्रेमरसाची चव कळते.

* * * *



## चिंतन २१९

अंत:करण एकवटून, श्रीहरीचे **अ–खंड** ध्यान, स्मरण करू लागल्यावर, मग यापुढे आपोआप काळ हरिस्मरणात जाऊ लागतो. यामुळे स्मरणाचे ओझे वाटत नाही आणि भगवद्–स्मरण कोणतेही आयास–प्रयास न करता घडते! यानंतर मग कोणताही लाभ–हेतू नसणारी, आत्यंतिक भक्तीप्रेमाने ओथंबणारी चित्तवृत्तीच्या धारा जेंव्हा आनंदकंद श्रीहरीच्या दिशेने वाहू लागतात, हीच निर्मल भक्ती. अशा निर्मल–मंगल भक्तीनेच भगवंताला आपलासा करता येते.

असे हे भगवंताचे स्मरण, अनुसंधान सदा–सर्वकाळ म्हणजे दिवस व रात्र, प्रत्येक क्षणी, प्रत्येक श्वासागणिक होत राहील असा नामस्मरणाचा अभ्यास करावयाचा. कारण अशा अखंड हरिस्मरणाच्या द्वारेच अचानकपणे हरिदर्शनाचा लाभ होतो.

**हरीचे चिंतन अखंड रात्रंदिन। फुकटचा तो क्षण जाऊ नये ।।१।।**

**येता जाता बोलता खान पान होता। सदा देता घेता हरिस्मरण ।।२।।**

**बैठकी अंथरूणी एकांती लोकांती। आठवावा रमापती अखंडित ।।३।।**

**आनंद म्हणे नित्य भगवंताचे दर्शन। तेणे सुख–समाधान पूर्णानंद ।।४।।**

जरा विचार करा, आपण आपल्या स्वत:स कधीतरी विसरतो काय? तर कधीच नाही. छत्री-पिशवी-पाकीट-चष्मा इत्यादी विसरतो; एकादशीसारख्या व्रताचा विसर होतो! पण आपला विसर कधीच नाही. आपले अस्तित्व, मन, बुद्धी, पद, जिवंतपणाची आपल्याला प्रतिक्षणी जाणीव होतच असते. आपले मोठेपण, नसलेले सुद्धा, आपण विसरू शकत नाही. हे सारेच्या सारे आपण कधीच विसरत नाही. ह्या सगळ्याचे आपल्याला नित्य भान असते-स्मरण असते. त्यासाठी आपल्याला काही प्रयत्न करावे लागत नाहीत. अशीच अवस्था भगवंताबद्दल-श्रीगुरूंच्याबाबत झाली पाहिजे.

तत्वत: विचार केला तर जीवचैतन्य (**म्हणजेच आपण**) हेच मुळी ईश-चैतन्य (**म्हणजे परब्रह्म**) आहे! साधनेच्या आरंभी-आरंभी, भक्त व भगवंत यात द्वैतभाव/वेगळीक वाटते (असत नाही). नामाच्या अखंड अनुसंधानाने हे वाटणारे अंतर कमी-कमी होत जाते. हीच "**सालोक्यता**" अधिक-अधिकाधिक एकाग्रता, दृढता साधल्यावर मग "**सामिप्यता**" त्यानंतर आपण व आपले उपास्य दैवत/श्रीगुरू हे जणू काय परमभक्तीप्रेमाच्या दिव्य-पवित्र रज्जूने बांधलेले आहोत अशी प्रत्ययात्मक जाणीव नित्य, क्षणोक्षणी अनुभवास येऊ लागते! आणि याचीच पुढील पायरी म्हणजे भक्त-भगवंत-शिष्य-श्रीगुरू यांची एकरूपता-**तादात्म्यता** हीच संसिद्धि/परमगती/परमपद.

देहभान विसरलेल्या स्थितीत फार अधिक काळ राहता येत नाही. भक्त हा परिणामी पुन: व्यवहारदशेत येतो. परिणामी श्रीहरिचिंतनात खंड पडण्याचा दाट संभव असतो आणि काही वेळानंतर ध्यानात येते की आपले नामाचे/ भगवंताचे अनुसंधान सुटले.

हे ध्यानात येणं ही नामस्मरणसोपानातील एक अतिमहत्वाची पायरी आहे. जेंव्हा लक्षात येईल त्या क्षणी आपल्याला अत्यंत दु:ख झाले पाहिजे. "अरेरे, माझ्याकडून केवढा तरी घोर अपराध झाला! मी भगवंतास विसरलो! श्रीगुरूंनी दिलेल्या नामाचा मला असा कसा काय विसर पडला?" असे विचार येऊन आपल्याला अगदी प्राणांतिक यातना व्हाव्यात. कशा? **किती**? तर प्राणवायूचा कृत्रिम पुरवठा काढून टाकल्यावर, त्याला ज्या, जेवढ्या **यातना होतील** तेवढ्या.

भगवंताचे नित्य स्मरण हेच नामधारक भक्ताचे अन्न असते; जीवन असते. म्हणून अर्धक्षणाचासुद्धा खंड पडल्याने त्याला खंत वाटते. जीव कासावीस होतो. याचमुळे **"हेचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।"** असे मागणे असते. एवढेच मागणे असते.

प्रल्हाद काय म्हणतोय ते पहा, **"नारायणा, तूच माझ्या हृदयात राहण्यास ये रे, म्हणजे मला तुझे निरंतर स्मरण होईल!"** ते सुद्धा (Without any break)

**"वेद अनंत बोलिला। अर्थ इतुकाची साधिला।। विठोबासी शरण जावे। निजनिष्ठे नाम गावे।।"** आपण फक्त त्याच्या अखंड स्मरणात असावे. नाही तो अहंकार घेऊन **"काळजी"** करत बसू नये "कसं होईल? काय होईल?" या अष्टाक्षराऐवजी **'रामकृष्ण हरि'**च्या अखंड स्मरणात असावे.

* * * *




अनादी कालापासून वाद-पोकळ चर्चा चालू आहे, भक्तीने ज्ञान, का ज्ञानाने भक्ती? वाद काही असोत. ज्ञान श्रेष्ठ का भक्ती श्रेष्ठ? भागवतकार सांगतात, ज्ञान आणि भक्ती परस्परांना पूरक आहेत; परस्परांना आश्रयभूत होणारी आहेत.

वाफेवर चालणाऱ्या आगगाडीस पाण्याची वाफ जेवढी महत्वाची, पूरक, पोषक आहे; तीतकीच **"भावना"** ही भक्तीमार्गाचा प्राण आहे. ही भावना भगवंताकडे वळलेली, एकप्रवाही आणि उत्कट पाहिजे. तरच ती भक्ती-भावना म्हणता येईल व अशी भावना जीवन-स्थित्यंतर करू शकणारी होईल.

भक्ती म्हणजे भावनांचा क्षणिक उद्रेक आणि खळखळाट नाही. श्रेष्ठ पराभक्ती म्हणजे अचल श्रद्धेने केलेल्या दीर्घ भक्तीसाधनेचे परिपक्व स्वरूप

आहे. आपल्या सर्व भाव-भावनांना इंद्रिय, मन, बुद्धी यांच्या सर्व व्यवहाराला विशिष्ट दिशेने म्हणजेच भगवद्वर्ती करूनच ही मंगल, परमपवित्र पराभक्ती प्रगट होते आणि म्हणून भक्तीला भगवंताच्या ज्ञानाचे अधिष्ठान आवश्यक आहे. तसे नसेल तर सगळा गोंधळच होईल. भक्त म्हणवणारा कोठेतरी ठेचाळेल; आंधळ्यासारखा अडमडेल.

ज्याची भक्ती करावयाची त्याचे महात्म्यज्ञान व तात्विक स्वरूप निश्चित माहित असले पाहिजे. ही भक्तीची साधना, उपासना कशी करावयाची, त्यातील प्रगतीचे टप्पे, मार्ग काय, त्याचबरोबर या मार्गात अडथळे कोणते येतात या सर्व गोष्टी कळावयास पाहिजेत. म्हणून "**भक्ती**" हे साधन स्वीकारले तरी भक्ती फलप्रद अवस्थेपर्यंत वाढण्यासाठी ज्ञानाची बैठक आवश्यक आहे आणि अशी ज्ञानाधिष्ठित-संपन्न भक्ती परमेश्वराला अत्यंत प्रिय आहे. नुसते ज्ञान प्रिय नाही तर ज्ञानानेयुक्त अशी भक्ती प्रिय आहे.

यासाठीच ह्या भक्तीमार्गात अध्यात्म्य-निरूपण व चर्चा, पुराणे व गीता आदी ग्रंथांचे वाचन, पारायण, **श्रवण**, पठण; संतांचा सहवास, त्यांची प्रवचने, कीर्तने आणि त्याचबरोबर या सर्वांचे मनन व सात्मीकरण/अनुसरण करावयास हवे.

प्रेमाचा व श्रद्धेचा विषय श्रीगुरू/भगवंत असेल तरच तज्जन्य अंत:करणाच्या प्रवाहास भक्ती असे म्हणतात. संतश्रेष्ठ तुलसीदासजी म्हणतात, "**प्रिति बिना नही भक्ती दृढाई। ज्ञान बिन न होई प्रतीति। बिनु प्रतीति होई नही प्रीति।।**"

ज्ञान, योग, कर्म आणि भक्ती हे चार प्रमुख अध्यात्ममार्ग असले तरी ते काही हवाबंद कप्पे नाहीत. अंतिम ध्येय एकच असल्याने वरील प्रत्येक मार्गामध्ये अन्य मार्गातील काही-काही भागांची सरमिसळ होतच असते.

ज्ञान हे भक्तीचे साधन आहे का भक्ती ज्ञानाचे साधन आहे, असा वाद व्यर्थ आहे. कधीच वाद करू नये. ज्ञान, भक्ती हे एकमेकांचा आश्रय करणारे आहेत. आपल्या हृदयात सतत स्फुरणारा, प्रवाहीत असा भक्तीचा **ओलावा** नसेल तर

ज्ञानसाधना म्हणजे शुष्क शब्दच्छल होईल आणि ज्ञानाच्या आश्रयाशिवाय भक्तीसाधना यंत्रवत्, निर्बुद्ध, निस्तेज, आंधळी-लुळी-पांगळी होईल.

मग नाथमहाराज काय सांगतात पहा, **"भक्तीने ज्ञानासि दिधले महिमान। भक्तीचे उदरी जन्मले ज्ञान। भक्ती ते मूळ, ज्ञान ते फळ। वैराग्य केवळ तेथीचे फूल। फूल-फळ दोन्ही येरयेरा पाठी। ज्ञान वैराग्य तेवी भक्तीच्या पोटी।।" "भक्तीयुक्त ज्ञान तेथे नाही पतन। भक्ती माता तया करीतसे जतन."**

याचा अर्थच **"भक्ती तेची ज्ञान। ज्ञान तेची भक्ती।।"** असाच आहे.

* * * *



## चिंतन २२१

आपल्या परमप्रेमास्पद आराध्य श्रीगुरू/भगवंताची सर्वतोप्रकारे सेवा मोठ्या प्रेमभक्तीआदराने करणे, तसेच त्या आधीची व नंतरची तदनुषंगिक कामे तितक्याच श्रद्धेने, संकोच न करता करणे आणि त्याबद्दल अतीव ओढ असल्याने अन्य कशाची तमा न बाळगणे हेच भक्तीचे मुख्य लक्षण आहे.

या सर्व गोष्टी श्रद्धेने, प्रेमाने, **सातत्याने** आचराव्यात. ह्याने सर्व साधनाद्वारा साधकाची सम्यक् आणि सर्वांगीण उन्नतीच होत असते. यामुळे इंद्रिये, शरीर, वाणी, मन, बुद्धी आणि सर्व भावनांचा एककेंद्रित प्रवाह हे सर्व आपल्या प्राणप्रिय उपास्य श्रीगुरू/भगवंताशी एकसंध जोडले जातात. बाह्य व अंतर जीवन सलग, अखंडत्वाने आनंदकंद नंदनंदनाशी **एकरूप** होते.

ही सेवा काही यंत्राप्रमाणे होणारी क्रिया नव्हे. तर हृदयातील भावभक्तीच्या उमाळ्यातून ही सेवा आकाराला येत असते. अंत:करणात परमादर, आनंद आणि भक्तीप्रेम ओथंबलेले असावे म्हणजे मग या सेवेतील आनंदानुभवाची प्रचीती येतच राहते.

ही सेवा काही केवळ शारीरिक क्रिया नाही तर आपल्या परम आराध्याबद्दल वाटणाऱ्या पूज्य-शुद्ध-निर्मळ भक्तीप्रेमभावनेची अभिव्यक्ती आहे. ही सेवा "**सानुराग**" म्हणजे स-अनुराग तथा सर्व चित्तवृत्ति एकवटून भक्तीप्रेमपूर्वक होत असते. "**काया, वाचा आणि मने। सद्भावे श्रीगुरू अर्चना करणे। जीवे, चित्ते, वित्ते, प्राणे। अशी ही सेवार्चना।।**"

अशा सांगोपांग सेवेने, भरकटणारे मन स्थिर होते. एकाग्र होते. "**भागा रे सब मनका धोका।।**" असे निर्भयच नाही तर अभयतापूर्वक विकसित होते. अमंगल, अभद्र विचार शंका-कुशंकापासून मुक्त होते आणि आनंदाने बहरते. हा आनंद दीर्घ-प्रदीर्घ काळ टिकणारा असतो.

सारांश काय तर आपल्या मनावर कोणतेही **दडपण** न येता, इंद्रिये-मन-बुद्धी यांचे स्वाभाविक व्यापार बंद न करता आपली सर्व इंद्रिये व देहसंस्था उत्कट भक्तीप्रेमभावाने श्रीगुरूच्या/भगवंताच्या सेवेत उल्हासाने-उत्साहाने गुंतविली जातात. खरोखरी सेवा म्हणजे सेवक आणि सेवनीय यांच्यातील अंतर नाहीसे करून सेवनीय श्रीगुरू/भगवंताला या सेवेद्वारा सेवकाच्या हृदयात कायम क्षेत्रसंन्यासी म्हणून निवास करावयास लावणारी अमोघ, अचाट, अफाट सेवाशक्तीच आहे.

या सेवेचा लाभ, आनंद काही दिवसातच अनुभवावयास येतो. मुख्य अनुभव म्हणजे मनाची चंचलता मोडते; चित्तस्थैर्य लाभते. भय उरतच नाही.

या सगळ्या सेवापुष्पाच्या माळेत "**अनुराग**" हे एकच बळकट न तुटणारे सूत्र आहे. अनुराग म्हणजे उत्कट भक्तीप्रेमाने उद्भवणारी व ही "हरिभक्ती-प्रेमसुधा" सतत मिळावी अशी सात्विक आसक्ती होय. व्यवहारात आसक्ती म्हणजे लंपटपणा. पण, फलाशा न ठेवता परमेश्वराबद्दल/श्रीगुरूसेवेबद्दल अनिवार्य ओढ असणे, अकृत्रिम स्नेहाने, निरपेक्ष प्रेमाने अखंडित आसक्ती वाटणे ही तर उच्चस्तर भक्तीची, निर्मल भक्तीची अत्यंत श्रेष्ठ अशी परमोच्च अवस्था आहे. या उत्कट श्रीगुरू/ईश्वर अनुरागाच्या अखंड, एकधारा प्रवाहामुळे अन्य गोष्टी-वस्तू यांच्याकडे धावणाऱ्या प्रवृत्तीला पायबंद पडतो.

याचा परिणाम काय तर एकदा का "**अनुराग-भक्ती**" उदित झाली की सेवकाकडून त्या एक प्रियाची परम सीमा असणाऱ्या परमेश्वराचे/श्रीगुरूचेच स्मरण, चिंतन, ध्यान चालते. सारांश या अशा सानुराग भक्तीनेच सेवा यथार्थाने संपन्न होते.

सेवाभावाने चैतन्यपरमात्मा आपलासा होतो. सेवाभक्ती ही आमरण चालणारी, उत्तरोत्तर विकास होणारी अखंड प्रक्रिया आहे. अशी सेवा होण्यासाठी तदाकारता, तल्लीनता, तद्रूपता साधावयाची. ज्ञानोबाराय म्हणतात, "**ऐसे मीचि होवोनी पांडवा। करिती माझी सेवा।।**" भगवद्पूज्यपाद श्री शंकराचार्य पण सांगतात, "**शिवो भूत्वा-शिवम् यजेत**" मग सेवेचा आनंद काय वर्णावा? भयात सेवा नाही आणि सेवेत भय नाही. एकरूपतेत कुठे **भय** असते का?

* * * *



## चिंतन २२२

देहाश्रित आहे; साकार आहे; सगुण आहे; नाम आहे; रूप आहे; जाती आहे; क्रिया आहे; आश्रय आहे हे सगळे असूनही अगदी प्रारंभापासून प्रश्न आहे की, मी आहे तरी कोण? ही देहउपाधी मला कशाकरिता प्राप्त झाली आहे? माझा पिता कोण? माझी माता कोण? जे नाम-रूप-मन-बुद्धी इ. लाभले आहे, त्यातून मला काय करायचे आहे?

मी सूक्ष्म स्वरूपात असतानाच जसजसा या प्रश्नांची उत्तरे शोधू लागलो, तसतसे प्रश्नांचे धुके विरू लागले. संशय फिटू लागले. सत्यतत्वाच्या ज्ञान प्रकाशाने अज्ञानरूप अंधकार संपू लागला. जाणीव झाली ती मूलभूत शिवस्वरूपाची. मी वासुदेव आहे. पाप-पुण्य, जन्म-मृत्यू काहीच नाही; तर केवल-स्वरूपी सत्-चित्-आनंदघन असा आत्माराम आहे.

हा आत्मविचार दुभंगलेला नसला तरच आचार व कृती दृढ आणि अभंग राहते. अशा दृढ कृतीत स्वस्वरूपानुभूतीची गिरिशिखरे उल्लंघून त्यावर अखंडाकारतेने आरूढ होण्याचे सामर्थ्य येते.

खूप वाचले, वेदांतच काय, जाबाली, नारद, मनू यासारख्या थोर विचारवंतांचे ग्रंथ अभ्यासले, उपनिषदे, ब्राह्मण-आरण्यके, षड्दर्शने, वेदांगे, पुराणे, संत साहित्य बघितले; या सगळातून रूढी काय आणि वैदिक जीवनमूल्ये काय याचा निवाडा झाला. त्यातूनच विरूक असावे पण विरूप नसावे हे शिकलो. चंदनवृक्ष आणि चंदन गंधशाश्वतताच शिकवतात. वेदविचारही शाश्वताचा भोक्ता आहे. बकुळी-ओवळी ही फुले आपला गंध सुकल्यानंतरही जपतात. ही फुले जशी सुकल्यानंतरही आपला गंध जपतात तसे विरक्तीतही भक्तीप्रेमभाव, विश्वास, सत्य या मूळधारणा जपाव्यात. हे वेदसूत्र आहे.

नदी ज्याप्रमाणे निरपेक्षतेने वाहून दोन्ही तटांवरील प्रजाजनांना, प्राण्यांना, वृक्षांना, लतांना इतकेच काय तर अगदी खुरट्या अशा तृणांना तृप्त करते तसेच वागावे हे कळू लागले. प्रसन्नतेने अवघ्यांना निर्मळ प्रेमभाव द्यावा, त्यात विरक्तीचा पडदा आड येऊ नये. भक्तीप्रेमाचा विचार-आचार-प्रसार विकसित करावा, त्यासाठी मूलभूत आनंदस्वरूपी राहावे, सहवासातील सर्वांच्यावर केवळ आनंदाचीच उधळण करावी, दुष्ट रूढी नष्ट कराव्यात. आनंदाची प्रतिभावना आनंदच असते. आनंदी रहा हाच बोध श्रीगुरूंकडून मिळाला.

भगवंताशी जवळीक साधण्यासाठी निसर्ग समजला पाहिजे. निसर्गाशी एकरूप कसे व्हावे याचे वर्म आपली उपनिषदे शिकवतात. आपण निसर्गावर प्रेम करावे. निसर्ग आपल्याला प्रतिप्रेम देतो. ही भक्तीप्रेमाची देवाण-घेवाण भगवत्स्वरूप जाणल्यावरच होते. निसर्गाचे पानन्-पान, वाऱ्याची झुळूक, जळाची एखादी चुळूक, चांदणे, उन ही सगळी भगवंताचीच रूपे आहेत. या सर्वात व आपल्यात एक मूलभूत भक्तीप्रेमाचे नाते आहे. हे पवित्र नाते हाच एक भगवंताच्या अस्तित्वाचा सुंदरसा पुरावा आहे. ही सगळी पंचमहाभूते, ही

इंद्रिये, त्यांच्या तन्मात्रा, यांच्यातील अभूतपूर्व सहकार्य ही एक त्या भगवंताचीच ओळख आहे. या सहकार्यामागे परस्परांना जोडणारा एक सूक्ष्म पण नाजूकसा धागा असून तो अतूट व बळकट भक्तीप्रेमभावाचा धागा आहे. या सगळ्यात असलेले ईश्वराचे एकत्व हेच पूर्ण सत्य आहे. संपूर्ण ज्ञान आहे. याच भक्तीभावाने/ज्ञानाने आनंदघनरामाचे शाश्वत असे दर्शन सर्वांना होते.

परात्पर ईश्वर तोच ज्ञान आहे. विज्ञान आहे. कलाही तोच. निसर्ग तोच आहे. तोच सगळ्या आकारात आहे. निराकारात आहे; सजीव तोच आणि निर्जीवही तोच ना! हा अनुभव एकदा निश्चित झाला की जगत् तोच आणि जगदात्माही पण तोच! मग द्वेष संपतो; मत्सर उरत नाही. लोभ लयास जातो. मोहाची तर नामोनिशाणीच राहत नाही. उरतो तो एकच अवघ्यांच्या संबंधात भक्तीप्रेमभाव आणि विश्वास. कधी प्रगट रूपात तर कधी रागाच्या पडद्यामागे. उभ्या आयुष्यभराच्या चिंतनाचे सार सर्वांच्या हाती सोपवले आहे.

* * * *




इंद्रियातीत अशा परमार्थातील गोष्टींच्या/प्रमेयांच्या सत्यत्वाला शब्दच प्रमाण; आप्तवाक्यच प्रमाण. आप्त म्हणजे नातेवाईक नाहीत तर भगवद्भक्त. असा आप्तवाक्य या शब्दाचा अर्थ. या संतवचनांचा स्वत:ला अनुभव येईपर्यंत साधकालाही या एका शब्दावरच/शब्दप्रामाण्यावरच श्रद्धा ठेवून चालावयास हवे. स्वत:ला अनुभव येईपर्यंत **आप्तवाक्यच** प्रमाण. या अनुभवालाच श्रीमद्आद्यशंकराचार्य **''अपरोक्षानुभूति''** असे म्हणतात. अनुभव आल्यानंतर मात्र मग प्रामाण्याचा प्रश्नच उरत नाही; तर अनुभवाने खात्रीच पटते. भक्तांची वचने प्रयोगाकरिता गृहीतकृत्ये (Hypothesis) म्हणूनच स्वीकारावयाची व त्यांनी सांगीतलेल्या मार्गाने जाऊन, स्वानुभवाने

त्यांच्या सत्यतेचा पडताळा घ्यावयाचा असा हा परमार्थमार्ग आहे. "**मार्ग दाऊनि गेले आधी। दयानिधी संत ते।। तेणेचि पंथे चालो जाता। न पडे गुंता कोठे काही।।**"

स्वानुभूती हेच ध्येय. हेच सत्यतेचे शेवटचे गमक; शब्दप्रामाण्य हे एक साधन. भौतिक शास्त्रातही हाच नियम आहे. प्रथम गृहीतकृत्य; नंतर प्रयोग व शेवटी सत्यासत्यतेचा पडताळा. (Hypothesis; experiment and verification) म्हणून "**शब्द हा बहू सार, उपकाराची राशी**" असे आपले श्रीतुकोबाराय म्हणतात.

देवाला प्रियतम, परमप्रेमास्पद एक भक्तच; मातेला प्रिय एक बाळच; श्रीगुरूला प्रिय फक्त एक शिष्यच. जीवे, मने, अंगे, अनन्यभावाने ज्यांनी देवाला विकून घेतले, तो त्यांना पदरात घेतो; अशांना मग संसाराची चिंता कशाला उरेल? आयुष्याची चिंता कशाला राहील? राजाची कांता काय कधी कोरान्न मागेल का? हा देव भक्तांचा ऋणी आहे; सेवक आहे. **मुलाने** हक्क सांगून, **लेकराने** अट्टाहास करून अगर करावा आणि देवांनी तो पुरवावा. तसे हे आहे. भगवंत म्हणतो, "भक्त हे माझे दैवत आहे; सर्वस्व आहे. तो **केविलवाणा** दिसला तर त्याची **लाज** मला; तुम्हा संतांचे बोल वाया गेले, तर मग माझ्या ईश्वरत्वाचा काय उपयोग?" असे भगवंत म्हणत असतो. सेवकाइतकाच काय त्यापेक्षाही खूपच तत्परतेने देव भक्ताला, श्रीगुरू शिष्याला सांभाळत असतात. "**भक्त समागमे सर्वभावे हरि। न सांगता करी सर्व काम।।**" अशी संतांची साक्ष आहे. भगवंत/श्रीगुरू सर्वतोपरी सहाय्य करतच असतात; धीर मात्र धरावयास हवा. भक्ताने/शिष्याने **निर्वाण** मांडावे; देव/श्रीगुरू कधीही उपेक्षा करणार नाहीत.

एकदा त्याचा अंकित झाल्यावर, मग तो तिष्ठत उभा राहतोच. तो दीननाथ, पतितपावन आहे. सर्व भार त्याच्यावर घालून आपण केवळ त्याच्या **नामस्मरणस्वरूप** प्रेमभक्तीत मग्न होऊन **रहावे**. तोच भक्ताला वैकल्याचे, मोक्षाचे, भक्तीप्रेमसुखाचे दान करतो. **दासाला जड** भारी पडले

तर त्याने देवाचे/श्रीगुरूंचे चिंतन करावे. ''**पडता जडभारी। दासी आठवावा हरि।। मग तो होऊ नेदी शीण। आड घाली सुदर्शन।।**'' दासाला तो शीण होऊ देत नाही. विघ्ने बारा वाटांनी पळवून लावतो.

श्रीगुरू/भगवंत, शिष्याला/भक्ताला अंतर कधीच देणार नाही, हे वचन कधीच खोटे होणार नाही; ह्यालाच आप्तवाक्यावरील विश्वास म्हणतात.

वरील मोक्षदायी, भक्तवत्सल, शिष्यप्रेमी देवाचे/श्रीगुरूंचे गुण प्रत्यक्ष कोठे दृष्टीस पडतील का असा प्रश्न यावयाचे कारण नाही. या गुणांचे **कोणातरी** देहधारी व्यक्तीत दर्शन होते आणि श्रद्धा वाढण्याला त्याचा उपयोग होतो. अज्ञेय, अदृश्य अशा भगवंताच्या गुणांच्या चिंतनाने उत्पन्न होणाऱ्या प्रेमभावापेक्षा त्या गुणांच्या कोणा व्यक्तीत प्रकट झालेल्या गुणदर्शनांनी अधिक उज्ज्वल भावना वाढीस लागतात.

भाव वाढविण्याचे उत्तम साधन म्हणजे वैष्णवांची भक्ती. ''**आत्मज्ञाने चोखडी। संत ते माझी रूपडी।।**'' वैष्णव भक्त हे देवाचेच रूप. निराकार देव दिसत नाही; तो सगुण साकार झाल्याशिवाय त्याच्याशी बोलता येत नाही. ही उणीव भरून काढणाऱ्या देवाच्या मूर्ती म्हणजे वैष्णव. ''**देव ते संत, देव ते संत। निमित्त त्या प्रतिमा।।**''

अशांच्या संगतीने भ्रांतालाही ब्रह्मभाव प्राप्त होतो. ''**जयाचे नांव तीर्थरावो। दर्शने प्रशस्तीसि ठावो। जयाचेनि संगे ब्रह्मभावो। भ्रांतासी।।**'' त्यांच्या/श्रीगुरूंच्या स्मरणानेही त्याचीच योग्यता प्राप्त होते. त्याच्या बोधाने निधडे झालेले चित्त ब्रह्मासारखे **संशयरहित** होते.

* * * *

# चिंतन २२४

ब्रह्मरूप कसे आहे? तर अस्ती, भाती आणि प्रिय आहे; अशा तीन स्वरूपाने ते आपल्याला अनुभवास येते. आहेपणाच्या अस्तित्वाने ते या चराचराला व्यापून आहे, इतकेच काय पण तेच आपले सद्रूपही आहे असा स्वानुभव येतो. भाती म्हटले की जग हे चिद्रूप असून भासमान आहे असे प्रचितीस येते. जग व या जगातील सर्व वस्तूंचे ज्ञान बुद्धीगम्य आहे हे निश्चितच.

आता प्रिय म्हटले की जग हे **आनंदरूप** आहे असा स्वानुभव येतो. ज्याच्या बुद्धीचा विकास झाला आहे, म्हणजे **प्रज्ञेत** परिणती झाली आहे अशा कुशल प्रज्ञेस/प्रज्ञावंत आणि प्रयत्नशील साधकाला हा **आनंदानुभव** येतो. बाकीच्यांना मात्र नाम व रूप अशा दोन ढोबळ अंगांनीच जगाची ओळख होते.

आपल्या बुद्धीनेच **आत्मस्वरूपाकडे/आनंदघनाकडे** पाठ केल्याने आपल्याच शुद्ध अस्तित्व/म्हणजे सच्चिदानंद स्वरूपावर असंख्य कृतींचा उदय-अंत चालू असतो हे आपणास कळतच नाही. आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात पहा, "**अनेक बुद्धीचे तरंग। क्षणोक्षणा पालटती रंग। धरू जाता संग। तव तो होतो बाधक॥**" हेच आपल्या बुद्धीचे दारिद्र्य म्हणजेच स्वरूपाचे-आनंदाचे अज्ञान! दोरीत सापाची कधीही उत्पत्ती होत नसून, दोरीचे सापात रूपांतर होत नसून अगर दोरीवर खरोखरचा साप येऊन बसलेला नसून आपल्याला मात्र **सर्पाभास** होतो, तो आपल्या दृष्टीचा व मनाचा दुबळेपणा आहे.

आपले यथार्थ स्वरूपज्ञान झाले म्हणजे जग ब्रह्मस्वरूपच-आनंदमात्रच आहे हे अनुभवास येते. जडाच्या-असत्याच्या-दुःखाच्या चिंतनाने जडत्व प्राप्त होते. शून्याच्या चिंतनाने शून्यत्व प्राप्त होते. अध्यात्म म्हणजे शून्यात दृष्टी लावून बसणे नाही बर का! विवेकाने ह्या जड-शून्य अवस्थांचा त्याग करून सतत अखंड परब्रह्मस्वरूप श्रीपांडुरंगाचे/श्रीकृष्णाचे/श्रीगुरूचे चिंतन केल्याने मात्र **आनंदघन, निश्चल** अशी ब्रह्मरूपताच प्राप्त होते. निश्चयाने व तीव्र आतुरतेने, प्रेमाने भक्ताने नाम-रूपाचे अनुसंधान ठेवले तर या **आनंदघनरामाशी** ऐक्य-एकरूपता,

तदाकारता, तल्लीनता प्राप्त होण्याला मुळीच वेळ लागत नाही.

ही नामसाधना/परमार्थसाधना करत असताना आपल्याला मार्गदर्शनाची आवश्यकता असतेच असते. नामसाधक ज्या नामाची साधना करतो, त्या साधनमार्गातील साधनेची दिशा दाखविणारा कोणी जो तोच सद्गुरू. आपण बद्धाचे मुमुक्षु होऊ, भले मुमुक्षुचे उत्तम साधकही होऊ, पण या साधनेतून ज्ञानाची/भगवंताची प्राप्ती होण्याकरिता श्रीगुरूपदी पूर्णत्वाने शरणागती स्वीकारावी लागते हे अगदी खरे आहे.

या शरणागतीने काय होते? असे म्हणाल तर, हलके-हलके आपला अहंभाव-अहंकार विरघळू लागतो. अंगी नम्रता-लीनता (दीनता नव्हे) वाढते. साधनेची बैठक पाहून श्रीगुरू ती **धारणा** अधिकाधिक टिकण्याचा मार्ग सारखा सुचवत असतात. त्या मार्गानेच आपण साधकाने सतत पुढे-पुढेच जावयाचे. श्रीगुरूकृपेने आपला **मीपणा** विरघळला म्हणजे प्रज्ञेमध्ये स्वयंप्रकाश आत्मारामाचे निर्गुण व श्रीपांडुरंगाचे सगुण स्वच्छ दर्शन होते; यथार्थ ज्ञान होते. या ज्ञानामध्ये ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ह्या अतिसूक्ष्म अशा त्रिपुटीची जाग असते, त्यामुळे "**मी**" ज्ञानी आहे, "**मी**" ज्ञाता आहे ही परोक्षज्ञानावस्थाच असते.

आपल्या आत्मस्वरूपाची पूर्ण विस्मृती म्हणजेच गाढ अज्ञान. स्वात्मारामाचे अखंड आनंदमय अस्तित्व अनुभवण म्हणजे ज्ञान. ही आनंदरूपता सातत्याने अनुभवणे म्हणजेच आत्मज्ञान. यासच श्रीसद्गुरूकृपेने प्राप्त झालेली परोक्षज्ञानानुभूती असे म्हणतात. "**आनंदाचा अनुभव। हाही वृत्तीचाच भाव। तदाकारी (म्हणजे आनंदस्वरूपात) ठाव। वृत्तीसी नाही।।**"

"मी आनंद अनुभवतो" हा संग पण सोडून "**मी**" चे सर्वस्वी समर्पण म्हणजेच **आनंदस्वरूपता**. यालाच अपरोक्षज्ञान असे म्हणतात. नामाने आणि श्रीगुरूकृपेने हे लाभते. नामाने काय होते म्हणाल तर, स्वत:च्या वेगळ्या अस्तित्वाचा पूर्ण लय होतो. आपण भगवंतात-श्रीगुरूत-नामात पूर्णत्वाने लय पावणे, एकरूप होणे, हीच खरी नामसाधना.

ज्यात नाम-नामी आणि नामधारक ही त्रिपुटी न राहता नामधारक **नामीच** होऊन उरतो अशी नामसाधना. असे नाम मीळवा आणि त्याच नामात रहा.

* * * *

# चिंतन २२५

गोकुळात परब्रह्मपरमात्मा श्रीकृष्ण रूपांने प्रगट झाला. हा इतिहास आहे. गो नाम इंद्रिय; कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये यांचा समुदाय/संकुल हा ''गोकुळ'' या शब्दाचा अध्यात्मशास्त्रदृष्ट्या लक्ष्यार्थ. म्हणजे आता गोकुळअष्टमीचा सुंदरसा अर्थ झाला. आपल्या मन-बुद्धी सारख्या सूक्ष्म इंद्रियात परमात्मा अनुभव रूपाने; स्वानंदानुभवाने प्रकट होणे. गोकुळात भगवंतांनी केलेल्या क्रिया म्हणजे आपल्या सर्वांच्या अंतर्यामी असणाऱ्या आनंदघन आत्मारामाची आनंदस्वरूप, आनंदाधिष्ठित आनंदक्रिडा. आनंदसोहळा.

केवढा छान अर्थ आहे ना या गोकुळअष्टमीचा? असा स्वानंदभावाचा साक्षात्कारी पुरूष (म्हणजे स्त्री सुद्धा) स्वतःच विश्व होऊन विश्वात फिरत असतो. आपले श्रीगुरूज्ञानेश्वर महाराज काय म्हणतात, ''**हे विश्वचि माझे घर। ऐसी मती जयाचि स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला।।**'' हे पण त्यांना कमीच वाटले म्हणून पुनः सांगतात की, ''**विश्व होऊनि विचरे। विश्वामाजी।।**''

श्रीरामकृष्णांना भावावेगात असा भाव प्रतित व्हावयाचा की, ''गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य मीच आहे'' आता पूजेला साहित्य काय आणू व पूजा तरी कशाची करू? हा एकात्मभाव; ही एकरूपता; तदाकारता हीच तद्रूपता, तल्लीनता. होय की नाही?

अशा स्वानंदानुभवाने ''**आनंदच**'' होऊन जाणे याचेच नांव जीवनमुक्ती आणि अशा जीवन्मुक्ततेच्या पायावर उभे आहे ते भक्तीप्रेमसुखाचे **भागवत** मंदिर.

या परमानंदस्वरूपामुळे विदेहवृत्ती देहभावाचेच विस्मरण असा महात्मा, महाभागवत, महावैष्णव अमर होतो, मृत्यूला जिंकतो, याचा अर्थ त्याचा देह अमर होतो असा नाही. देह कधीच कुणाचा अमर होणार नाही. देह म्हटले की तो **मरणारच.** मग अमरत्वाचा अर्थ काय? तर अमरत्व याचा अर्थ असा

की संत ब्रह्मरूप होतात. म्हणजेच स्वानंदाकार होतात. "**मी**" म्हणजे देह नव्हे; आणि देह माझा पण नव्हे हा अनुभव त्यांना येतो. म्हणून देहनाशाचा- त्याच्या सुख:दु:खाचा संबंधच त्यांच्याशी उरत नाही.

"मी वस्तू आहे," ब्रह्म आहे, आता देह राहो अथवा जावो; मरणाऐलीकडेच देवाला मिळून गेल्यावर मग देह सोडताना दुःखच कसले? तर तो सोहळाच होतो; आणि तो पण अनुपम्य. सगळे त्रिभुवनच आनंदानेच दाट भरून गेलेले.

हा देह असेपर्यंत भगवंताचीच भक्ती-प्रेम-सेवा करावयाची. हे **भक्तीप्रेमसुख** हीच पराभक्ती किंवा सहजसमाधी. ही समाधी कधीच न मोडणारी. अखंड. कारण ते भगवंतापासून क्षणभर देखील दूर होतच नाहीत.

अशा अखंड समाधिअवस्थेतही वैष्णव याच **जगात वागत** असतातच. मग या अवस्थेचा त्यांच्या आचरणावर काय **परिणाम** होतो? या आनंदावस्थेतून "**भेदभाव**" संपतो. भेदभाव गेला की "**भयच**" संपते पहा. मग "**विश्वात्मभाव**" नांदतो. याच भावातून भूतदया, विश्वबंधूत्व, सर्वजण **सुखस्वरूप** असावेत ही जगत्कल्याणाची भावना इत्यादी गुण अगदी आपोआपच उदयास येतात; वाढीस लागतात.

**प्रेम** केवळ स्वत:च्या देहाबद्दल संकुचित न राहता तो **भक्तीप्रेमभाव** विश्वव्यापक होतो.मग रंजल्या-गांजल्यांना ते आपल्या हृदयी धरतात. आपल्या पुत्रावर जी दया तीच-तशीच दासांवरही करतात. अंत:करण अंतर्बाह्य मृदू होते/ झालेलेच असते. लोभ, स्वार्थ, **भीती** स्पर्शही करू शकत नाही.

भगवंताशी नाते जडल्याने इतरांचे सुखदु:ख त्याच्या अंतरी उमटते. केवळ परोपकारासाठीच, कल्याणासाठीच व सर्वांच्या सुखासाठीच या जगात ते असतात. त्यांना स्वत:ला काहीच मिळवावयाचे नसते. केवळ ते असतात सर्वांच्या कल्याणासाठी. त्यांनी मिळवलेले असतात भगवंत आणि **भगवत्प्रेमी भक्त.**

* * * *

# चिंतन २२६

नाम घेतले असता एक हरिच घनदाट भरलेला दिसतो. नामस्मरण करणाऱ्याला देव हुडकीत येतो. आपण कंठी नाम उच्चारताच आपल्यापुढे जगजेठी उभा राहील असे नामस्मरण करावे. नाम घेता-घेता जिव्हेवर अमृत स्रवते.

नामस्मरणाने साक्षात्कार होतो हे तत्त्व आहे. या साक्षात्काराने श्रीसद्‌गुरु ईश्वरच झालेले असतात, त्यांनी आपल्याला दिलेल्या नामात दैवी शक्ती असते, असे ते नाम म्हणजे देवाचे बीजच !!! अशा नामस्मरणाने ईश्वररुपी पीक पिकते. स्वानंद-साक्षात्कार होतो.

या नामाचे सतत स्मरण करणे हे साक्षात्काराचे साधन. नामस्मरणाचा प्राथमिक अभ्यास करताना, पाठीचा कणा व शिरकमल ताठ ठेवून आसन घालावे; दृष्टी नासिकाग्री ठेवावी, प्राणापान शक्यतो सम करावेत, प्रत्येक श्वासाबरोबर नाम घ्यावे, उच्छ्वासाबरोबर पण नामच घ्यावे, असा नामस्मरणाच्या अभ्यासाचा प्रकार आहे. कंठ, ओठ शक्य तितके न हालविता, आतल्या आत, मनात स्मरण करावयाचे, उच्चार करावयाचा नाही; वैखरीने जप करावयाचा नाही तर मनोजप करावयाचा.

याप्रमाणे दिवसातून दोन-तीन वेळा, तास-दोन तास किंवा जमेल, वेळ मिळेल त्याप्रमाणे नामस्मरण स्वस्थ बसून एकाकार एकाग्रतेने करावे, पण या व्यतिरिक्त इतर वेळीही नाम विसरू नये. उठता-बसता, चालता-फिरता, घरकाम-धंदा करता नामाचे अनुसंधान असावे कारण "**आठव तो ब्रह्म। नाठव तो भवभ्रम।।**"

नामाचा विसर पडला की, देहबुद्धी डोके वर काढते, होय की नाही ? व मग देहभावाचेच विचार मनात येतील व मग तेच संस्कार आपल्या मनावर

उमटतील, याने तितका काळ देव दुरावेल. म्हणून एकही श्वास नामावाचून फुकट जाऊ देऊ नये. आपले श्रीतुकाराम महाराज म्हणतात, **''शिंक जांभई खोकला। इतुका काल व्यर्थ गेला।।''** नामावाचून गेलेला काळ/श्वास तो ''मुरदाड''.

असे अखंड नामस्मरण करावयाचे, तसेच ही अखंडता दीर्घ-प्रदीर्घ काल टिकवावयाची. अगदी शेवटचा श्वासही नामाबरोबरच गेला पाहिजे. **''अंते मतिः सा गतिः''** भगवंताचे चिंतन करीत हा स्थूल देह सोडला की सायुज्यमुक्ती. सतत त्या आनंदघन भगवंताचे चिंतन, नामस्मरण असेल तरच शेवटी त्याचे स्मरण होईल ना ??? म्हणून तर अखंड, दीर्घकाल, देह पडेपर्यंत एक नामस्मरणच करावयाचे. तोच आपला कुलधर्म, कुळाचार, औषध आणि टॉनिकसुद्धा.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे, हे नामस्मरण पाट्या टाकणाऱ्या मजूरासारखे नाही करावयाचे तर मोठ्या भक्तिभावाने, प्रेमादराने करावयास हवे. आपल्या अंतःकरणात प्रेमभक्ती नसेल तर अशा शुष्क/कोरड्या स्मरणाचा फारच थोडा लाभ/उपयोग होईल, ''नाम वाया मुळीच जाणार नाही'' पण ते एकाकार-एकरुप-एकाग्रतेने होणार नाही.

''अंगी तुझ्या प्रेमाचे भरते यावे, नाम सतत हृदयात राहावे, शरीरावर रोमांच उभे राहू देत, नाम आठविताच पोटात प्रेमभाव वाढू दे, कंठ सद्‌गदित होऊ दे रे, नेत्रात आनंदाश्रू येऊ देत रे, भगवंता, सर्व देह तुझ्या भक्तीप्रेमभावाने भारून जाऊ दे रे बाबा.'' अशी त्या प्रेमस्वरूप भगवंताची अंतःकरणपूर्वक, मोठ्या तळमळीने सतत प्रार्थना करावी, पदर पसरावा, भीक मागावी एका प्रेमभावाची.

एकदा का नामाच्या प्रेमाचे वेड लागले की, एकाग्रता मग सहजच येते. तोपर्यंत मात्र नामस्मरणाचा अभ्यास कंटाळा न करता (कोणत्याच सबबीखाली) कसून करावयास हवा. माळ हातात, जीभ तोंडात पण मन !!! दाही दिशांनाच फिरत राहिले तर ते योग्य नामस्मरण नाही, नुसताच देखावा.

नाम चित्ताला जडून गेले पाहिजे. गुजरीण पाण्याला जाते, हात मोकळे असतात, गप्पा गोष्टी चालतात मैत्रिणीबरोबर पण !!! चित्त घागरीवर असते. लोभी जीव सर्व व्यवहार करतो, पण चित्त द्रव्यावरच तसे नामधारकाचे चित्त नेहमी नामावरच पाहिजे. नामस्मरण सोडू नये. मग "**फुटो हे मस्तक, तुटो हे शरीर**".

* * * *




एकांतीक भक्ताकडून कीर्तीत (म्हणजे गुण-प्रशंसा) झालेला (गायिला गेलेला) भगवंत/परमात्मा अल्पकाळातच प्रकट होतो आणि कृतार्थच काय पण अकृतार्थ भक्तांना पण अंतीम असा अनुभव प्राप्त करून देतो. कशाचा ? तर भक्तीप्रेमसुखाचा.

कीर्ती या शब्दाचे तसे अनेक अर्थ आहेत. कीर्ती म्हणजे प्रसिद्धी, यश, तेज, विस्तार पावणे, गुण-प्रशंसा, महिमान आणि कृपा. जो यश, तेज, महिमा आदींनी युक्त आहे असा श्रीपांडुरंग हा "किर्त्य" म्हणजे आपल्या अनंत सामर्थ्य, ज्ञान-विज्ञान, कर्तृत्व, नियंर्तृत्व आदींमुळे भक्तांकडून कीर्तित होण्यास (म्हणजे कीर्ती-यशोगुण) गाण्यास योग्य असा परमात्मा.

भगवंताचे स्तवन, गुणगान, कीर्तन, आपआपल्या परीने सर्वच भक्त करतात आणि त्याचेच गुणगान करावे ना !!! "स्तुती करावी परमेश्वराची। करू नये व्यर्थ कधी नराची।।" असं एक वाक्य आहे ना ???

परंतु त्याच्याशी अतूट संपर्क साधलेले थोर भक्तच त्याचे माहात्म्य यथार्थपणे जाणतात. त्यामुळे अशा एकांतभक्तांकडून होणाऱ्या हरिगुण-कीर्ती गायनाने भगवंत त्या "स्थानी" प्रकट होतो !!! श्रवणाने, संकीर्तनाने, ध्यानाने, पूजनाने आणि आर्त भावनेने केलेल्या प्रार्थनेने आपल्या हृदयात

गुप्तपणे निवास करणारा परमात्माच सुकीर्तीत झाल्यावर तत्काळ प्रकट होतो व मानवमात्राची दशसहस्र जन्माची पापे धुवून काढतो. भागवतकारांचा हा निर्वाळा आहे. आपले श्रीगुरु ज्ञानोबाराय पण सांगतात, "**ऐसें माझेनि नामघोषें। नाहीशी करिती विश्वाची दु:खे। अवघे जगची महासुखे। दुमदुमित भरले।। नामचि नाही पापाचे ऐसे केले।।**".

ह्या परमात्म्याची कीर्ती कशी करावी ? गुणगान कसे करावे ? संकीर्तन कसे करावे ? आणि तो प्रकट होतो तरी कसा ? तर ज्या या जगात मानव राहतात, त्यांनी या "ब्रह्मांड-लीला नायकास" जाणावे, शोधून काढावे, त्याला "**एकालाच**" निवडावे आणि आपल्या अंत:करणाच्या एकवटलेल्या निष्काम **परमप्रेमभावांनी** त्याच्याशी संपर्क साधावा, तोच एक जीवसखा, मित्र, सर्व काही असावा अशी दस्तुरखुद्द भगवंताचीच इच्छा/प्रेरणा असते !!! म्हणून तर त्यानेच सृष्टीच्या आरंभापासून अध्यात्मातील हा **भक्तीप्रेममार्ग** प्रसृत केला आहे.

पण हा भक्तीमार्ग सामान्य माणसापर्यंत कसा उपलब्ध होणार ? त्याकरीता महत्त्वाचा घटक म्हणजे "महत्कृपा" साधणे आवश्यक. भगवंत हा अव्यक्त-अगोचर तर भक्त व्यक्त व गोचर म्हणजे मानवाच्या आकारात प्रत्यक्ष वावरणारा. म्हणून तर या कृपाळू भगवंताच्या प्रतिनिधींच्याद्वारेच सर्व मनुष्यमात्राला भगवंतापर्यंत जाता येते अथवा हे पारमार्थिक कार्य एक ईश्वरच या एकांतभक्ताद्वारे करवून घेत असतो असे म्हणणेच जास्त बरोबर आणि शोभनीय !!!

भगवंतानी सोपवलेले हे कार्य भक्त कसे करतात? श्रीतुकोबारायांनी एका चरणात सांगितले आहे, "**वाढावया सुख भक्ति-भाव-धर्म। कुळाचार नाम विठोबाचे।।**" एक "श्रीहरि" हेच त्यांचे जीवन झालेले असते. एका भगवंताशिवाय बोलण्यास, चिंतनास त्यांना दुसरा विषयच नसतो. त्यामुळे दुसरे काही आणि **दुसऱ्याशी** काय बोलणार ना ??? गीतापण दहाव्या अध्यायात हेच सांगते ना ? "**मच्चिता: मद्गतप्राणा: बोधयन्त: परस्परम्।**" (परस्पर म्हणजे ज्यांची आवड एक भगवंतच आहे त्यांनाच).

त्यामुळे तन्मय, तद्‌भाव झालेला एकांतभक्त जो **सन्मार्ग** दाखवतो, बोध करतो, तो भगवंतासपण मान्यच असतो; कारण त्याचे कर्तृत्व हे भक्ताकडे नसून एका परमात्म्याकडेच असते. भक्त केवळ निमित्तमात्रच असतो. हे **देवकार्य** आहे आणि ते करण्याची संधी देवानेच आपणास दिली आहे, अशीच त्याची भावना असते आणि याबद्दल तो सदैव कृतज्ञ असतो. देवच अशांची गाठ घालून देत असतो. आपण एक ईशसेवाच करतो अशी त्याची अढळ निष्ठा असते.

असा भक्त दुसऱ्यांना "**देवाचा अनुभव**" आणून देऊ शकतो. अनुभव म्हणजे प्रभाव, तेजस्वीपणा, सामर्थ्य, सिद्धकृपा, की ज्यामुळे "भावभक्तीयुक्ताला" भगवंताच्या प्रभावाचे, तेजाचे, सामर्थ्याचे, अस्तित्वाचे भव्य, दिव्य दर्शन घडते.

* * * *




भक्ती म्हणजे प्रेम करण्याची युक्ती. अगदी सर्वसामान्य माणसाला हा प्रेमाचा अनुभव असतोच. तो अनेक व्यक्तींवर व वस्तूंवर प्रेम करीत असतो !!! पण सहेतुक. परंतु याच कारणाने त्याचे प्रेम वाटले जाते. अनेक ठिकाणी आणि अनेक कारणांनी ज्या वस्तूंवर आपण प्रेम करतो, त्यांच्या गुणधर्मावर आपल्या जीवनातील सुख-दुःख (लौकिक, व्यावहारिक) अवलंबून असते. जर शाश्वत आणि अनंत, आनंदमय वस्तूवर/तत्त्वावर आपण प्रेम केले तर आपले मन केवळ आनंदाने भरून जाते, एवढेच नाही तर आनंदस्वरूपच होते. मग तेथे दुःखाला, भयाला, शंकेला वावच उरत नाही.

एक भगवंतच/श्रीगुरुस्वरूप तत्त्वच शाश्वत असल्याने त्याच्यावर प्रेम

म्हणजेच भक्ती केल्यास समाधानाचा अनुभव येतो. पण त्यावर प्रेम करायचे तरी कसे ???

शुद्ध प्रेम तीन लक्षणांनी प्रगट होते. ज्यावर खरे प्रेम असते त्याचेच सर्वांहून अधिक महत्त्व वाटणे हे पहिले लक्षण. त्याचेच अखंड स्मरण राहणे हे दुसरे लक्षण. (म्हणून तर नामस्मरण/श्रीगुरुस्मरण) आणि तिसरे लक्षण आहे आपली प्रत्येक क्रिया त्यासाठी होणे.

भगवंता-श्रीगुरुइतकी उत्तम, सुंदर आणि पवित्र-सुखरुप वस्तू विश्वात नाही अशी खात्री झाल्यावर जो त्याचेच अखंड स्मरण ठेवतो आणि आपले जीवन सर्वस्वी त्याला वाहून टाकतो, तोच भगवंतावर प्रेम करतो.

हा भक्तीप्रेममार्ग आपले जीवन आनंदघन व उज्ज्वल करण्याचा हा एकच हमखास उपाय आहे. हा भक्तीमार्ग आपल्याला **निर्भय** (अभय), नि:स्वार्थी व संशयरहित आनंदमय जीवन जगण्याचा मार्ग सदैव दाखवित असतो. देहबुद्धीतून निर्माण झालेल्या बंधनापासून मुक्त जीवन जगणारा माणूस हा **चालता-बोलता** देव. त्यालाच अध्यात्माच्या भाषेत संत असे म्हणतात. तोच ह्या भक्तीमार्गावरील बोधाची दिवटी आपल्या हाती धरून साधकाला सतत वाट दाखवीत असतो.

असा भक्त कसा असतो ??? मनाने प्रपंचातून सुटलेला, पण देहाने प्रपंचातच असणारा, मनांत सदैव आत्मज्ञान जागे असलेला, पण देहाने ज्ञान नसल्यासारखेच वागणारा, मनाने एका आत्मारामालाच सत्य मानणारा, पण देहाने बहुरंगी जगातला परमात्मा पाहाणारा, असा प्रपंच (दृश्य विश्व) आणि परमार्थ यांची बेमालूम सांगड घालणारा, दिव्य जीवन जगून आनंद भोगणारा आणि जीवांना आनंदसरोवरात विहार करावयास समर्थ करणारा असा **आनंदच** असतो.

हा आनंद अवघ्यांना अनुभवास यावा यासाठी तो अवघ्यांना नामाचा छंद लावतो. या **त्याने** दिलेल्या नामामध्ये जसजसा मनाचा लय लागेल तसतशी निष्ठा वाढते. नाम आपोआप अंत:करणात खोल-खोल जाऊ लागते,

वृत्ती तन्मय होते, मग नाम सर्व अवस्थात जागेच राहते (म्हणजे चालूच राहते). एका नामावाचून या त्रिभुवनांत इतर काहीच श्रेष्ठ नाही असा ठाम विश्वास निर्माण होतो.

या नामस्मरणाने स्वतःच्या ''मी''चा भगवंतामध्ये/श्रीगुरुमध्ये अंत होतो. भगवंत/श्रीगुरुपेक्षा ''मी'' (खोटा) वेगळा उरतच नाही. या भक्तीमार्गात ''मी''ला प्रवेशच नाही, वेगळे स्थानच नाही. ''मी'' का एकदा श्रीगुरुंशी एकरुप झाला की मग जे भक्तीप्रेमाचे मधुर फळ चाखता येते ना ती काय बोलण्याची गोष्ट आहे होय ???

तो सावळा श्रीकृष्ण आपले हात पसरून आपल्या भक्ताला आपल्या बाहुपाशात घेतो आणि प्रेमभक्तीभावाने गाढ आलिंगन देतो. त्यावेळी देव आणि भक्त यांचे हृदय एकच झालेले असते. भगवंताच्या हृदयातील ज्ञान-प्रेम-भक्तीरस भक्ताच्या अंतःकरणात ओतला जातो. देहाने वेगळ्या असणाऱ्या पण चित्ताने एकरुप झालेल्या भक्ताला भगवंत अगदी आपल्यासारखेच आनंदस्वरूप करतो. त्यावेळी जो आनंदसागराला आनंदाचा महापूर येतो त्यामध्ये भगवंत आणि भक्त दोघेही स्वतःला पूर्ण विसरून एकच होऊन राहतात. आपल्या श्रीगुरुज्ञानदेवांनी भगवान श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या दिव्य भेटीचे वर्णन हा केवळ प्रतिभेचा विलास नाही तर भक्तीशास्त्रातला प्रत्यक्ष अनुभव आहे. श्रीमहाराजांनी आनंदसागरांना नाम दिले. त्यांनी ते मनापासून घेतले. महाराजांनी त्यांना एक दिवस बोलावून घेतले. थोड्या कालाने एके दिवशी अचानक श्रीगुरुंनी आपले बाहु प्रेमाने पसरले. आनंदसागर विचार न करता त्यांच्या बाहुपाशात शिरले, विरुन गेले. दोघांच्याही डोळ्यात प्रेमाश्रू वाहू लागले. काय आनंद आहे बघा ना ???

* * * *

# चिंतन २२९

समाधान हा शब्द ''धा'' या धातूला सम् व आ असे दोन उपसर्ग लागून बनलेला आहे. याचा अर्थ स्थिर करणे व एकाच ठिकाणी गोळा करणे असा होतो. अर्थात आत्मारामाच्या-भगवंताच्या-श्रीगुरुच्या ठिकाणी मन, बुद्धी, चित्त, अहंकार आणि सर्व इंद्रिय गोळा करून स्थिर ठेवल्याने जीवाला जी परमशांती मिळते तिचे नाव **''समाधान''**. आपल्या **मनाला** नि:संशय करून, निर्भय नाही तर अभययुक्त करून **सर्वबाजूने एका** आनंदघन भगवंताच्या ठिकाणी सदा स्थिर ठेवणे याचे नांव **समाधान**.

समाधान म्हणजे चित्ताची परमशांतावस्था. म्हणजेच आनंद. आनंद हा शब्द ''नंद्'' या धातूला आ हा उपसर्ग लागून तयार झाला आहे. आनंद म्हणजे सर्वांगाने तृप्त होणे. भगवंताच्या दर्शनाची म्हणजेच अनुभवाची समाधान व आनंद ही दोन अभिन्न अंगे आहेत आणि प्रत्येक माणसाला चित्ताची शांती हवीच असते. त्याला आनंद हवाच असतो, नाही का ???

या समाधानासाठी धडपड न करणारा माणूस या जगात नाही हे जरी खरे असले तरी समाधान मिळवलेला माणूस मिळणे कठीणच आहे हेही तितकेच खरे. अपवाद संत. माणसाच्या संपत्तीवरून, सामर्थ्यावरून, त्याच्या पराक्रमावरून, कार्यावरून, विद्वत्तेवरून, साहित्य-ग्रंथ-लेखनावरून त्याचे मोठेपण ठरवणे भ्रामक असते. म्हणून अध्यात्मशास्त्र बजावून सांगते की, ज्या प्रमाणात माणूस आत्मज्ञानाकडे म्हणजेच एका भगवंताकडे/श्रीगुरुकडे वळतो, त्या त्या प्रमाणात माणसाच्या चित्ताला समाधान मिळते आणि ज्या प्रमाणात चित्त समाधान पावते त्या प्रमाणातच माणसाच्या अंगी खरे थोरपण विलसते.

माणसाचा जन्म समाधान मिळवण्यासाठी आहे (नसलेले नाही तर

असलेलेच स्वयंभू, निरुपाधिक, निरुपचार, निरामय आणि निरतिशय असे समाधान) हे जर खरे तर चित्ताचे समाधान (म्हणजेच चित्ताची मूलभूत चिद्रूपता) हेच मानवी जीवनातील परमोच्च "जीवन-मूल्य" नाही का ???

ज्ञानयुक्त भक्तीच्या उपासनेमध्ये समाधानाचे वर्म आहे. पण ज्ञान म्हणजे आत्मज्ञान बरं का !!! ज्ञानाची उपासना म्हणजेच भगवंताची-श्रीगुरुची उपासना. जगातल्या सगळ्या कला, विद्या, विज्ञान यांची उपासना नव्हे. या उपासना मेंदू, डोळे, कान, हात व आवाज/ध्वनी यांच्या साहाय्याने होत असतात. माणसाचे वय होऊन देह थकत चालला म्हणजे मेंदू अशक्त होतो व आकुंचन पावतो. तसेच डोळे, कान, हात, वाचा, काम करण्यास असमर्थ होतात. अशा अवस्थेत कलेची-विद्येची उपासना थंडावते, अखेरीस थांबते. पण भगवंताची उपासना (म्हणजे भक्तीप्रेमभाव) थांबत नाही, क्षीण होत नाही, म्हणजे **नामस्मरण** सेवा-उपासना चालूच राहते. पदवी घेतल्यावर अभ्यास सुटतो पण आनंदस्वरूप भगवद्‌भावारुढता प्राप्त झाल्यावर "**नाम**" शिल्लकच राहते, चालूच राहते. "**ऐसे मीचि होऊनि पांडवा। करिती माझी सेवा।**" असं श्रीगुरु ज्ञानोबाराय सांगतात आणि ही सेवा म्हणजे नामसंकीर्तन/नामस्मरण.

या समाधानाचा स्वभाव मोठा चमत्कारीक आहे. उन्हात बसलेले एक लहान मूल आपली सावली धरण्यासाठी सावलीमागे पळू लागते, त्या **प्रयत्नामुळे** सावली त्याच्यापासून दूर जाऊ लागली. नंतर ते पोर कंटाळले, त्याने सावलीकडे पाठ फिरवली आणि काय मौज पहा ना !!! ती सावलीच मग आपणहून त्याच्या मागे लागली. त्याचप्रमाणे जो माणूस समाधानाच्या मागे लागतो, त्याच्यापासून समाधान दूर जाते, पण जो समाधानाला विसरून (???) जगतो त्याच्या मागे समाधान लागते (म्हणजे मी समाधानी आहे हेही जो विसरतो तेथे समाधान नांदते.)

हे जरी सगळं झालं तरी समाधान म्हणजे प्रत्यक्ष काय ? हे प्रश्नचिन्ह आपले जसेच्या तसेच! होय की नाही ? तर समाधान म्हणजे मनाची **काळजीरहित** अवस्था. ही काळजी भीतीपासून निर्माण होते आणि जेथे

काळजी-भीतीसहित ठाण मांडून वास करते तेथे समाधान, आपणहून तर नाहीच पण कधी चुकूनदेखील दृष्टीस पडत नाही.

संतांचा, भक्तांचा, आत्मज्ञानी माणसाचा प्रधान गुण जो "**अभय**" हाच समाधानाचा प्राण आहे. संपूर्ण **अभय** हेच आत्मज्ञानाचे प्रकट चिन्ह आहे. गीतेमध्ये दैवी संपत्तीचे वर्णन करताना या **अभयाला** प्रथम क्रमांक दिला आहे.

कोण अभयांनी नटतो ? तर ज्याचे मन एका भगवंतात/श्रीगुरुंत रमते तोच. भगवंत/श्रीगुरु म्हणजेच परमानंद. चित्ताची प्रसन्नता हेच परमानंदाचे व्यक्त स्वरूप. श्रीगुरु कधी-कधी अप्रसन्न वाटतात !!! का? तर आपल्या लेकराला अजून ही अभय संपत्ती मिळाली नाही म्हणून. वर-वर या अप्रसन्नतेच्या लाटा असतात पण आत-आत समुद्राप्रमाणे एक परमानंदच असतो.

* * * *




मनुष्य श्रद्धामय आहे असे सगळीच ज्ञानी माणसे सांगतात, संत सांगतात, शास्त्रकार सांगतात आणि दस्तुरखुद्द भगवंताने पण श्रीमद्भगवद्गीतेत स्वमुखाने सांगितले, "**श्रद्धामयोयम पुरुषः**" श्रद्धा म्हणजे सत्याची-पूर्ण सत्याची जाणीव. ईश्वरावर श्रद्धा ठेवणे अगर आपल्या श्रीगुरुंवर श्रद्धा असणे म्हणजे ईश्वर/श्रीगुरु सत्य आहे असे वाटणे. या श्रद्धेमध्ये विश्वासाचा प्रचंड जोर असून एक प्रकारची सुंदर-शांत-निवांत अशी स्वस्थता असते. मायमाऊलीच्या अंगावर स्वस्थ पहुडलेल्या बालकासारखी.

याच्या अगदीच उलट संशय, भीती. हे श्रद्धेच्या विरोधात असतात. ज्या श्रीगुरुविषयी आपली श्रद्धा निर्दोष, भय आणि संशयरहित असते, त्या श्रीगुरु/

भगवंताचा खरेपणा आपल्या वागण्यात, बोलण्यात, चालण्यात, प्रत्येक कृतीत प्रकट झाला पाहिजे.

नामधारकाने आपल्या आध्यात्मीक प्रगतीसाठी या श्रद्धा न भीता जोपासायला पाहिजेत आणि निर्माण झालेली, वाढविलेली अशी श्रद्धा अधिकाधिक वाढवावयास पाहिजे. आपली श्रद्धा पाहून **येर** सुद्धा नतमस्तक झाले पाहिजेत, विरघळले पाहिजेत.

भगवंत आहे असे आपण सामान्य माणसे आणि सगळे संतदेखील म्हणतात. परंतु आपली भगवंताच्या/श्रीगुरुच्या असणेपणाची श्रद्धा निर्दोष नाही आणि त्यामुळेच आपल्या वागण्यात, चालण्या-बोलण्यात भगवंताच्या/ श्रीगुरुच्या असणेपणाचे प्रतिबिंब **पडतच** नाही. संतांच्या/वैष्णवांच्या/ महाभागवतांच्या वागण्यामध्ये मात्र ते अगदी हमखास आणि ओतप्रोत सापडते.

खरा कर्ता-करविता मी नसून एक भगवंतच/श्रीगुरुच आहे (अगदी थेट नामस्मरणातसुद्धा) याचा अर्थ आपणच निष्ठेने, अखंड घ्यावयाचेच, पण तो भगवंत/श्रीगुरुच माझ्याकडून करवून घेतात, मी कशाचा करतो ? असा विश्वास. आपण फक्त नाममात्र-निमित्तमात्र, हाच पूर्ण भाव.

अशी श्रद्धा वाढवावयाची हे नामधारकाचे काम. ही श्रद्धा वाढविण्यास संतांचा/आपल्या श्रीगुरुंचा सहवास, आत्मानात्मविवेक आणि स्वयंसूचना आणि त्याबरोबर श्रीगुरुंनी प्रसादपूर्वक दिलेल्या नामाचे अखंड स्मरण हे प्रधान उपाय आहेत.

श्रीगुरु भेटणे आधी कठीण, भेटला तर त्याचा सहवास घडणे महाकठीण पण काही वेळेला पूर्वपुण्याईने **भेटतो** आणि सहवास पण घडतो हे लक्षात येणे फार महत्त्वाचे नाही का ??? मग घडल्यावर तरी आपण आपल्या श्रद्धेचे छान भरण-पोषण करून भगवंतापर्यंत मजल मारावयास पाहिजे, होय की नाही ??? ही मजल मारण्यासाठी आपण प्रपंचातच राहून, आपल्याच अंतरंगात खोल-खोल शिरुन आपल्याला स्वत:ला पार बदलून टाकायचे असते.

गंमतीने सांगतो, ''एका श्रीमंत आई-बापाची एकुलती एक लाडकी मुलगी. कधीतरी कौतुकाने स्वयंपाक करावयाची. तिने तिला आवडलेल्या एका सच्छील पण गरीब मुलाशी लग्न केले. माहेरी स्वयंपाकाचा कंटाळा करणारी मुलगी सासरी रोज आनंदाने स्वत: स्वयंपाक करू लागली. काम दोन्हीकडे सारखेच तरी आता हेतूमध्ये फरक पडला. त्यामुळे अंतरंगात फरक पडला नाही का ???!!!

अगदी याच प्रकारे आपला हेतू बदलून प्रपंचात राहू लागल्यावर प्रपंच आहे तसाच राहून त्याच्या व आपल्या अंतरंगात बदल घडवून आणता येतो. हा हेतू बदलण्यास आपल्या वृत्तीचे वळण बदलावे लागते. वळण असे असते की, ''अमूक, अशाप्रकारे जर मी केले, वागलो तर मग छान होईल.'' म्हणजेच **''माझ्याकरिता मी''** अमक्याकरिता मी ??? हा आपल्या वृत्तीचा ओघ.

या ओघाऐवजी **''भगवंताकरीता मी''**, ''श्रीगुरुकरीता मी'' असा ओघ वृत्तीला लागला तर त्यातून निर्माण होणारे हेतू भगवंताने व्यापलेलेच होतील. असे स्थान मिळण्यासाठी त्याच्याविषयी दृढ आपलेपणा वाटला पाहिजे. असा आपलेपणा वाढण्यास त्याचा **सहवास** जास्तीतजास्त करावयास हवा. भगवंत सूक्ष्म आहे तर श्रीगुरुतत्त्व सूक्ष्म असून सगुण साकार आहे. म्हणून सूक्ष्म भगवंताचा सहवास सूक्ष्मस्वरूप स्मरणरुपाने (म्हणजेच नामस्मरणाने) आणि श्रीगुरुचा सहवास त्याच्या प्रत्यक्ष सेवा-सहवासाने घडत असतो. अशा स्मरणाने आणि सहवासाने भगवंत/श्रीगुरु आपल्या हृदयसिंहासनावर सुप्रतिष्ठित होतात.

* * * *

# चिंतन २३१

भगवद्‌भक्तांनी सर्व कालखंडात सर्व चिंता दूर सारून केवलाद्वय अशा प्राणप्रिय भगवंताचे/श्रीगुरुचे सर्व भाव-भावनांनी भजन (सेवा)-पूजन करावे.

यासाठी प्रथम साधकाने निश्चिंत व्हावयास हवे नाही का ? आणि दुसरा भाग म्हणजे त्याने सर्वकाळ कोणत्या ना कोणत्या तरी भक्ती उपायात स्वत:स गुंतवून एकमात्र श्रीहरीचे/श्रीगुरुचे अनुसंधान ठेवावयास हवे.

मनुष्य निश्चिंत केव्हा होतो ? तर जेव्हा त्याच्या सर्व आशा, आकांक्षा, इच्छा सफल झाल्या, आता काहीही मिळवावयाचे उरले नाही, सर्व अडचणींवर पूर्ण मात केली आहे व त्याचबरोबर निराशेचा, अपयशाचा, हानीचा, दु:खाचा प्रसंग कधीच येणार नाही. अशी स्थिती प्राप्त होणे अवघड. असे सर्व वैभव, ऐश्वर्य, सत्ता, यश, सुखसाधनांची विपुलता पायाशी लोळत आहेत असा अपवाद विरळच आणि अशा अपवादाच्या ठिकाणीसुद्धा अनेक चिंता, व्याधी, समस्या असतातच असतात.

जीवनात (**लौकिक**) असा एक क्षण कधीच येत नाही की ज्यावेळी कोणतीही चिंता, अतृप्त कामना नाही आणि जसजसा मनुष्य वयाने वाढत जाईल त्या त्या प्रमाणात सर्व गात्रे अधिकाधिक दुर्बल होत जातात, मनाची धारणाशक्ती कमी कमी होत जाते. त्यावेळी हरिभक्ती, ध्यान, भजन, पूजन, उपासना दीर्घकाल करता येत नाही. सारांश काय ? तर निश्चिंत होणं तसं अवघडच **पण** अशक्य नाही !!!

मग ''**निश्चिंत**'' याचा अर्थ तरी काय व कसा करावयाचा ? तर भक्त जरी असला तरी त्यालासुद्धा व्यावहारिक अडचणी, संकटे, व्यग्रता असणारच हे गृहित धरूनच या निश्चिंतपणाचा विचार केला आहे. साधकाने सर्वदा

भाव-भावना आणि विचारांचा प्रवाह एका श्रीहरीच्या/श्रीगुरुच्याकडेच वळवावा म्हणजे अखंड एका भगवंताचेच अनुसंधान राखता येईल.

जेव्हा भक्तीभाव अंत:करणात दृढ होतो, मुरतो, शुद्धतर आणि एकाग्र होतो त्या त्या प्रमाणात मन अगदी अंतर्मुख होऊन, बाह्य-**लौकिक** उपाधींबद्दल निर्लिप्त होत जाते. याप्रमाणे मन-बुद्धी-भावना व विचार हरिमय/श्रीगुरुमय केल्यावर/झाल्यावर मग आपोआपच व्यावहारिक **चिंतांचा** भार हृदयावरून उतरतो. **आत्मविश्वास** दुणावतो आणि **भक्तीप्रेमभाव** अखंड नांदतो.

लौकिक उपाधींच्या अवधानातून कशीबशी सुटका करून घेतली ??? तरी नव्यानेच प्रकटणाऱ्या आध्यात्मिक चिंता मात्र वाढतच जातात !!! ''माझी काहीच प्रगती होत नाही, मला कोणताच पारमार्थिक अनुभव येत नाही !!!''' गीता आणि भक्तीशास्त्रकार सांगतात की, ''**अशी चिंता भक्ताने कधीच करू नये.**''

केलेली साधना, भक्ती कधीच व्यर्थ जात नाही. बी पेरल्यावर लागलीच फळ मिळत का ? प्रथम रोप आले पाहिजे, ते वाढून त्याचा वृक्ष झाला पाहिजे. नंतरच फळे हाती येतील ना ??? त्याचप्रमाणे हरिभक्ती आपल्या हृदयात रुजली पाहिजे, मग ती चित्तात वाढली पाहिजे, नंतर ती **अनन्य** झाली पाहिजे. सर्व **मर्यादा ओलांडून** ती **परमप्रेमभक्तीरूपा** झाली पाहिजे. त्यानंतरच भगवद्प्रेमाचा अतींद्रिय पातळीवरील प्रत्यय येतो.

''निश्चिंत'' हा शब्दच अनुक्रमे ''सर्वदा'' व ''सर्वभावेन'' या दोन शब्दांशी भक्तीशास्त्रकारांनी जोडला आहे. यामुळे या शब्दाचा (निश्चिंत या) गूढ-सूक्ष्म भावार्थ प्रकाशात येतो. साधन अनन्य झाल्याची खूण म्हणजे त्यास प्रसंगोपात अनाहत नाद, **प्रकाशकिरण, सुगंध** जाणवतो. कधी-कधी अकारण आनंदाचे-समाधानाचे उधाण उसळते. कधी कठीण शास्त्रसिद्धांताचा गूढार्थ स्पष्ट होतो तर कधी कधी ध्यान-नाम-चिंतनात आलोचन रात्र-रात्र घालवूनही मुळीच त्रास होत नाही. तर कधी दीर्घकाल मुग्धपणे राहतो.

(आणि इतरांना वाटते हा रागावला, रुसला, चिडलाय, निरुत्साही आहे !!! आता याला तो मुग्ध भक्त काय करणार ??? ते सांगतात **नॉर्मल वागा**).

अशा अवस्थेत तो गौणी भक्तीच्या, बाह्योपचारांच्या-व्यवहाराच्या पलीकडे गेलेला असतो. एकमात्र सगुण-भक्ती-सुखानुभवात रंगून गेलेला असतो. त्या प्रेमसुखावाचून काहीही, अगदी ऐश्वर्य-सन्मान, मान-मरातब लौकिक नको असतो. त्याला एकच वाटत असते, ''**माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया।।**''

* * * *




सर्वदा म्हणजे सर्व काळात, सर्व वेळी. मग तो दिवस असो वा रात्र असो, एकटाच असो वा कुटुंबात अगर जनसमुदायात असो, मान-सन्मान प्रसंग असो वा अपमान-अपयशाचा प्रसंग असो आणि तो शरीराच्या रोगी वा निरोगी स्थितीत असो, सर्व प्रसंगात, सर्व काळात व सर्व स्थळांत भक्ताची चित्तस्थिरता, हरितन्मयता अभंगच राहिली पाहिजे. (कोणत्याही भावनांचा कल्लोळ झाला तरी कल्लोळाखालील चित्त हरिमयच) ''**पांडुरंग ध्यानी, पांडुरंग मनी। जागृती स्वप्नी पांडुरंग।।**'' जागृत दशेप्रमाणेच या स्वप्न व सुषुप्तीमध्येसुद्धा परमात्म्याचे/श्रीगुरुचेच अनुसंधान राहिले पाहिजे नाही का ???

श्रीतुकोबाराय म्हणतात, ''**पडिले वळण इंद्रिया सकळां। भाव तो निराळा नाही दुजा।।**'' इतका सर्वदाचा अर्थ होतो. बघा ना काय मौज आहे ती !!! एका शब्दात केवढा अर्थ सूचित करतात संतांचे शब्द.

''सर्वभावेन'' म्हणजे सर्व भावनांनी, हे भाव त्रिविध (इतकच काय विविध सुद्धा) असतात. (अ) भगवंत हा सर्वांचा माता, पिता, स्वामी, **सखा**, जिवलग आणि कूट (म्हणजे आत्मा) आहे. म्हणून या प्रत्येक भाव-

भावनेने भगवंताची आराधना करावी. (आ) जगदंबा, श्रीविष्णू, गणेश, शिव, सूर्य, अग्नी आणि राम, कृष्ण, विठ्ठल, दत्तात्रेय आदी रूपांची भक्त उपासना करतो. कोणत्याही रूपाची भक्ती केली तरी ती एकमेवाद्वय सच्चिदानंद भगवंताचीच आराधना होत असते हाच भाव हवा आणि उपास्यपण **एकच-एक** हवे. प्रत्येक भक्ताच्या आवडीच्या रूपातूनच तो एक आदिपरमात्मा श्रीगुरुरूपातून अनुग्रह करीत असतो.

म्हणून आपले उपास्य दैवत/आपले श्रीगुरु हेच श्रेष्ठ आणि अन्य भक्तांची अर्चनारूपे/श्रीगुरु गौण आहेत अशी भेदबुद्धी लेशभरसुद्धा नसावी. शैव-वैष्णव, यांचे कलह, धर्म-धर्मानुयायी यांच्या मतभेदांना व्यापणारा व अधिष्ठान असणारा असा एकमेव भगवंत **एकच** आहे अशी उदार विशालदृष्टी झाली पाहिजे. (इ) सर्वभावेन याचा आणखी एक अर्थ. ''सर्वभावेन'' म्हणजे ''सगुण व निर्गुण'', ''साकार-निराकार'', अद्वैत, विशिष्टाद्वैत, मधुराद्वैत आदी असंख्य विचारप्रणालीचे भाव, आणखी भाव म्हणजे निवृत्तीलक्षण आणि प्रवृत्तीलक्षण असे दोन प्रकारचे भाव-धर्म; यातील कोणत्याही भावाने पूर्णत्वापर्यंत प्रगती करता येते आणि यातील कोणत्याही भावाने जीवन-व्यवहाराचे स्वरूपच पार बदलून जाते आणि या **भावमय** जीवनाने भगवद्रूपताच लाभते.

सारांश काय तर उपास्यरूपांत, उपासना मार्गात आणि प्रत्यक्ष आचरणात, अनेक प्रकारे भेद, अंतर पडत असले तरी भक्त आपापल्या निष्ठेशीच जर दृढ राहिला, चित्त शुद्ध झाले, भय संपले, भक्ती-भाव घट्ट झाला की त्याला एका भगवंताचीच जाणीव होईल. अनुभवाचा प्रांत विशाल-उन्नत-उदात्त होईल आणि याचे रहस्य हेच की भगवंत मूलतः अव्यक्त व सर्वव्यापी आहे, तो भक्तांच्या आवडीनुसार त्या-त्या विशिष्ट रूपांत-भावात भक्तांपुढे प्रकट होतो.

भक्ताच्या अंतःकरणातून सर्व भेदाचा-भयाचा लोप झाला, भिन्नता संपली, मग तो सम-ब्रह्मरूप-निर्दोष होतो. अभेदभक्तीचा असा ब्राह्मीभाव

प्राप्त करून घ्या आणि अंतर्बाह्य एक श्रीहरि/श्रीगुरुमय व्हा. हाच अर्थ "सर्वभावेन" या शब्दाचा आहे.

जेव्हा भक्तीभावना ही वरीलप्रमाणे सर्वभाव, सर्वसमावेशक, **अभेद**, भयरहित होते तेव्हा ती चैतन्यस्वरूप होते !!! मग भक्ती-भक्त आणि भगवंत यातील परस्पर अंतरच **(मुळात नसतेच, पण भक्ताला उगाचच आहे असे वाटते !!!)** लोपते. उरते ती केवळ एकरूपता. **एक** म्हणण्याचेसुद्धा प्रयोजन उरत नाही, कारण एकाहून दुसरे वेगळे काही उरतच नाही.

हीच "**एकांत**" भक्ती बरं !!! आणि नवल असे की त्यानंतरसुद्धा असा थोर भक्त पूर्ववत् (म्हणजे साधनकाळात) भजन-पूजन-कीर्तन आदि करू शकतो, नव्हे तर करतो आणि करीतच राहतो. आपल्या श्रीज्ञानोबारायांनी विठ्ठलाची, श्रीरामदासस्वामींनी श्रीरामाची, श्रीरामकृष्ण परमहंसांनी जगन्मातेची भक्ती आमरण सोडली नाही.

श्रीपांडुरंग हाच आदी परमात्मा असा स्वानुभव घेतल्यावरही भक्त म्हणतात, "**श्रीनाथेजानकीनाथे अभेदः परमात्मनि। तथापि मम सर्वस्व समः कमललोचनः।।**" हाच **सगुणाच्या** (साकाराच्या) परमप्रेमलक्षणाभक्तीप्रेमाचा विशेष.

* * * *



## चिंतन २३३

भक्ताच्या ठिकाणी अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह, ब्रह्मचर्य हे पाच यम व पावित्र्य, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान हे पाच नियम इत्यादी दैवी गुण-संपदा असावी.

याचबरोबर "**निर्भयता**", सत्वगुणप्रवृद्धी, ज्ञान, कर्म, योग आणि भक्ती यांचे शास्त्रज्ञान, **दान**, इंद्रियनिग्रह, यज्ञ (म्हणजे त्याग-समर्पण), स्वाध्याय, तपस्या, ऋतुजा, अक्रोध, शांती, निर्वैर, सर्वांभूती दया,

निर्लोभता, सौजन्य, विनयीवृत्ती, चित्तस्थैर्य, तेजस्विता, क्षमा, तितिक्षा, निरभिमान हे आणि असे अनेक दैवी गुण हवेत.

हे सगळं सांगण्याच्या मागील भूमिका काय ??? तर हरिप्राप्ती साधणे हेच भक्ताचे एकमेव ध्येय. त्यासाठी त्याने स्वत:स भगवंताला/श्रीगुरुला सर्वतया वाहून घ्यावे आणि त्याचबरोबर या परमश्रेयाच्या आड, विरोधी जर अशी काही ‘‘**लौकिक बंधने**’’, सामाजिक रुढी-संकेत, वेदोक्त ‘‘**कर्मकांड**’’ येत असेल तर त्या सगळ्याचा निर्धाराने त्याग करावा आणि एकमात्र हरीभक्तीला सर्वभावाने लागावे.

भक्तीच काय ? पण कोणताही अध्यात्म मार्ग जर चोखाळावयाचा असेल तर साधकाचे जीवन या वरील सर्व गुणांच्या भक्कम पायावर अधिष्ठित राहिले पाहिजे. त्याशिवाय तो वैष्णव, संत, धर्मदीप होऊ शकणारच नाही. म्हणून सर्व अध्यात्म साधकांनी यम, नियम, आचाराचे अगदी आरंभापासूनच पालन करावयास हवे. त्यात कोणतीही सवलत नाही व पळवाटपण काढता येणार नाही.

अशा सर्व भरभक्कम पायावर उभारलेले अचल मंदिर म्हणजे धर्मसंस्था -‘‘**भागवतधर्ममंदिर**’’. या मार्गाचे निष्ठेने परिपालन करण्यानेच साधकाचे जीवन, निर्मल, अ-काम, अ-पाप, **निर्भय**, मंगल आणि आनंद-निर्भर होत असते व त्याची भक्ती एकाग्र, उत्कट, एकप्रवाही आणि एकरूप होते. मग त्याला यथाकाल श्रीहरि-गुरुप्रसाद लाभतो. नाही का ???

आणि तौलनिकदृष्ट्या अंतरच दाखवावयाचे झाले तर धर्म (भक्तीधर्म) हा सर्वश्रेष्ठ आहे. म्हणूनच क्वचित् प्रसंगी लौकिक, वैदिक, सामाजिक कर्तव्ये यांचा व आध्यात्मीक उपासना यांचा संघर्ष होत असेल तर अध्यात्म-धर्माचीच कास धरा आणि लौकिक, पारंपारिक, बौद्धीक आचार बाजूस सारा असे सर्व भक्ताचार्य सांगतात हे ध्यानात ठेवावे. पुत्राने पित्याचे ऐकावे हा पुत्रधर्म आहे परंतु प्रल्हादाने पित्याचे आणि भरताने कैकयी मातेचे मानले नाही तरीपण प्रल्हाद आणि भरत हेच आदरणीय मानले जातात. यज्ञपत्नींनी

याज्ञिकांचे ऐकले नाही आणि फराळाचे पदार्थ घेऊन त्या श्रीकृष्णाकडे गेल्या, नंतर त्या याज्ञिकांनाही आपापल्या पत्नीची धन्यता मान्यच करावी लागली.

एक-एक गुणाचे खूप तपशीलासह वर्णन करता येईल, उदाहरणार्थ एक अहिंसाच बघा ना !!! आता अहिंसा म्हणजे काय ? शरीर, वाणी व मन यांच्याद्वारे आपल्याकडून कोणाही (चतुर्विध) जीवास पिडा होऊ नये, हत्येस प्रत्यक्षपणे तसेच अप्रत्यक्षपणे कारण होऊ नये यासाठी अत्यंत जागरुक राहून, कोणालाही दु:ख होणार नाही असे आदर्श वर्तन हे अहिंसा पालन. अहिंसा शब्द निषेधात्मक आहे. त्याचाच अस्तिपक्षी भाव म्हणजे सर्व भूतमात्रांकडे समदृष्टीने पाहणे व त्यांच्यावर अभेदपणे प्रेम करणे !!! म्हणूनच जगाला सुखी करण्याच्या उद्देशाने कायिक-वाचिक-मानसिक समग्र जीवन व्यवहार करणे ही श्रद्धा अहिंसाच असे श्रीगुरु आपले श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

श्रीगुरू श्रीज्ञानेश्वर महाराज तेराव्या अध्यायात आपल्या धर्मसंकीर्तनात म्हणतात, ''अध्यात्मज्ञानाची आणि संस्कारसंपन्न मनाची गाठ पडली की खऱ्या अहिंसाभावनेचा उदय होतो !!! ज्याच्या वाणीमध्ये मूर्तीमंत अनुकंपा, अपार भक्तीप्रेमभाव आणि अगणित सहानुभूती असते, ज्याच्याकडून कोणालाही पीडा होत नाही, इतकंच काय तर मनातही तसा विचार येत नाही तोच खरा अहिंसापालक.'' **''पुढा स्नेह पाझरे। मागा चालती अक्षरे। शब्द पाठी अवतरे। कृपा आधी।। का फेडित पाप-ताप। पोखित तीरीचे पादप। समुद्रा जाय आप। गंगेचे जैसे।।''**

अहिंसेची ''**प्रेमस्वरूप**'' सद्‌भावना प्रथम बुद्धीमध्ये उद्‌भवते नंतर ती मनात संचारते असे झाले की बुद्धी, मन, वाणी आणि सगळी इंद्रीये यांच्याद्वारे केवळ निरामय, निरतिशय, निर्विषय, निरुपचार, निर्मळ, नि:ष्काम अशा भक्तीप्रेमपरिप्लुत क्रियांचाच व्यवहार घडतो. अहिंसेची खरी खुरी जोगवण ती हीच.

हा एक भक्तीप्रेमभावच जगात शांतता, सुख, स्वास्थ्य, आनंद आणि ''अभेद निर्भयता'' यांचे साम्राज्य स्थापन करू शकतो.

* * * *

# चिंतन २३४

कोणतीही गोष्ट विषय समजल्यावर, प्रमेय कळाल्यावर, भगवंत अनुभवास आल्यावर आपल्या ठिकाणी जे ज्ञानाचे स्फुरण होते ते वाणीद्वारे बाकी सर्वजणांना कळावे म्हणून महात्मे इतरांना सांगतात. जसे वाणीच्याद्वारा तसेच अन्य इंद्रियांच्या माध्यमातून व हावभावांनी तेच सूचित होत असते म्हणून भगवंताच्या अनुभवी माणसाने असे बोलावे, वागावे आणि कृती करावी की ज्यामुळे आपणास जे कळले, अनुभवास आले "**तोच**" बोध दुसऱ्यांनासुद्धा व्हावा. आपले श्रीतुकोबाराय म्हणतात, "**अनुभवे आले अंगा। ते या जगा देतसे।। तुका म्हणे पोटी। देवा घालूनि सांगू गोष्टी।।**"

अशा सत्यपरमतत्त्वाचे बोलणे जरी झाले तरीपण ते अहिंसा भावाला मारक नसावे. म्हणजेच सत्यवचन हे दुसऱ्याचे मन/अंत:करण विदीर्ण करणारे कठोर-कटू नसावे. जे **हितकर**, प्रिय व मधुर असूनही काहीही झाकून लपवून ठेवीत नाही आणि खरे सांगत असूनही कोणालाही दुखवीत नाही ते सत्य भाषण !!! मोगऱ्याची कळी जरी अणीदार असली (म्हणजे टोकदार) तरी ती मृदु, सुगंधी व हृद्य असते. पौणिमेचा चंद्रप्रकाश लखलखीत असला तरी तो शीतल असतो. तसेच भाषण-बोलणे सत्य असूनही कोणास न दुखवणारे आणि आल्हाददायक असावे. आपले श्रीगुरुज्ञानोबाराय याबाबत काय म्हणतात ? "**पुढा स्नेह पाझरें। मागा चालती अक्षरें। शब्द पाठी अवतरे। कृपा आधी।।**", "**तैसे साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। बोल जैसे कल्लोळ। अमृताचे।।**". सत्य बोलणे, सत्य पालन करणे हे सोपे नाही आणि नसतेही तर फार कौशल्याचे/तारतम्याचे आहे. त्यासाठी विवेकबुद्धी, व्यक्तीहीत, समाजकल्याण, सत्‌धर्म, अहिंसा, विचार सर्वांगाने करावा लागतो व त्याच बरोबर अंत:करणाची अंतर्बाह्य शुचिता, शुद्धता, निर्मळपणा-सरळपणा, निर्भयता या गोष्टी पुरेपूर असल्या पाहिजेत.

हिरा आत व बाहेर सारखाच स्वच्छ असतो, सूर्य सर्व दिशांना सारखाच तेजस्वी असतो, कापूर आत व बाहेर सारखाच निर्मळ व सुगंधित असतो, तसेच भक्ताच्या अंतःकरणाचे भाव कोणत्याही प्रसंगांनी, बाह्य उपाधींनी दूषित होतच नाहीत, अशा मनाच्या निर्मळ स्थितीला **"शुचित्व"** म्हणतात. त्यांचे बाह्य वर्तन आणि अंतरंग आत्मज्ञानाच्या दीपाने विशोधित (आणि सुशोभित पण) झालेले असते. तोच शुचित्वाचा खरा पालनकर्ता असतो.

सत्कर्माचरण, सद्भाव आणि सतत घडणारे **नामस्मरण** अगदी सहज अंगवळणी पडल्याने ज्याचा बाह्यभावपण उजळला आहे आणि त्याचबरोबर आत्मप्रकाशाने ज्याचे अंतरंग निष्कलंक, तेजस्वी झाले आहे म्हणजेच शुचित्वामुळे (**सोवळयामुळे** ???) बाहेर व आत, कृती-उक्ती व विचार, शरीर व मन ह्यात भेदच उरलेला नाही आणि चित्तात एकमात्र निर्मळ-स्वच्छ-परमात्मा-पांडुरंग प्रकटलेला असतो ते शुचित्त्व-**सोवळे** !!! पाण्याने हिरा भिजत नाही तसेच ज्याच्या मनाचे भाव विकारांनी बाधित होत नाहीत अशी अविचलस्थिती म्हरजे **"पावित्र्य-सोवळं"**. श्रीतुकाराम महाराज काय सांगतात ते, **"पवित्र सोवळीं। तीच एक भूमंडळी।।१।। ज्यांचा आवडता देव।"** आणि एका ठिकाणी म्हणतात, **"नाही त्या विटाळ, अखंड सोवळी। उपाधि वेगळीं जाणिवेच्या।।"**.

यासाठी बाह्यशुचित्त्वालासुद्धा महत्त्व आहे बरं का !!! (१) नित्य प्रातःस्नानाने शरीर व गात्रे मलरहित ठेवणं, (२) व्यायाम (**चालणं**), प्राणायाम, युक्त अस्त आहार-विहार (यामुळे त्रिदोष, सप्तरस, सप्तधातू, नाड्या, रोहिणी, नीला व एकंदरीतच सर्व शरीराचीच आतील यंत्रणा निरोगी व समप्रमाणामध्ये ठेवणे), (३) पवित्र तीर्थात, पर्वकाळी व संधी सापडेल तेव्हा स्नान करणं, पुण्यक्षेत्रात निवास करणं, धर्म-भक्तीप्रेम-अध्यात्म यांची **चर्चा** करणं, **नामस्मरण**, ध्यान-चिंतन, सत्संग आणि **श्रवण** साधणं, (४) स्वाध्याय-नित्य नियमाने-वाचणे-पाठ करणे इत्यादी, अव्यावृत्त **नामस्मरण** आणि ईश्वर-प्रणिधान ही झाली बाह्यशुचिता.

दंभ, दर्प, अभिमान, दु:संग, मत्सर, असूया, क्रोध, स्वार्थ, धन-सत्तेची लालसा या सर्व दोषांचा त्याग. भूतमात्रांबद्दल दया-प्रेम-सहानुकंपा, सरलता, समभाव, प्रसन्नता, अढळ अशी भगवद्/श्रीगुरु निष्ठा ह्या सगळ्यांनी अंत:शुचिता.

उपासना म्हणजे नामस्मरणप्रधान भक्तीमार्गात शब्दाच्या चिकित्सेला महत्त्व नाही. तर सगुण-साकार भावनेच अव्यक्त-सर्वव्यापी भगवंताची उपासना महत्त्वाची. त्यामुळे अढळ आसिक्याच्या-श्रद्धेच्या-निष्ठेच्या पायावर भक्तीभावाने मंदिर उभे राहते. म्हणून श्रीगुरु-हरी चरणाविंदी अढळ भक्तीप्रेमभाव !!!

* * * *




''दया धर्म का मूल है'' असे एक वचन आहे. अवघ्या भूतमात्रांत एकच ''आत्माराम'' आहे, ह्या भूमिकेवरून अवघ्या प्राणीमात्रांबद्दल दया-प्रेम-सहानुकंपा, सरलता, समभाव, प्रसन्नता, अढळ भगवद्-श्रीगुरु निष्ठा आणि सर्वकाल विनम्रता ह्या सद्गुणांनी भक्तीप्रेमाला जास्तच गोडवा-माधुर्य प्राप्त होते.

ह्या जगतात सर्वत्र सुखापेक्षा दु:खच अधिक आढळते. दुसऱ्यांच्या दु:खाबद्दल आपल्या अंत:करणात अनुकंपा वाटणे (आपण दु:ख भोगत असतानासुद्धा), त्यांचे दु:खहरण कसे करता येईल याचे विचार मनात येणे, याच ऋजुभावाला ''दया'' असे म्हणतात. दयेच्या अनेक व्याख्या समर्पकपणे श्री भगवद्पूज्यपाद श्रीशंकराचार्यांनी केल्या आहेत बघा, त्यावरून दयाभावनेचे स्वरूप सहजच कळून येते. **''दया नाम सर्वभूतेषु सर्वत्रानुग्रहः।''** म्हणजे सर्वभूतमात्रांबद्दल सर्वदा अनुग्रह-सहाय्य करण्यास

तयार असणे म्हणजेच दया. "**यत्नादपी परक्लेशं हर्तुम् यद् हृदि जायते। इच्छा भूमिसूरश्रेष्ठ सा दया परिकीर्तितः।।**" दुसऱ्यांचे दुःख हरण करण्यासाठी जरी बहुत कष्ट पडले तरी ते आपण सोसावेत अशी सदिच्छा जेव्हा हृदयात उचंबळते, तेव्हा तीच "**दया**" भावना बरं !!! "**आत्मवत् सर्वभूतेषु यो हितायच शुभायच। वर्तते सततं दृष्टः क्रिया येषा दया स्मृतः।।**" साधारणपणे मनुष्य स्वार्थ साधण्यास तत्पर असतो नाही का ? परंतु जो सर्व भूतमात्रांना आत्मवत (**स्वस्वरूप**) मानून त्यांच्या भल्यासाठी, त्यांच्या कल्याणासाठी-परमकल्याणासाठी, दुःख निवारण करण्यासाठी **स्वेच्छेने** सतत झटतो त्या सर्वच्या सर्व कायिक, वाचिक आणि मानसिक क्रियांना "**दया**" असे म्हणतात. "**आत्मवत वर्तितव्यं हि दयैया परिकीर्तितः। परे वा बंधुवर्गे वा, मित्रे द्वेष्टादि वा सदा।।**". बंधू-भगिनी, कन्या-पुत्र (**मानस**) देखील, आप्त-मित्र, **अनोळखी माणसे**, शत्रू (आपण कोणाचेच नाही, पण आपल्याशी कोण करत असेल) आणि आपला निष्कारण द्वेष करणारे, या सर्वांवर आत्मवत् प्रेम करणे, सर्वप्रकारे, सर्वतोपरी सहाय्य करणे अशी सद्भावना ही खरोखरची दया.

संत कोण ??? संत, सत्पुरुष, महावैष्णव यांची लक्षणे अनेकविध आहेत. सामान्य आणि विशेष. तथापी, सामान्य लक्षणातील सर्वात प्रमुख लक्षण "**दयाभेतूषु**" **हेच आहे.** "**साधवो दीनवत्सला:।।**", आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात बघा ना !!, "**भूतांची दया हे भांडवल संता। आपुली ममता नाही देही।।**", "**भूती देव म्हणूनि भेटतो या जना। नाही हे भावना नर-नारी।।**". महापुरुषांची दयाबुद्धी केवळ मनुष्यासच नव्हे तर सर्व जीवमात्रांना **प्रेमामृताने** प्रसन्न करत असते, त्यात भेद-भाव, आपला-परका असा पक्षपात होत नाही. त्यांच्या या प्रेमभावात-वागण्यात-बोलण्यात-चालण्यात कोणताही अंतरहेतु नसतो.

श्रीगुरूपण आपल्या लेकरावर अशीच प्रेमाची पाखर घालत असतात. श्रीगुरुंच्या या दिव्य प्रेमभावाबद्दल एक थोर शिष्य (की जो कन्या-पुत्रवत्

आहे) स्वानुभवाने आनंदोद्गार काढतो, तो काय म्हणतोय बघा ना !!!, ''**स्नेहेनबध्नासि मनोऽस्मदीयम्। दोषान् अशेषान् सगुणी करोति। अहेतुना नो दयसे सदोषान्। स्वाके गृहित्वा यद् इदं विचित्रम।।**'' याचा भावार्थ असा – हे श्रीगुरुमाय, तू आपल्या अकृत्रिम भक्तीप्रेमरज्जूने माझ्या/आमच्या अंत:करणास बांधून टाकून, माझ्या/आमच्या दोषसमूहाचे सद्गुणांमध्येच परिवर्तन करतेस आणि कोणताही अंतस्थ हेतू न ठेवता माझे/आमचे दोष, उणिवा, अपूर्णता हरण करून पूर्णपदावर नेऊन बसवितेस !!! ''हे माते, हे किती अतर्क्य, अघटित घडले आहे !!! घडते आहे !!! होय की नाही ???''

ब्रह्मानुभवसंपन्नतेच्या पायावर आधारित असा हा जो प्रेमभाव तो अत्यंत विशुद्ध. अंत:करणात उपजलेले हे विशुद्ध प्रेम ज्यावेळी अंत:करणातून बाहेर पडते आणि मग ते क्रियारूप होते त्या भक्तिप्रेमयुक्त क्रियाशिलतेलाच ''**दया**'' असे म्हणतात.

अध्यात्मदृष्टीने ही दया स्पृहणीय अशी तारकशक्ती आहे. वरच्या ''दया धर्मका मूल है'' या वचनातील इंगीत हेच आहे. आपल्या अंत:करणात या दयारूपी तारकशक्तीचा प्रवाह सुरु झाला की प्रथम ''भय'', निराशा दूर होते. आर्ताचे दु:ख, ताप नष्ट होतो, पतित हा पावन होतो. या तारकशक्तीने सामान्यांच्याही समग्र जीवन-संक्रमणास आरंभ होतो. जे या अच्युत-नारायणाशी तन्मय झालेले असे ''**महाभागवत**'' असतात, ते सर्वांच्या सुखसमाधानासाठी, शाश्वत आनंदासाठी आपले सर्वस्व झिजवत असतात होय ना ???

* * * *

# चिंतन २३६

“अस्ति” म्हणजे ‘आहे, ‘असणे’, आता “आस्तिक्य” म्हणजे “सतत असणे, आहेपणा”. परंतु समस्त चारी प्रकारची जीवसृष्टी ही मर्त्य आहे. या सगळ्या चराचर विश्वात अमर, सतत विद्यमान असणारा, अविनाशी असा परमात्मा हाच एकमेव आहे !!! सर्व चराचराचा-आकाराचा नाश झाला तरी ज्याला नाश नाही, अव्यक्ताहून पण पलीकडे असलेला असा भावरूप एक तोच आहे.

यालाच ज्ञानी परब्रह्म म्हणतात, तर भक्त हे “परमात्मा-भगवंत-श्रीहरी” असे संबोधतात. हा ईश्वर या सर्व ब्रह्मांडाचा निर्माता, पिता, माता, भ्राता, पितामह व सर्वाधार असून तोच एक सर्व जीवांचा पोषण-रक्षणकर्ता, सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वांचे उत्पत्ती-गती-लय कारण आणि पुनर्उत्पत्तीचे अव्यय बीज आहे.

म्हणूनच भगवंतावर श्रद्धा तथा आस्तिक्यबुद्धी एवढी दृढ असली पाहिजे - श्रीगुरुंवर तशीच तेवढीच असली पाहिजे (कारण दोन नाहीत तर एकच आहेत. देव तोच गुरु, गुरु तोच देव) की भक्ती-साधकाची विचार आचारांची जीवन प्रेरणा याच निष्ठेवर अधिष्ठित असावयास हवी. या निष्ठेचा डांगोरा पिटावयाचा नाही, आपल्या निष्ठेची लोकांकडून वाहवा करून घ्यावयाची नाही, आपल्या भक्तीप्रेमभावाचा देखावा पण नको, समर्थ म्हणाले, “**देवाविण काही नाही। ऐसे बोलती सर्वही। परंतु त्यांची निष्ठा काही। तैसी नसे।।**”. असल्या नुसत्या बोलण्याचा काय उपयोग ???

सारांश काय तर ही “श्रीगुरु-हरिनिष्ठा” ही वाणीद्वारे नुसता बोलण्याचा विषय नाही, तीच खरीखुरी जीवननिष्ठा होऊन सर्व अर्थाने, सर्व अंगांनी, भाव-भावनांतून, विचारांतून-आचारांतून, कृतीतून, जीवनाच्या सर्व स्तरांतून

प्रगटली पाहिजे. अशी अढळ श्रीहरि-गुरु निष्ठा अंगी मुरल्यावरच भक्त-भगवंत, श्रीगुरु-शिष्य यांचा एकपणा-अद्वैत संबंध केवळ बौद्धिक व काल्पनिक न राहता, अद्वैत अनुभवाच्या-समरसतेच्या कक्षेत येईल !!! मगच त्यांचे सामरस्य-तत्त्वैक्यता लाभेल. प्रल्हादाची श्रीहरिवर अढळ श्रद्धा होती. त्याला अणूरेणूंमध्ये सर्वंकष भगवत्चैतन्याची प्रचीती येत असे. प्रल्हादाचे सोडा, त्या एकलव्याला मातीच्या पुतळ्यात श्रीगुरु द्रोणाचार्यांचीच प्रचीती येत असे. भक्तीयोगातील उच्चस्तरीय आनंदानुभव येण्यास असा दृढ आस्तिक्यभाव आपल्या हृदयात सतत जागा हवा नाही का ???

''ईश्वराचे अस्तित्व मानणे म्हणजे आस्तिक्य'' अशा एका व्याख्येमुळे काही विचित्र समस्या आपल्यासमोर येतात. कारण भारतीय तत्त्वज्ञान ईश्वर मानणे आवश्यकच आहे असे मानत नाही ??? जैन व बुद्ध हे निरीश्वरवादी आहेत, योगाने ईश्वर मानला असला तरी त्याचे जगत्कर्तृत्व, नियंर्तृत्त्व आणि कृपा यांना मानले नाही आणि अद्वैत शुद्धज्ञानमार्गी माया आवृत्त परब्रह्म म्हणजेच ईश्वर असे मानतात. जरा अवघड चिंतन झाले हो ना ??? काही बिघडले नाही. आस्तिक शब्दाचीं दुसरी एक रुढ व्याख्या आहे. आपण या व्याख्येचा विचार करू. ''**अस्तीक्यं नाम वेदोक्त धर्माधर्मेषु विश्वासः। नास्तिको वेद निन्दकः।।**'' वेदांना प्रमाण मानणारे ते आस्तिक व वेदप्रामाण्य न मानणारे ते नास्तिक. म्हणजेच सांख्य, योग, ज्ञान या मार्गाचे उपासक आस्तिक आणि जैन व बुद्ध हे उघडाउघडच नास्तिक.

यावरील दोन व्याख्यांमुळे ''आस्तिक'' या शब्दाबद्दल अधिकच गोंधळ होतो. निर्गुण-निराकार तत्त्वोपासक आणि सगुण-साकाराचे उपासक असे दोन्ही मार्ग अनादी कालापासून प्रचलित आहेत. हे दोन्ही मार्ग जसे एकाच शिखर बिंदूला येऊन मिळतात ना !!! तसंच या आस्तिक-नास्तिक पदांच.

मग आपण काय करावयास पाहिजे ??? तर ''आस्तिक्य'' या पदाचा अर्थ अधिक व्यापक, खोल, सर्वसमावेश आणि समन्वय साधणारा करावयास हवा. श्रीमद् भगवान पूज्यपाद श्रीशंकराचार्य आपल्या गीताभाष्यात

म्हणतात, **"आस्तिक्यं नाम अस्तिभाव:। श्रद्धधानता परमार्थेषु आगमार्थेषु ।।"**

म्हणजे सरतेशेवटी काय तर, **आत्मारामाच्या नित्य अस्तित्त्वावर अढळ श्रद्धा.** आपल्याला भगवंताच्या/श्रीगुरुंच्या अस्तित्त्वाचे नित्य भान, आपल्या जीवनाला अंतर्बाह्य व्यापून असणाऱ्या श्रीगुरु-हरि स्वरूपाची नित्य जाणीव म्हणजे आस्तिक्य आणि ही नित्य जाणीव होण्यास एकच साधन **"नाम"**.

* * * *




कार्तिक शुद्ध ?? प्रबोधिनी एकादशी, कार्तिकवारी, पंढरीसारखे क्षेत्र, महायोगपीठ, संतांचे माहेर. पहाटे श्रीपांडुरंगाची षोडशोपचार पूजा संपन्न झाली. दूधा-दह्याचे रजतकलश त्या सावळ्या विठूरायाच्या मस्तकावर रिते झाले. मुखाला नवनीतीचा गोळा, मस्तकापासून चरणकमलापर्यंत अंगा-प्रत्यंगावरून पयोधारा ओसंडत होत्या. कृष्ण-धवल, समचरण स्वरूप डोळ्यात साठवले. डोळ्याचे पारणे फिटले, पण त्याच बरोबर डोळ्यांची भूक भागेना.

भगवन्ताचा वर्ण मेघाप्रमाणे श्यामवर्ण, कासे सोनसळी पितांबर कसला आहे, अर्धोन्मिलित नयन कमलाप्रमाणे सुंदर आहेत, त्यातून भक्तीप्रेमाच्या अमृतधारांना स्नेहाभिषेक चालला आहे. श्रीपांडुरंग परमात्मा परमानंद स्वरूप आहे. ब्रह्मविद्येचा पुतळा आहे. निष्काम परब्रह्मच भक्तीप्रेमसुखासाठी आसुसले मग महाभावसंपन्न वैष्णवजनांची काय कथा !!! त्या नवलनयनोत्सव, राजस, सुकुमार, मदनमोहनाजवळ त्याच्या दर्शनाची माधुकरी मागायची. हे नाथ, हे रमानाथा, आता तुझ्या दर्शनासाठी प्राण

कंठापर्यंत आले आहेत, तेव्हा आपल्या दर्शनसुखाची भीक आमच्या डोळ्यास घाल. भक्तवर सूरदास म्हणतात, "**अखीयाँ हरिदर्शनकी प्यासी।**" या विश्वातील सर्व सौंदर्य, भौतिक सौंदर्य ज्याच्यावरून कुरवंडी करून टाकावे असे हे सर्वांगसुंदर स्वरूप, लावण्याचा भागाच, नवरंगाचा हा रंगनाथ.

या आनंदकंदावरून सर्व सुखे ओवाळून टाकावीत. या रंगनाथाच्या पुढे सर्व रंग फिके. याच्याशिवाय जीवनात रंगतच नाही, जगण्यात मौजच नाही. कृष्णवेडी मीरा तर म्हणते, "या विश्वात अनेकविध रंग आहेत, पण ते सगळे विटणारे, फिके पडणारे आहेत. न विटणारा, फिका न पडणारा तर नाहीच पण क्षणाक्षणाला गहिरा, जास्त गहिरा होणारा रंग एका या श्रीरंगाचाच. तो रंग आहेच तसा रंगारी आहे. आपले श्रीतुकोबाराय म्हणतात, "**देव रंगारी रंगारी। त्रिभुवनाचा रंग करी।। शाम बिना सब रंग फिको।।**"

याला इतका पहावा की डोळ्यात कृष्ण, ह्दयात कृष्ण, एवढंच काय तर रोमारोमांत, श्वासाश्वासात कृष्णच कृष्ण, कृष्णमयता. त्याच्याशी नित्य संयोग (सगुणात) वियोग-निर्गुणस्वरूप, पुनः संयोग, पुनः सगुण, "**निर्गुणाची बाज, तर सगुणाची शेज**", असं श्रीज्ञानराज माऊली या संयोग-वियोगाचे वर्णन करतात.

वियोगातूनच ध्यान आकाराला येते. ध्यान म्हणजे मन आणि इंद्रिये ही भक्तीप्रेमात संयुक्त होणे !!! एका भगवंताचे/श्रीसद्गुरुचे चिंतन, भगवंत भेटावा, याच एका उद्देशाने एकाग्रचित्ताने केलेली कुशाग्रबुद्धीची क्रिया म्हणजे ध्यान. ही क्रिया विरहातूनच आकाराला येते जे प्रत्यक्ष समोर प्राप्त आहे, त्याचे ध्यान घडून येत नाही, ते दृष्टीआड झाले की त्याबाबत पुनः कसे प्राप्त होईल यातून त्याचे पुनः चिंतन सुरू होते, तो दूर होण्यामुळे जो वियोग झाला आहे त्यातूनच त्याचे ध्यान घडते. यालाच विरहभक्ती म्हणतात. भक्तीतील ही फार मोठी उच्च अवस्था आहे. माझ्या स्वामीचे दर्शन केव्हा घडेल याची तळमळ, तगमग लागलेली असते. ज्ञानराजांनी गोपीभावावर आरुढ होऊन,

गोपीच्या भावातून आणि मुखाने या विरहभक्तीचे, स्वानुभवाचा अविष्कार म्हणून गोड वर्णन केले आहे. "**पडिले दूर देशी। मज आठवे मानसी। नको नको हा वियोग। कष्ट होताती जीवासी।।१।। दिनु तैसी रजनी। झाली वो माये। अवस्था लावून गेला। अजुनी कां न ये।।२।।**" तर कबीर म्हणतात, "**बिरह कमंडलु कर लिये। बैरागी दो नैन। मांगे दरसन माधुकरी। छके दिन रैन।।**"

गोपीसुद्धा याच भावातून त्याची सुंदर अशा गोपीगीतातून प्रार्थना करतात. कृष्णा, तू कमलनयन आहेस, अशा कमलाकार नेत्रातून आमच्यावर कृपादृष्टीतून, भक्तीप्रेमरसाची बरसात झाली आहे. त्यातूनच आमच्या अंत:करणात भक्तीप्रेमाचा ओलावा, जिव्हाळा, स्रोत निर्माण झाला; भक्तीप्रेमाचे मळे फुलले, तू आमचे अघासूर, बकासूर, कालिया इत्यादींपासून रक्षण केलेस, पण हा विरहासूर आज आमचे प्राण घेऊ पाहत आहे हे नाथ !!! कृपा कर आणि आमचे प्राण वाचव.

तुझ्या वियोगात आमचे रक्षण तुझ्या कथामृतातून-नामामृतातून होत आहे. स्वर्गीय अमृतात विकार वाढतात, पुण्यक्षय होतो, पण तुझ्या नामामृतात, कृष्णा, विकारच उरत नाहीत.

भगवान म्हणाले, मग मला कशाला शोधीत होतात ? तर म्हणाल्या, तुझ्या दर्शनासाठी आता प्राण व्याकूळ झाले आहेत. परमात्मा प्रकट झाला, म्हणाला, खरे खरे सांगू, तुम्हाला जे दु:ख झाले त्यापेक्षा कितीतरी पटीनी जास्त दु:ख मला झाले, तुम्ही कथा-नामामृतात तरी दु:ख विसरू शकत होतात, पण मला तेही करता येत नाही. मी आपला एकटाच होरपळत होतो. मी तुम्हाला काय देणार ? तुमच्या आत्यंतिक भक्तीप्रेमाचा उतराई कसा होणार ? मी एवढेच तुम्हाला सांगतो की, मी तुमचा कायम ऋणीच आहे. गोपी हे ऐकून कृतार्थ झाल्या. प्रभूंनी त्यांना परमानंदस्वरूपता बहाल केली. आपल्या स्वस्वरूपी मिळवून टाकले.

* * * *

# चिंतन २३८

आपल्या जीवनातून सुख-दुःख, इच्छा-लाभ इत्यादी पूर्णपणे निघून गेल्यावर मग मी एका हरिभक्तीस सर्वस्वी वाहून घेईन, अशा भविष्यकालीन क्षणाची वाट न पाहता, आपण साधकांनी आहे त्या परिस्थितीतच भक्तीसाधनेस लागावे आणि आपल्या आयुष्यातील अर्धक्षण/निमिषसुद्धा हरिभजना-नामाशिवाय व्यर्थ घालवू नये.

सर्व नारदादिक भक्ताचार्यांचा एकच हेतू आहे की, भक्तीचे सत्य व शुद्ध स्वरूप अगदी जनसामान्यांना पण कळावे आणि या प्रेमलक्षणाभक्तीचा सर्वत्र प्रसार व्हावा, अधिकाधिक भक्तांना हरिप्राप्ती व्हावी, हाच एक सकलकल्याणकारक मंगल हेतू. या सदूहेतूनेच ओव्या, श्लोक, अभंग, पदे आणि सूत्रे यांची रचना.

‘‘**आपण श्रीहरिप्राप्ती साधावयाचीच**’’, असाच संकल्प साधकाने अगदी दृढ धरावा आणि मग साधकाने अर्धक्षणसुद्धा श्रीहरिसेवेशिवाय/श्रीगुरुसेवेशिवाय काळ उगाच फुकट दवडू नये असा सर्व भक्ताचार्यांचा आग्रह आहे. त्याचे कारण म्हणाला तर समाजात सर्वत्र अशी एक विचारसरणी प्रसृत आहे की, ‘‘आत्ताच एवढ काय नडलय ? हे काय वय आहे परमार्थ करण्याच !!!???, पुढं पुष्कळ आयुष्य पडलय ? मग तेव्हा भक्ती, श्रवण, सत्संग, भजन-पूजन, नामस्मरणच करू ना !!! त्यावेळी दुसरे काहीच काम नसते, होत नाही, भरपूर वेळ असतो, त्यावेळी मग अहोरात्र देवदेवच करीत बसायच आहेच की !!! काय बिनबुडाचा तर्क नाही का ?

परंतु प्रत्यक्षात जे काय घडते व दिसते आणि अनुभवास येते ते सर्व अगदी यावरील तर्काच्या विरुद्ध असते. तरुणपणी या सगळ्याकडे दुर्लक्ष करणारा माणूस, त्याच्या वृद्धापकालीसुद्धा यातील (परमार्थातील) काहीही न

करता नुसत आयुष्य नाही त्या गोष्टीत फुकट घालवतो. आळस असल्यावर तर काय ? बोलायची सोयच नाही. भरपूर वेळ असूनही पारमार्थिक कल्याण साधण्याची साधी इच्छासुद्धा होत नाही. मग प्रत्यक्षात परमार्थ कुठला ना ??? आणि जरी एखादे वेळी इच्छा झाली तरी शरीर आणि मन-बुद्धी यांच्या दुर्बलतेमुळे व सगळ्याचा चावून चोथा झाल्यावर काय करणार ? तर काहीच प्रगती करू शकत नाही.

श्रीरामकृष्ण परमहंस नेहमी म्हणत, "बालपणी शरीर लवचिक असते, मन स्वच्छ आणि संस्कारक्षम असते, अशाच काळात शरीर-मन-बुद्धीला जे वळण लावू, संस्कार घडवू तेच आयुष्यभर टिकतात आणि म्हणूनच हरिभक्तीचे वळण-शिक्षण व अभ्यासास बालपणापासूनच आरंभ करावयास पाहिजे." ज्या कळकाचा पालखीचा दांडा करावयाचा तो कळक, कोवळा-हिरवा असतानाच वाकवून मग त्याला वाढू देतात. वाळून जून झाल्यावर वाकवावयास गेलो तर त्याचे तीन-तेरा, नऊ-बारा असे वाजतील.

ही गोष्ट पूर्ण सत्य आहे की, मोठ्या वयात प्रारंभ करून कोणत्याही लौकिक कलेतसुद्धा प्रवीण होता येत नाही. तर मग सगळ्यात अवघड (**पण अशक्य अजिबात नाही हं**) अशी हरिप्राप्ती वृद्धापकाळात कशी जमणार ? मग जोपर्यंत शरीर सुदृढ आहे, रोगरहित आहे, अजून वृद्धत्त्व आलेले नाही (आणि आल, यावयास लागल तरी कृत्रिम बाह्य उपायांनी, आपण ते दडवतो आणि आलेच नाही अशा भ्रमात राहतो आणि आपली आपणच वंचना करून घेतो. आत्मवंचनेसारख **पाप नाही**.) जोपर्यंत इंद्रियांची कार्यक्षमता उत्तम आहे आणि काळाची सावली पडलेली नाही अशाच उमेदीच्या काळात, प्रपंच होत असतानाच परमार्थसाधनेचे अपार परिश्रम करावयास पाहिजेत. (आणि श्रीहरि-गुरुभाव-नामस्मरण यात काय कष्ट आहेत ?) वेळ निघून गेल्यावर मग काय उपयोग ? गाडी निघून गेल्यावर मग स्थानकावर जाऊन काय होणार ना ? गाडी यावयाच्या आधी आपण तेथे असावयास हवे. घराला आग लागल्यावर मग विहीर खोदण्यास प्रारंभ करणे शहाणपणाचे होईल काय ? अस तो भर्तृहरी कवी असून विचारतोय, मग सर्व साधू-संत, महात्मे,

महाभागवत, वैष्णवाचार्य यांचा परमार्थसाधनेविषयी अत्याग्रह असण केवळ स्वाभाविक आणि आपल्या परमकल्याणाच ना, पण आपल्याला त्यांचा हा आग्रह मानवत नाही. काही जण तर म्हणतात, ''सगळ थोडच श्रीगुरुंच ऐकावयाच ???'' त्यांच नाही ऐकावयाचं तर मग कुणाच ऐकून आपल परमकल्याण होणार ??? विचार करा !!!

* * * *




कोणी तर्कवादी म्हणतील आणि म्हणतात सुद्धा की, **अद्याप** आमच्या इच्छा, आकांक्षा, लालसा, मनोरथ पुष्कळच बाकी आहेत, त्या सगळ्या **एकदा** तृप्त होऊ द्यात मग अगदी निरिच्छ चित्ताने भगवंताच्या प्राप्तीमागे लागता येईल. परंतु ही एक पळवाट आहे, हा एक केवळ निव्वळ-पोकळ युक्तीवाद आहे. कारण माणसाच्या लालसा-मनोरथ कधीच तृप्त होत नाहीत. पेटलेला अग्नी जसा त्यात इंधन घालतच राहिल्याने कधीच शांत होत नाही, तशाच इच्छा. पुराण-इतिहासात ययाती-पुरुखा आणि कित्येकांची उदाहरणे आहेत.

म्हणून सर्व संतमहात्मे, भक्ताचार्य, साधू, महाभागवत-परमवैष्णव असा रोखठोक निर्वाळा देतात की, ''आपल्या आयुष्यात असा एक सुदिन उगवेल की ज्यावेळी आपल्या सर्व कामना तृप्त झालेल्या असतील, मग त्यावेळी भगवंताच्या उपासनेस-सेवेस-स्मरणास सर्व वेळ व शक्ती लावू ! असा तर्कट विचार म्हणजे एक स्वप्नरंजनच ठरेल. असा सुदिन कधीच आपणहून उगवणार नाही म्हणून त्या कधीच न येणाऱ्या **काल्पनिक** दिवसासाठी न थांबता, आहे त्याच स्थितीत, भगवत्प्राप्तीच्या साधनेस प्रामाणिकपणे, तळमळीने लागा.''

अखिल मानवांच्या कल्याणार्थ झटणारे सगळे संत अगदी पोटतिडकीने, कळवळून सांगतात की, हरिप्राप्तीच्या उपासनेचे कार्य भविष्यकाळावर ढकलू नका. हातातून निसटून जाणारा प्रत्येक क्षण, फार काय पण अर्धक्षणसुद्धा हरिस्मरणाशिवाय (म्हणजेच **नामस्मरण**) निरर्थक घालवू नका. अर्ध्या-अर्ध्याक्षणांची बेरीजच घटका, दिवस, पक्ष, महिना आणि वर्षे होत असतात!!! याचा जरासुद्धा विचार न करता क्षणाक्षणाने काळ व्यर्थ दवडणे म्हणजे आपल्या हातानी, मूर्खपणाने आपल्याच आयुष्याचा सर्वनाश करणे नाही का ???

"काल", महाकाल याचा दुसरा अर्थ मृत्यू-विनाश असा आहे. काल हा सर्वांनाच नष्ट करतो. तो या माणसाच्या सुख-लाभ-इच्छा तृप्त झाल्या आहेत किंवा नाहीत याचा विचार करीत नाही, याची तमा-क्षिती तो महाकाल बाळगीत नाही. मृत्यू हा नेहमीच अचानकपणे झडप घालीत असतो. जीवननाट्य संपते !!! म्हणूनच समर्थांसारखे महात्मे आपल्याला हेच सांगतात, "**मरणाचे स्मरण असावे। हरिभक्तीस सादर व्हावे।**" ते पण कसे? तर तत्पर आणि सावधपणे. आपण सावध होतच नाही ना ??? आपले श्रीतुकोबाराय पण सांगतात -

**क्षणोक्षणी हाचि करावा विचार। तरावया पार भवसिंधू।।१।।**
**नाशवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान।।२।।**

मग काय कराव ? -

**संत समागमी धरूनी आवडी। करावी तातडी परमार्थाची।।३।।**

आणि शेवटी इशारा -

**तुका म्हणजे इहलोकीच्या व्यवहारे। नका डोळे धुरे भरूनी राहो।।४।।**

भगवद्पूज्यपाद **श्रीशंकराचार्य** कळवळून त्या दयाघन परमात्म्याची प्रार्थना करतात, "एकेक दिवस व्यतीत होत जात, आयुष्य कमी कमी होत आहे, तारुण्याचा भर प्रत्येक दिवसागणिक ओसरत आहे (आपण कृत्रिमपणे तो लपवण्याचा निष्फळ प्रयत्न करतोय), गेलेला दिवस काही केले तरी पुन:

परत येत नाही. तो कायमचाच नष्ट झालेला असतो. अरे, आम्ही ज्याच्यामागे वेड्यासारखे लागतो तो सर्व **लौकिक** व्यवहार जलतरंगाप्रमाणे अतिचंचल आहे. **कसा, काय व किती सांभाळणार ना ???** म्हणून हे सर्वाधार भगवंता, तुला सर्वस्वी शरण आलेल्या माझे आता तूच रक्षण कर.''

यावर कोणी म्हणेल, ''अंतकाळी भगवंताचे स्मरण केल्यावर देह सोडत असताना तो माझ्या स्वरूपी मिळून जातो. यात अजिबात तीळमात्रसुद्धा संशय नाही अर्जुना !'' या भगवद्‌वचनाप्रमाणे शेवटच्या क्षणी वागले की पुरे ना !!! मग निश्चितच मुक्ती व हरिपदप्राप्ती होईलच ना !!!

हा युक्तीवाद फसवा, आपलीच फसवणूक करणारा. झटपट उपाय हा बहुदा फसवाच असण्याची शक्यता जास्त. कारण जो जन्मभर सतत नामस्मरण, **श्रीहरि-गुरु** चिंतन करीत असेल, त्याच्याच मुखातून शेवटच्या क्षणी नाम येईल. म्हणूनच सर्वकाळ हरिस्मरणातच गेला पाहिजे हेच अगदी खरे.

म्हणून क्षणार्धही **नामानुसंधान** सोडू नये. नामस्मरण हेच जीवन व्हावे. ब्रह्मचैतन्य काय आणि कोणीपण संत काय त्यांचा निरोप हाच आहे, नाम गावे, नाम घ्यावे, नाम खावे, नाम प्यावे, नाम बोलावे, नाम ऐकावे. नामाला कधी सोडू नये. मग नामी ? भगवंत/श्रीगुरु आपल्याला सोडत नाहीत. अण्णा तरी दुसर काय सांगणार ???

* * * *



## चिंतन २४०

फळात राजा आंबा, पक्षीगणात राजहंस, ताऱ्यांमध्ये सूर्य, पशूंमध्ये सिंह तसा मंत्रात श्रेष्ठ मंत्र ''नाममंत्र''. ''मननात् त्रायते इति मंत्रः।'' ज्याचे स्मरण केले असता ज्ञान-आत्मज्ञान प्राप्त होते तो मंत्र. मंत्राचे तीन प्रकार :- (१) अर्थात्मक (२) शक्यात्मक आणि (३) भावनात्मक.

काही मंत्र असे असतात की त्यांचा काही अर्थ निघत नाही. उदाहरणार्थ – ऱ्हीम्, क्लिम इत्यादी. अशा अक्षरांचा अर्थ सांगता येणार नाही पण तरी या तांत्रिक मंत्र अक्षरांत एक विशिष्ट ताकद जरूर असते. या अक्षरांचा वारंवार उच्चार केला असता अंत:करणात शक्ती निर्माण होते. त्यामुळे या मंत्रांना शक्त्यात्मक मंत्र म्हणतात.

आता काही मंत्र असे असतात की त्यात अर्थाला फार महत्त्व असते. उदा. गायत्री मंत्रासारख्या मंत्रात अर्थाला महत्त्व असते. स्थूल स्वरूपाने परमात्मा/ भगवंत सर्व विश्वाला प्रेरणा देणारा परमात्मा, आपल्या सर्वांच्या बुद्धीला आत्मज्ञानमार्गात प्रेरणा देणारा जो परमात्मा, त्याच्याच तेजाचे मी चिंतन करतो असा या या मंत्राचा लक्षार्थ आहे. अशा मंत्राचा जप करत असताना त्याच्या अर्थाचे चिंतन-स्मरणाकडे अखंड लक्ष असणे अती महत्त्वाचे.

आता तिसरा प्रकार भावनात्ममंत्र. म्हणजे आपला "**नाममंत्र**". भगवंताचे नाव हे भावनात्मक आहेच तशीच त्यात प्रचंड शक्ती आहे आणि अर्थ तर आहेच आहे. भगवंताच्या प्रत्येक नामाबरोबर एक सुंदरसा भाव मनात येतो. "राम-कृष्ण-हरी" म्हणताच-स्मरताच-आठवताच एक भक्तीप्रेमभाव मनात जागा होतो व हळू-हळू तो वाढू लागतो. नामाबरोबर भगवंताचे रूप आपल्या जनरेसमोर येते. नामानुसंधानात भावनेला अनन्यसाधारण मूल्य आहे. "राम-कृष्ण-हरी" या नाममंत्रात शक्ती आहे, अर्थ आहे व प्रचंड भाव आहे. वेदांमध्ये हा मंत्र सांगितला असल्याने त्यात अपार सामर्थ्य आहे.

या मंत्रात समग्र ऐश्वर्य साठलेले आहे. ऐश्वर्याचे पुन: तीन प्रकार – (१) लौकिक (२) अलौकिक व (३) पारमार्थिक म्हणजेच अध्यात्म स्वरूपाचे ऐश्वर्य. लौकिक ऐश्वर्य स्थूल. डोळ्यांनी पाहता येते. ज्ञानेद्रियांच्या द्वारा अनुभवता, उपभोगता येते. मनात जर या लौकिक ऐश्वर्याची भावना ठेवून/धरून जप केला तर लौकिक ऐश्वर्य मिळते. आता अलौकिक ऐश्वर्य. उदा. विद्या, कला. डोळ्यांना काय किंवा कर्मेद्रियांना दिसत नाहीत अशा विद्या (नाना) व कला प्राप्त व्हाव्यात अशी अलौकिक वासना धरून जप केला तर अलौकिक ऐश्वर्य प्राप्त होते. आता राहिले ३ रे अध्यात्मिक ऐश्वर्य म्हणजे "समाधान"

आत्यंतीक समाधान हे सर्वश्रेष्ठ ऐश्वर्य आहे. अखंड समाधान हीच मनाची समाधी आहे. नामचिंतनाने ती प्राप्त होत असते. आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात पहा, **"सर्व काळ नाम-चिंतन मानसी। समाधान मनासी समाधि हे।।"**

नामोच्चाराने आपले अंतःकरण शुद्ध होत जाते. अज्ञान नाहीसे होऊन स्वरूपज्ञान होते. स्वआनंदाचा अनुभव यावयास लागून अंतःकरण सुशीतल होते. "रामकृष्ण हरि" हा नाममंत्र सच्चिदानंदस्वरूप आहे. जिवाला शिवापर्यंत-भगवंतापर्यंत नेणारा हा नाममंत्र आहे.

जपमाळेला अक्ष माला असे पण म्हणतात. आपण जसा नाममंत्र माळेच्या प्रत्येक मण्याबरोबर जपतो तसे पूर्वी अ पासून क्ष पर्यंत एकेक अक्षराचा एकेक मणी ओढताना जप करीत असत. म्हणून माळेला **अक्ष** माला म्हणतात. माला या शब्दाचा अर्थ असा आहे, **"मा लाती ते माला."** मा म्हणजे **मला**. ला म्हणजे **घेऊन येणारी.**

आपले मन जे इकडे-तिकडे सतत भटकायला जाते, त्याला पकडून आणून भगवंतात स्थित करणारी ती माला म्हणजे **माळ.** या मंत्राने तीन अवस्था, तीन गुण आणि तीन काळ ओलांडून भगवंतापर्यंत जाता येते. याच्या मागे "जय जय" लावून भजन केले की या अवस्थांवर विजय प्राप्त होतो.

* * * *




हे जगत्-जगत्व्यवहार अगदी खरा-खरा वाटतो; पण ही माया आहे; हा एक आभास आहे; हे सारंच्या सारं गौड बंगाल आहे. मग सत्य काय आहे असं विचाराल तर फक्त एक आत्माराम सत्य आहे. त्रिवार सत्य आहे. आपले श्रीतुकाबाराय काय म्हणतात पहा, **"सत्य तू, सत्य तू, सत्य तू विठ्ठला।**

**का गा दावियेला जगदाकार।।"** हे तत्व कोणत्या प्रकारे, काय युक्तीने, कसे समजावून घ्यावे? याबाबत मनाची खात्री, बुद्धीचा निश्चय कसा करावा?

बिंदूमात्र रेत गर्भवासात राहते. (रक्त व रेत यांचे संयुग म्हणून) मग त्याला हात, पाय, डोके असे अवयवरूप अंकुर फुटतात. मग ९ मासांनी जन्म झाल्यावर बालपण-तारूण्य-प्रौढता-वृद्धत्व असे अनेक वेश-स्वरूपे, निरनिराळ्या काळी धारण करून ते पाहते, खाते, ऐकते, वास घेते, बोलते, चालते, झोपते, उठते, जाते-येते. एक प्रकारचा जादूचा खेळच ना? आता हा काय प्रकार आहे?

वडाचं लालबुंद फळ किती बारीक आणि एवढ्याशा बिजातून वडासारखा विशाल वृक्ष निघावा म्हणजे केवढे मोठे इंद्रजालच ना! मग खरे काय व कसे मानायचे? जडापासून चेतन आणि चेतनापासून पुन्हा जड होईलच कसे? अर्थात ही सगळी माया म्हणजे मिथ्या आहे.

मग सत्य काय? तर सत्य एकच चैतन्य, आत्मवस्तू. बाकी सगळे आत्मचैतन्यावरील/ब्रह्मचैतन्यावरील आभास आहेत. थोडा अवघड आहे सिद्धांत खरा, पण समजण्याकरिता म्हणून एक दृष्टांत सांगतो.

चित्रपट म्हणजे तरी काय तर पटावरील चित्र. पट म्हणजे वस्त्र. धुतलेलं, खळ लावलेलं, आखलेलं व रंग भरलेलं अशा पटाच्या चार अवस्था. पहिली विणलेली शुभ्र-धुतलेली; दुसरी खळ वगैरे लावून केलेली घट्ट अवस्था. शाईने किवा कशानेही आकारानुसार आखलेली रेखित किंवा लांछित अवस्था (म्हणजे कापडावर काढलेला छाप वगैरे) आणि ४ थी अवस्था रंग भरलेली रंजित.

एका पटाला म्हणजेच वस्त्राला हे जसे चार भाव (अवस्था) प्राप्त होतात; तसेच एका स्वयंप्रकाश आत्मारामाला चार भाव प्राप्त होतात.

पटाची मूळ शुद्ध-शुभ्र अवस्था हे आत्मारामाचे चिद्स्वरूप; पटाचे खळ लावून घट्ट केलेले स्वरूप म्हणजे आत्म्याचे अंतर्यामित्व. पटाचे लांछित स्वरूप म्हणजे आत्मारामाचा सूत्रात्म भाव आणि पटाची रंजित अवस्था म्हणजे आत्मारामाची विराटता (विश्वरूप)

आत्मपटावरील चित्रे कोणती म्हणाल तर, ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत, स्थावर-जंगम सर्व पदार्थ ही सर्व चित्रेच. राजा-प्रधान, चाकर-नोकर, स्त्री-पुरुष, बालक-वृद्ध, प्राणी, वनस्पती ही सर्व आत्मपटावरील चित्रेच. पटाचे ते लांछित/रेखीव/छापलेले रूपच.

मग पटाची रंजितावस्था (रंगवलेली) काय समजावी? तर ''चित्रकाराने कागदावर/पडद्यावर काढलेली चित्रे माणसांची, उडणाऱ्या पक्षांची, धावणाऱ्या रथांची, वृक्ष-लता-नद्या-झरे-फुले-फळे यांची. चित्रे म्हणजे रंजित अवस्था/**आभास.**

पण आभास का? तर या चित्रातील कपड्यांनी थंडी निवारण होत नाही, झरे-नद्या यांचे पाणी प्राशन करता येत नाही, फळे-अन्न-खाता येत नाही; आगीने पट जळत नाही, पावसाने भिजत नाही. शस्त्राने फाटत नाही.

दुसरे उदाहरण पहा. जलाशयातील आकाश काय खरे असते? आपल्याला खरेच वाटते? ज्याने खरे मानून त्यात प्रवेश केला, तो गुंतला पाहा! स्वत:च्या गळ्यात लफ्फा घालण्या ऐवजी आरशातल्या प्रतिबिंबाच्या गळ्यात घातला तर कसे? तर ही झाली **माया; आभास** एका आत्मचैतन्यावरचा. चैतन्याची जाणीव सत्यता, कळण्यासाठी उपासना/म्हणजे एक नाम.

* * * *



## चिंतन २४२

पटावरील चित्रातही उडणारे पक्षी, धावणारे रथ, कडेवरील हसरी बालके, वाहणारी नदी, कोसळणारा धबधबा, झुलते डुलते वृक्ष, आरवणारा कोंबडा, धगधगीत उसळलेला आगडोंब, अथांग जलाशय, गोचर होतात. पण पडदा, भिजत नाही, जळत नाही, हाणामारी, खून-खराबी यांनी फाटत नाही. रक्तरंजित होत नाही. का? तर ती पटावरील रंजीतता आहे.

पट उलगडला की सृष्टी आहे (पटावरील) आणि पट गुंडाळला की, सारीच्या सारी सृष्टी गडप. आहे की नाही मौज? आता दुसर उदाहरण घ्या. ''आरशातील छबी.'' ती पाहणाऱ्यासारखी हसते, मुखीचे भाव, हालचाल अगदी हुबेहूब. मग ती छबी काय खरे शरीर असते? तसाच जलाशय; त्यात आकाशातील तारे, ढग, चंद्र सरकताना चमकताना दिसतच असतात; जणू काही दुसर एक आकाशच. ते काय खरे असते?

आपल्याला तर खरेच वाटते. खऱ्यासारखेच दिसते ते. हो ना? एक लबाड, स्वार्थी, धनलोलूप आणि दुसरा साधा-भोळा, मंदबुद्धी. मोहोरांची समान वाटणी तया दोघांमध्ये; जागा कशी तर आरसे महाल. लबाड माणसाने त्या भोळ्या-बिचाऱ्याला सांगितले, ''बघ दोनही ढीग, मोहोरांचे सारखे आहेत ना? नीट बघ, खात्री कर; हा माझा आणि पलीकडचा तुझा. मी माझा घेतो, तू तो पलीकडचा घे! ह्याने उचलल्यावर काय येईल दुसऱ्याच्या हाती? घोर फसवणूक नाही का?

ज्याने खरे समजून स्विकारला तो फसला. आरशात बघून स्वतःच्या मुखात घालण्याऐवजी आरशातल्या मुखात घास घालण्यास गेला-घातला तर कसे?

हीच माया. तो आभासच! नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त, सत्-चित्-आनंद चैतन्यावरचा आभास. चैतन्य एक, मग श्रीपंढरीनाथ-श्रीराम-श्रीकृष्ण असोत किंवा श्रीगुरूदत्त अवतार श्रीपादश्रीवल्लभ-आद्यशंकराचार्य-ज्ञानेश्वमहाराज-समर्थ किंवा श्रीब्रह्मचैतन्य असोत, **चैतन्य एकच एक, आनंद एकच एक.** पक्के लक्षात ठेवावे.

चैतन्य/ब्रह्म एकच. त्यावरील मृगजळाची पहिली लहर अहंकार, दुसरी लहर बुद्धीची, तिसरी मनाची व मनाच्या भावविश्वाशी आणि चौथी देहाची. त्याच्या स्थूलविश्वाची. पण या सगळ्याच्या सगळ्या लाटा शेवटी त्या खोट्या मृगजळाच्याच ना? केवळ आभास.

हा आभासच मोह मायाजळात पाडतो; मग तो आभासच खरा वाटतो. मग तशी तशी क्रिया घडते. **जसे पाहावे-तसेच दिसते.**

मग काय करायला हवे? "**पाहणे बदलायला हवे.**" एका भव्य नाट्यगृहात एक दीप लावला आहे, त्याच्या प्रकाशाच्या सीमेत जे-जे येईल ते ते तो प्रकाशित करतो. ज्या नाटकाचा खेळ चालला आहे त्यातील पात्रे, सूत्रधार, देखावे. हे तो दीप पाहतो व प्रकाशित पण करतो.

पात्रे भांडली-तंडली, गोड झाली. त्यात कोणी राजा तर कोणी राणी, दास-दासी, विदूषक. त्यांची तसतशी वस्त्रे-अलंकार, त्यांच्या तशा-तशा छबी, तसे-तसे हाव-भाव; कार्यकलाप, अभिनय.

सर्वच्या सर्व तो दीप पाहणार-पाहतो-प्रकाशित करतो, पण कसा? तर तटस्थ राहून, साक्षीभावाने, त्रयस्थ-निर्विकार असताना. तसे जग पहावे.

प्रकाशाच्या झोतात आहेत तोपर्यंत दिसणार, त्याच्या **बाहेर गेले** की झाले अदृश्य. संपले नाटक. प्रेक्षक उठून जाणार आणि तो **दीप**.......?

ते रिकामे नाटकगृह पाहत राहणार, अगदी निवांतपणे. तसंच पटाच. पट उलगडला की झाली सृष्टी. तो गुंडाळला की सृष्टी गुंडाळली. संपली. पण पट उरतोच ना? नाटक सुरू होत नि संपत पण. तसाच जगदाभास.

पण मग कर्माच काय? देह आहे म्हणून घडतात, घडतील आणि घडत राहणर, घडतील ती घडोत; तो **आभासच आहे** हे कळल्यावर अवघं जीवनच **दीपवत्** होऊन उरेल. त्यात नामस्मरणरूप स्नेह भरत राहणे. मग तो जास्तच उजळत राहतो. साक्षीभावाने.

* * * *

# चिंतन २४३

## श्रीज्ञानेश्वरी महिमा-१

ज्ञानराजांच काव्य आत्मीय आणि तसच रसाळ व आस्वादक आहे. त्याच सगळच साहित्य त्या वलयात रमून जाण्यासारख तर आहेच पण त्याचबरोबर गुंतून-गुंग होण्यासारख आहे. याच्या प्रभावामुळे-भक्तीभावामुळे कोठेही तरी त्या माऊलीच्या परिवारातच जीव वावरत राहतो.

सगळ्याच संतमंडळाच्या आचार-विचार-उच्चारांनी आपण भारले जातो. त्यातून एक सूक्ष्म विचार-निवड, सत्य-अनृत वेगळ करण्याची दृष्टी प्राप्त होते. मग आभास नकोसा होतो आणि अधिष्ठानावरची नजर हालत नाही.

पण या संतसाहित्यात परब्रह्मस्वरूप अभिव्यक्त होत असले तरी त्याचे दर्शन सहजासहजी होत नाही. शब्द परिचय झाला, पाठ झाले तरी त्यातला अर्थ-आशय गळी उतरतोच असे नाही; संतांचे विचार अनुभवावर (आत्मारामाच्या) आधारलेले असतात. आपले श्रीतुकोबाराय म्हणतात, **''अनुभवे आले अंगा। ते या जगा देतसे।।''**

आपल्याला शब्दार्थ कळला एकवेळ, तरी अनुभव नसतो. म्हणून असे घडते. संतांचा अनुभव उत्कट तर असतोच आणि त्याबरोबरच प्रकट होण्यासाठी तो आतुरही असतो. अशी दिव्य-भव्य उत्कटता आणि आतुरता, श्रीज्ञानराजांच्या सगळ्याच ग्रंथात विपुल आढळते. त्यामुळे त्यांच्या विभूतीमत्वाचा शोध घेताना आपण मुग्ध होतो; स्तब्ध होतो.

श्रीगुरुमाऊलीचे विभूतीमत्व असामान्य आहे, लोकोत्तर आहे, अद्वितीय आहे. त्याचबरोबर ते बहुकक्ष आहे. या चराचर विश्वातील एकही असा विषय नाही की तो ज्ञानोबारायांच्या ग्रंथात आला नाही. किंबहुना सगळ्याच संदर्भांना ज्ञानराजांच्या वाङ्मयीन स्पर्शाने अभूतपूर्व प्रतिष्ठा लाभली आहे.

आत्मनिष्ठा-अध्यात्म हा त्यांच्या रचनेचा, तसाच त्यांच्या विभूतीमत्वाचा

गाभाच आहे. त्यातूनच त्यांच्या विभूतीमत्वाचे अनेकानेक पैलू आकारास आले आहेत. हे सगळे पैलू जरी भिन्न-भिन्न असले तरी एकात्म आहेत. त्यांची दृष्टीच चिन्मयी आहे. याच अलौकिकामुळे ते गगनालाही गवसणी घालतात. त्यांच्या अफाट कैवल्यस्वरूपाचा वेध घेण्यास जमिनीवरच उभ्या असलेल्या सामान्य माणसाचा आवाका अतिशय थिटा पडतो. तरी पण श्रीज्ञानदेवांच्चाच **''गीता जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची।।''** या वचनाचे बोट धरून **''ज्ञानेश्वरी जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति ज्ञानदेवांची।।''** अस म्हणता येत. नुसत म्हणण नाही तर ते अक्षरश: अगदी खरेच आहे. श्रीज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरमहाराज दोन नाहीत तर या अक्षररूपांनी खुद्द श्रीज्ञानोबारायच आहेत.

श्रीगुरुज्ञानदेवांनी आपल्या सगळ्याच ओव्या-अभंगांतून आत्मस्वरूपा-पासून-परमात्मस्वरूपापर्यंत सगळीच **''रूपे''** रेखाटली आहेत. ही सगळी रूपे अरूपाची आहेत; अक्षराच्या पलीकडे असणाऱ्या उत्तम पुरुषाची आहेत. शब्दात न गवसणारे **''अरूप''** माऊलीच्या अभिव्यक्तीसामर्थ्यामुळे शब्दरूपाने **स-रूप** झाले आहे; साकारले आहे.

या सगळ्या साहित्याचा उद्देश केवळ कला म्हणून नाही; तर विवेकाची वाण फिटावी आणि ब्रह्मविद्येचा सुकाळ व्हावा हाच आहे. पण आत्मविद्या हा एक असा मौजेचा विषय आहे की तो मौनात दडत नाही आणि बोलात सापडत नाही. **भक्तीप्रेमभावाला** हेच परिमाण अगदी तंतोतंत लागू पडते पहा. तुकोबाराय सांगतात, **''प्रेम नये सांगता, बोलता, दावीता। अनुभवे चित्ता चित्त जाणे।।''**

आपल्या श्रीगुरु ज्ञानाईमाऊलीची मात्र प्रतिज्ञाच अशी आहे की, ''ऐंद्रिय जाणिवांच्या पलीकडचे आत्मस्वरूप शब्दात मांडावयाचे, तेही इतक्या गोड शब्दात की ज्ञानेंद्रियात गोड भांडण लागेल आणि अमृताच्यापण तोंडाला पाणी सुटेल.

श्रीज्ञानेश्वरी म्हणजे तर शब्दांचे वस्त्रालंकार धारण केलेली प्रत्यक्ष परब्रह्ममूर्तीच. हे शब्दांचे वस्त्रालंकार परमात्म्यास नुसते सजवत नाहीत, तसेच झाकत तर नाहीतच, पण त्याला म्हणजे परब्रह्माला इंद्रियग्राह्य करतात. अशा ग्रंथाची म्हणजेच भगवंताची साथ संगत कायम ठेवा.

* * * *




## श्रीज्ञानेश्वरी महिमा - २

ज्ञानदेवांसारखे महावैष्णव नेहमीच अतिशय विनयाने पण तेवढच आत्मविश्वासाने, श्रवणातून ब्रह्मरस आस्वाद कसा घ्यावा याचा परिचय करून देत असताना श्रोत्यांचा अनुनय करतात, "**वक्ता तो वक्ता नव्हे। श्रोतेनविण।।**" यात वक्त्याचे समाधान आणि श्रोत्यांचे अवधान सतत उत्सुक आणि उत्साहपूर्ण आहे. संवादातील वातावरण सदैव ताजेतवाने आहे. तोंड भरून विचारावे असे अर्जुनासारख्या श्रोत्याला वाटते आणि कान ओसंडून वाहतील इतके बोलावे असे भगवान् श्रीकृष्णाला वाटते आणि वक्ता व श्रोता यांच्या परस्परांमधील प्रेमामुळे/भक्तीमुळे कधी कधी विषयांतराचा, पुनरुक्तीचा तसाच पाल्हाळाचा भागही रुचीने बोलला-ऐकला जातो आहे.

"**चातकाचिये कणवे। मेघु पाणियेसी धावे। तेथ चराचर आघवे। निवाले जेवि।।**" अशी वाचकांचीही अवस्था होते. स्वत: आत्मतृप्ततेने निवून श्रीगुरु थांबलेले नाहीत तर त्यांनी वाचकांनाही स्वानंदसाम्राज्यचे चक्रवर्तीत्व बहाल केले आहे. "**मने, काये, वाचा। जो सेवकु होईल इथेचा। तो स्वानंद साम्राज्याचा। चक्रवर्ती करी।।**"

हे चराचर विश्व म्हणजे मूर्तामूर्तीची सुंदर, सुरेख, नयनरम्य, लोभसवाणी क्रीडाच आहे. कधी अमूर्त प्रकट होते, तर कधी मूर्त अनंतात लपून राहते. एकदा का आपल्याला मूर्तामूर्ताच्या या खेळाची गोडी लागली की मग ज्ञानेश्वरीच्याच काय पण साऱ्याच संतसाहित्यातील कोडी अलगद, हळूवारपणे आपोआप उलगडू लागतात. मग अरूपाचे रूप दिसते; रूपातील अरूपता जाणवते आणि त्याचबरोबर रूपारूपातील द्वैतही-भेदपण मावळून जातो.

श्रीज्ञानेश्वरीच्या सर्वांगी हा खेळ कसा छान रंगला आहे. अगदी पहिल्याच प्रांगणात/ओवीत वेदप्रतिपाद्य आद्यतत्व आणि स्वसंवेद्य आत्मरूप यांचे

आपल्याला चर्मचक्षूंनी न दिसणारे पण तत्वत: असणारे ऐक्य श्रीगुरूंनी अतीशय चपखलपणे दाखवले आहे आणि पाठोपाठ लगेचच या आत्मस्वरूपालाच **"देवा तूचि गणेशु।"** म्हणून सावयव, सगुण-साकार केल आहे.

आपल्या डोळ्यांसमोर अशी आपल्या परिचयाची गणेशमूर्ती पुढ्यात दिसते न दिसते तोवर तिला वाङ्मयगणेशाचे रूप उभे केले आहे. श्रीज्ञानराजांच्या वाङ्मयीन आणि अध्यात्मिक रूपकांनी गणेशाचे रूपडे स्पष्ट होते. अठरा पुराणांची मणिभूषणे, षड्दर्शनांच्या भुजा, तर्कशास्त्राचा परशू, वेदांताचा रसाळ मोदक असा गणराज साकार होतो. सगळे शब्दब्रह्मच मंगलमूर्तीस्वरूप होऊन जाते.

मूर्तास अमूर्त आणि अमूर्तास मूर्त करण्याची किमया हा श्रीज्ञानराजांच्या प्रतिभेचा, ऋतंभरा प्रज्ञेचा सहजविलास आहे. या सगळ्यामध्ये एकाच वेळी रूपाचे अरूप आणि अरूपाचे रूप होऊन जाते. श्रीज्ञानाईस यात सगुण-निर्गुणाचे, स्थूल-सूक्ष्माचे, व्यक्त-अव्यक्ताचे, साकार-निराकाराचे मूलभूत असलेले ऐक्यच अभिप्रेत आहे.

अभेद-अद्वैत सिद्धांताच्या बैसकेमुळे येथील भाषा सीमित असलेली दिसली तरी अर्थाच्या अंगाने विस्तारतच जाणारी आहे. अशा वेळी श्रीज्ञानोबारायांच्या शब्दातील आशय पकडताना, अर्थाला मनाने मिठी घालताना जरी दमायला झाल्यासारखे वाटले तरी या दमण्यातही पूर्ण **विसावा** आहे. या विसाव्यातच **आनंद** आहे. समाधिसुख आहे.

अनंत अरूप संकल्पना श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मन:चक्षूंसमोर शब्दरूप घेत असतात आणि त्याचवेळी प्रत्यक्षातील रूपसंपन्न आकारातील व्यापक अरूप चैतन्यतत्वही श्रीज्ञानोबारायांच्या अंत:चक्षूंना दिसत असते आणि ही सगळीच रूपे त्यांनी शब्दबद्ध केली आहेत.

अरूपाला रूप आले, निराकार साकार झाले, निगुर्ण-सगुण झाले की त्याला नटवण्या-सजवण्याची हौस ही भक्त-भगवंताच्या-महाभागवतांच्या मनी जाती होत असते. म्हणून तर हा अक्षरांचा खेळ, अनुभवातून-स्वानुभवातून सतत कागदावर उतरत असतो.

* * * *

# चिंतन २४५

## अनंत रूपे अनंत वेषे

ज्ञानदेवादी सगळे भागवतसंप्रदायातील वैष्णव हे बहुतांशी अद्वैती आहेत. त्यांना सगुणाचे प्रेम आहे व निर्गुणाचे ज्ञान आहे. सगुण आणि निर्गुण एकच आहे असा त्यांचा दृढ विश्वास आहे व अनुभवपण आहेच आहे.

चराचर सृष्टीला व्यापून असणाऱ्या चेतन तत्वावर/चैतन्यावर त्यांची नितांत निष्ठा आहे. या चेतन तत्वालाच प्राचीन तत्ववेत्यांनी ब्रह्म, आत्मा, परमात्मा, परतत्व वगैरे नामांनी संबोधले आहे. ह्या विश्वाच्या अणुरेणूत असलेल्या चेतनाला अनुस्मरूनच "**देव**" ही संकल्पना आकाराला आली.

भक्तगणांनी आपल्या आपल्या आवडीनुसार या **देवाला** नानाविध रूपे आणि नावे दिली आहेत; पण मुळात देव ही **वस्तू** त्या एका अरूप अशा परतत्वाचीच दर्शक आहे. हा देव सर्वत्र आहे. म्हणूनच "**जे जे भेटे भूत। ते ते मानिजे भगवंत।**" ही भागवतधर्माची शिकवण उपनिषद् तत्वाला अनुसरणारीच आहे.

पण त्याचबरोबर भूतमात्र आणि भगवंत यांच्यातील परस्पर असणारा अन्योन्य संबंध हा एक अखंड असा चिंतनाचा विषय झाला आहे. अगदी अनादी कालापासून. आपल्या अवतीभवतीच्या चराचर सृष्टीला नाम-रूप आहे. परतत्व/ब्रह्म मात्र अरूप आहे. तरीही त्यांच्या परम्परात आंतरिक नाते आहे. हे ब्रह्मच जगदाकाराने आकाराला येते. भक्तांसाठी हे आत्मतत्वच भगवंत म्हणून सगुण-साकार होते. म्हणजे आता पहा, ब्रह्म-भगवंत आणि विश्व दिसावयास वेगळी असली तर तत्वत: **एकच-एक** आहे. ह्यांच्यातील नाते शोधणे, ओळखणे, अनुभवणे आणि **जपणे** म्हणजेच भक्तीसाधना होय.

अध्यात्मशास्त्रकार जीवमात्राच्या ठायी असणाऱ्या आत्मरूप चेतनतत्वाला "जीवात्मा" तर सर्वव्यापी अशा त्याच एक तत्वाला/मूलभूत

तत्वाला **"परमात्मा"** असे म्हणतात. अगदी अनादी कालापासून जीवात्म्याला परमात्म्याची ओढ लागलेली आहे. या तीव्र ओढीतूनच अनेक साधनमार्ग निर्माण झाले. हे मार्ग आत्मज्ञानाने उजळले जातात. त्याचे राजमार्ग होतात. मग वाटचाल सोपी होते. सगळ्या संतांनी या मार्गावरून चालता चालता मुक्काम तर गाठलाच पण त्याचबरोबर पायवाट सोपी केली, नुसती सोपीच नाही तर **राजमार्ग** केला आणि हा राजमार्ग म्हणजे नामसाधना. भक्तीप्रेमयुक्त नामस्मरण.

आपल्या अवतीभवतीचे विश्व दृश्य आहे. साकार आहे. त्याला एक विशिष्ट रूप आहे; पण ते नश्वर आहे. आज आहे तर उद्या नाही असे ते क्षणजीवी आहे. तात्कालिक आहे. अस्थायी आहे पण या विश्वामागील चेतनशक्तीतत्व मात्र दृश्य नाही. त्याला रूप-रंग-आकार नाही. पण तरी ते चिरंतन आहे. स्थायी आहे. असे ते शाश्वत-अविनाशी आहे म्हणून तर हा विश्वव्यापार अखंड-अव्याहत सुरू आहे. कोणतीही शक्ती म्हटली की तिला रूप-रंग-आकार नसतोच. ती अरूप असते-अदृश्य असते. मात्र तिचा प्रभाव तेवढा सातत्याने जाणवत असतो. तिचे कार्य प्रत्यक्षात दिसत असते. त्यावरून दिसत नसली तरी तिचे अस्तित्व मानावेच लागते. या शक्तीचा अनुभव तुम्हाला जाणवला ना? जाणवतो ना? या शक्तीला माध्यम लागते. महाभागवत, महावैष्णव, महात्म्यांच्या माध्यमातून ही शक्तीच कार्यान्वित होते. कार्य करीत असते.

सगळ्या संतांना विश्वामागील या चेतनाशक्तीचे सतत स्मरण असते. महामानवांची समग्र जाणीवच या चेतनाशक्तीने व्यापलेली असते. त्यांना या शक्तीचा अखंड ध्यास असतो. त्यामुळे तिचा अविरत शोध घेत, घेत राहण आणि शोध लागल्यावर सुद्धा अखंड स्मरणात राहण हेच त्याचे जीवन आहे. हा त्यांचा स्थायीस्वभाव आहे. याच "अरूप" चेतन तत्वाची/शक्तीचीच रूपे, अनंत रूप ते आपल्या अवतीभवती न्याहाळत असतात. ज्ञानराज सांगतात, **"अनंत रूपे अनंत वेषे देखिले म्या त्यांसी। बापरखुमादेवीवरू, खूण बाणली कैशी।।"** अनंत रूपांनी, आकारांनी, नामांनी, वेषांनी एक भगवंतच नटला आहे. तो नटनाट्यकुशल कान्हा आहे.

* * * *



# चिंतन २४६

## संतपरंपरा

ह्या चिंतनाला अक्षरस्वरूप देण्याच्या आधी, प्रथमत: अखिलगुणनिधान, सच्चिदानंदघन, करूणावरूणालय, भक्तवत्सल, प्रेमळजनप्रांजळ अशा रूक्मिणीप्राणसंजीवन श्रीपांडुरंगाच्या चरणांवर माथा ठेवता. त्याला अभिवादन करतो.

चिंतन करताना श्रीमहाविष्णूचा अवतार, **''सखा माझा ज्ञानेश्वर''** अस आपल्या श्रीजनाबाई ज्यांचा उल्लेख करतात, महाकैवल्यतेजोनिधी असे श्रीगुरु (**आपले**) ज्ञानेश्वरमहाराज यांचे जाज्वल्य, स्वयंभू अधिष्ठान, शब्दशक्तीचा सातत्याने पुरवठा करीत असते.

या चिंतनाच्या मागे, ऋषी, मुनी, आचार्य आणि संतपरंपरा यांचा प्रकाश आहे. अण्णा फक्त गोमुख-**दगडाचे**. ह्या सगळ्या परंपरातील महात्मे, मनुष्यमात्राला प्रबोधन करण्यासाठी, मार्गदर्शन करण्यासाठी झालेले ईश्वर-शक्तीचेच अवतार आहेत.

सत्ययुग ते त्रेतायुगात ऋषी व मुनी परंपरा प्राधान्य. आचार्य परंपरा-प्रारंभ झाला द्वापारयुगातच. पण आता त्यानंतर ह्या कलियुगात प्रधान रूढ परंपरा म्हणजे संतपरंपरा.

ऋषी, मुनी, आचार्य त्या जुन्या सनातन वैदिक-औपनिषदिक् तत्वज्ञान यांचा विचार-आचार करणाऱ्या परंपरा असल्या तरीसुद्धा आत्ता ह्या घोर कलियुगात आपल्यामध्ये परमार्थिक बी रूजवणारी मुख्य उपकारक असणारी संतपरंपराच आहे.

सांप्रदायिक चाकोरीचा आग्रह-अट्टाहास ज्यांनी कमी केला, परमार्थमार्ग सुलभपद्धतीने सर्वांसाठी प्रकाशित केला, **''यारे यारे लहान थोर''** हा ज्यांचा उदार दृष्टीकोन **''याति भलते नारीनर''** असा आवाका

लोककल्याणाचा; आणि "**करावा विचार। न लगे चिंता कोणासी।**" ही आश्वसकता, ती संतपरंपरा.

संतांनी परमार्थाच्या "सूक्ष्म-दुस्तर" वाटा मोडल्या आणि राजमार्ग रूढ केला, सर्वांसाठी खुला केला. हे करताना त्यांनी ऋषी, मुनी आणि आचार्य या परंपरेचाच आधारभूत पाया म्हणून उपयोग केला. आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात पहा, "**वेदमार्गे मुनी गेले, त्याचि मार्गे चालिलो।** आपली ज्ञानराज माऊली।।" "**व्यासांचा मागोवा घेतु। भाष्यकारांते वाट पुसतु।**" अशीच साक्ष. तुकोबारायांनी या सगळ्याचा सुंदर समन्वय साधला. "**वाचा बोलो वेदनीती।** पण **कर संती केले ते।।**" म्हणजेच औपनिषदिक वैदिक तत्वज्ञान, प्रमेय-सिद्धांत समाजात रूजवताना, देश-काल-मानानुसार पद्धतीत थोडा बदत केला. पण हा बदलसुद्धा दार्शनिक दृष्ट्या, तत्वदृष्ट्या न करता तपशीलात केला. त्यात सुलभता-सर्वंकषता आणली.

जरा विचार केला तर, जेवढी जवळीक संतांची वाटते ऐवढी ऋषी-मुनी-आचार्य यांची नाही वाटत. खर नां? काय गंमत आहे पहा सत्य, कच्छप-वराह हे अवतारच, पण ह्या अवतारातील भगवंताची कोणी उपासना करत का? नंतर नरसिंह-वामन-परशुराम-राम-कृष्ण. पण ह्यात पण प्राधान्येकरून उपासना "राम-कृष्णाचीच" नाही का?

राम अवतार उपास्य खरे पण ह्या अवतारात प्रभूंचे राजेपण अवतार समाप्तीपर्यंत आहेच आहे. पण कृष्णावतार पहा ना! ह्या अवतारात आपले मूळ अनादी स्वरूप तसच्या तस ठेवून गवळ्याघरी अवतार घेतला. समाजात इतके मिसळले की त्या गवळ्यांच्या पोरांशी खांद्याला खांदा लावून खेळले. खेळतानाही वेळ आली तर त्यांचा डाव त्यांना द्यावा. कृष्णावर डाव आला की पेंद्याने म्हणावे, "कान्ह्या खाली वाक, मी आता तुझ्याच पाठीवर बसणार रे." कृष्णाने खाली वाकावे, पेंद्याला येथून तेथवर वाहून न्यावे व डाव द्यावा.

एवढेच काय "**पाहता गोवळी। खाय त्यांची उष्टावळी।।**" कुठे जगत्नियंता परमात्मा व कुठे ही गवळ्याची मुल! त्यांच उच्छिष्ट खावे

ब्रह्मांडनायकाने? त्यामुळे भगवान् कृष्ण अगदी सामान्य जीवालाही आपलाच वाटतो. **खेळीमेळी** खेळगडी वाटतो. तसच संतांच. कुठे भगवत्कृपापात्र पुण्यवंत संत व कुठे सामान्य जीव. खूपच अंतर तत्वत: पण तरी हे संत समाज **कल्याणासाठी** खाली उतरतात, सोप सांगतात आणि सोप काय? तर ''नाम'' आणि त्यांना; लोकांना वर उचलतात. आपल्यासारख करतात. हे संतपरंपरेचे वैशिष्ट्य.

* * * *




**आचार्य आणि संत**

संतांनी समाजाला धर्म, तत्वज्ञान आणि परमार्थ शिकविण्यासाठी वर्णप्राधान्य, आश्रमप्राधान्य इतकच नाही तर वेशप्राधान्य ह्याला गौणत्व दिले. त्याचे पूर्ण खंडनही केले नाही; तसाच त्याचा आग्रहही धरला नाही. वेदमार्गाला कुठेही यत्किंचित बाधा येऊ न देता त्यांनी समाज आणि परमार्थतेचे प्रबोधन करणारे आचार्यपद यातील अंतर कमी केले.

आचार्यांनी समाज प्रबोधन केले पण! आपल्या स्थानावरून, आसनावरून. त्यामुळे काय होत होते? काय झाले? तर समाजातील व त्यांच्यातील अंतर यात एक कायमची दरी-दुरावा राहिला. याच्या नेमके उलट संतांनी खूप खाली उतरून, जनसामान्यात मिसळून ''**तुम्ही आम्ही खेळीमेळी। गदारोळी आनंदे**।।'' असे वागून समाजाला वर उचलले व यामुळे समाजातील व संतांमधील अंतर कमी झाले.

ऋषी, मुनी, आचार्य ह्यांच्यात व समाजात अंतर वाटते; आजही ''श्रीशंकराचार्य'' म्हटले की आपल्यात व त्यांच्यात **एक** अंतर वाटते. आचार्यपरंपरेत त्या-त्या काळात, काळानुसार ते **अंतर गरजेचे-योग्य** होते. पण

संतपरंपरेतील संत आपल्याला अगदी जवळचे वाटतात. उदाहरणच द्यावयाचे तर ऋषी, मुनी, आचार्य लेकराला पित्यासारखे तर संतमहात्मे माय-माऊलीसारखे वाटतात. शंकराचार्य माऊली अस कुणी भजन करत नाही. पण "श्रीगुरुज्ञानेश्वरमाऊली" म्हणून हाक मारताना, भजन करताना एक मायेची-प्रेमाची अत्यंत जवळीक भावते.

पूर्वी ऋषी, मुनी, आचार्य यांच्या अधिकाराच्या कक्षा असायच्या. कुणीही आपल्याला एकदम ऋषी, मुनी अगर आचार्य म्हणवू शकत नव्हते. शंकराचार्यांच्या पीठावरील व्यक्ती संन्याशीच असावी लागते असे काटेकोर बंधन आणि ह्या बंधनामुळे-कक्षामुळे काय झाले? तर "ह्या दृष्टीने आपण अनधिकारी आहोत" असा न्यूनगंड समाजात निर्माण होऊन समाज परमार्थापासून-साधनमार्गापासून-आत्मज्ञानावाचून वंचित व दूर राहिला.

ही जाणीव नेमकी आपल्या संतांना झाली आणि म्हणूनच संतांनी सर्व देशात, सर्व कालात, सर्व समाजात-वर्णात-आश्रमात-जाती-जमातीत-धर्म-पंथात-स्त्री-पुरूष अशा सगळ्याच्या सगळ्या स्तरात अवतार घेतले.

यामुळे काय झाले पहा, संतांनी सामान्य-तळागाळातल्या समाजाशी इतकी काही जवळीक केली, ती पण केवळ समाजाच्या कल्याणासाठीच, की समाजमानसात संतांबद्दल एक वेगळीच अंतरीची ओढ-जिव्हाळा आपलेपणाची **ओढ** निर्माण झाली. समाजाने ऋषी-मुनी-आचार्य इतकेच काय पण देवापेक्षाही संतांना आपल्या गळ्यातले ताईत बनवले.

जर संतचरित्रे वाचली तर अगदी सहज अस लक्षात येईल की, कोणत्याही अनुकूल-प्रतिकूल बाह्यपरिस्थितीत संत झाले! अशी एक परिस्थिती माणसाला बोट करून दाखविताच येणार नाही की, "काय करावे, माझी परिस्थिती **तशी** नसल्याने मला संत होता येत नाही."

अत्यंत श्रीमंत-सत्ताधीश, एका किल्ल्याचे किल्लेदार अशा जनार्दन स्वामींसारखे राहून संत होता येते; नाथांचे गृहवैभव संतत्वाच्या आड येत नाही. "**तुम्हा घरी गायी म्हशी। आम्हा घरी उंदीर घुशी।।**" अशी

आपल्या श्रीतुकोबारायांची गरिबी. तरी ते संत झाले. त्यांनी अस नामस्मरण-भजन केले की त्यांचे "**सदेह वैकुंठागमन**" झाले. संतत्वासाठी वय, वर्ण, लिंग, आश्रम काही आड येत नाही, आल नाही आणि येणारपण नाही.

अशा प्रकारे सर्व देश, काल, परिस्थिती, वय आणि स्तर यात परमार्थ करता येतो; संत होता येते हे संतांनी आपल्या जीवनात प्रत्यक्ष आचरून दाखवले. आम्ही मात्र कारण (खोटी) सांगत बसतो. संतांनी आपल्याला आहे त्या परिस्थितीतून परमार्थ करून भगवंताकडे जायला शिकवले. त्यामुळेच समाजाला संत जन्मदात्या मातेपेक्षाही जवळचे वाटतात.

* * * *




## अरूपाचे रूप

"**अरूपाचे रूप दावीन**" अशी श्रीगुरूज्ञानराज माऊलींची प्रतिज्ञा. रूप दाखवणे, रूप करणे असे शब्दप्रयोग त्यांनी आपल्या ग्रंथात अनेक ठिकाणी आणि अनेक अर्थांनी उपयोजिलेले आहेत.

"**अहिंसा रूप किजैल**", "**गुरूसामर्थ्या रूप करू**", "**नेणे रूप करू देवा**" अशा सारख्या ठिकाणी वर्णन करणे, स्वरूप दाखवणे, मर्म स्पष्ट करून सांगणे अशा अर्थाने ज्ञानराज "रूप करणे" हा शब्दप्रयोग करतात.

समग्र वाङ्मयव्यवहारच/साहित्याची निर्मिती, हा सगळा अक्षर प्रपंचच अरूपाला रूप देण्यातून साकारत असतो. साहित्यीकाच्या मनातील अमूर्त भावना-भावभावना आणि कल्पना या शब्दाच्याच माध्यमातून अभिव्यक्त होत असतात. लेखकाच्या मनात जे अव्यक्त असते ते याच अक्षरमाध्यमातून व्यक्त होते, अरूप रूपवान् होते. यालाच शब्दचित्र असे पण म्हणतात.

आता श्रीगुरुंची हीच ओवी पहा,

**नाना कथा रूपे भारती। प्रगटली असे त्रिजगती।**
**अविष्करोनि महामती। व्यासांचिये।। (ज्ञाने.अ.१)**

कशी आणि किती बोलकी आहे ना? भारती म्हणजे प्रत्यक्ष वाग्देवताच महाभारत कथेच्या रूपाने, व्यासांच्या विशाल बुद्धीला नित्य स्फुरण देत या त्रिभुवनात प्रगटली असे श्रीज्ञानराज म्हणतात. पण ''अरूपाचे रूप दावीन'' यात मात्र केवळ वाङ्मयीन अभिव्यक्तीत्वाच्या उद्देशाने म्हणतात असे नाही तर एखादे सर्वथैव असाध्य साध्य करण्याच्या ताकदीने, अभिनिवेशाने म्हणतात पहा,

**तेणे कारणे मी बोलेन। बोली अरूपाचे रूप दावीन।**
**अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रियाकरवी।।**

या ओवीच्या शब्दाशब्दातून त्यांचा आत्मविश्वास प्रस्फुरित होताना प्रत्ययास येतो. पण ''अरूप'' या शब्दातून ज्ञानदेवांना काय अभिप्रेत आहे याचा विचार फार महत्वाचा. हा शब्द तसा दुर्बोध नाही, पण त्याचबरोबर तो आपल्याला वाटतो तेवढा सुबोधपण नाही.

ज्याला रूप नाही, त्याला रूप देणे हा ''अरूप'' शब्दाचा वाच्यार्थ आहे. पण वाच्यार्थातून नेमका आशय आपल्या लक्षात येत नाही. ही ओवी आली आहे ६ व्या अध्यायाच्या मंगलाचरणात म्हणजेच या अध्यायाच्या प्रास्ताविकात या अध्यायात योगाचे विवेचन आहे. कुंडलीनीमार्गाचे सविस्तर वर्णन आहे. योगाद्वारे साधकाने प्रगती कशी साधावी ते या अध्यायात सांगितले आहे. तरीसुद्धा या ६ व्या अध्यायापुरतेच फक्त योगविद्येच्या संदर्भात श्रीगुरुमहाराज ज्ञानदेव ''अरूपाचे रूप'' दावीन असे म्हणत नाहीत तर अरूप म्हणजे ''निर्गुण निराकार परब्रह्म'' एवढा सखोल अर्थ श्रीज्ञानदेवांना अभिप्रेत असल्याचे लक्षात येते.

ज्ञानेश्वरीत केवळ सगुण साकार अशा ''**तो हा विठ्ठल बरवा। तो हा माधव बरवा।।**'' एवढेच वर्णन/रूपवर्णन आहे असे नाही. परतत्वाच्या संदर्भातच ज्ञानेश्वरमहाराज ''**अरूपाचे रूप दावीन**'' अस म्हणतात. परतत्व दाखवणे हे सामान्याचे काम नाही. श्रीज्ञानराजांसारख्या थोर आत्मसाक्षात्कारी संतश्रेष्ठींचीच ती योग्यता.

* * * *




## संतांचा ‘‘मी’’

श्रीगुरुज्ञानदेवांना ज्या परतत्वाची जाण आहे, त्या परतत्वाच्या संदर्भातच ते **‘‘मी बोलेन। बोली अरूपाचे रूप दावीन।’’** अस म्हणतात. या चरणात ‘‘मी’’ हा कर्ता आहे. ‘‘मी’’ म्हणजे एक ज्ञानेश्वर नामक व्यक्ती असे वरवर पाहता प्रथमदर्शनी वाटेल, पण हा ‘‘मी’’ व्यक्तीवाचक एकवचनी मी नाही; तो केवळ ज्ञानदेव नामक व्यक्तीचा सूचक नाही.

हा ‘‘मी’’ सर्वात्मक, शक्तीशाली आत्मस्वरूपाचा वाचक आहे. व्यक्ती आणि समष्टी यांच्यातील एक अपूर्व एकरूपता, एकात्मता, एकरसता या ‘‘मी’’ मध्ये सातत्याने जाणवत असते. त्यांच्या ‘‘मी’’ मध्ये अवघे विश्व सामावलेले आहे आणि त्यांचा ‘‘मी’’ विश्वात विस्तारला आहे.

जेंव्हा ‘‘मी’’ असा विश्वात्मक होतो; तेंव्हा त्या मीमध्ये स्वार्थाचा एवढा सुद्धा लवलेश नसतो. **‘‘हे विश्वचि माझे घर’’** एवढा तो मी व्यापक, उन्नत असतो. विश्वकल्याणार्थ समग्रतेची एक सर्वव्यापी, सर्वंकश धारणाच तेथे ‘‘मी’’ च्या स्वरूपात कार्यरत झालेली असते.

या दृष्टीने खुद्द श्रीज्ञानराजच स्वत:च ‘‘अरूपाचे रूप’’ (ब्रह्म) असे आहेत. **‘‘दिसो परतत्व डोळा’’** (म्हणजे परब्रह्मस्वरूपाचा अद्वैताच्या पातळीवर अनुभव यावा) ही देखील एकट्या ज्ञानदेवांचीच, ज्ञानदेव नामक एका व्यक्तीची स्वत:पुरती वैयक्तीक आकांक्षा नाही तर या विश्वरूप ‘‘मी’’ ने परतत्वदर्शनद्वारा अवघ्या विश्वसुखाची मागणी विश्वात्मक आत्मदेवाजवळ केली आहे. म्हणूनच तर ज्ञानराज माऊली म्हणतात, **‘‘दिसो परतत्व डोळा। पाहो सुखाचा सोहळा। रिघो महाबोध सुकाळा। माजि विश्व॥’’** समग्र विश्वाला महाबोधाचा सुकाळ व्हावा आणि परिणामी विश्वाने सर्वसुखाचा सोहळा अनुभवावा हीच ज्ञानेश्वरमहाराजांची अभिलाषा आहे.

गुरुमाऊलीचा “मी” असा सर्वात्मक असल्याने **“अहं ब्रह्मास्मि”** (म्हणजे **“मी ब्रह्म आहे”**) या वेदातील महावाक्यात असणाऱ्याच “मी” शी त्यांचे अद्वैताचे अतूट, अनन्य, घनिष्ठ नाते आहे. **“अयमात्मा ब्रह्म”** (हा माझा आत्माच ब्रह्म आहे) किंवा **“तत्त्वमसि”** (ते ब्रह्म तूच आहेस) या सगळ्याच महावाक्यातील अद्वैत पातळीवरची “मी-तू” अशी द्वैतरहित परिभाषाच श्रीज्ञानराजांच्या जाणिवेला व्यापून बसली आहे.

त्यामुळेच हीच सर्वात्मकता, त्यांच्या अमृतापेक्षा रसाळ अशा बोलातून अखंड ठिबकत असते, पाझरत असते, एवढेच नाही तर ओसंडून वाहात असते. श्रीगुरुंच्या रोमारोमात एकच सर्वात्मभाव भिनलेला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांसारख्या सगळ्याच “संतांचा” “मी” असा विश्वात्मक असल्याने, इतरेजनांना जे “अरूप” (म्हणजे अनुभवापलीकडील) आहे, न दिसणारे आहे, जे परब्रह्म त्यांना स्पष्ट दिसत असते. नरेंद्राने एकदा श्रीरामकृष्णांना विचारले, **“जगन्मातेविषयी सारखे बोलता, पाहिली आहेत का?”** तेंव्हा परमहंसांनी उत्तर दिले, “नरेंद्रा, तू जितका या चर्मचक्षूंचा प्रत्यक्ष विषय आहेस, त्यापेक्षा कित्येक पटींनी “माता” माझ्या अनुभवाची आहे.

या आत्मदर्शनाने ते आनंदाकार झालेले असतात आणि ही आनंदाकारता अवघ्या मानवमात्रास प्राप्त व्हावी हीच त्यांची विश्वात्मक अभिलाषा असते. “मागणं” जेंव्हा विश्वव्यापक होते तेंव्हा त्यात स्वार्थ नसतो तर केवळ आणि केवळ “जगत्कल्याण” हाच एकमेव विचार असतो. नाही का?

* * * *

# चिंतन २५०

## संतांची कळकळ

संतांच्या अवताराचा हेतू एकच. "**जगत् उद्धार; जगत् कल्याण.**" घोर कलियुगात जडजीवांच्या उद्धाराची सर्वात जास्त कळकळ असणारे समर्थ महान पुरूष म्हणजे केवळ संतच.

देवाच्या अवताराच्या-अवतारकार्याच्या भूमिका वेगवेगळ्या आहेत व संतांच्या कार्याच्या वेगळ्या. ईश्वर अवतारात "**विनाशाय च दुष्कृताम्।**" नृसिंहअवतार. फक्त प्रल्हादापुरता करुण, बाकी कठोर. परशुराम अवतार-कृपा कमी, कठोर शासनच. बुद्ध अवतारात शासन कमी, दया व अहिंसाच जास्त. थोडक्यात काय ? संतांचे अवतार देवापेक्षाही जास्त करूणामय आहेत एवढे मात्र खरे.

भगवंतांनी अवतार घेऊन दुष्टांचा वध केला आणि संतांनी मात्र दुर्जनांना सज्जन केले. नृसिंहाने हिरण्यकशिपूला मारला, रामाने रावणाला मारला, श्रीकृष्णाने कंसाला मारला; पण आपल्या भक्ताचार्य नारदांनी वाल्ह्याकोळ्याला वाल्मिकी ऋषी केले. ज्ञानोबाराय पसायदानात मागतात "**जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मी रती वाढो।।**"

जगत् सुधारण्याच्या बाबतीत सर्वच संतांची कळकळ सारखीच. "**बुडता हे जन न देखवे डोळा। येतो कळवळा म्हणोनिया।।**"

संत हे स्वत: पूर्णच असतात, जगत् कल्याणासाठी आपले ज्ञान, अनुभव, बोध, उदार अंत:करणाने, करुणेने जगताला वाटत राहतात. त्या कृपाभावामुळे, कळकळीने कधी देवाजवळ जनसामान्यांसाठी दान मागतात. "**तुका मागे दान। द्यावे जी अनन्य।।**" प्रसंगी कडक भाषेत पण जगाला चांगले फैलावर घेतात. "**मातेच्या पोटे दगड आला पोटासी।**" कधी

कळवळून सांगतात, “**ऐके रे जना। तुझ्या साहित्याच्या खुणा। पंढरीचा राणा। मनामाजी स्मरावा।।**” “रे” हा शब्द अत्यंत कृपावाचक आहे, कळवळ्यापोटी आहे. प्रसंगी याच करुणेने जगत्‌कल्याणाच्या हेतूने समाजाच्या पाया पडतात, “**सकळांच्या पाया माझे दंडवत। आपुलाले चित्त शुद्ध करा।।**”

“**मी वासुदेव तत्वता**” “**तुका विष्णु नाही दुजा**” एवढ्या अधिकाराचे तुकोबाराय पण आपल्या पायी लागतात. “**लागोनिया पाया विनवितो तुम्हा। करे टाळी, बोला मुखी नाम।।**” समोरचा कितीपण हीन-दीन असला तरी, आपला मोठेपणा बाजूला सारून त्याच्या उद्धारासाठी त्याच्या पायी विनवणी करतात. अजून कळकळ ती काय असावी? अजून उपकार तो काय असावा?

म्हणून तर तुकोबारायांनी त्यांना माऊलीची उपमा दिली. “**लेकुराचे हित। वाहे माऊलीचे चित्त।। ऐसी कळवळ्याची जाती। करी लाभाविण प्रीती।।**” कळवळ्याच्या बाबतीत आई व संत एका जातीचे आहेत. पण “**करी लाभाविण प्रीती**” या बाबतीत संतप्रेमाची विशेषता आहे. व्यवहारी माता मुलावर प्रेम करते. मुलाला लहानाचा मोठा करीत असताना, सांभाळताना हेतू नसतो, पण पुढे मुलगा मोठा झाल्यावर त्याने आपल्याला सांभाळावे ही आशा असते, म्हणजेच त्या प्रेमभावाला हेतूचा डाग असतोच. म्हणून संतांच्या **प्रेमभावाला** व्यवहारी मातेची उपमा तोकडीच आहे.

केवळ उपकाराकरताच ते या भूतलावर येतात, आपल्यात मिसळतात, आचरण करून प्रसंगी बोटाशी (आणि पोटाशी सुद्धा) धरून आपल्याला चालवतात. असे संत आनंदाचे अनुकार, सुखाचे सागर, भक्तीप्रेमाचे माजघर असतात.

* * * *

# चिंतन २५१

आपल्याला आत्मज्ञानाची प्रगाढ अशी इच्छा असावी. ज्ञाननिष्ठाही ज्वलंत असावी. त्यासाठी सारे अध्यात्म ग्रंथ, वेदग्रंथ, संतग्रंथ अभ्यासावेत. परंतु ग्रंथ फक्त आपल्याला शब्दज्ञान देतात. केवळ शब्दाने "**आत्मज्ञान**" होऊ शकत नाही तर आत्मज्ञानाला अनुभूतीची नितांत गरज असते.

अध्यात्माचा पाया; पाया नाही तर इमारतच मुळी अनुभूतीवर अधिष्ठित आहे. हे अनुभविक ज्ञान केवळ संतांकडून/श्रीगुरुंकडून लाभत असते. म्हणून देव आणि "श्रीगुरु" यात "श्रीगुरु" हे अंतिम शरण्य मानले आहे.

अगदी उपनिषद्‌काळापासून गुरुसंस्था चालत आलेली आहे. गुरुशिवाय ज्ञानप्राप्ती अशक्यच आहे. ही आपल्या भारतीयांची धारणा आहे. बहुश्रुत, व्युत्पन्न, ज्ञानसंपन्न आणि आत्मानुभवाने परिपक्व अशा श्रीगुरुंचे जीवनात फार महत्त्वाचे स्थान आहे.

अध्यात्मशास्त्रीय, स्वानुभूतिप्रधान ज्ञानपरंपरा देहधारी (पण देहबुद्धी नाही) अशा गुरुंनीच तेवत ठेवली आहे. सगळ्याच महात्म्यांनी ही परंपरा तर पाळलीच आहे पण श्रीराम-श्रीकृष्ण अशा साक्षात् परब्रह्माच्या अवतारांनी "गुरु" ही संकल्पना अधिक तेजस्वी, भरदार आणि जास्त उज्ज्वल केली आहे. आपल्या श्रीज्ञानदेवांनी गुरुच्या रुपात मूर्तिमंत "**ज्ञानच**" उभे केले आहे.

श्रीमत् निवृत्तीनाथ हे ज्ञानराजांचे गुरु तसेच ते त्यांचे वडील बंधूही होते. परंतु गुरु म्हणून वा वडील बंधू म्हणून निवृत्तीनाथांचे बाह्य, स्थूल वर्णन माऊलींनी आपल्या ग्रंथात कुठेही केलेले नाही. अमूर्त-अरुप अशा ज्ञानपुंजालाच ज्ञानराजांनी गुरुस्वरूपात पाहिले आहे, वर्णन केले आहे. आपल्या स्वत:ला होणाऱ्या अनुभवाच्या पातळीवरील ज्ञानालाच ते आपल्या

अंतरंगात राहणाऱ्या गुरुस्वरूपात अनुभवतात. ज्ञानरुपाने श्रीगुरुच आपल्या हृदयी राहतात अशी निष्ठा, म्हणूनच ते म्हणतात -

**''मज हृदयी सद्गुरु। जेणे तारिलो हा संसारपुरु।**

**म्हणऊनी विशेषे अत्यादरु। विवेकावरी।।''**

गुरुमुळे ज्ञानदृष्टी लाभते. **''जैसे डोळ्या अंजन भेटे। ते वेळी दृष्टीस फाटा फुटे। मग वास पाहिजे तेथ प्रगटे। महानिधी।।''** डोळ्यात विशिष्ट अंजन घातले की पायाळू माणसाला जमिनीतले निधान (गुप्तधन) दिसू लागते, त्याप्रमाणे गुरुकृपादृष्टी लाभली की आपल्याच ठिकाणी असणारा ज्ञानाचा साठा म्हणजेच भगवंत स्पष्ट अनुभवाला येतो.

झाडाच्या मुळाशी घातलेले पाणी शेड्यापर्यंत पोचते आणि झाडाचे सारे लहान-मोठे शाखापल्लव सारख्याच **तन्मयतेने** टवटवीत करून सोडते त्याप्रमाणे श्रीगुरुचा कृपा-सहवास-संगती एकरुप-समरसतेने सर्व प्रकारची अभिलाषिते पूर्ण होतात आणि सारे जीवनच आत्मचैतन्याने-आत्मानंदाने अंतर्बाह्य बहरून जाते.

गुरुच्या ठायी आत्मज्ञान असते. त्यामुळे आपल्याला आत्मतत्त्व दिसते, (जसे एका कोपऱ्यातील सतार वाजली की समोरील सतारीतूनपण झणत्कार होऊ लागतो) आणि आत्मदर्शनाने **समाधान** लाभते.

* * * *



## चिंतन २५२

श्रीगुरुंची अनेकानेक रुपे-स्वरूपे पाहता-पाहता श्रीगुरु अरुपातच विलीन होऊन राहतात. श्रीगुरु काय ? श्रीगुरु काय ? याची संकल्पना आठवू म्हटले तर शेवटी एवढेच जाणवते **''गुरु तेथे ज्ञान।''**

मूर्तिमंत आत्मज्ञानस्वरूपातच गुरुंना पाहावे. ज्ञानाशी अगदी निकट संबंधित म्हणून जरी श्रीगुरुंच्या संदर्भात गणेश, शारदा यांची आठवण/रुपके झाली, गुरुस्नेहभावावरून जरी आपण त्यांची मायमाऊलीशी तुलना केली, श्रीगुरुला जरी अगदी चित्सूर्य म्हटले, तरी पण अखेरीस श्रीगुरुचे माहात्म्य वाचातीत आहे आणि मग सरतेशेवटी एकच तरणोपाय म्हणजे नतमस्तक होणे.

श्रीगुरुसामर्थ्याचे वर्णन करणे आपल्या शक्तीबाहेरचे काम. सूर्याला उटणे लावावे, कल्पवृक्ष टणटणीच्या फुलांनी शृंगारावा, कापराला अन्य सुगंधी द्रव्याने सुगंधीत करावे, चंदनाला लिंबाच्या खोडाची उटी लावावी हे जसे, जितके हास्यास्पद आहे, तितकेच काय पण त्याच्याहून जास्तच थट्टा म्हणजे श्रीगुरुंचे शब्दांनी वर्णन करणे.

''विशदबोधविदग्धा'', ''विद्यारविंदप्रबोधा'', ''संसारतमसूर्या'' अशी विशेषणेसुद्धा त्यांचे वर्णन करण्यास असमर्थच. पण ती त्यांच्या ज्ञानदायी सामर्थ्यावर प्रकाश टाकतात एवढे खरे !!!

श्रीगुरुच्या पायांपाशी काय पिकत नाही ? ज्ञानोबाराय एके ठिकाणी म्हणतात, ''**पिके सारस्वत तुझिया पाऊली।।**'' ''पिके'' हा शब्दच मुळी नवनिर्मितीसूचक आहे. ''पिकणे'' यात सृजनाची, सृजनात नवनिर्मितीची आणि नवनिर्मितीत अरुप अशा चेतनाची (ब्रह्मचैतन्याची) गर्भित अशी आशयघनता आहे. अध्यात्मशास्त्रदृष्ट्या गुरु स्नेहाळ माऊलीप्रमाणे परिपुष्ट करणारे आहेतच, पण साधकाच्या सर्व स्तरावरील विकासात, उन्नतीत, सर्वोदयास हातभार लावणारे असतात.

प्रभावसंपन्न, प्रतिभासंपन्न, ऐश्वर्यसंपन्न, गुरुमाऊलीच्या श्रीमंत गुरुअंबापदाचे केवळ स्मरणच प्रभुत्व आणि साऱ्याच संपत्तीची निर्मिती अगदी सहज करत असते. स्मरणासरशीच लक्ष्मी-मोक्षलक्ष्मी पायाशी लोळण घेते असा आजवरचा अनुभव आहे.

केवळ आणि केवळ गुरुसामर्थ्यामुळेच प्रापंचिक आणि आध्यात्मिक-

पारमार्थिक अशी सगळी उद्दिष्ट्ये साध्य होत असतात असा आपला दृढ विश्वास असावा. एकाचवेळी आत्मज्ञानाची जिज्ञासा आणि प्रपंचाची लालसा तृप्त करण्याचा गुण श्रीगुरुंच्या रुपाने अवतरलेला आहे. श्रीगुरुला व्यावहारिक पातळीवरून न पाहता आत्मसत्तेच्या स्तरावरून पाहावे. श्रीगुरु साधकाकडे व्यावहारिक सत्तेतून कधीच पहात नसतात तर आत्मभावाने पाहतात. साधक हा कायम साधकच न राहता तो आपल्यासारखा "**गुरु**" स्वरूप व्हावा अशी तळमळ-कळकळ त्या श्रीगुरुच्या सगळ्या कृती-उक्तीतून सारखी, अखंड निथळत असते. साधकांनी पण ही श्रीगुरुच्या अंतरीची आत्मीयता नको का जाणायला ? गुरुप्रेमाला व्यवहाराचा स्तर नाही, आहे तो निखळ-निरपेक्ष आध्यात्मीक प्रेमभाव.

* * * *




श्रीहरीची अखंड प्राप्ती व्हावी असं वाटत असल्यास त्याचेच अखंड नामस्मरण करावयास पाहिजे. सगळ्या वेद, शास्त्र, पुराणे, संतश्रेष्ठांनी हे नामस्मरणाचे महत्त्व कळवळून सांगितले आहे. श्रीगुरु तर नामाशिवाय काहीच बोलत नाहीत ना ???

भगवंताचे नामस्मरण अखंड होण्यासाठी त्याचा क्षणभरही विसर पडता कामा नये आणि श्रीहरीचा कधीच विसर पडू नये असे वाटत असेल तर त्याचे आत्मवत् अखंड प्रेम लागणे अत्यंत जरुरीचे आहे. कोणत्याही वस्तूचे ज्या मानाने आपल्याला प्रेम असेल त्याच आणि तेवढ्याच प्रमाणात त्या वस्तूचे मनात स्मरण होत असते.

आपल्या स्वत:चे आपल्याला नि:स्सिम प्रेम आहे आणि त्यामुळे आपल्याला आपला विसर कधीच पडत नाही व जेवढे काही आपण करतो

ते सर्व आपण आपल्यावर असलेल्या आपल्या प्रेमाकरिता करत असतो. आपले आपल्या स्वत:वरचे प्रेम कधीच नाहीसे होत नाही म्हणून आपल्याला आपला विसर कधीच पडत नाही तर सतत आठवच राहतो.

पण स्थावर-जंगम आदि वस्तूंचे प्रेमात खंड पडतो, का तर जोपर्यंत ते आपल्या सुखाला कारणीभूत होतात, अनुकूल असतात तोपर्यंत त्यांचे प्रेम राहाते. मधुमेह नाही तोपर्यंत साखर गोड-हवीशी वाटते, पण मधुमेहाला साखर गोडच असूनसुद्धा नकोशी वाटते. का ? तर ती प्रतिकूल असते. दु:खाला कारणीभूत होते. म्हणूनच एकाच वस्तूचे आपल्याला सारखेच अखंड प्रेम राहात नाही. कधी घराचे तर कधी धनाचे, तर कधीतरी आणि अन्य कोणत्यातरी वस्तूचे. ज्या वस्तूचे ज्यावेळी प्रेम असते त्यावेळी त्या एका वस्तूवाचून दुसऱ्या वस्तूचा आपल्याला सहजच विसर पडतो.

या सगळ्याचे तात्पर्य हे की, आपले आपल्यावर अखंड-निर्हेतूक-निरलस-निरामय प्रेम आहे आणि त्यामुळेच आपल्याहून ज्या वस्तू भिन्न आहेत त्यावरील प्रेमभाव खंडित होत असतो व आपल्याशी ज्याचे ऐक्य होईल त्या वस्तूचे प्रेम अखंड राहते. याचे साधे प्रत्यंतर आपण आपल्या देहाच्या ठिकाणी सतत पाहतो. "देहच मी" असे देहाशी ऐक्य-तादात्म्य-एकरुपता केल्याने, बाह्य-देहभिन्न वस्तूंपेक्षा देहाचे प्रेम अखंड असते.

म्हणूनच भगवंताला-श्रीगुरुला आपण आपल्याहून जोपर्यंत भिन्नच पाहू तोपर्यंत भगवंताचे/श्रीगुरुचे ठायी अखंड भक्तीप्रेमभाव जडणे शक्य होत नाही व त्याचे अखंड नामस्मरणही होणे जमत नाही.

म्हणजेच भगवंताचे अखंड नामस्मरण घडावयास हा श्रीहरी/श्रीगुरु माझ्याहून यत्किंचीतपण भिन्न नाही, तो माझेच स्वरुप आहे किंवा माझे खरे स्वरुप म्हणजे श्रीहरी/श्रीगुरुच होय, मी श्रीहरी/श्रीगुरुहून एवढासुद्धा निराळा नाही असे एकाकारतेचे ज्ञान **अनुभवास** येणे अवश्य आहे.

एवढेच नाही तर जोपर्यंत श्रीहरी/श्रीगुरुपासून आपण भिन्न-वेगळे आहोत अशी द्वैतबुद्धी आहे तोपर्यंत पूर्वसंस्कारानुसार भगवंताचे प्रेम व स्मरण यात

खंड पडत राहणार. श्रीहरी-गुरुंची अद्वैत सत्ता असून त्याचा अपला **अभेद** असून त्याचीच सर्वत्र व्याप्ती आहे अशी एकरसता अनुभवात आली, मग त्याचे स्मरण-भक्तीप्रेमभाव अखंड **नामस्मरण**, सहजच होते-होतच राहते.

* * * *




आपल्या सर्वांच्या ठिकाणी "मी" म्हणून जे स्फुरण होते त्यालाच शास्त्रकार जीव असे म्हणतात. या जीवाला "मी म्हणजे कोण ?" हे यथार्थ समजत नाही. "मी" म्हणजे देहस्वरूप, कर्मकर्ता, सुख-दुःखादी फलभोक्ता, अज्ञानी, अपूर्ण, शब्दादी भोगावर ज्याचे सुख अवलंबून आहे असा, जन्म-मरण भोगणारा असे तो आपल्याला समजत असतो.

हे त्याचे सर्व ज्ञान विपरीत असून स्व-स्वरूपाचा यथार्थ विचार न केल्यामुळे आहे. आपल्याला आपल्या स्वस्वरूपाचा यथार्थ-योग्य विचार नसणे यालाच **अज्ञान** असे म्हणतात.

पण श्रृती-संतांनी दाखविलेल्या सन्मार्गांनी विचार केला तर जीवाचे हे स्वरूपाचे अज्ञान नाहीसे होऊन त्याला आपल्या स्व-स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होते.

विषय, देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी, अहंकार या सर्वांचा देहात समावेश आहे. मी म्हटल्याबरोबर विचार न करता, मनुष्य आपल्या देहाकडे बोट दाखवून जरी "मी" असे म्हणत असला तरी तो आपल्याला अनेकानेक प्रसंगी देहाहून निराळा समजतो असे दिसून येते.

"माझा देह" असा जेव्हा तो आपल्या देहाचा उल्लेख करतो तेव्हा तो आपल्याला देहाहून अगदी निराळाच समजत असतो. पहा ना !!! "मी डोळा" असं म्हणत नाही तर माझा डोळा, माझे मन, माझी बुद्धी असेच

म्हणत असतो ना !!!??? कारण "**माझा**" ही षष्ठी विभक्ती आपल्याहून सर्वथैव भिन्न असलेल्या पदार्थाचा आपल्याशी काही संबंध दाखवावयाचा असल्यासच उपयोगात आणली जाते.

जागेपणी ज्या देहाचा आपण "मी" म्हणून निर्देश करतो, तो देह ज्यावेळी अंथरुणावर पडलेला असतो तेव्हा आपण त्या देहावर मीपणा ठेवीत नाही. सुषुप्तीत तर देहाला आपण विसरतोच. म्हणूनच "मी म्हणजे देह" असे समजणे हे काही स्व-स्वरूपाचे यथार्थ ज्ञान नव्हे; तर ते अगदी विपरीत ज्ञान (म्हणजेच अज्ञान) आहे.

देहाच्या बाहेरील गोष्टीशी व्यवहारिक संबंध आला असता, मनुष्य देहावर **मीपणा** ठेवून व्यवहार करतो नाही का ??? बाहेरील गोष्टींशी व्यवहार बंद पडला की मग देहावरचा **मीपणा** आत असलेल्या इंद्रियांवर येऊन थडकतो. तरी तो मीपणा जसा देहावरचा नसतो (यथार्थत:) कारण या सर्व पदार्थांचा "**माझे**" म्हणून आपण निर्देश करत असतो. "**मी**" म्हणून त्यांचा आपण निर्देश करूच शकत नाही. जसे मी डोळा, मी कान, मी मन, मी बुद्धी असे आपण म्हणत नाही. याचे कारण हेच की "मी" म्हणणारा जीव या सर्वांहून अगदी निराळाच आहे.

याप्रमाणे जीव हा या सर्व गोष्टींपासून अगदी निराळा आहे. जीव हा **स्वसंवेद्य** असून अन्याला जाणत असतो; पण दुसरे पदार्थ आपल्या स्वत:ला जाणत तर नाहीतच पण दुसऱ्यालाही जाणू शकत नाहीत. जसे घोडा "मी घोडा" आहे असे जाणत नाही व अन्यालाही जाणत नाही पण जीव जाणतो. म्हणून जीव ज्ञानस्वरूपच आहे. ज्ञानाला उत्पत्ती नाश असू शकत नाहीत. कारण उत्पत्तीनाश जाणण्याकरीता ज्ञान पाहिजेच ना ??? आता हेच बघा ना !!!"मला काही कळत नाही" हे कळण्यास ज्ञानच लागते ना !!!

म्हणजेच ज्ञानरुप जीव उत्पत्तीनाश रहित असा अविनाशीच आहे. अशा जीवाला अत्यंत दु:खरहित व अविनाशी सुखाची इच्छा असते. असे सुखच जर नसते तर ही सुखाची इच्छाच दुरापास्त. असे अविनाशी अखंड सुख

जीवाहून जर वेगळे असते तर ते सुख अविनाशी म्हणताच येणार नाही. सुखाला अखंड तेव्हाच म्हणता येईल की जेव्हा ते नव्हते किंवा प्राप्त नव्हते असा अनुभव येणार नाही. असा अखंड सुखाचा अनुभव घेता येतो का ? तर जीव मुळातच **सुखस्वरूप** आहे.

सृष्टीतील एक नियम आहे, ''कोणतीही वस्तू आपल्या स्वरूपभूत धर्माचा त्याग करून इच्छित नाही किंवा तिला त्या धर्माचा कधी कंटाळा येत नाही.'' जीवाला ज्या आनंदाची अपेक्षा आहे तो जीव मुळातच असा सत्-चित्-आनंदस्वरुप आहे. ह्या आपल्या सच्चिदानंद स्वरुपाची अनुभूती श्रीगुरुकृपेने-नामस्मरणाच्याद्वारा येते.

* * * *




अपेक्षा चूक नाही पण आग्रह धरणं चुकीचं आहे. ''**नहि स्वात्मारामं विषय मृगतृष्णा भ्रमयति।**'' स्वात्माराम तृप्त आहे. तो परिपूर्ण आहे. याचा अर्थ काय आहे ? जीवनाचे खरे लक्षण काय आहे ?

आपण अंतर्मुख होऊन आता बघितले पाहिजे. पण आपण बघतो बाहेर. ज्या सुखाकरिता या जगात रात्रंदिवस आपण धडपडतो, त्याऐवजी आपण जर आपल्या आतमध्ये जे सच्चिदानंद-आत्मस्वरूप आहे, त्याच्या/त्याला अनुभवण्याची कला जर शिकून घेतली तर सार्थकच झाले. अष्टौप्रहर, बारामहिने, तेराकाळ आनंदच आनंद-स्वानंद, कारण तो आपल्या आत आहे, तो नुसता दाशरथी राम नाही तर तो **स्वानंदाभिराम** आहे, हा केवळ नंदलाल नसून **आनंदलाल** आहे.

भगवत्नामाचे तात्पर्य तरी काय आहे ? नामाची व्याख्या अशी आहे, ''आपण आपल्या मनाने नामाचा हात धरून चारी वाणींच्या पायऱ्या उतरून

आपल्या अंत:करणात उतरायचे, की जेथे परमानंदाचा अक्षय खजिना आहे; हा परमानंद अखंड भोगण्याचे नाव म्हणजे **नामसाधना**."

आपण केवळ आपल्या मनाच्या सहाय्याने, परा, पश्यन्ति, मध्यमाव वैखरी या चार वाणींच्या पायऱ्या उतरून आत खोलवर जाऊ शकत नाही. मग याला काही उपाय आहे का नाही ? तर त्याला एकच-एक उपाय आहे, "**नाम**". नाम हीच एक अशी वस्तू आहे, असे तत्त्व आहे, की एका वाणीतून दुसऱ्या वाणीत ते उतरता-उतरता ते आपल्याला भगवंतापर्यंत घेऊन जाते.

म्हणूनच असं आत-आत उतरण्याकरिता, अवघ्या विश्वात पसरलेले आपले जे मन आहे, त्या मनाला आत ओढून घेऊन भगवत्‌नामाशी बांधून मग त्या मनाला आत सोडायचे, तरी ते उसळ्या मारुन वर-वर येण्याचा प्रयत्न करतेच, पण **नामाच्या** वजनाने, नाईलाजाने का होईना पण त्या मनाला आत उतरावेच लागते. आत भगवंताचे/आपल्या श्रीगुरुंचे अधिष्ठान आहे. जिथे भगवंत प्रत्यक्ष आपल्या अनुभवात येतो, त्या परावाणीच्या ठिकाणी भगवंताचा अखंड अनुभव घेत-घेत आनंदाने-महानंदाने-ब्रह्मानंदाने समृद्ध-समर्थ जीवन जगणे हेच नामसाधनेचे अमृतफळ आहे.

ज्ञानियांचे राजे, योगीराज, तत्त्वज्ञानी, संजीवन समाधीचे सम्राट आणि स्वानंदसाम्राज्याचे सार्वभौमचक्रवर्ती असे ज्ञानेश्वरमहाराजही म्हणाले, आपल्या हरिपाठात काय म्हणाले तर, "**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा। पुण्याची गणना कोण करी।।**"

किती सोपे सांगितले ना ??? पण या सोप्यालासुद्धा आपण उपाधी लावून त्याला उगीचच जास्तीत जास्त अवघड करून टाकतो. एक सांगतो, श्रीब्रह्मचैतन्यांनी एकाला नाम सांगितले, तो पण घेऊ लागला. पहा, मोठ्या श्रद्धेने, प्रेमाने. सहा महिने झाले, एक दिवस आला महाराजांकडे म्हणाला, "महाराज गुडघे फार दुखतात-मांड्या भरून येतात." महाराज म्हणाले, "का ? कशाने दुखतात ?" याने काय म्हणावं ? म्हणाला, "बद्धपद्मासन

घालून बसतो !!!'' महाराज म्हणाले, ''मी तसे सांगितले होते का ???'' मग तो म्हणाला, ''मी कोणत्या आसनावर बसून जप करू ?'' महाराज म्हणाले, ''तुम्ही प्रपंचाचा विचार करता, चिंता करता, काळजी करता, ती **कोणत्या आसनावर** बसून ???''

चोवीस तास नाम घ्यावे. कशाला त्या कष्टप्रद आसनाची उठाठेव ? नाही का ? ''**निजल्याने गाता उभा नारायण। बैसल्या कीर्तन करिता डोले।।**'' म्हणून ज्ञानेश्वर महाराज काय म्हणाले ? तर ''**हरि मुखे म्हणा**''. हरि-राम-कृष्ण या तिन्ही नामाचा भाव एकच आहे ''**रामकृष्णहरि**''.

एक नाम घेतले ना कीं पुरे झाले बघा. अन्य काही आटापिटा नको. ते नाम आपल्याला वाणीच्या पायऱ्या उतरून आत नेईल आणि भगवतस्वरुपाचा साक्षात्कार म्हणजे **आनंदाची-स्वानंदाची** अनुभूती देईल. ही जबाबदारी दिव्य नामाची. ज्यांनी/श्रीगुरुंनी आपल्याला नाम दिलेले असते, त्यांची आपण काय करावयाचे तर नाम घेत रहावयाचे. कसे-कुठे तर आसनी-शयनी-भोजनी-उठता-बसता-येता-जाता-काम करता करता अगदी भांडताना-कांडतानासुद्धा. एक नाम आणि नाम. आपण नाम घ्यावे **काळजी तो करतो.**

* * * *




कळकळीच्यादृष्टीने संतांचा नंबर सदा पहिला. हे स्वत: पूर्ण असतात. जगत्कल्याणासाठी आपले सर्वस्व उदारतेने, करुणेने वाटत राहतात. अवघ्यांच्या हिताची, उद्धाराची तीव्र कळकळ त्यांच्या ठायी नांदते.

समोरच्यांच्या कमी-जास्त अधिकाराचा कोणताही विचार न करता त्यांच्याच परमकल्याणासाठी त्यांच्याच पाया पडतात - कोण ? तर फक्त संतच. अजून उपकार तो कोणता असावा ??? यापरती अजून कळकळ ती

काय असावी ना ??? सगळ्यांना दंडवत घालण्यातही कळकळ आणि प्रसंगी शिव्या घालण्यातपण एक तोच कळवळा.

संतांना माऊलीची उपमा देतात !!! "**लेकुराचे हित। जाणे माऊलीचे चित्त।। ऐसी कळवळ्याची जाती। करी लाभाविण प्रीती।। पोटी भार वाहे। त्याचे सर्वस्वही साहे।।**"

खरे सांगू का ? व्यवहारातील हा माऊलीचा दृष्टांतसुद्धा कमीच पडतो. संतांच्या प्रेमाचे वर्णन करण्यासाठी आईच्या प्रेमाची उपमा तोकडीच आहे. कळवळ्याचे बाबतीत संत व आई एका जातीचे आहेत, पण "**करी लाभाविण प्रीती**" ही फक्त संतप्रेमाचीच विशेषता आहे.

रामायणात तुलसीदासांनी भरत व हनुमान यांना संत म्हटले आहे. प्रभू रामरायांना ज्या कैकयीने वनवासात पाठविले अशा मातेलाही चित्रकूट यात्रेच्या निमित्ताने श्रीरामाच्या पायावर घालण्याचे काम एका भरताने केलेले आहे.

रामायणात एक प्रसंग आहे. मारुतीराय वानरांना घेऊन सीतामाईच्या शोधासाठी निघाले, तेव्हा एका प्रसंगी सर्वजण तहानेने व्याकुळ झाले व पाणी लवकर मिळाले नाही तर वानरांचे प्राणोत्क्रमण होणार अशी अवस्था झाली. संतवृत्ती-कृपावृत्तीचे बलभीम, त्यांना हे पाहवले नाही. "बुद्धीमतां वरिष्ठं" असणारे अंजनीय पाणी शोधण्यासाठी एका डोंगरावर चढले. तेव्हा त्यांना एक गुहा आढळली. त्यातून पक्षी ये-जा करत होते. यावरून तेथे पाणी असले पाहिजे असे अनुमान त्यांनी केले, पण स्वत: एकटे जाऊन पाणी प्याले नाहीत. डोंगरावरून खाली आले, सर्व वानरांना घेऊन वर गेले, सर्वांची तहान भागवली व नंतर मगच स्वत: पाणी प्याले. तसेच संत !!! भगवत् साक्षात्काराच्या स्थितीवर प्राप्त/आरुढ होऊनही समाजाच्या कल्याणासाठी परत खाली येतात. संतस्वरुप हनुमंतांनी भित्र्या सुग्रीवाचा संबंध रामाशी जुळवून त्याला निर्भय केले. मारुतीरायांना काय लाभ हवा होता ??? "**करी लाभावीण प्रीती**" हाच भाग.

कळकळीमुळे संत अत्यंत थोर अशा आत्मीयतेने कशी जवळीक करतात पहा !!! श्रीतुकोबारायांचा एक अभंग आहे, "**अर्भकाचे साठीं। पंते हाती धरिली पाटी ।।१।। तैसे संत जगी। क्रिया करूनी दाविती अंगी ।।धृ.।। बालकाचे चाली। माता जाणुनि पाऊल घाली ।।३।। तुका म्हणे नाव। जनासाठी उदकी ठाव ।।४।।**"

पाटी हाती धरण्याची गरज नसतानासुद्धा, मुलाला लिहिता यावे म्हणून पंत हाती पाटी धरतात, आईला चांगले भरभर चालता येत असतानाही बालकाला चांगले चालता यावे म्हणून जाणून-बुजून आई त्याच्या चालीने चालते, नाव लोकांना तारुन पलीकडे नेण्यासाठी पाण्यात राहते, तसेच संत पूर्णत्त्वाच्या स्थितीवर असून कळवळ्यापोटी क्रिया करून दाखवितात. गरज नसताना भवसागरात राहतात, जगासाठी ह्या भवसागरात नावेचे काम करतात.

"**दिव्यत्वाची जेथे प्रचिती। तेथे कर माझे जुळती ।।**" संतांच्या उपकाराचे काय वर्णन करणार ना ??? नारदांनी पण भक्तीसूत्रात त्याचे असेच वर्णन केले आहे पहा. काही कर्तव्य-प्राप्तव्य नाही पण आहे तो एक फक्त असीम असा कळवळा-कळकळ. आपल्याला फोडण्या-तोडण्यासाठी आपले लोखंडालाही सुवर्णत्त्वाचा लाभ करून देणारी एकच कृपाळू, उदार दृष्टी.

* * * *




नामदेवांचा एक सुंदर अभंग आहे -

**"रामकृष्णहरि जप ममत्वे साधावा।**
**अहंकार टाकावा, समबुद्धि ।।१।।**
**निवृत्ति योगे पुण्य होईल अगाध।**
**एका नामे गोविंद तुष्ट सदा ।।२।।**

**नामदेव म्हणे सद्गुरुपासोनी।**
**नाम घ्यावे जाणोनी ना ना काही।।३।।**

भगवंताचे गुण व स्वरुप, यापासून भक्ताच्या अंत:करणात निर्माण होणाऱ्या भावना व भाव, भक्तवत्सल ईश्वराचे भक्तावरील प्रेम व भक्ताची देवावरील भक्ती, संत/श्रीसद्गुरु हीच देवाची प्रत्यक्ष रुपडी म्हणूनच देवाप्रमाणे, प्रसंगी देवाहून काकणभर अधिकच संतांवर/श्रीगुरुंवर असणारा विश्वास, देवाला भक्तांनी करावयाची काकुळतीची प्रार्थना व भक्तीप्रेमाची याचना या गोष्टींना नामस्मरण साधनेत फार फार महत्त्व आहे.

साधनामार्गाला लागल्यानंतरसुद्धा साधकाने सद्गुरुला/संतांना देवपण कशाने (कोणत्या साधनांनी) आले त्या साधनांचा विचार नित्य करावयास हवा. त्याचबरोबर आपल्या परमार्थप्रवृत्तींची कारणे, सद्गुणसंवर्धन व देव-भक्तांचे-सद्गुरु-शिष्याचे नाते या गोष्टींचा सातत्याने विचार करावयास हवा.

या सगळ्या विचारांना परमार्थपथावर चालताना लागणारी **शिदोरी** असं म्हणतात. त्याचबरोबर नित्यानित्यविवेक, अपूर्णतेची जाणीव, परमात्म्याच्या अगाध लीलासामर्थ्याची जाणीव ही एकप्रकारची छान, पवित्र, पौष्टिक, स्वादिष्ट, खुसखुशीत अशी शिदोरीच आहे.

हा परमार्थप्रवास फार लांबचा, दीर्घकाल चालणारा असल्याने, एकदा सुरवातीला निघताना तयार करून घेतलेली शिदोरी मुक्कामाच्या टोकापर्यंत पुरत नाही, तर चालत असताना (म्हणजे अखंड नामस्मरण करताना) वाटेत त्या शिदोरीत सारखी-सारखी भर घालावी लागते. जसा जहाजावर समुद्रातून प्रवास करताना दर बंदरावर गोडे पाणी व अन्न यांचा साठा करावा लागतो, वाफेवर चालणाऱ्या गाडीच्या इंजिनात जसा वारंवार पाणी व कोळसा भरावा लागतो, त्याचप्रमाणे या **नामस्मरणरूप** परमार्थपथावरदेखील मुक्कामाला जाईपर्यंत वरील वर्णन केलेल्या साधनांचा विचार पुन: पुन: करावा लागतो.

भगवंताचा साक्षात्कार व वरील विचारांचे श्रवण-मनन-निदिध्यास यांचा अन्योन्य संबंध आहे. तसाच श्रीगुरु-शिष्य/देव-भक्तांचे नात्याचा संबंध पण

अतिशय महत्त्वाचा. श्रीगुरु-शिष्य/देव-भक्त या नात्याच्या विचाराने-आचाराने आपला भाव (श्रद्धा) वाढतो. या चढत्या-वाढत्या भावामुळे साक्षात्काराला फार मोलाची मदत होते व साक्षात्कार, परस्परांच्या सहाय्याने अनेक पायऱ्यांनी वाढतच जातात आणि शेवटी पूर्ण साक्षात्कार म्हणजेच पूर्णभाव, पराभक्ती, शिव होऊन शिवाला भजणे **(भगवत होऊनही भगवंताचे नामस्मरण)** अशी पूर्णावस्था लाभते.

का सारखा या शिदोरीचा विचार करावयाचा ??? तर माणसाला विस्मरण फार !!! त्यात पुन: मौजेची (परमार्थाच्यादृष्टीने मात्र फार घातकच) गोष्ट म्हणजे हवे ते विसरावयाचे व नको ते मात्र न चुकता-विसरता स्मरणात ठेवावयाचे.

म्हणून परमार्थात आरंभशूर फार !!! पण शेवटचा मुक्काम गाठणारे विरळच नाही का ??? म्हणून श्रीसमर्थांनी अगदी आग्रहाने सांगितले, ''**केलेचि करावे भोजन। घेतलेचि घ्यावे जीवन। तैसे श्रवण आणि मनन। (निदिध्यासनदेखिल) केलेचि करावे।।**''

सर्व परमार्थपर ग्रंथात देहादिप्रपंचाच्या असारत्त्वाची व भगवंताच्या सारसर्वस्वाची नित्य यशोगाथा वर्णन केलेली असते. भगवंताचे/श्रीगुरुंचे सामर्थ्य, कृपा, ऐश्वर्य आदिंचे वर्णन असते. कशासाठी ? तर भक्तीभाव वाढण्यासाठी. हरिकथेत याच गोष्टीचे वर्णन. साधकाने या गोष्टी नैमित्तिक न करता सातत्याने करावयास पाहिजेत. आपण श्वासोश्वास कधी-कधी करतो का ??? तर नाही नाही !!! तो सतत-अखंड-अविरत चालूच आहे. नाम असं चालू रहावयास हवे. नाही का ???

* * * *

# चिंतन २५८

"**जैसा निर्वातीचा दीपू।सर्वथा नेणे कंपू।**" निर्वात स्थळी तेवत असलेला दीप जसा निश्चल असतो तसा स्थितप्रज्ञ निश्चल असतो. गीतेत दुसऱ्या अध्यायाच्या अखेरीस स्थितप्रज्ञाचे वर्णन भगवान् श्रीकृष्णांनी केले आहे. ते अर्जुनाची दोलायमान मन:स्थिती सावरण्याकरता. गीतेपेक्षा माऊलींनी स्थितप्रज्ञ अधिक सुस्पष्ट केला आहे.

अटीतटीच्या संघर्षप्रसंगी माणसाचे मन कसे असावे याचा हा एक उत्कृष्ट आदर्श आहे. सामान्य माणूस असल्या प्रसंगी असाच गोंधळतो, बावरतो, किंकर्तव्यमूढ होतो 'अर्जुनासारखा". मोहाने वेढला जातो, भावविवश होतो, अंती "**स्वधर्माचा**" विसर पडतो, बुद्धिभ्रंश होतो आणि या सर्वातून आत्मनाशाची वाट चालू लागतो, कधी ? त्याचे त्यालाच उमगत नाही.

सर्व प्राणीमात्रात मनुष्य हा अत्यंत बुद्धिमान प्राणी आहे. पण जनावरांपेक्षाही तो बहिर्मुख होतो. सुखाने हुरळून जातो, आनंदाने उड्या मारतो, कधी तो चिडतो, संतापतो, क्रोधविष्ट होतो. नाही का ??? हर्षाने तर कधी विषादाने त्याची बुद्धी सारखी हेलकावे खात असते. सोसाट्याच्या वाऱ्यात सापडलेल्या पाण्यावरील नावेसारखी आणि सगळ्याचा परिणाम् काय तर **आत्मारामाची** विस्मृती. रात्र जशी सूर्याला गिळून टाकते तसा अस्थिर माणसाचा **स्वस्मृतिभ्रंश** आत्मारामाला झाकोळून टाकतो.

याच्या अगदी उलट "**स्थितप्रज्ञ**". तो अंतर्मुख वृत्तीचा असतो. भौतिक सुखाने तो नाचत नाही तसाच दु:खप्रसंगी हतबलही होत नाही. तो आत्मानंदाने परिपूर्ण असतो. सूर्याची किरणे जगातील अणूरेणूला स्पर्श करतात, पण जगात लिप्त मात्र होत नाहीत. तसाच हा स्थितप्रज्ञ. सर्वदा "**आत्मरसे निर्भिन्न**" "**संगदोषे न लिंपत**".

हा स्थितप्रज्ञ आणखी कसा असतो ? तर निरहंकारी असतो. आपला अहंकार सारखा एवढ्या तेवढ्या कारणांनी फणा काढत असतो, होय की नाही ? अहंकार गेला की काय होते ? तर मग सर्वप्राणीमात्रांबद्दल त्या स्थितप्रज्ञाला आत्मीयता असते. विश्वात्मकवृत्तीने तो उजळून निघालेला असतो. "**विचरे विश्व होऊनि। विश्वामाजी।।**" संयम, अभ्यास, यम-नियम यामुळे त्याचे मन त्याच्या मुठीत असते.

कोणाबद्दल राग आणि द्वेष त्याच्या ठायी नसल्याने तो "आत्मप्रसन्न" असतो. चेहरा जरी उदास दिसला तरी आत्मारामाची प्रसन्नता कायमस्वरूपीच असते. पाणी कधीतरी पाण्याला बुडवते का ??? विस्तव कधीतरी विस्तवाला भाजतो-पोळतो काय ??? त्याचप्रमाणे हा परिपूर्ण स्थितप्रज्ञ.

बुद्धी आत्मस्वरूपी स्थिरावली की अंत:करण-मन कधीही एवढंसुद्धा विचलीत होत नाही. बुद्धी आत्मारामाच्या ठायी कायमस्वरूपी स्थिर होण्याचा सोन्यासारखा उपाय म्हणजे नाम. जाता जाता नामाचा गूढार्थ सांगतो, "**राम-कृष्ण-हरि**" एवढेच नाम नाही तर "**अखंड आत्मारामाचे भान**" म्हणजे नाम आणि नाम तेच रुप, आत्मरुपाचे दर्शन. म्हणून "**नामे तेचि रुप-रुप तेचि नाम**" अशी नाम-रुपाच्या एकरसतेची अनुभूती.

सर्व नद्या जरी सागराला मिळाल्या तरी समुद्राची पातळी वाढत नाही, त्याला काही महापूर येत नाही किंवा याच्या उलट उन्हाळ्यात नद्या आटल्या आणि त्यांचे पाणी सागराला मिळेनासे झाले तरी त्याची पातळी कमी होत नाही, कधी तो आटतही नाही. ह्या सागरासारखा स्थितप्रज्ञ अक्षुब्ध असतो.

स्थितप्रज्ञाच्या पुढ्यात साक्षात रंभा-उर्वशी अगर ऋद्धि-सिद्धी जरी उभ्या ठाकल्या, अगदी कर जोडून !!! तरी त्याच्या मनाची जराही चलबिचल होत नाही. एका आत्मबोधानेच तो इतका **संपन्न** झालेला असतो की त्यापुढे इतर कोणतेही ऐश्वर्य फिके पडते. ज्ञानोबाराय म्हणतात, "सूर्याच्या घरी प्रकाशाकरिता काय वातीचा दिवा लावावा लागतो का ??? समजा दिवा लावला नाही !!!??? तर काय सूर्य अंधारात कोंडला जाऊ शकतो थोडाच ??? हे जितके असंभव तितकेच स्थितप्रज्ञ विचलीत होणे असंभव आहे.

हा अंतरिक महासुखाने तृप्त असतो, आत्मबोधाने संतुष्ट असतो. परमानंदाने पुष्ट असतो. असा असूनही केवळ स्वकेंद्रित नसतो तर विश्वात्मक पातळीवर आरुढ झालेला असतो. ग्रंथराज ज्ञानेश्वरी पारायण प्रसाद म्हणून हे चिंतन !

* * * *




परमार्थ हे ध्येय ठरल्यावर प्रपंच हा परमार्थाचे साधन म्हणून करावयाचा. तेव्हा परमार्थाला उपयोगी पडेल अशा रीतीनेच प्रपंच करावयाचा, टाकावयाचा नाही. "**मानिला प्रपंची आनंद। केला परमार्थी विनोद।।**" ह्या समर्थवचनाप्रमाणे करावयाचे नाही.

परमार्थात श्रीगुरु-शिष्य हे नाते पवित्र, मधुर, पुण्यमय असून महद्‌भाग्याने जोडले जाणारे आहे. श्रीगुरु हे एक स्थूल पांचभौतिक शरीर नसून एक परमसत्याचा अनुभवी आकार आहे. माता-पिता, आप्तबंधू, पुत्रपौत्र यांच्यापेक्षाही श्रीगुरु/देवाबद्दल अधिक जवळीक व आपुलकी हा फार महत्त्वाचा भाव आहे.

"**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ।**" ज्याची भगवंतावर व जशी त्या भगवंतावर तशीच ह्या गुरुवर भक्ती; नाही नाही पराभक्ती आहे तो नामधारक. "**आत्मज्ञ: अर्चयेत भूतिकाम:।**" ज्याला परमार्थात अगर प्रपंचात वैभव, ऐश्वर्य पाहिजे असेल त्याने आत्मदर्शी अशा श्रीगुरुंची भक्ती करावी असे उपनिषदे सांगतात.

अशा महापुरुषांचे दर्शन-संगती-सहवास-कृपाशीर्वाद म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराचेच दर्शन. ज्याची प्राप्ती करून घ्यावयाची त्या भगवंताची मूर्त म्हणजेच असा महात्मा. देवाची सगुण-साकार कृपामृताचा वर्षाव करणारी

मूर्तच म्हणून त्यांच्याकडे पाहता येते. अशी श्रीगुरुस्वरुपाची महती आहे. "**जाको दरसें। साहेब दरसें।।**" असे कबीरांनी त्यांचे गुणगान केले आहे. जगाला न दिसणाऱ्या अशा परमात्म्याच्या गुप्त रुपाशी ऐक्य पावलेला पुरुष म्हणजे श्रीगुरु.

जड, निर्जीव पदार्थ (त्यांनाही अल्पप्रमाणात जीव आहेच) वनस्पती, सूक्ष्म जीव, मानवेतर मोठे प्राणी व मानव या भिन्न-भिन्न जाती, त्यांच्या त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या देवाच्या चढत्या-वाढत्या प्रकाशामुळे झाल्या आहेत. देवाचा अधिक प्रकाश मानवांत आणि **सर्वाधिक** प्रकाश श्रीगुरु/संतांच्या ठिकाणी असतो. ते देहधारीच असतात, देहधारीच दिसतात. तरी त्यांचा आत्मा परमात्म्याशी एकरुप झालेला असतो. भगवंत हा सागर तर हा महात्मापुरुष त्यावरील तरंग. दोन्ही एका समान गुणधर्माचे पाणीच. त्यांच्या ठिकाणी असलेला उज्वल देवप्रकाश संपर्कात येणाऱ्याला प्रकाशच करून सोडतो.

भाव-भक्ती वाढवण्याचे उत्तम साधन म्हणजे श्रीगुरुभक्तीप्रेम असा सर्वच्यासर्व सत्पुरुषांचा सिद्धांत आहे. "**आत्मज्ञाने चोखडी। संत जे माझी रुपडी।।**" निराकार देव दिसत नाही, त्याला भेटता येत नाही, त्याच्याशी बोलता येत नाही; ही उणीव भरून काढणाऱ्या देहातल्या मूर्ती म्हणजेच श्रीगुरु. "**देव ते संत, देव ते संत। निमित्त त्या प्रतिमा।।**"

त्यांच्या संगतीने, उपदेशाने, प्रबोधनाने, शिकवणूकीने निधडे झालेले चित्त ब्रह्मासारखे संशयरहित होते. श्रीगुरु हे श्रेष्ठ तीर्थ आहे. त्यांच्या संगतीने भ्रांतालाही ब्रह्मभाव प्राप्त होतो. त्यांच्या सहज स्मरणाने त्यांचीच योग्यता प्राप्त होते. श्रीगुरु हे देवाचेच रुपडे. जसा भाव देवावर ठेवावयाचा तसाच तोच भाव श्रीगुरुवर/संतांवर ठेवावयाचा. महात्म्यांच्या या वचनांवर दृढ श्रद्धा !

एक थोर सत्पुरुष म्हणत असत की, तुम्ही आपल्या श्रीगुरुंना मनुष्य समजता म्हणून तुमचे साधन चांगले होत नाही. आपल्या श्रीगुरुंना देव मानल्यावर उत्तम अनुभव येतात. खरी सगुणभक्ती म्हणजे संतांवर/

श्रीगुरुवरील भक्तीभाव. याच भक्तीभावाने भगवंतावरील भक्तीभाव वाढतो. साधनावरील (म्हणजे नामावरील) श्रद्धा दृढ होते. भय नष्ट होऊन अभयादी दैवीसंपत्ती लाभते.

नामस्मरण होण्याला सर्वात उत्तम साह्य श्रीगुरुसंगत. ''**संतांचे संगती मनोमार्गगति ।।**'' श्रीगुरु/संत भक्तीप्रेमच देतात व भक्तीप्रेमच घेतात. आपण संतांच्या घरी भिकारी होऊन का गेलो हे तुकोबांनी फार सुंदर वर्णन करून सांगितले आहे. आपल्या पूर्वपुण्याईने संतच घरी आला.

**''संतांचिया गावी प्रेमाचा सुकाळ। नाही भय शंका तळमळ ।।१ ।।**
**तेथे मी राहीन होऊन याचक। घालतील भीक तेचि मज ।।२ ।।**
**संतांचिया गावी वरो भांडवल। अवघा भक्तीप्रेमभाव धनवित्त ।।३ ।।**
**संतांचे भोजन अमृताचे पान। करिती नामस्मरण सर्वकाळ ।।४ ।।**
**संतांचा उदिम उपदेशाची पेठ। भक्तीप्रेमसुख देती घेती ।।५ ।।**
**तुका म्हणे तेथे आणिक नाही परी। म्हणोनि भिकारी झालो त्यांचा ।।६ ।।''**

* * * *




श्रीगुरुंनी आपल्याला आत्मशक्तीसहीत नाममंत्र दिला आणि आपल्याला मोठ्या प्रेमाने आपल्या करी धरिले, आपल्या मस्तकावर त्यांनी त्यांचा कृपामृतकोमल तळहात साशीर्वाद धरला, मग याचा परिणाम काय झाला ? नामशब्द आपल्या हृदयपटलावर उमटू लागले आणि त्याचबरोबर हृदयाकाशात नाना ध्वनी उठले.

हे ध्वनि तरी कसे ??? असं म्हणाल तर कधी पैंजणाच्या घागऱ्यांचा रूणझुणाट, कधी मोकळी बिनगी/घागर फुंकल्याचा आवाज/घोष; कधीतरी मंदिरातील असंख्य लहान-मोठ्या घंटांचा घणघणाट, केव्हा बासरीचे मंजूळ

सूर, कित्येक सुरात लावलेल्या विणेचा झणत्कार, कधी दुंदुभीची गर्जना, कधीतरी सागराच्या लाटांची गंभीर गाज तर कधी नभांचा गडगडाट, कधीकधी शंखनाद तर मध्येच केव्हातरी सिंहनादसुद्धा.

त्यांच्या कृपेने मन स्व-स्वरुपी लुब्ध होते. अंगांगात स्वानंदाधिरामाचे वारे भरते आणि आनंदाची काही-बाही अशी जी स्व-स्थिती होते की ती वाचेनी बोलता नये. बारा-सोळा (अंत:करणवृत्ती), हातांमध्ये भक्तीप्रेमाच्या ज्योती/बोध काकडे घेऊन आपल्या भोवती गोळा होतात, फेर धरतात. त्यांची ताल-लय-स्वर यांच्याबरोबर एकच दाटणी (गर्दी) होते, त्यांच्या हाती असणाऱ्या आत्मबोधाच्या ज्योतींचा सभोवार एकच दाट स्वच्छ, लखलखीत प्रकाश पडतो. आपण त्या प्रकाशजळात सचैल न्हाऊन निघतो व भक्तीप्रेमभावाने निथळतो.

इतका हर्ष होतो की बस् !!! दशमद्वारी जाऊन सत्रावीचे अमृतपान होते. हृदयआकाशात लक्ष लावून पाहता-पाहता तटस्थता प्राप्त होते. एक आगळा-वेगळा निवांतपणा लाभतो; त्याचबरोबर परमशांतीच्या साम्राज्यभुवनी सुखासनावर स्वानंदरसाचा पट्टाभिषेक होतो. परमसिद्धी चवऱ्या ढाळतात. महासुखे अबदागिरी धरतात.

श्रीगुरुकृपाप्रसादे अंतर्मौन लाभते. नक्षत्रांचा सडा भरदिवसा अनुभवास येतो, कधी अति ज्वलंत अग्निच्या ज्वाळा दिसतात तर कधी पौर्णिमेचा पूर्ण-शुभ्र चंद्रमा डोळ्यांसमोर चकाकत असतो. त्या आत्मचंद्राचा ललितप्रकाश पाहून मन वेडावून जाते. मनाचा राजहंस ह्या चंद्राच्या चांदण्यातील अमृतकणाचा अति मवाळपणे आस्वाद घेतो. हा मानसीचा राजहंस मोठ्या दिमाखाने सारखा डोलत असतो, झुलत असतो.

हा आत्मस्वरूप, आनंद राजहंस उडून जाऊ नये म्हणून एका भक्तीप्रेमभावाच्या एकांती त्याला आपल्या डोळ्यात साठवून ठेवावयाचा. त्याला न्याहाळून-न्याहाळून, पुन: पुन: पहात रहायचं. मग तो आपल्या डोळ्याच्या बाहुलीतच कायमस्वरूपी स्थानापन्न होतो.

श्रीगुरुंनी दिलेल्या "नामाचे" **(दिव्य नामाचे)** अखंड स्मरणात हा सगळा स्वानंदानुभव घडोघडी घ्यावयाचा. ज्याचे त्याने, आपण आपणात हे महासुख भोगावयाचे. हा सुखानुभव काय सांगावा ना ??? **"ते सुख काय सांगो। वाचे बोलता न ये।।"**

श्रीसद्गुरुनाथांच्या कृपाशिर्वादे आनंदबाळ नामसंकीर्तन करतो, सुखात डोलतो. गुरुकृपेनेच या आनंद महासागरी अवभृतस्नान करण्याचे महद्भाग्य लाभते !!! होय की नाही ???

आपल्या श्रीगुरुंनी दिलेल्या नाममंत्राचा हा सगळा अनाकलनीय महिमा. त्यांच्याच असीम कृपेमुळे हे सर्व अमृतअनुभव येत असतात आणि थोर नवलाव वाटतो. हे अनुभव असताना कानात वारे भरलेल्या वासरासारखी गत होते. शब्दांनी जरी व्यक्त केले असले तरी खरे पाहता ते शब्दांच्या पलीकडले आहे. श्रीगुरुंच्या कमलाकर स्पर्शांनी मात्र ते आपल्या जाणीवेला **(शुद्ध जाणीवेला)** भावल्याशिवाय राहात नाही.

या तेजाने तेजाची दाटणी होते, अत्यंत थोर अशा आनंदाची कारंजी सहस्त्रधारांनी थुईथुई उडत असतात. स्वरुपदर्शनाने/विस्मयकारक **प्रकाशदर्शनाने** मन तटस्थ होते. चित्ताला या दर्शन सोहळ्याचे वेडच लागते ना !!!???

अमृतरस सतत झिरपतो. त्याने सहस्रदलांतील तळे भरते, ओसंडून वाहते. मधुरवाणीने "भगवत्नाम" अनहत्ध्वनी रुपांनी उमटते. तेजाचा पाऊस पडतो. भगवंताचे समग्र वैभव प्रकटते. मग सहजच मुखातून त्या गुणवंताची/भगवंताची स्तुती बाहेर पडते. (अण्णांच्या बाबतीत ती कागदावर अक्षर रुपाने अवतरते) या फार सूक्ष्म, तरल गोष्टी आहेत. अनुभवावयाच्या आहेत, सतत.

* * * *

# चिंतन २६१

धर्म आणि अध्यात्म यामध्ये खूपच मोठा फरक आहे. धर्माने अध्यात्माचे रक्षण केलं जात असेल पण धर्म म्हणजे काही अध्यात्म नाही, याचं नेमकं भान असलं पाहिजे. जसं कुंपण पिकाचं रक्षण करतं म्हणून कुंपण म्हणजे काही पिक नव्हे.

धर्म हा बऱ्याचवेळी अध्यात्माची गळचेपी करत असतो, त्याचे कर्मकांड करून टाकतो. आपल्याला श्रीगुरुंकडून प्राप्त झालेल्या उपासनेचं कर्मकांड होऊ देता कामा नये. म्हणजे काय ? तर उदाहरणार्थ, वेळापत्रक ठरलं की, रोज पहाटे ५.३० ला फिरायचं, फिरुन आल्यावर स्नान करायचं, मग देवपूजा करायची आणि पूजा झाल्यावर अर्धातास **जप** करायचा की झालं आपलं काम. आता आपला आणि देवाचा संबंध संपला !!! उद्यापर्यंत. असं होता कामाचं नाही बरं. मग हे अध्यात्म काय आहे ?

अध्यात्म शब्दाचा अर्थ असा आहे अधि+आत्म. आत्म्यासंबंधी म्हणजे माझ्यामधला जो परमात्मा आहे की, जो सर्वांच्यात आहे, एकच आहे; आपल्यात जो खरा ''मी'' आहे (आतला मी) त्याच्याशी अखंड अनुसंधान, त्याचं स्मरण, अनुभव म्हणजे अध्यात्म.

आत्मा कसा आहे ? तर तो अत्यंत शाश्वत आहे. काय गंमत आहे बघा, साडी आणावयास गेलीय, साडी पसंत केली आणि काय विचारलं ? रंग पक्का आहे ना ??? दुकानदार म्हणतो/म्हणाला, ''अगदी पक्का आहे, जर का गेला तर परत घेईन.'' घेत नाहीत कधी पण नुसतं बोलायला काय जातं नाही का ?

आता विचार करा, आपण अशाश्वत, साडी जेमतेम सर्व-दीड वर्ष टिकणारी, देणारा, विणणारा अशाश्वत, पैसा अशाश्वत रंग मात्र या

सगळ्यात आपल्याला शाश्वत पाहिजे !!! म्हणजे अशाश्वतांत आपण शाश्वत शोधतो. आपण गॅरंटी मागतो म्हणजे एकप्रकारे शाश्वतताच मागतो. अशाश्वतात शोधून शाश्वत कसं हाती येणार ना ???

मग शाश्वत तरी काय ? शाश्वत आहे एक समाधान. समाधान हा जीवनाचा धर्म आहे. कुत्री, मांजरं यांच्या शरीराच्या गरजा भागल्या की ती स्वस्थ झोपून जातात. माणसात आणि प्राण्यात हा मोठाच फरक आहे की, त्याला भगवंताने विकसित मन दिले आहे. त्यामुळे शरीराच्या गरजा भागूनसुद्धा तो शांत, तृप्त होत नाही. मनाचं समाधान व्हावं लागतं. मनाची शांतता ती खरी शांतता, मनाचं समाधान हे खरं समाधान.

मग आपल्याला काय हवे, काय मिळाले पाहिजे ? तर जन्मभर पुरुन उरेल असं **समाधान**. या देहात असताना, अशाश्वत अशा देहात संपूर्ण समाधान अनुभवत राहणे म्हणजे अध्यात्म.

जसे जसे दिवस जातील, तसतसे समाधान वाढायला पाहिजे, याचं नाव समाधान. समाधान कायमस्वरुपी आहे, त्याला घट नाही, अव्यय आहे, त्यालाच वेदात अक्षरं असं आपण म्हणतो.

समाधान म्हणजे तरी काय ??? समाधान शब्द समाधीशी संबंधीत आहे. ती स्थितप्रज्ञाची अवस्था आहे. ''सम+धी'' म्हणजे समाधी. बुद्धी नव्हे तर **प्रज्ञा** सम होणं म्हणजे समाधी. एक गंमतीशीर बाहुली असते, कशी पण टाका-फेका ती नेहमी उभीच राहते तशी प्रज्ञा.

म्हणजे समाधान याचा अर्थ असा की, देह, प्रपंच कोणत्याही अवस्थेत असला तरी मन भगवंताला चिकटून असणं म्हणजेच अध्यात्म. मन भगवंताला चिकटून राहिल्यावर समाधान का राहतं ? तर तेथे मन कसं असतं ? प्रज्ञा कशी असते ?

परमात्मा आनंदस्वरुप आहे. आनंदस्वरुप म्हणजे तरी कसा ? तर ''आ+नंद''. ''नंद'' म्हणजे तृप्त होणे आणि ''आ'' म्हणजे सर्व बाजूने तृप्तता. आनंद म्हणजे शांतता, परमशांतता. प्रज्ञा भगवंताला चिकटून

राहिल्यावर सर्व बाजूंनी तृप्तता, अभय, संशयरहितता याचंच नाव समाधान, म्हणजेच अध्यात्म. प्रज्ञा आनंदघन भगवंताला सतत चिकटूनच नव्हे तर आनंदस्वरुप होण्याचे साधन ''एकच-एक साधन''. श्रीगुरुंनी प्रसादपूर्वक दिलेल्या ''नामा''चे स्मरण.

* * * *




समाधानाच्याबाबतीत आपली कुठेतरी गडबड होते. सगळं काही अनुकूल असलं तरी जे थोड कुठं कमी आहे/असेल तिथे आपलं समाधान राहत नाही. म्हणून मग कसं पाहिजे ? तर कधी दु:ख माहितीच नाही म्हणजे काय ? तर दु:ख येईल अंगावर, पण दु:खाचं दु:खपण बाधत नाही ते समाधान.

आपलं तर सुखसुद्धां दुखतं बघा. श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराजांनी १४ व्या अध्यायात एक दृष्टांत दिला आहे, फार अप्रतिम आहे; त्रिगुणातीत कसा असतो ? तर म्हणतात, ''एक पर्वत आहे, मेरु पर्वताचंच उदाहरण दिलं आहे, दक्षिणेकडून तुफान आलं, मेरु पर्वत हालत नाही, उत्तरेकडून जरी तुफान आलं तरीसुद्धा तो हालत नाही, अगदी आहे तसाच स्थिर असतो.''

प्रपंच म्हटला की धक्के हे बसायचेच ना ??? प्रपंचामध्ये कितीही धक्के बसले तरी आपली चित्तवृत्ती आनंदकंद भगवंतापासून बाजूला होत नाही त्याला म्हणतात समाधान. परमार्थात हेच तर सदा शिकावयाचे आहे आणि शिकता-शिकता अंगी बाणायचे आहे, होय की नाही ?

प्रपंचामध्ये कधीतरी काहीतरी कमीजास्त हे होणारच. न्यायशास्त्राच्या भाषेत बोलायचं तर ज्यात कमी-जास्त होत असतं त्यालाच प्रपंच म्हणतात. परमअर्थात कमी नाही व जास्तही नाही.

अशाश्वतता म्हणजे तरी काय आहे ? जे आज आहे ते उद्या असेलच असं नाही, नाही–नाही बहुतेक नसतंच याचं नाव अशाश्वत. श्व म्हणजे उद्या. आज आहे ते उद्या नाही म्हणून तर अशाश्वत ना ??? मग सांगा आता वृत्ती कशी व्हावयास पाहिजे ? आज वृत्ती शांत आहे, आता शांत आहे, तशीच उद्या राहिली पाहिजे. मग राहिली पाहिजे. तुम्ही काही तरी म्हणता बघा, मला पाठ नाही, "भंगावे ना कधी समाधान". म्हणता ना ? म्हटलं नाही तरी चालेल एकवेळ, पण महत्त्वाची गोष्ट समाधान कधी भंगू देऊ नये. खरं ना ???

अध्यात्माचा प्राण समाधान आहे. नामसाधनाने रम्य समाधान लाभते. "**ज्ञानदेवा रम्य रमले समाधान**" समाधानसुद्धा रमते, असं समाधान. मग करायचं काय या समाधानासाठी तर म्हणतात "**हरीचे चिंतन सर्वकाळ**".

साधनाने जर समाधान होत नसेल तर मग म्हणावे लागेल, साधन खोटे नाही तर साधना करणारा लटका. महाराजांकडे एक गृहस्थ गेला, म्हणाला, "इतके दिवस नाम घेतो आहे मी, पण शांती काही मिळत नाही, मिळाली नाही अजून." महाराजांनी त्याला एक गंमतीशीर दाखला दिला. एक कोमटी तेलंगी व्यापारी, खूप श्रीमंत, दोन लग्ने केली. दोघींना लेकरं झाली, दोन असताना आणखी तिसरी एक केली. पैशाची धुंदी, पण या तिसरीला काही झालं नाही, कुस उजवली नाही. महाराज म्हणाले, दोष कोणाचा ? अर्थात तिसरीचाच ना ? ब्रह्मानंदाला नाम दिलं, **माझा** ब्रह्मानंद तयार झाला, आनंदसागर तयार झाला, आता तुम्ही होत नाही तयार, नाही मिळत शांती म्हणता, यात दोष कुणाचा ? आणि मग म्हणाले त्यांना दिलं तेच नाम तुम्हाला पण दिलेलं आहे. मग ? त्यांनी ते सर्वस्वी खरं मानलं, तुम्ही मानत नाही. मग कसं मिळणार समाधान ??? तुम्ही मानत नाही याला मी काय करू ???

बघा आता, समाधान होत नाही–टिकत नाही, म्हणजे नामच एक खरं वाटावयास पाहिजे तेवढं ते वाटत नाही. आपल्या श्रीगुरुनं दिलेले नाम जितकं

खरं वाटायला पाहिजे तितकं वाटत नाही. मग वाटत नाही म्हणजे नेमकं काय ??? तर अत्यंत निरुपाधिक नामाला आपण उपाधी लावतो. आपल्याला उपाधिशिवाय नाम घेताच येत नाही.

आपण सगळं धावून-धावून करतो, पण नामाला अनेक सबबी सांगून चाट देतो. आम्ही सगळं अनुकूल असलं तर मग **नाम** झालं तर झालं. पैशापेक्षाही नाम जास्त खरं वाटलं पाहिजे. नामाची जी Supreme Value आहे ते परमात्मस्वरुपच आहे, भगवंतापेक्षा खरं आहे असं वाटलं पाहिजे !!!

एका थोर नामयोग्याचं एक वाक्य आहे, इंग्रजीत आहे. ते म्हणतात, "The Name is God" नामच भगवंत आहे. भगवंत हा अत्यंत निरुपाधिक, म्हणून **नाम** पण तेवढेच निरुपाधिक, स्नान, भस्म, माळ, **आरती**, दांपत्यजप १००० ची माळ, किती उपाधी लावता ना नामाला ? **प्रार्थना आहे**, निदान नामाला तरी कोणती उपाधी लावू नका.

* * * *




भक्ती हा द्वैतभावातला प्रकार आहे असं बऱ्याच अडाण्यांना वाटतं. ते म्हणत असतात, भगवंत वेगळा आणि भक्त वेगळा !!!??? अशी वेगळीक असल्याखेरीज भक्ती होणारच नाही. ही मंडळी सतत अथपासून ते इतीपर्यंत द्वैतभावातच डचमळत असतात.

भागवतधर्ममंदिराचा पाया घालणारे ज्ञानोबाराय (पुढील सगळे वैष्णव त्यांच्या तत्त्वज्ञानाला अनुसरणारे असून त्याचेच पाईक आहेत) त्यांना मात्र द्वैता-अद्वैताच्या चांदण्या गिळून द्वैतभावापतीकडे गेलेला, ईश्वराशी पूर्णत्वाने एकरुप झालेला भक्त कळला आहे.

हा भक्त आहे पण तरीही त्याला विश्वव्यापी चेतनातत्त्वाची जाण आहे. परमतत्त्वाचे भान आहे. निर्गुणत्त्वाचे ज्ञान आहे. त्याचबरोबर सगुणाचे विलक्षण प्रेमही आहे.

सर्वव्यापी परमतत्त्वाचे भान असल्याने आणि सर्वत्र तेच एकमेव परतत्त्व अनुभवत असल्याने, हा ज्ञानी भक्त कुणाचाही द्वेष करत नाही. कारण द्वेष भावना ही परकेपणातच असते. या ज्ञानी भक्ताला सारे विश्वच स्वकीय झालेले असते. **"किंबहुना चराचर आपणचि जाहला"** त्यामुळे तो सर्वांचाच मित्र असतो. प्रत्येक भूतमात्राबद्दल त्याच्या मनात अपार करूणाच असते. आत्मीयताच असते.

चराचर सृष्टीच्या ठिकाणी ज्ञानी भक्ताची ऐक्यभावाची भूमिका असते. त्यामुळे तो निरंहाकारी असतो. तो अत्यंत नि:स्वार्थी असतो. त्याचा "स्व" मर्यादित न राहता आत्मस्वरुपी विसर्जित झालेला असतो. त्याचा "मी"पणा एका विश्वात्मक भावनेने पुसून गेलेला असतो. पृथ्वी, प्राण, पाणी, दीप या दाखल्यांनी ज्ञानराजांनी १२ व्या अध्यायात या ज्ञानी भक्ताची अमूर्त गुणवत्ता मूर्तीमंतपणे साकार केली आहे.

हा ज्ञानी भक्त कायम संतृप्त असतो. वर्षाकाळ असो अथवा नसो, सागराची पातळी नेहमी तेवढीच असते ना !!!??? तो सतत संतुष्ट असतो. या संतोषाचे कारण म्हणजे जीव आणि परमात्मा हे दोघेही त्याच्या ह्दयात एकाच आसनावर विराजमान झालेले असतात.

**"जीवू परमात्मा दोन्ही। बैसोओनि ऐक्यासनी।**
**जयाच्या ह्दयभुवनी। विराजति।।"**

जीव व परमात्मा, देव आणि भक्त, श्रीगुरु-सत्शिष्य यांचे ऐक्य त्याने जाणलेले असते; तसेच जगाचे व आपले ऐक्यही त्याने ओळखलेले असते, नुसते ओळखलेले नसते तर तो ते प्रत्यक्ष जगतच असतो. **"हे विश्वचि माझे घर"** अशी त्याची मती स्थिर झालेली असते बघा.

या ऐक्यभावनेमुळेच भवतीच्या व्यक्तीची, परिसराची त्याला भीती वाटत

नाही. कारण, साऱ्या चराचरातून एकच चैतन्याचा/ब्रह्मचैतन्याचा (म्हणजे फक्त गोंदावलेकर महाराज नव्हेत तर एकच एक सच्चिदानंद प्रेममय भगवंताचा) स्त्रोत वहात असतो. याचे त्याला ज्ञान आहे. सागर खवळला तरी माशांना (मासा याचे अनेकवचन) त्याची भीती नसते आणि कितीही जलचर सागरात वास्तव्य करून असले तरी सागराला त्यांचा कंटाळा येत नाही. तसा या ज्ञानी भक्ताला जगाचा उबग येत नाही, जगालाही त्याची भीती वाटत नाही.

आपले शरीर आणि आपलेच हात-पाय आदी अवयव यांच्यात जी ऐक्यता/एकता असते तशीच एकरसता जग आणि ज्ञानी भक्त यांच्यात असते. याच्या ठायी समग्र विश्वाविषयी कोणताच दुरावा नसतो. आज आपण बोलघेवडे सामाजिक बांधिलकीचे कोरडे गोडवे गातो पण ज्ञानी भक्त मात्र विश्वात्मक बांधिलकीचा पुरस्कार करतो, आचार करतो. ही विश्वात्मकता त्याच्या ठायी इतकी भिनलेली असते की **जगच** त्याचा देह झालेला असतो. त्यामुळे द्वैतबुद्धीच निखळून पडलेली असते.

**“हे जगचि देह जाहले। म्हणौनि प्रियाप्रिय गेले।”**

हा भक्त “कैवल्याचा अधिकारी” असून “मोक्षाची सोड-बांध” करणं ही त्याची लीला असते. तो म्हणेल, त्याच्यापाशी महाबोधाचा सुकाळ होत असतो/झालेला असतो. मात्र हा बोध ओळखता आला पाहिजे.

* * * *



# चिंतन २६४

प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या तीन गुणांच्या प्रभावाने जीवाची आत्मबुद्धी झाकोळली जाते, जसा ढगांच्यामुळे सूर्य झाकून जातो. मग त्यामुळे जीव लौकिक जगातील बहुरुपतेत गुरफटून जातो. सुख-दुःख, बरं-वाईट, शीत-उष्ण, निंदा-स्तुती आदी द्वंद्वात गरगरत राहतो. याचा परिणाम तो

आत्मस्वरुपापासून दुरावतो. हा दुरावा दु:खालाच कारणीभूत असतो. दु:खाची समूळ निवृत्ती होऊन अत्यंतिक सुखरुपता प्राप्त होण्यासाठी या प्रकृती कार्य त्रिगुणांपासून वेगळे होण्याची खूपच अगदी नितांत आवश्यकता असते आणि म्हणूनच भगवंतांनी गीतेत गुणातीत अवस्थेचे वर्णन महत्त्वपूर्णपणे गायिले आहे.

सत्त्व, रज, तम हे तीनही गुण देहाच्या आधारानेच आपापले सामर्थ्य प्रगट करीत असतात. अग्नी जसा लाकडाच्या आकाराने साकारतो, भूमीतील जीवनरस झाडांच्या रुपाने दिसतो, दह्याच्या रुपात दूधच रुप, गुण, चव बदलते, उसाच्या निमित्ताने गोडी मूर्त होते तसे हे प्रकृतीचे तीन गुण देहाच्या अंत:करणयुक्त माध्यमातूनच प्रगट होतात. देहाच्या आश्रयानेच हे गुण आपले सामर्थ्य गाजवतात.

गुणातीत पुरुष (म्हणजे स्त्रीसुद्धा) गुणांचे हे बंधकत्व ओळखतो. गुण या शब्दाचा एक अर्थ आहे. दोर, दोरा, दोरी म्हणून या अर्थाने गुण बांधतात. गुणातीत या गुणांच्या प्रभावापासून अलिप्त राहतात. गुणांच्या मर्यादा ओलांडतात आणि मग आत्मस्वरुप साक्षात्कारापर्यंत पोहचतात. नदी उगमापासून स्वतंत्र असते पण सागराला मिळाली की सागररुप होते. तसा गुणातीत गुणसाम्राज्याच्या प्रांतातून सहीसलामत प्रवास करून आत्मस्वरुप परतत्त्वापर्यंत विनासायास जातो.

**"किंबहुना पंडुसुता। ऐसा तो माझिया सत्ता।**
**पावे जैसी सरिता। सिंधुत्त्व गा।।"**

अज्ञानाच्या घोर निद्रेतून गुणातीत जागा झालेला असतो. बुद्धीचा भेद करणारा मोहाचा बिलोरी आरसा त्याच्या हातातून गळून गेलेला असतो. त्यामुळे त्याला प्रतिबिंबाचा (म्हणजे मी जीव आहे, शिवापासून वेगळा आहे) आभास होत नाही. मूळ बिंब (म्हणजे आत्माराम) तेवढे त्याला दिसत राहते. त्या बिंबावरच (स्व-स्वरुपावर-आत्मस्वरुपावर) त्याचे सारे अवधान केंद्रित होऊन राहते. त्यामुळे जगात एका परतत्त्वाखेरीज त्याला दुसरे काहीच दिसत नाही.

**''पै बुद्धिभेदाचा आरिसा। तयार हातोनि पडिला वीरेशा।**

**म्हणौनि प्रतिमुखाभासा। मुकला तो।।''**

केवळ वाऱ्यामुळे सागर आणि लाटा वेगळ्या दिसतात, जर वारा वाहत नसला की सागर व लाटा एकरुपच प्रत्ययास येतात. लाटा भासतच नाहीत तर केवळ समुद्रच प्रत्ययास येतो; देहाहंकाराचा वारा लोपला की जीव व शिव एकरुप, एकरसच होतात, भक्त-भगवंत, शिष्य-श्रीगुरुंचे अगदी तसेच ना ???

**''देहाभिमानाचा वारा। आता वाजो ठेला वीरा।**

**तै ऐक्य वीचि-सागरा। जीवेशा हें।।''**

प्रकृतीच्या तीन गुणांच्या प्रभावाने अहंकार वाढीला लागतो. मग आत्मप्रकाश लोपतो, दिव्याला काचेचे किंवा अभ्रकाचे आच्छादन असले तरच त्याचा प्रकाश त्या अच्छादनातूनही पलीकडे जातो. अडवला जात नाही. समुद्राच्या पाण्याने वडवानल विझत नाही. गुणातीताचा आत्मबोधदेखील असा तीन गुणांनी आडवला जात नाही. गुणांची बाधकता त्याच्या वाट्याला उरतच नाही. आकाशातील चंद्र जमिनीवरील सरोवरात सरळ-सरळ जसाच्या तसा प्रतिबिंबित व्हावा तसा आत्मबोध त्याच्या ठायी पूर्णत्त्वाने उदयाला आलेला असतो.

पूर्ण विकसित कमलाचा सुगंध एकदा सर्वत्र आकाशापर्यंत गेल्यावर जसा परत काही कमलात येत नाही तसा गुणातीत एकदा गुणाच्या बंधनातून आत्मारामाकडे झेपावल्यावर परत गुणात्मक कोषात अडकत नाही. पण गुणातीत असूनसुद्धा परतत्त्वाची-भगवंताची प्रेमलक्षणाभक्ती मात्र करतच असतो.

* * * *

# चिंतन २६५

गुणातीत होता आलं की मग अधिकाधिकच आत्मसन्मुखता लाभते. आता अशा आत्मनिर्भर अवस्थेत गुणांची (म्हणजे त्रिगुणांची) काळजी करण्याचे काही कारणच उरत नाही. सापाने एकदा का कात टाकली की मग ती कात सतत सांभाळून ठेवण्याची त्याला काहीच आवश्यकता नसते. अगदी त्याचप्रमाणे गुणांना ओलांडून पलीकडे गेलेला गुणातीत गुणांची पर्वा करीत नाही.

**''सांडूनि आंगिची खोळी। सर्पु रिगालिया पाताळी।**
**ते त्वचा कोण सांभाळी ?। तैसे जाले।।''**

तसेच हे सत्त्व, रज, तम हे प्रकृतीचे तीनही गुण आपापल्या सामर्थ्याद्वारा देहाची सोंगे नाचवीत असतात पहा. सूत्रधार आत्माराम मात्र गुणांच्या पडद्यामागे अदृश्यच असतो. गुणातीताचे सारेच्या सारे अवधान-अनुसंधान आत्मवस्तूकडेच असते. गुणप्रभावामुळे जीवाचे जे नर्तन होत असते तिकडे मात्र त्याचे लक्ष एवढेसुद्धा नसते. का ? तर त्याचा अहं लोपलेला असतो.

**''तिन्ही गुण आपुलिया प्रौढी। देह नाचवीति बागडी।**
**तो न पाहे धडी। अहंतेते।।''**

असा हा (ही सुद्धा) शरीरधारी असूनही निरहंकारी असतो. देह असूनही त्याला देहबुद्धी नसते. कारण गुणांपासून तो सर्वथैव अलिप्तच राहतो. ज्ञानराजांनी योगी पुरुषाचे वर्णन करत असताना दिलेला घटाकाशाचा दाखला, गुणातीताच्या वर्णनातही येतो. घट फुटला मग घटात प्रतिबिंबित झालेले घटाकाश हे महदाकाशात सामावते. त्याचप्रमाणे देहाभिमानाचा लोप झाला की निखळ एक आत्मस्वरूपच राहते. देहधारी असूनही मग केवळ

आत्मबोधानेच देहात राहणे होणे. आत्मबोध कायम जागता असतो आणि म्हणूनच त्याला भगवान श्रीकृष्ण गुणातीत म्हणतात.

गुणातीताचं गुणगान श्रीज्ञानराजांनी असे भरभरून केले आहे पहा. अर्जुनाने गुणातीताची लक्षणे विचारताच श्रीज्ञानोबारायांचा श्रीकृष्ण अधिकच उल्हास पावतो आणि

"**परिस आता तयासि। रुप करू।।**" असे म्हणतो. "रुप करणे" हा माऊलीचा अतिशय आवडता शब्दप्रयोग आहे. बघा ना !!! काय सामर्थ्य आहे त्यांच्या शब्दकलेचं ???

रजोगुणामुळे माणूस कार्यप्रवृत्त होतो. कार्य करता करता **कर्तेपणाच्या** अहंकारामुळे तो वेढला जातो, उन्मत्त होतो. सत्त्वगुणाने सर्वेद्रियांवर ज्ञानाचे तेज फाकते. विद्येच्या अभिमानाने मनुष्य खुंट्यासारखा ताठतो. तमोगुणाच्या प्रभावाने मोहवश होतो. अज्ञानाच्या गर्तेत फसत जातो. गुणातीत मात्र या तीनही गुणांच्या कर्तृत्वाकडे तटस्थपणाने पाहतो. एका आत्मतत्त्वाच्या सत्तेनेच या तीन गुणांचा वापर सर्वत्र होत असल्याचे तो जाणतो. सूर्य जसा अलिप्तपणे समस्त लोकव्यवहार पाहतो तसा हा गुणातीत गुणांचा खेळ बघत असतो.

सागराला चंद्रामुळे भरती येते. चंद्रामुळे सोमकांतमणी पाझरतो. याच चंद्रप्रकाशाने कमळे उमलतात; पण चंद्र मात्र आपल्याच जागी निवांत आणि अलिप्त असतो. गुणातीताच्या संदर्भातही सत्त्व-रज-तम आपापला स्वभाव प्रगट करत असतातच पण गुणातीत मात्र या सगळ्यांपासून अत्यंत अलिप्तच असतो. सूर्याच्या घरी जसा अंधार नसतो किंवा दिवाही नसतो तसाच हा गुणातीत. रात्रीला कधी प्रकाश दिसतो का ? सूर्याला कधी अंधार कळतो का ? अंधारंच काय तर त्याला प्रकाश पण कळत नाही. इतका स्वयंप्रकाश !!! आहे की नाही गंमत ???

गुणातीत एका अर्थाने दगडासारखा ??? निश्चल असतो. पण तो चेतनाशून्य/संवेदनाशून्य नसतो तर अत्यंत तरल असतो. गुणातीत अवस्थेतही

तो ज्ञानी भक्ताप्रमाणे भगवंताची अव्यभिचारी भक्ती अखंडत्त्वाने करीतच असतो ही फार महत्त्वाची बाब आहे.

हा परमतत्त्वाची निश्चल एकांतिक भक्ती करतो. विश्वासह विश्वात्म्याचे त्याचे भान (म्हणजे अनुभव) अचल असते. असा हा गुणातीत ज्ञानोत्तर भक्ती करणाऱ्या भक्ताप्रमाणेच परमतत्त्वाच्या ठायी विश्राम पावलेला असतो आणि अशी विश्रामता प्राप्त होऊनही तो भक्तीप्रेमसुखाचा भुकेला असतो. त्याला भगवंताची व भगवंताला अशा भक्ताची भूक असते. हेच भक्तीप्रेमसुखाचे ऐश्वर्य !!!

* * * *



## चिंतन २६६

प्रारब्धकर्माचा क्षय ती भोगल्यानेच होत असतो म्हणून जीवनमुक्तांनाही देह पडेपर्यंत प्रारब्धकर्मे करावी लागतात व त्याचबरोबर भोगावी पण लागतात, असा वेदान्ताचा सिद्धांत आहे आणि त्याचबरोबर अनेक जीवन्मुक्त संतमहात्म्यांच्या चरित्रावरून तर या प्रमेयाला बळकटी येते, अधिकच.

हे उरलेले प्रारब्धकर्म, जनकल्याणासाठी, जन-समाज प्रबोधनासाठी, लोकांच्या मनात परमार्थाचे ज्ञान ठसवण्यासाठीच असते असे सामान्यत: दिसून येते. "**प्रारब्ध शेष उरलें जननिश्चयाला**" श्रीतुकोबाराय पण ग्वाहीपूर्वक सांगतात की, "**तुका म्हणे आतां। उरलो उपकारापुरता।।**"

संतांच्या या कर्मभोगाने जगाची/समाजाची पारमार्थिक उन्नती होत असते.

**"कां फेडित पाप ताप। पोखित तीरींचे पादप।**
**समुद्रा जाय आप। गंगेचे जैसे।।**
**तैसी बांधिली सोडित। बुडाली काढित।**
**सांकडी फेडीत। आर्तांचिया।**

**किंबहुना दिवसराती। पुढिलांचे सुख उन्नति।**
**आणित आणित स्वार्थी। प्रवेशिजें।।"**

वरील सुंदर ओव्यात श्रीज्ञानराजमाऊलींनी वर्णिल्याप्रमाणे देह पडेपर्यंत नराला नारायण करण्याचे व याचप्रकारे, याच मार्गांनी व्यक्तिमात्राला व त्यामुळे समाजाला स्वरुपसुखशांती प्राप्त करून देण्याचे व्रत संत आचरीत असतात. मानवाला आपल्या मूलभूत भगवत्तत्त्वाचे/परमतत्त्वाचे सतत स्मरण देऊन, भगवंतस्वरुप होण्याचा मार्ग दाखविण्याचे महत्कार्य या संतमहात्म्यांच्याकडून सतत, सहजतेने घडत असते. "**सहज बोलणे हित-उपदेश। करोनि सायास शिकवती।।**" आणि साधन मार्ग काय म्हणाल तर एकच "**नामस्मरण**".

म्हणूनच त्यांची ही थोरवी, अनेक थोर-थोर **संतपुरुषांनी** अगदी मुक्तकंठाने व प्रेम, कृतज्ञता व अत्यंत आदर या **भावनांनी** दाटलेल्या अंत:करणाने गायिली आहे. "They are the salt of earth" असं तत्त्वज्ञ म्हणतात. "हे महात्मे म्हणजे जगाला सुपीकता व रस देणारे मीठ होत." ते नसतील तर जगात सद्गुणांचे व शाश्वत सुखरुपतेचे पीक येणार नाही.

अपूर्णातून पूर्णाकडे जाण्याचा मनुष्य सदा प्रयत्न करीत असतो, परंतु बहुतेकांना **एकदेशी** पूर्णतेचेच आकर्षण वाटते. थोड्याचजणांना सर्वांगीण पूर्णतेचे आकर्षण, ओढ असते. थोडेच प्रयत्न करतात, हीच नवजागृती किंवा परमार्थप्रवृत्ती.

परमार्थसाधनेने परमानंदाची प्राप्ती, परमानंदाने जीवनातील अध्यात्मीक, आधिभौतिक व आधिदैविक अशा तापत्रयाचा नाश, सर्वाभूती आत्मभाव व त्यायोगे विश्वात्मकभाव. मग "**सर्वही सुखरुप असावेत**" असा एकच एक जीवनहेतू उरतो. संकुचित स्वार्थाचे स्मरणही रहात नाही.

एक भगवंतच खरा, इतर सर्व आभास असा निश्चय/अनुभव. या अनुभवाने विश्वाचे कोडे सुटते आणि भक्तिप्रेमभाव, निर्भयता, आदर, देव-भक्तांचे ऐक्य आणि ऐक्यातून होणारी "भक्तीप्रेमसुखसेवा" या भावनांबरोबर

जीव आनंदकंदाबरोबर एकरुपता अनुभवतो, भ्रांतिनाश होतो, संशयरहितता येते.

या आत्मानंदरुप स्थितीने भावनांना, भरतीला-प्रेमाला भक्ती-भाव-प्रेमाला पूर्णत्त्व येते. त्याचबरोबर विश्वात्मकभावाने त्यांच्या क्रियाशक्तीच्या व्यापाराला (Will) पण पूर्णता येते.

हीच मानवी जीवनाची सफलता, सार्थकता, कृतार्थता, धन्यता. स्वरुपसुखाची परमोच्च अवस्था. मग **"याचि देही याचि डोळां। भोगिजे मुक्तीचा (आत्मसुखाचा) सोहळा।।"** शेवटचा दिवस गोड होतो. आपण केलेल्या नामसाधनेचे **(नामस्मरणाचे)** असे महान फळ (मधुर + रसाळ + परिपक्व) आलेले पाहून स्वत:चे स्वत:लाच मोठे कौतुक वाटते. मुक्तीशी लग्न लावून, साक्षात्कारी महात्मा, जीवन्मुक्तावस्थेतील आपले उरलेले जीवन भक्तीप्रेमसुखाच्या खेळीमेळीत आनंद लुटत असताना आपल्याला मिळालेला आनंद जगाला वाटत असतो.

**"सेवितो हा रस, वाटीतो आणिका।**
**घ्यारें होऊ नकां रानभरी।।**
**तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू।**
**नका चडफडूं घ्यारें तुम्ही।।"**

"देवाचा प्रसाद घ्या", "आनंद व्हावा" हीच त्यांची तळमळ आणि आनंद होण्याचे साधन एकच ! देवाचे **"नाम"**.

* * * *

# चिंतन २६७

दर्शनाचे तीन प्रकार -

१) स्वप्नात प्रभूचे दर्शन - साधारण दर्शन

२) मंदिरात/मूर्तीत दर्शन - मध्यम दर्शन

३) भगवंताचे अपरोक्ष दर्शन - उत्तम दर्शन

द्रष्टा म्हणजे पाहणारा, भगवंताला पाहताच भगवत्मय होऊन जातो त्याला "**उत्तम दर्शन**", अपरोक्ष साक्षात्कार असे म्हणतात. भगवंत जगात ओतप्रोत भरला आहे असा अनुभव घेता-घेता जो देवात विलीन होऊन जातो तोच भगवंताचे परिपूर्ण स्वरुप जाणू शकतो, ओळखू शकतो. भगवंत सर्वव्यापक आहे.

तो मूर्तीत व मंदिरात आहेच पण तेवढाच तो नाही, दृष्टी जाईल तेथे तेथे भगवंतच आहे. इतकंच काय मन जेथे जेथे जाईल तेथे तेथे पण तोच परमात्मा आहे. हेच भगवंताचे "**उत्तम दर्शन**". जो भगवंत माझ्यात आहे तोच सर्वांमध्ये आहे. अखिल जगत् भगवंतच आहे.

आपण जे जे काही करतो ते देवासाठीच करतो अशी भावना असल्यावर त्या सर्व कर्मांची परिणतता एका भक्तीतच होते. अशा तन्मयभक्तीने जीव कृतार्थ होतो. गोपी भक्तीमार्गाच्या आचार्या, त्यांचा आदर्श मन, डोळे यांच्यासमोर असावा.

सुखाचा साथी जीव आहे. दुःखाचा साथी भगवंत आहे. नेहमी ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. मनुष्य पैसा मिळवण्यासाठी जेवढे प्रयत्न करतो, कष्ट करतो, दुःख सोसतो त्यापेक्षा जरा थोडे जरी प्रयत्न, कष्ट तो एका सच्चिदानंदस्वरुप देवासाठी करील तर त्याला भगवंताची प्राप्ती निश्चितच होईल. नाही का ???

श्रीकृष्ण तर न बोलवताही गोपींच्या घरी जात असे. मग तो आपल्या घरी का बरे येत नाही ??? आपल्या चित्तात का ठसत नाही ??? याचा विचार आपल्या मनात कधी तरी येतो काय ???

श्रीठाकूरजींना लोणी फार प्रिय, लालाला लोणी फार-फार आवडते. उत्तरेत एक वाक्प्रचार आहे, **''लालाको मख्खन भायेरे। कुछ और न काम आये रे।।''** लोणी सर्वांचे सार आहे. भगवंत पण साराचेही सार आहे. आपला भगवान् बाळकृष्ण सारभोगी आहे. वैष्णवही सारभोगी असतात.

भक्ती हे प्रेमाचे शास्त्र आहे. भक्तीप्रेम हा पाचवा पुरुषार्थ आहे. परमप्रेमास्पद चिंतनात भान विसरते ती भक्ती. भगवंत हा प्रेमस्वरुप आहे. भक्तीमार्गात वेगळेपणा राहात नाही. विभक्त नव्हे तो भक्त.

भक्ताला भगवंताचे, शिष्याला श्रीगुरुचे, रोग्याला औषध-पथ्यपाण्याचे ध्यान असते. ध्यानाने भक्तीप्रेमभाव वाढतो, तन्मयता वाढते. भगवंत अशा भक्तीप्रेमाने ऋणी होतो. भक्ती प्रेमभावात हक्काची भावना अंतरात निर्माण करते. ''स्व-सुखसुखित्वाला'' तिलांजली देऊन ''तत्सुखसुखित्वाचे'' संवर्धन ही भक्ती. अशी भक्ती भगवंताने अण्णाला द्यावी हीच त्याच्या चरणी विनम्र प्रार्थना. प्रभू रामचंद्रांनी राज्याभिषेकाच्यावेळी सर्व वानरांना सप्रेमभेट म्हणून पारितोषिके दिली पण हनुमंताला काहीच दिले नाही म्हणून सीतामाईंना वाईट वाटले. त्या रामांना म्हणाल्या, ''मारुतीला पण काही द्या ना !!!'' श्रीराम म्हणाले, ''त्याला मी काय देऊ ??? त्यानेच माझ्यावर किती-किती उपकार करून ठेवले आहेत !''

मारुतराय काय म्हणाले, ''सनमुख होइ न सकत मन मोरा।।'' म्हणाले, ''प्रभू माझं मन काही आपल्या सन्मुख होत नाही हो, तेवढं करा ना''. ''भक्तीप्रेमात'' अपेक्षेचा भाव आला की भक्तीप्रेम संपलेच. भगवंताने ही अपेक्षेची भावना अण्णाचे मनातून तडीपार करावी. अपेक्षा असली तर भक्तीने ती पूर्ण होते पण भगवंत मात्र हातातून निसटून जातो.

शांडिल्य ऋषींनी आपल्या भक्तीसूत्रात म्हटले आहे, **''तत्सुखे सुखित्वं**

**प्रेमलक्षणम् ।।''** अन्याच्या सुखात सुख अनुभवणे हे खऱ्या भक्तीप्रेमाचे लक्षण आहे. दयाघन, कृपाळू भगवंताने हा बोध अण्णाला द्यावा हीच प्रार्थना.

* * * *




महावैष्णव संत म्हणजे साक्षात परमपावित्र्य व भक्तीप्रेम यांचे सगुण-साकार रुपच. मन, इंद्रिय, बुद्धी व शरीर अवघ पवित्र. वाणी पवित्र, सगळं सगळंच परमपवित्र. इतकं पवित्र की **''पवित्राणां पवित्रं यो, मंगलानां च मंगलम् ।।''** अशा देवांच्या देवानं ज्यांच्या चरणधूळीची अपेक्षा करावी ना !!! **''देव इच्छि रज चरणीची माती। धावत चालती मागे मागे ।।''** तरी एक भगवंतच त्यांच्या जीवनाचे लक्ष्य, आदर्श आणि हेतूसुद्धा. त्यांच्या ठिकाणची ''प्रेमभक्ती'' असीम. भगवंताबद्दल आणि आपल्या श्रीगुरुमायमाऊलीसंबंधातही.

महावीर हनुमंतरायाचे श्रीरामप्रभूप्रत, श्रीब्रह्मानंदाचे श्रीब्रह्मचैतन्याप्रत, श्रीराधेचे श्रीकृष्णाठायी असेच प्रेम, अशीच भक्ती. या महात्म्यांची आपल्या श्रीगुरुच्याबाबतीत यांच्या ठायी असणाऱ्या भक्तीप्रेमाची सुयोग्य तुलनाच कशाबरोबर करावी हाच मोठा अवघड प्रश्न. नाही, भक्तीप्रेमाची तुलनाच होऊ शकत नाही, हेच अगदी खरे.

अवघ्या भूतमात्राविषयी तोच प्रेमभाव, तीच प्रेमभक्ती, अवघ्यांना ते भगवंत, श्रीगुरु यांच्याबरोबर अभिन्नपणे पाहतात. **''भूती भगवद्‌भाव। मात्रासहित जीव। अद्वैती तो ठाव। निरंजनी एकला ।।''** सर्वांच्याच विषयीचा त्यांचा स्नेहादर हा जवळजवळ भगवत्/श्रीगुरु पूजेच्या भावासारखाच श्रेष्ठ असतो. त्यांच्या ठायी उच्च-नीच, श्रीमंत-गरीब, पंडित-

अडाणी असला भेदभावच नाही. प्रत्येक जीवाच्या कल्याणाची-परमकल्याणाचीच काळजी ते वाहत असतात. **"जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती। देह कष्टविती परोपकारे।।"**.

खुल्या दिलाने ते आराध्यांचे स्वागत करतात. त्याचबरोबर स्वतःचे सर्वस्व अवघ्यांना मुक्त हस्ताने वाटत असतात. **"सेवितो हा रस वाटितो आणिका।"** प्रत्येकाच्या अंतर्यामी वसत असलेल्या एकाच आत्मदेवाची पूजा करणे व प्रत्येकाला अंतर्यामी असणाऱ्या, वास करणाऱ्या दिव्य आत्मचैतन्याची अभेदबोधाने ओळख/साक्षात्कार करून घेण्यास, मार्गदर्शन-मदत करणे हाच त्यांचा स्वधर्म आणि या कर्तव्यासाठीच ते स्वतःची आहुती देतात. प्रसंगी कित्येकांचा रोष पत्करतात. शिव्याशाप सुद्धा आशिर्वादासारख्या आनंदाने स्विकारतात.

इतरेजनांनी जो कित्ता गिरवावा असे त्यांना वाटते, तोच कित्ता अतिदक्षतेने स्वतःच्या जीवनात प्रत्यक्ष आचरून हे महावैष्णव लोकांपुढे मांडत असतात.

अशा संतांचे वाङ्मय-साहित्य-लेखन-काव्य मनाला परमशांती देणारे असतेच असते. भगवंताचे/श्रीगुरुंचे हे महात्मे दृढ व परमनिष्ठ भक्त असतात. एक श्रीगुरु, एक भगवंत याशिवाय त्यांच्या लेखी दुसरे तिसरे काहीच नसते. एका भक्तीप्रेमभावानेच ते परिपूर्ण झालेले असतात. एका भगवंता-श्रीगुरुशिवाय इतर कसला विचारच त्यांच्या चित्ताला स्पर्श करीत नसतो. त्यामुळे त्यांच्या शब्दकलेचा सखोल परिणाम जीवनावर होतोच होतो. म्हणून मोठ्या लक्षपूर्वक, काळजीने, तत्परतेने त्यांची अक्षरे वाचावीत-अभ्यासावीत. ते रात्रीचाही दिवस करून लिहित असतात आणि आपल्याला ते वाचायला फुरसत होत नाही !!!

जसजसा काळ जाईल तसतसे या संतरचनेचे महत्त्व लोकांना अधिकाधिक जाणवू लागेल. मग त्या ओव्या-अभंग-श्लोक अगर पत्रे असोत,

ही अक्षररचना जरी लहानखोर असली तरी बव्हर्थी. **"जैसी दीपकलिका धाकुटी। परी बहु तेजाते प्रगटी।।"**

ही अक्षरे, या ओळी नुसतेच शब्द नसतात, नुसती अक्षरे नसतात, नुसतेच स्वर-व्यंजने, काना-मात्रा-अनुस्वार-वेलांट्या-विसर्ग-आकार-उकार नसतात. मग **"ही अक्षरे नव्हती देखा"** तर प्रत्यक्ष ब्रह्मसाम्राज्याचे प्रकाशन करणाऱ्या चित्ज्योतीच असतात. शब्दांचा-ओळींचा पोशाख करून प्रत्यक्ष ब्रह्मच आपल्याला आतुरतेने भेटावयास आलेले असते. या अक्षर स्वरुपातून ब्रह्मच आपल्याला अवघ्या अंगानी क्षेमालिंगन द्यावयास आलेले असते. **"पुढां स्नेह पाझरें। माघा चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरें। कृपा आधी।।"**

म्हणूनच ओळींवरून वाचू नये नुसतं, तर ओळीतून वाचावे. ज्या कोणा साधकाजवळ ही अक्षरपत्रे/त्याच्या प्रती असतील त्या सर्वांनाच अक्षर ब्रह्माची अक्षय प्राप्ती होते. म्हणूनच संत आणि त्यांचे साहित्य दोन नव्हेत एकच. वाङ्मयस्वरुपाने हे संत खरोखरच **अभंग**.

* * * *




असंख्य जन्मांचा परिणाम/संस्कार, चुटकीसारखा धुऊन टाकता येत नाही. आपल्याला वाटते, ह्याच क्षणी कृतार्थ व्हावे, पण असं होत नाही. **"अनेक जन्म संसिद्धिं"** असं भगवान श्रीकृष्ण सांगतात. दम धरता आला पाहिजे, तो टिकला पाहिजे. धीर धरी, धीर धरी, तो गिरिधारी जागृत आहे ना ???!!! मग झाले तर.

साफल्याचा सर्वोत्तम उपाय हाच की, भगवान श्रीकृष्णांनी-रामकृष्णांनी श्रीगुरुकृपेने, आपल्याला ज्या कोणत्या परिस्थितीत ठेवले आहे तिच्यातच

सुखी नव्हे तर सुखरुप राहून सर्वदा आपले मन त्यांच्याकडे वळवून ठेवावे. **"तूं मन हे मीची करी। माझ्या भजनी चाड धरी। सर्वत्र नमस्कारी। मज एकातें।। माझेनि अनुसंधाने देख। संकल्पु जाळणे नि:शेख।"** लहान मूल जसे आपल्या आईबापांकडेच साहाय्यासाठी पाहत असते तशीच आपली वृत्ती सतत भगवंताकडे असावी.

भगवंतांनी स्वेच्छेने आपल्याला जिथे ठेवले आहे, जसे ठेवले आहे तिथेच आणि तसेच शांतपणे राहावे आणि न राहून काय करतो ? नाही का ? रहावेच लागते. पण वर्म श्रीतुकोबाराय सांगतात, **"ठेविले अनंते तैसेचि राहावे। चित्ती असो द्यावे समाधान"** आपलं **नामस्मरण** यथार्थ आहे याची मोठी खूण आहे कदापि समाधान भंग न पावणं.

श्रीरामकृष्ण म्हणत असत, "रोपटे लहान असताना त्याच्याभोवती कुंपण उभारून त्याची विशेष काळजी घ्यावी, नाहीतर शेळ्या-बकऱ्या ते चरून फस्त करून टाकतील. पण तेच रोपटे वाढून जेव्हा त्याचा वृक्ष होतो तेव्हा त्याच्या विस्तारलेल्या फांद्यांखाली शेकडो शेळ्या-बकऱ्या आश्रय घेऊ शकतात."

म्हणून नामस्मरणाने थोडी श्रद्धा, वैराग्य, भक्तीप्रेमभाव याचा आपल्या मनात जो अंकुर फुटतो, तेव्हा त्याची जपणूक करावी. वारा घालून, तुपाची धार धरून जसा आपण यज्ञकुंडातील अग्नी प्रदीप्त करीत असतो तशीच आपल्या भक्तीच्या भावभक्तीची ज्योत तेवत ठेवावी. जास्तीत जास्त उजळत ठेवावी. संसारी आसक्त अशा सर्वजणांपासून, संसारातच साक्षीत्वाने विलग राहून, विशेष काळजीपूर्वक, मोठ्या दक्षतेने आपल्यातील **भक्तीप्रेमभावाची** जोपासना करावी. मग एकदा का या **भावाची** मुळे अंतरी पक्की रुजली की मग त्यांना कुणी हलवू शकत नाही, उपटू शकत नाही.

जनावराला जोपर्यंत खायला अन्न व रहायला जागा मिळते तोवर ते आपल्या परिस्थितीत बदल घडवून आणण्याची कधीच इच्छा करीत नाही पण माणसाचे तसे नाही, तो आज श्रीखंड खात असेल तर उद्या आपल्याला

अंगूरमलई कशी मिळेल याचा प्रयत्न करतोच करतो, खरोखर माणूस असेल तर हं !!! उच्च, उन्नत, विकसित स्थितीसाठी अविरत तळमळ व प्रयत्न हीच खऱ्या माणसाची खूण आहे. म्हणूनच परमार्थ केला तर तो आपल्या स्वत:तल्याच नारायण स्वरुपाशी एकरुप होतो. **''नर करणी करे तो नरका नारायण बन जाता है।''**

आपल्याला नारायणस्वरुप व्हायचे आहे ना ??? मग प्रथम लक्ष्य, उपाय एकच **''सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।''**, **''सुवर्ण मणि सोनया। ये कल्लोळ जैसा पाणिया। तैसा मज धनंजया। शरण ये तूं।।''** या ओवीचे सातत्याने पालन करावे, सर्वस्वानिशी, सर्वभावांनी, सर्वांगांनी श्रीगुरुला-श्रीकृष्णाला शरण जावे. आपण एवढेच करावे. बाकी सर्व काळजी, चिंता मग **तोच** करत असतो.

भगवंतच/श्रीगुरुच आपला सांभाळ करीत आहे असाच दृढभाव आपल्या हृदयी सतत जागता असावा. सदासर्वकाळ त्याच्याच आश्रयानी राहावे, शांत राहावे, स्वस्थ राहावे. अशांतपणा हाच मोठा रोग आहे. धर्म-स्वधर्म म्हणजे काय तर एका श्रीगुरुला/भगवंताला शरणागती आणि त्या शरणागतीतून अनुभवाला येणारे अखंड समाधान. **''श्रीगुरुला शरण जावे व निजनिष्ठे नाम गावे''**.

* * * *




ज्ञानेश्वरीत गुरुभक्ती, देवभक्ती आणि भक्तभक्ती अशा तीन मुख्य प्रकारांनी समस्त योगरुप असलेला ''भक्तीयोग'' सांगितला आहे. पुराणादिकांमधून तसेच आगम ग्रंथांतून ''भक्ती''चे अनेक प्रकार सांगितले आहेत. संसारात क्रियाप्राधान्यता असते, अति महत्त्वाची असते. एखादा पाहुणा

आपल्या घरी आला असता, मनातून त्याच्यासंबंधी प्रेम नसले तरी योग्य प्रकारे, अनेक उपचारे त्याचे जर आदरातिथ्य केले की तो संतुष्ट होतो, प्रसन्न होतो.

पण परमात्मा/श्रीगुरु मात्र केवळ बाह्य उपचारांनी किंवा क्रियेने संतुष्ट होत नाही. तो आत्मकाम आहे. तो परिपूर्ण आनंदस्वरुप आहे. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले,

**''अर्जुना माझ्या ठायीं। आपणपेवीण सौरसु नाही।**
**मी उपचारें कवणाहि। नाकळे गा।।**
**येर पत्र पुष्प फळ। हे भजावया मिस केवळ।**
**वांचूनि आमचा लाग निष्फळ। भक्तीतत्त्व।।''**

अर्जुना, माझे ठिकाणी भक्तांनी केलेल्या आत्मसमर्पणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपचारात मला अजिबात स्वारस्य वाटत नाही; कारण मी कोणत्याही बाह्य उपचारांनी वश होत नाही. मुख्य भक्तीप्रेमाशिवाय इतर जे पत्र, पुष्प, फल-जल इत्यादी सर्व अवांतर पदार्थ माझी भक्ती प्रकट करण्याची केवळ माध्यमे/निमित्तेच आहेत. माझा संबंध मात्र, अर्जुना, उपचारांशी नसून केवळ शुद्ध **प्रेमलक्षणभक्ती** तत्त्वाशीच आहे. उपचार किंवा क्रिया भक्तीत नको किंवा नसते असे नाही, पण त्याच्या मुळाशी, बुडाशी जे प्रेम, जो भाव असतो त्यास आणि त्यासच महत्त्व आहे. तसेच ते **''प्रेमही''** सामान्य स्वरुपाचे असून भागत नाही तर ते **''परमप्रेम''** असावयास पाहिजे.

म्हणूनच श्रीनारदमुनी भक्तीचे लक्षण सांगतात, **''सा त्त्वस्मिन परम प्रेम रुपा''**. सा-ती भक्ती 'अस्मिन' या प्रत्यक्ष, नित्य, अपरोक्ष **आनंदस्वरुपाचे** ठिकाणी ''परमप्रेमरुपा'' म्हणजे परमप्रेम असणे हेच या भक्तीचे अंतरंग स्वरुप आहे. शास्त्रांमध्ये एखाद्या महत्त्वाच्या साधनांची दोन प्रकारची लक्षणे सांगितलेली असतात. एक बहिरंग लक्षण असते व दुसरे अंतरंग लक्षण असते. जी क्रियात्मक लक्षणे सांगितली असतात, ती लक्षणे नाहीत असे नाही पण नुसती क्रियात्मक लक्षणे बहिरंग असतात. अंतरंग लक्षणांमुळे या बहिरंग लक्षणांना महत्त्व येते. जसे सुवर्णरत्नखचित **अलंकार** चिंधीत बांधला

असल्यामुळे अलंकार असेपर्यंत त्या चिंधीला मूल्य, अलंकारच नसला तर नुसत्या चिंधीला कोण विचारतो ??? तसेच जर मुळात "**प्रेमभाव**" असेल तरच मग श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन या क्रियांना भक्तीमध्ये बहिरंग का असेना स्थान मिळेल आणि हा प्रेमभाव जर नसेल तर सर्व व्यर्थ !!! भगवान् श्रीकृष्ण म्हणाले अर्जुना, "**एक भाव नाही माझा। तरी पाल्हाळ ते।।**".

गणितात "शून्याला" मूल्य प्राप्त होते, पण केव्हा ? जर त्याच्या मागे "एक" किंवा एखादा अंक असेल तर (१ ते ९ कुठलाही). श्रीतुकोबाराय म्हणाले, "एके दाखविले दहा। पहा फाटा पुसोनि।।" मागे अंक नसेल तर मात्र ते शून्य व्यर्थ होते. नाही का ??? त्याचप्रमाणे भक्तीच्या कोणत्याही क्रियेमध्ये "**प्रेम**" हे मागच्या अंकासारखे आहे.

"प्रेम" ही एक अत्यंत महनीय, परमपवित्र अशी अंत:करणाची "वृत्ती" आहे. या प्रेमवृत्तीला कोणीतरी आलंबन असावे लागते. म्हणजेच कोणास तरी आलंबन/विषय करूनच "प्रेमभाव" होऊ शकतो. भक्तीसूत्रातील "अस्मिन्" हे पद आलंबन दाखवणारे आहे. "तस्मिन्" असे न म्हणता "**अस्मिन**" असे म्हटले आहे.

जो आपणाहून दूर, परोक्ष, परका असतो, वेगळा असतो त्यासच "तो", "त्याच्या ठिकाणी" असे म्हणतात. पण जो आपल्या नित्य, सदासन्मुख, प्रत्यक्ष, अपरोक्ष, नव्हे नव्हे आपल्याहून **वेगळाच** नसतो त्याच्याच ठिकाणी "**अस्मिन्**" असा शब्दप्रयोग केला जातो.

फक्त आनंदघन परब्रह्मपरमात्मा/श्रीगुरुच असा आहे. भगवंत/श्रीगुरु जर वेगळा, परका मानला तर तो परमप्रेमाचा–प्रेमभावाचा–परमप्रेमलक्षणाभक्तीचा विषयच होणार नाही. "**तेथ प्रियाची परमसीमा। तो भेटे माऊली आत्मा।**" असंच ज्ञानोबाराय म्हणतात. "प्रेमभावाचिया भावा", "जिवीचा जिवलग", "जिवीचा जिव्हाळा" असा श्रीपांडुरंग विटेवर उभा आहे. "आषाढी भाग्याची" **हे भाग्य वाट्यास येणे** हेच केवढे महद्‌भाग्य ???

* * * *

# चिंतन २७१

कबीर म्हणतात, **"मेरा मुझमें कुछ नहि"**. सर्व गोष्टी भगवंताच्या इच्छेप्रमाणे घडत असतात. तेव्हा त्या देवासच का अर्पण करू नयेत ? आपल्याला प्राप्त झालेले स्थान किंवा पदवी अगर पद, आपण चालवतो असा भ्रम असलेली सत्ता, संग्रह केलेली संपत्ती या सर्वच्या सर्व गोष्टी त्या एका देवाच्या सदिच्छेने, कृपेने, सत्तेनेच प्राप्त होतात. तेव्हा हे पद, पदवी, सत्ता व संपत्ती ज्याने दिली ती त्याची त्यालाच का परत देऊ नये ? त्यांचा त्याच्या सेवेकडेच का उपयोग करू नये ?

हे जसे तसेच आमच्या सर्व वृत्ती, भावना याही ईश्वरचरणी अर्पण कराव्यात, श्रीगुरुचरणी लावाव्यात. आपल्या मनातून काढून टाकाव्यात व त्यांच्या ठिकाणी भगवंताचे साम्राज्य स्थापावे, नाही का ???

हे सगळं केव्हा घडतं ? तर अहंकार समूळ नाहीसा झाल्यावर मग. पण तो काही केल्या जात नाही. घालवावा म्हणता म्हणता तो उलट जास्तच बोकांडी बसतो. **"मी"** जात नाही, तो जाणारपण नाही, जोवर तो कृष्णस्वरुप होत नाही. आम्ही परमार्थ करतो तोच मुळी आमच्या "मी"ला धक्का लागणार नाही याची काळजी घेऊन. कळत-नकळत आम्ही आमच्या "मी"ला आंजारत-गोंजारत असतो, कुरवाळत असतो.

परोपकार हे साधूचे अत्यंत ठळक असे महत्त्वाचे लक्षण आहे. **"जळ न खाती जळा। वृक्ष आपुलिया फळा। भोक्ता तो निराळा। जेणें गोडी निवडिली।।"** विश्वाच्या कल्याणासाठी संपत्ती साठवावी. झाडे आपली फळे खात नाहीत वा सरोवर आपले पाणी आपणच पीत नाही. आपली संग्रह केलेली संपत्तीसाधने आपल्या स्वत:च्याच कल्याणासाठी (ऐहिक कल्याणासाठी) राखून न ठेवता अवघ्यांच्या कल्याणासाठी ती वापरावी हेच संतांचे, वैष्णवांचे श्रेष्ठ कर्तव्य आहे.

पण संपत्ती म्हणजे केवळ ऐहिक धन नव्हे. पारमार्थिक धन असाही संपत्ती या शब्दाचा अर्थ होतो. **''सम्पद्याविर्भाव, स्वेन शब्दात्''** या सूत्रामध्ये श्रीबादरायण ऋषींनी ''संपत्ती'' या शब्दाचा अर्थ पारमार्थिक संपत्ती असा केला आहे.

साधूचे दुसरे श्रेष्ठ लक्षण म्हणजे त्याच्या ठिकाणी असणारी प्रांजळ नम्रता. मोठे महात्मे आपली बढाई कधीच सांगत नाहीत. मौल्यवान हिरा कधीतरी आपण होऊन ''माझी किंमत लाखो रुपये आहे'' असे सांगतो काय ? आपल्या अंगी असलेल्या मोठेपणाची जाणीव नसणे हेच विभूतिमत्त्वाचे मुख्य लक्षण आहे आणि इथे तर नसलेल्या मोठेपणाचीच बढाई ! आम्ही एक हातभर लाकूड असताना काय ? तर मुळात काहीच नसताना नऊ हात ढलपी काढणार !!! भगवंत आम्हाला काय म्हणेल ???

काजव्याच्या पृष्ठभागी असलेल्या तेजाची त्यास जाणीव नसते व त्या प्रकाशाचा त्याचा त्यास काही उपयोग पण होत नाही. ''तो दुसऱ्याच्या उपयोगी पडतो'' ही उच्च प्रकारची नम्रता व आपल्या स्वतःच्या ??? सामर्थ्याची नेणीव. ही खरी साक्षात्कारी पुरुषाची मुख्य लक्षणे. त्याच्या कृपेने अंगी कधी वास करणार ? त्यालाच ठाऊक. आमची गत माकडासारखी. ते म्हणतच असतं ना ? ''माझीच लाल''. अहंकार सोडायचा नाही आणि उदारपणाची जाहिरात करावयाची कुठलं आलंय साधुत्व, सगळा दंभ.

जो ''जाणतो म्हणतो'', ''मी केलं म्हणतो', त्यास ज्ञान नाही व जो ''जाणत नाही म्हणतो'', ''मी''च नाही तर ''मी केलं'' असं म्हणत नाही तोच खरा-खरा आत्मज्ञानी पुरुष. आमचं कर्तेपण अजून आमची मानगूट सोडावयास राजी नाही. मग कसलं कपाळाचं ज्ञान ! ज्ञान नव्हेच नव्हे तर ज्ञान नावाचं अज्ञानच.

पूर्णतेस पोहोचलेला वैष्णव देवाशी एकरुप झाल्याने अहंकारगलित होतो. शांत राहतो. अत्यंत स्तब्ध व मुका राहतो. **''स्तब्धो भवति, मत्तो भवति, आत्मारामो भवति ।।''** भक्तीसूत्रात नारदांनी हेच तत्त्व प्रतिपादले आहे. कुठे

भक्ती आणि कुठे व्यापारकुशलता ? आमच्या मुखी सदैव व्यापाराच्या-देण्याघेण्याच्या गोष्टी.

हे सगळे अवगुण पण प्रभू दयाघन, त्याला एवढीच प्रार्थना करावयाची, सतत करावयाची, “**प्रभूजी अवगुण चित न धरो।।**”

* * * *




माणसाला जर “अध्यात्म” यथार्थ कळले, हे जग काय ? हा जीव कोण ? जगाचा-जीवाचा संबंध काय ? ब्रह्म काय ? आणि या ब्रह्माचा वरील सर्वांशी (म्हणजे जीव आणि जगाशी) काय प्रकारचा संबंध ? एवढ्या गोष्टी मूलभूतदृष्ट्या समजल्या तर आपण कोण ? आपले स्थान काय ? या सर्वांची निश्चित जाणीव होईल.

बाह्य-दृश्य जगाचा, आपल्या स्थूल-सूक्ष्म-कारण देहाचा तादात्म्यभाव सुटल्याशिवाय “**सुखरुपता**” नाही, हेच खरे. आकाशांतील गंधर्व-नगरीच्या विस्ताराप्रमाणे, डोक्यात विचारांचे (आत्मविचार सोडून हं) वादळ सुटलेले असते तोवर आत्मारामाचा शांत अनुभव येणार नाही हे त्रिवार सत्यच.

सूर्यप्रकाशाच्या ठिकाणी कोळशाची पूड पडलेली पाहून त्या कोळशाच्या काळेपणामुळे सूर्यावर कृष्णवर्णीचा आरोप करता येईल का ? तर मुळीच नाही.

गाढ झोपेत “मी”चे भान नसते, पण म्हणून तेथे काहीच नाही असे होत नाही. त्या ठिकाणी न कळत पण आहेपणाचे भान हे असतेच असते आणि म्हणून तर झोपेतून उठल्यानंतर झोपेचा आनंद जाणवत असतो.

वाहत्या पाण्याला भूमीचा गुण-रंग हा लाभतोच. स्वच्छ पाण्यात काचेचा भास होणारच. त्याचप्रमाणे गाढ अज्ञानाचे मुळाशी, न कळत का होईना

जीवेश्वराचे अस्तित्व असतेच. या जीवेश्वराच्या अस्तित्वामुळेच या बाह्य वस्तु असतात, डोळ्यांना त्या दिसतात आणि मनाला भासतात. कार्य कारणांची ही मोठी विलोभनीय वर्तुळ परंपरा जगाच्या उत्पत्तीपासून अखेरपर्यंत अशीच चालत राहणारच. ही वर्तुळ परंपरा वेदांताच्या–संतवाङ्मयाच्या अभ्यासाने समजून घेतली म्हणजे मग **"रम्य समाधान"** लाभते बरं !!!

एखाद्या व्यसनाधीन माणसाला ते व्यसन आपल्या नादी लावून जसे नाचवते, त्याप्रमाणे ही सगळी शरीररुपी यंत्रे आत खेळत असलेल्या एका शक्तीने अव्याहत कार्यपर असतात. यंत्रातून खेळणारी विद्युत शक्ती ज्याप्रमाणे साऱ्या यंत्रांना चालविते त्याप्रमाणेच.

अशा साऱ्या जगाला आपल्या नादी लावून, आपल्या म्हणण्याप्रमाणेच नाचवीत असते. या आशेला जगाला भुलविण्याचे सामर्थ्य जर कशामुळे प्राप्त झाले असेल तर ते या दृष्याच्या लालीमुळेच. आपल्या सर्व धमन्यातून जसे रक्त वाहते त्याप्रमाणेच सर्व प्राणीमात्राच्या कार्यातून सुखाची आशा अव्याहत प्रवाहरुपाने वाहत असते. जीवाला बांधून आपल्यामागे पळावयास लावणारी अशी ही आशेची विचित्र मोहक शृंखला सर्व जीवांच्या पायांतून जखडून गेल्यामुळेच हे सर्व जग सुखाकडे (?) दृष्टी ठेवून त्याच्या प्राप्तीकरता सारखे आशेच्या मागे धावत सुटले आहे.

हे विश्व ही एक मोठी प्रयोगशाळा आहे. यात असलेल्या सर्व पदार्थांच्या सहाय्याने यातील सर्व माणसे जर कशाचा सारखा शोध करत असतील तर तो या सुखाचाच. या सुखाच्या भावनेचा उगम जरी मन–बुद्धी–इंद्रियांच्या बाह्य पदार्थांशी संयोग होऊन (अंत:करणात) होत असला तरी आत्मविचाराच्यादृष्टीने पाहू गेले असता या संबंधापेक्षा/हून कुठेतरी वेगळीकडेच या सुखाचा खरा ठेवा आहे आणि या सुखाच्या मूळ उगम स्थानाचा (म्हणजेच अत्यंत सुखरुप अशा भगवंताचा) शोध लागला म्हणजे मगच जीवाला निरंकुश, नितांत तृप्तिकर, निरतिशय, निरुपाधिक, नित्य, निर्व्याज, निर्मळ सुखरुपतेचा लाभ होतो.

खारे पाणी जसे तहानलेल्या माणसाची तृप्ती करीत नाही तसेच दृष्याचे सत्यत्व कोणालाही तृप्तिकारक ठरत नाही. **"यद् अल्पं, तंमर्त्यम्।"** जे जे अल्प-मर्यादित-परिच्छिन्न तेच मर्त्य म्हणजे नष्ट होणारे असते. अल्प वस्तु पूर्ण होत नाही तसेच अल्पवस्तूत पूर्ण वस्तूचा समाविष्टही अशक्यच. जे जे अल्प ते ते कार्य, म्हणून कार्य हे कारण होऊ शकत नाही, म्हणून एक भगवंतच पूर्ण.

* * * *




**"साक्षात्कार"** हा शब्द परमार्थसाधना करणाऱ्या साधकालाच काय पण प्रपंचात नखशिखांत गढून गेलेल्या पामरालासुद्धा चांगला परिचयाचा आहे. पण साक्षात्कार म्हणजे नेमके काय ? याचा अर्थ चांगल्या-चांगल्या विद्वानांना पण भलताच अभिप्रेत असतो.

साक्षात्कार या शब्दाचा साधा आणि सोपा पण अध्यात्मशास्त्राला अभिप्रेत असणारा अर्थ म्हणजे "अनुभव". देवाचा साक्षात्कार होणे म्हणजे देवाचा "प्रत्यक्ष अनुभव येणे की ज्या अनुभवात अनुभव, अनुभाव्य व अनुभाविता ही त्रिपुटीच उरत नाही."

देवाचा प्रत्यक्ष अनुभव म्हणजे आपल्या मूलभूत दिव्य अशा "सच्चिदानंद" स्वरुपाची प्रचिती.

जीवाला आपल्या दिव्य स्वरूपाचा विसर पडल्यामुळे तो आपल्या आनंदस्वरूपाला अगदी विसरला व परिणामी स्वतःला "जीव" या संकुचित स्वरूपात अडकवून घेऊन पडला. आपले मूळ दिव्य आनंदस्वरूप अत्यंत विलक्षण आहे. अजर, अमर, अखंड, नित्य, शाश्वत, स्वयंभू, आनंदघन, ज्ञानघन, निर्गुण आणि निराकार आहे.

जीवाला (विसरामुळे) या दिव्य स्वरूपाचा पत्ताच नसतो. मायेच्या विलक्षण प्रभावामुळे त्याला या आपल्या स्वरूपाचा/आनंदाचा विसर पडतो व परिणामी तो स्वत:ला जन्मणारा, मरणारा, कर्तृत्ववान, भोक्ता, अशाश्वत, अनित्य, एकदेशी व स्थूल शरिराएवढाच लहान समजू लागतो. ही "माया" व मायेचा परिणाम म्हणजे "स्वरूपाचा विसर" या दोन्ही गोष्टी मोठ्याच विलक्षण आहेत. अध्यात्मातलं सुद्धा ते एक Top Secret आहे.

विसरांत दोन प्रकार. एक प्रपंचातला सामान्य विसर की "असा विसर झाला खरा!!!''' याचे भान होते आणि जीवाला आपल्या दिव्य स्वरूपाचा जो विसर पडतो तो मोठा "विलक्षण विसर". "असा काही विसर आपल्याला पडलेला आहे" याची जीवाला साधी जाणीवदेखील नसते मग आठव कुठला ???

संसारात गुरफटलेल्या जीवाला या विलक्षण विसराचा पत्ताच नसतो, पण परमार्थ करणाऱ्याला मात्र या विलक्षण विसराचे फक्त "**शब्दज्ञानच**" असते.

विलक्षण अशा विसरात गढून गेलेल्या जीवाला श्रीगुरु दिव्यबोध व "**दिव्यनाम**" देऊन जागे करतात व त्याला आपल्या दिव्य आनंदस्वरूपाची प्राप्ती करून देतात. थोडक्यात, श्रीगुरुकृपेने जीवाच्या ठिकाणी असणाऱ्या विलक्षण विसराचे विसर्जन होऊन त्याला आनंदस्वरूपाची अनुभूती येते. ही आपल्या स्वयंभू मूलभूत आनंदस्वरूपाची अनुभूती म्हणजे साक्षात्कार.

या अनुभवाचेच वर्णन श्रीतुकोबाराय करतात, "**देव पहावया गेलो। तेथे देवचि होवूनी ठेलो।।**" किंवा "**आपुले मरण पाहिले म्या डोळां। तो जाहला सोहळा अनुपम्य।।**" आपण आपल्या हाताने आपल्याच ठिकाणी नाहीसे होतो व आपल्यातला देव प्रगटतो असा "**अमृतानुभव**" म्हणजे साक्षात्कार.

कैरीपण संपते आणि तिचे रुपांतर रसाळ आंब्यात होते, कळी संपते आणि तिचेच रुपांतर सुंदरशा फुलात होते. तसा नामधारक जीवरुपाने मरतो

आणि देवरुपाने उरतो. नामस्मरणाने बहिर्मनाकडून सरकत सरकत या दिव्यआनंदस्वरूपाला येणे म्हणजे साक्षात्कार. गुरुदेव म्हणत, "Body Consciousness to Divine Consciousness."

* * * *




भगवंताचा साक्षात्कार नित्यनवा आहे. First hand आहे, second hand नव्हे. सर्वसामान्यत: सेकंड हँड देवच लोकांना माहीत आहे, असतो. दुसऱ्यांच्या अनुभवावरून आपण देवाची कल्पना करत असतो. ''उपनिषदांत असे सांगितले आहे'', ''गीतेत तसे सांगितले आहे'' हेच सर्वसामान्यपणे बोलतात, बोलले जाते. अर्जुनाने विश्वरुपाचे वर्णन केले. आपण अनुभवलेल्या विश्वरुपाचे त्याने वर्णन केले. त्याला आलेला अनुभव हा सर्वतोपरी first hand, नित्यनवा होता. यशोदेला आलेला विश्वरुपाचा अनुभवपण नित्यनवाच होता. आपला देवाचा नित्यनवा अनुभव सर्व संतांनी लिहून ठेवला. त्यांचे नुसते लिखाण वाचल्याने, त्यांच्या केवळ शब्दार्थाने आपल्याला जो आनंद होतो तो जर अमर्याद, अलौकिक, अगदी आगळा वेगळा असतो तर प्रत्यक्ष भगवंताचा अनुभव किती श्रेष्ठ ? नाही का ?

देवच देवाला पाहू शकतो. आत्मारामालाच आत्मारामाचे दर्शन होते. जनक राजाच्या दरबारात पंडितांची चर्चा चालू होती. त्या चर्चेत याज्ञवल्क्यांनी तेथे जमलेल्या सर्वच्या सर्व पंडितांना हरवले. शेवटी जनक राजाशी त्यांचा वाद सुरू झाला, ''कुंभाराने केलेल्या मडक्याला कुंभाराचे ज्ञान होते का ?'' असा प्रश्न जनकांनी विचारला. प्रश्न अति महत्त्वाचा आहे. जो परमार्थप्रेमी आहे, परमार्थ पाहण्याची ज्यांना तीव्र तळमळ आहे त्यांच्यापुढे हा प्रश्न आलाच पाहिजे. ''होय, कुंभाराला जाणण्याची शक्ती घटाला आहे. (कुंभार

म्हणजे परमात्मा, घट म्हणजे जीव) या आपल्या देहांतच असणाऱ्या आत्म्यालाच परमात्मा जाणण्याची शक्ती, युक्ती, बुद्धी आहे. ‘‘ती किमया आत्मस्वरूपाशिवाय इतर कोणालाच नाही’’ असे याज्ञवल्क्यांनी जनकराजास मोठे छान, खरे खरे अचूक उत्तर दिले.

आत्मारामाच्या या क्रियेला dishotomy हा शब्द तत्त्ववेत्यांनी वापरला आहे. (म्हणजे एकाचे दोन होणे). एकाचे असे दोन होण्याचे सामर्थ्य फक्त आत्मारामातच आहे. आता एकाचे दोन होतात म्हणजे, ‘‘आत्मा निम्मा निम्मा झाला’’ असे वाटण्याचीच शक्यता जास्त नाही का ? पण ते तसे नव्हे. म्हणजे पाहणारा व दिसणारा दोघे एकच एक असतात. म्हणूनच स्वप्नांतूनपण अद्वैताचा अनुभव येतो. एकाचे दोन होणे म्हणजे आरशात आपण आपल्याला पाहिल्यासारखे नव्हे. आरशातील प्रतिबिंब विकृत असते (उजव्याचे डावे तर डाव्याचे उजवे). जशाचे तसे दिसण्याचे सामर्थ्य फक्त एका आत्मारामातच आहे. हे स्व-स्वरुपाचे ज्ञान कुणाला होते ? आत्म्याचा अनुभव केवळ आत्मारामालाच.

हा आत्मसाक्षात्कार मग कोणाला ? देहाला की आत्मदेवाला ? ‘‘मी देव पाहिला’’ आपण सहज बोलून जातो, त्यांनी देव पाहिला असेही आपण सहज बोलून जातो.

हा देह जड आहे. तर आत्मा अत्यंत सूक्ष्म आहे. किती सूक्ष्म आहे ? बरं शब्दांनी सांगायचे झाले तर एका खसखशीच्या दाण्याचे १००० भाग करावेत व त्यातील १/१००० भागाची विभागणी पुन: १००० भागात करावी (त्याला रेणू म्हणतात). आत्मा त्यापेक्षाही सूक्ष्मातिसूक्ष्म आहे. अशा सूक्ष्मतम आत्मारामाचे ज्ञान या जड देहाला कसे होणार ? जडाला सूक्ष्माचे ज्ञान होणे कधीच शक्य नाही. जडाने जडाला जड माध्यमांतूनच जडाचेच ज्ञान होते. सूक्ष्म कळणार नाही.

पण या जड देहात एक चैतन्य आहे. एक शक्ती आहे, एक आनंद आहे. त्याला मग तुम्ही काहीही नाव द्या. याला आत्मा असं शास्त्रकार

म्हणतात. सारांश काय तर जड इंद्रियांना देव कळत नाही. मग मनाला कळतो का ? तर मनाचा डोळा पण देव पाहू शकत नाही. मन पण जडच आहे; तर आत्मचक्षूच आत्मारामाला, देवाला जाणू शकतात, पाहू शकतात.

बुद्धीला देवाचं ज्ञान होऊ शकतं का ? बुद्धिला गुरुदेव 'lower intellect' खालच्या पातळीची बुद्धि असं म्हणत असत. या बुद्धीला फक्त देवाचे अस्तित्व कळते. तेवढाच या बुद्धीचा उपयोग. म्हणून आपल्या बुद्धीने देवाच्या महामंदिराच्या दरवाजापर्यंत जाता येते म्हणून मनाने बुद्धीने कळणार नाही. वाचेने सांगता येणार नाही.

मग इंद्रियांना दिसत नाही. बुद्धीला कळत नाही, मनाला कल्पना/ आकलन करता येत नाही असा हा देव आहे तरी कशावरून ? देव हे काय गौडबंगाल, किमया, जादू आहे ? तर देवाचा साक्षात्कार हे 'intutive apprehension आहे. ते प्रातिभ दर्शन आहे. इंद्रियजन्य, बुद्धिगम्य अगर मानसिक नाही तर प्रज्ञा दर्शन आहे. याला लागणारी प्रज्ञा म्हणजे प्रातिभ शक्ती. त्याला आत्मदृष्टी, आत्मशक्ती असे पण म्हणतात. गुरुदेव त्यालाच intuition असं म्हणतात.

* * * *




परमआनंद, परमसमाधान, पंढरीनाथ समोर उभा आहे. श्रीगुरुज्ञानेश्वर महाराज समोर बसलेले आहेत. त्यांच्या नेत्रकमलांतून कृपामृताचा वर्षाव होत आहे. परमभाग्य अनुभवास येणारा मंगल प्रभातक्षण आहे. चौरंगावर ज्ञानेश्वरमहाराजांची भावार्थदिपीका भरजरी वस्त्रावर पुढ्यात आहे. आनंद सोहळा चालला आहे प्रवचन सेवेचा.

ग्रंथकर्त्यांना आपल्या ग्रंथसंपदेइतके अन्य काहीच प्रिय नसते. ज्ञानोबाराय

तर म्हणतात, श्रीगुरुनिवृत्तीनाथांनी ग्रंथरुपाने समाधिधनच माझ्या पदरात घातले. ग्रंथामध्ये ग्रंथकर्त्याचे सर्व आचार-विचार प्रत्यक्ष अनुभव इत्यादी धन साठवलेले असते.

ग्रंथरुपाने प्रत्यक्ष ज्ञानेश्वरमहाराजच. श्रीगुरुज्ञानराज आणि **ज्ञानेश्वरी** दोन नव्हेत, एकमेकांपासून वेगळे नाहीत. अगदी एकस्वरूपच. ज्ञानेश्वरीतील अक्षरं नी अक्षरं म्हणजे ज्ञानेश्वरमाऊलीच. अशी आपली **ज्ञानेश्वरी**, आमची **ज्ञानेश्वरी**.

संत प्रत्यक्ष देहाने असतात तेव्हा आपल्याला त्यांचे विचार जेवढे कळू शकत नाहीत तेवढे त्यांच्या ग्रंथाच्या माध्यमांतून आपल्याला कळतात. असे हे संतसाहित्याचे महाधन आपल्या हातात आहे म्हणून आपण परमभाग्यवान.

ज्ञानदेवांना पण परमानंद होत असतो. त्यांनी **''आनंदाचे आवर''** साऱ्या जगाला घातले. गीतार्थाने विश्व भरून टाकले. ज्ञानेश्वरी ग्रंथाची **पारायणे** होतात. या ग्रंथावर प्रवचने, चर्चा, परिसंवाद, व्याख्याने, भाष्य, निबंध, लेखमाला, विवरणात्मक पुस्तके होतात.

असा हा ग्रंथ. जनसामान्यांच्याही मनात, अंत:करणात थोडा-फार रुजला आहे. रुजतो आहे. गोडी वाढत आहे. अभ्यासकांना यातील प्रमेयांची ओढ आहे तर पारमार्थिक प्रामाणिकपणे या ग्रंथातील जीवनमूल्ये जगत आहेत.

असा हा दिव्य जीवनाचा परिपाठ सांगणारा ग्रंथ. अवघ्या विश्वाला अध्यात्मिक जीवदान देणारा ग्रंथ. महाराजांनी हे धर्मसंकीर्तन केले, नाथमहाराज या ग्रंथाला **''ब्रह्मसाम्राज्य दीपीका''** म्हणतात. नुसती पारायणे करून, या कानांनी ऐकून त्या कानांनी सोडून देण्यातला हा ग्रंथ नाही तर त्याचे श्रवण, मनन, निदिध्यास पाहिजे.

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ भगवद्गीतेवरील भाष्य !!! श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर महाराजांनी ''पदाची कोर'' न सांडता हे विवरण केले. जीवन उत्तुंग, उन्नत, विशाल, व्यापक **आनंदब्रह्मरुप** करण्याचा मार्ग अर्जुनाच्या निमित्ते भगवंतांनी आपणा सर्वांना सांगितला. भगवंताच्या उपदेशाचे विस्तृत विवरण ज्ञानदेवांनी

केले; अलंकारिक भाषेत. अतिषय रसाळ ''गोड-गोऽऽड'' ग्रंथ आणि या विश्वमाऊलीला अभिप्रेत आहे, अपेक्षित आहे ते म्हणजे लेकरांनी नुसताच चाळा न करता **स्तन्य सेवावे**. म्हणजे फक्त शब्दात रंगून न जाता त्याचा अर्थ लक्षात घ्यावा, एवढंच नाही तर अर्थरुपता प्रत्यक्ष अनुभवावी.

ग्रंथराज ज्ञानेश्वरी हा श्रोता-वक्ता यांच्यातील संवाद आहे. मूळात बघा ना !!! श्रीमद्‌भगवद्‌गीता हा भगवंत आणि अर्जुनासारखा अंतरग भक्त यांच्यातला संवाद आहे. नेवाशात करवीरेश्वराच्या मंदिरात खांबाला टेकून हे धर्मसंकीर्तन चालले होते तेव्हा महाराजांसमोर श्रोते प्रत्यक्ष उपस्थित होते. सभामंडप खच्चून भरलेला. वक्ता तर काय ''**कैवल्याचा पुतळा**'' आणि श्रोतेपण समर्थश्रीगुरु, ज्येष्ठ बंधू निवृत्तीनाथांसकट सोपानकाका, चित्‌कला मुक्ताबाई. असा श्रोता-वक्ता यांचा सुसंवाद. श्रोते दुष्चित्त नाहीत त्यामुळे सर्व रसांचा रसोत्कर्ष.

वक्ता सांगतोय त्याला अनुसरण्यातच आपले कल्याण आहे असे वाटले तर तो **श्रोता** आणि असा श्रोता असला तरच तो वक्ता. महाराज म्हणताहेत ''**वक्ता तो वक्ता नोहे श्रोतेनविण ।।**'' चांगला श्रोता होता येणं ही परमार्थातील पहिली महत्त्वाची गोष्ट. श्रोता ''निर-क्षीर'' विवेक असणारा हवा. काय बरोबर काय चूक हे त्याला कळले पाहिजे. त्याला श्रवणातून शास्राचे अध्ययन घडले पाहिजे; वेदान्त, सांख्य, योग, प्रकृती-पुरुष विचार, भक्तीप्रेमा कळला पाहिजे आणि असा सुयोग, जुळला मग काय ? ''**कानावचनाचिये भेटी । सरिसाचि पै उठी । वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ।।ज्ञा. १८-९९१.**

* * * *

# चिंतन २७६

श्रीमद्‌भागवाताच्या चिंतनाने, कथनाने, श्रवणाने, मननाने त्यातील कथा, आख्याने-उपाख्याने, चरित्र-लीला, भक्तीप्रेमभाव, भगवंताचे गुणानुवाद, तत्त्वज्ञान, धर्म, आचार-विचाराची पद्धती या सगळ्यांनी मन आनंदाच्या, कौतुकाच्या आणि अत्यादरांच्या संमिश्र भावनांनी नेहमीच भरून जाते.

अण्णा स्वत:च अनेक श्रेष्ठ महाभागवतांच्या सहवासात-वातावरणात वाढलेला व त्यामुळे स्वाभाविकपणे भागवताविषयी **प्रेमभाव असणारा.** मग **''माझिये जातीचे ?''** कुणी भेटले की आनंद होतोच; **कारण ''आवडीची धणी''** परिपूर्ण होते. आपले तुकाराम महाराज तर **देवाला प्रार्थना** करतात की, ''गीता भागवत करिती श्रवण असे कुळी कन्या पुत्र होती जे सात्त्विक'' त्यांची देवा, मला जर सेवा घडू देशील तर माझ्या दैवाला पारावारच राहणार नाही !!! येथे अण्णाला तर ''भागवत'' कथन करण्याचा, अक्षरस्वरुप भगवान् श्रीकृष्णाची वाङ्‌मयीन पूजा बांधण्याचा योग वारंवार येतो. मग असा भाग्याचा प्रसंग का सोडावा ना ???

आताच्या या कथा-ज्ञानयज्ञातील आनंदामध्ये वेगळीच गोडी निर्माण करणारे कौतुकही थोडं मिसळलेले आहे. श्रीखंडात जायफळ (स्वादापुरतेच हं) असावे तसा स्वाद त्यामुळे या आनंदाला प्राप्त झाला आहे !!! आपल्याच घरातील माणसाने काही विशेष भूषणास्पद काम केले, त्याचे अनेकांनी कौतुक केले तरीसुद्धा त्या घरच्याच माणसांनी अगदी अनौपचारिक पण अकृत्रिम प्रेमाने, मोठ्या कौतुकाने त्याच्या पाठीवर टाकलेली थाप ही बाकी साऱ्या सत्कार-सन्मानापेक्षा बरीच काही वजनदार, भावस्पर्शी, कौतुकाची असते. तशीच जमखंडीमधील भागवतकथा !!! जन्मभूमी, गावाकडील गावरानप्रेमी मंडळी. त्यात भजनी, वारकरी त्यामुळे गाव सोडून इतकी वर्षे लोटल्यावर सुद्धा त्यांचे प्रेम, आत्मीयता, समान आवड, यामुळे

एक आपुलकीचे नाते जोडले गेले, आत्मभाव सतत वाढतच राहिला आहे. या गावाशी असलेले दृढ नाते कायम टिकून आहे.

भागवतातील अवीट गोडी असणारा कथाभाग आणि भक्तीप्रेमभाव जनरुप जनार्दनापर्यंत पोहोचवावा ही एकच तळमळ म्हणूनच याही वयात हा प्रवास, परिव्रजा. हे देवाचे-संतांचे कार्य आहे; होईल तेवढे करीतच राहावे हीच एक भावना, श्रद्धा आहे. स्वत: तर आपण भगवंताच्या भक्तीप्रेमसुखाचा आनंद अनुभवावयाचाच, भोगावयाचाच पण तो फक्त आपल्या एकट्यापुरताच ठेवावयाचा नाही तर तो मुक्तहस्ताने सगळ्यांना वाढावयाचा. "**सेवितो हा रस वाढितो आणिका**" अशीच श्री तुकोबारायांची पद्धत. गुरुवर्यांच्याकडून संप्रदायपूर्वक प्राप्त झालेला "**कथानंद**" सगळ्यांना लाभावा हाच हेतू. या कथाकथनांतच मनाला अपूर्व शांतीसुखाचा, महानंदाचा लाभ होतो हा स्वानुभव.

भागवताचे हेच सर्वश्रेष्ठ वैशिष्ट्य आहे की त्याच्या वाचन-मनन-चिंतन आणि कथनाने, श्रवणाने मनाला परमशांतीचा लाभ होतो. "सर्वोपशांती प्रमदेचा कान होऊन स्वानंदस्वरूपीच रममाण होता येते". या कथेची गोडीच अशी विलक्षण आहे की बस् !!! ज्याने एकदा का चाखली त्याला तिची चटकच लागते. भागवत माहात्म्यात भागवताचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, वेदरुपी कल्पवृक्षाच्या झाडावरील पिकून गळून पडलेले **रसाळ फळ** म्हणजेच हे श्रीमद्भागवत. म्हणजे याचाच अर्थ असा झाला की, हे फळ मिळविण्यासाठी अनेकानेक शाखा असणाऱ्या वेदाच्या दु:साध्य वृक्षावर चढण्याचे काही कारणच नाही, श्रम नाहीतच !!!

वेदांच्या ज्ञानाचे फळ म्हणजे प्रत्यक्ष परमतत्त्व परब्रह्मच, ते सहज या भागवताच्या रुपाने आपल्या हातात येते. त्यात पुन: या रसाळ फळाला शुकमुखाचा स्पर्श आहे. त्यामुळे या रसाला अमृताची गोडी-चव-स्वाद प्राप्त झाला आहे. पोपटाने तोंड लावलेली फळे अतिशय गोड असतात या कल्पनेचा उपयोग श्रीशुकाचार्यांच्या मुखाने सांगितल्या जाणाऱ्या/गेलेल्या भागवतकथेची गोडी सांगण्यासाठी किती चातुर्याने तेथे केला आहे बघा ना !!!

भागवतपुराण हे असे केवळ रसाळच आहे असे नाही तर सर्व मनोविकार

नष्ट करणारे दिव्यौषध तर आहेच आहे, पण भवरोग नष्ट केल्यावर शांती, पुष्टी, तुष्टी देणारे रसायनही आहे. एवढ्यानेच याचे माहात्म्य संपत नाही तर मृत्यूच्या भयाला/कल्पनेलाही मारुन टाकणारे हे परमामृत आहे. भागवत हे भक्तीप्रधान आहे हे खरेच तरीपण कर्म, योग, ज्ञान यांच्यातील रहस्यांचे प्रकटीकरण जागोजागी असल्याने त्याची संपन्नता अनेकपटींनी वाढलीच आहे.

आपला भगवान श्रीकृष्ण जसा विलक्षण अपूर्वच तशीच भगवंताची वाङ्मयीमूर्तीच असणारे हे भागवतपुराणही महाविलक्षणच !!!

* * * *




श्रीकृष्णद्वैपायन व्यासांनी १८ पुराणे रचली. ''व्यासेनी अमूप ग्रंथ केले।'' पण या सगळ्या साहित्यात श्रीमद्भागवताची रचना अगदी अपूर्वच म्हणावयास पाहिजे. भागवत म्हणजे प्रत्यक्ष भगवंताची वाङ्मयी मूर्तीच अशी सर्वांची अतूट आणि अढळ परमश्रद्धा. यामुळेच आपण म्हणायचे की, भगवान श्रीकृष्ण जसा विलक्षण तसेच हे भागवतपुराणही विलक्षणच.

नवनीतप्रिय असा नटखट बालकृष्ण लोणी चोरून, ते बालगोपाळांना वाटून खूष करतो, लहान असूनही मोठमोठ्या दांडग्या राक्षसांचा नि:पात करतो, जसा गोपिकांच्या चित्ताचे हरण करून त्यांना भक्तीप्रेमसुख देतो, भक्तांचे संकटापासून रक्षण करतो, तो जसा ''ज्ञानदानी सकरुण'', विद्वत्तेचा अहंकार बाळगणाऱ्या पंडितांना गूढ आणि शरण जाणाऱ्या/आलेल्यांना सोपा आहे तसेच या भागवताचे !!!

भागवतही उपनिषदांचे मथित लोणी भाळ्या-भोळ्या-साध्यांना वाटून टाकते. लहान-लहान कथा-आख्यानातून कामक्रोधांसारख्या मोठमोठ्या राक्षसांचा संहार करते, आपल्या वृत्तीरुपी अनेक गोपीकांना आकर्षित करून त्यांना

भाव-प्रेम-भक्तीचे दिव्य सुख देते. दुर्वासनांच्या आणि भवसागरात बुडण्याच्या महान संकटापासून त्याच्या भक्तांना वाचवते, तत्त्वज्ञान हाती देऊन मुक्त करण्याच्या कार्यात तेही भगवंतासारखेच उदार आहे. तेही विद्वानांची परीक्षा पाहणारे आहे तर शरण जाणाऱ्या भाविकांसाठी मात्र सुलभ-सोपे-सरळ आहे.

या पुराणाच्या अशा अनंत गुणांमुळेच भारतवर्षातील वेगवेगळ्या संप्रदायाच्या भक्तीमार्गीयांना तर ते अतिवंद्य आहेच, पण या महापुराणाने ज्ञान आणि भक्ती यांची एवढी मोठी, सुंदर सांगड घातली आहे की त्याने प्रभावीत होऊन ज्ञाननिष्ठ महात्म्यांनाही **''कृष्णात्परं किमपि तत्त्वमहं न जाने।''** असेच म्हणावेसे वाटले !!! प्रत्यक्ष विशालबुद्धी व्यासांच्या अशांत मनाला ज्या भगवत् चरित्राच्या गायनाने दिव्य शांतीसमाधान लाभले व शुकांसारख्या आत्मतृप्त सिद्ध पुरुषाला त्या गायनात-कथागायनात अलौकिक, निरतिषय, निरुपाधिक, नित्यानंदाचा ठेवा आढळला असे हे दिव्य कथामृत आहे. महाराष्ट्रातील साधूसंतांनी भागवताला आपला प्रमाणभूत ग्रंथ मानला आहे.

या सर्व थोर-थोर महात्म्यांना, महावैष्णवांना या भागवताचे एवढे प्रेम !!! एवढे महत्त्व का बरे वाटते ? तर भागवतातील कथांनी आणि मुख्यत: त्यातील दशमस्कंधातल्या भगवान श्रीकृष्णांच्या अपूर्व लीलांनी माणसाचे मन शुद्ध-विकार-रहित होऊन ते भक्तीप्रेमाच्या पवित्र-रम्य नितांत सुंदर भावनांनी भरून जाते व भगवत्-भक्ती-प्रेम-सुखाचा अभूतपूर्व आनंद त्याला अनुभवण्यास मिळतो म्हणूनच.

हे सगळे महात्मे परमज्ञानी असूनही त्यांच्या हे ध्यानात आले की, ज्ञानानेही जर भक्तीचा आश्रय घेतला नाही तर मग ते रुक्ष ज्ञान माणसाच्या स्वत:च्या मनाला तर आनंदाची आणि शांतीसमाधानाची प्राप्ती करून देणार नाहीच नाही, पण उलट भावबळाचे माधुर्य लाभलेले अंत:करणही तो दुर्दैवी गमावून बसेल आणि त्याचा एक निर्दय, अहंमन्य, बुद्धिनिष्ठ, एकलकोंडा पुरुष होऊन जाईल. कसा म्हणाल तर बिनतुपाच्या-खव्याच्या-बिनओल्या खोबऱ्याच्या पक्क्यापाकातील रव्याच्या लाडवाचा जणू दगडच आणि अशी माणसे आपल्या सभोवतालच्या माणसात-समाजात काय-कोणते-कसे सुख पसरवू शकतील ? नाही का ???

आपल्या या सगळ्या पुराणकथांनी समाजातील-माणसातील-नात्या-नात्यांतील भावसौंदर्य, जिव्हाळा आणि त्याचबरोबर अध्यात्मदृष्टीही टिकवून ठेवण्याचे फार-फार मोठे कार्य केले आहे. कोणाही माणसाच्या हातून घडणाऱ्या चांगल्या कृत्याला या पुराणातील सत्कथा कारणीभूत आहेत. आपली पुराणे आणि श्रीमद्भागवत तर अशा कथांची केवळ खाणच आहेत.

* * * *



## चिंतन २७८

श्रुतींनी सुखाच्या प्रश्नाचा फार छान निर्णय केला आहे. **"यो वै भूमा तत्सुखम्। भूमैव सुखम्"** भूमाच सुखस्वरूप आहे. "भूमा" या शब्दाची व्याख्या श्रुतीमातेने केली आहे. **"यत्र नान्यत्पश्यति, नान्यच्छृणोति, नान्यद्विजानाति स भूमा:"** म्हणजे जिथे पाहण्याला, ऐकण्याला, जाणण्याला दुसरी अन्य वस्तु म्हणून उरत नाही तेच भूमा. या प्रमाणानुसार सुख म्हणजे आपल्या पूर्णतेकरिता अन्याची अपेक्षा न ठेवता जे स्वत: स्वयंपूर्ण असते ते. या भूमालाच "ब्रह्म" म्हणून दुसरे नांव आहे. मग जिथे वेगळे पाहिले जाते, वेगळे समजले जाते, वेगळे ऐकले जाते ते ते सर्व "अल्प" म्हणून केवळ आणि केवळ दु:खरूपच ठरते.

हे ब्रह्म "एकमेवाद्वितीय" आहे. **"सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म। विज्ञान मानन्दं ब्रह्म।"** अशी ब्रह्माची लक्षणे सांगितली आहेत. ब्रह्म समजणाऱ्याला ते ब्रह्म स्वहून अगदी अभिन्नच आहे. असे श्रुतिमाता सांगते. म्हणजे जो कोणी या ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो. असा श्रुतीचा अर्थ आहे.

**"त्रिकालबाधित ब्रह्म।"** भूत, भविष्य व वर्तमान अशा तीन काळातही जे एकरूप असते ते ब्रह्म. या ब्रह्माच्या ठिकाणी कार्यरूपाने **"मी ब्रह्म"** म्हणून होणारी स्वस्वरूपाची जाणीव सुद्धा भ्रामकच ठरते. तर

आपल्या सर्वथैव पंचभूतांच्या एकीकरणाने झालेल्या देहाच्या **"मीच देह"** ही देहबुद्धी किती भ्रामक आणि सर्व दुःखाला कारणीभूत. मग **"मी ब्रह्म"** ही जाणीव फक्त एका भगवद्भक्तिप्रेमसुख रसायनांनीच विरते, जिरते.

शहाणी माणसे शाश्वत सुख कोणते ते जाणून अशाश्वत सुखाकडे कधीही चुकूनसुद्धा ढुंकून बघत नाहीत. शाश्वतसुख कधीही अशाश्वत होतच नाही; आणि ते शाश्वत सुख अशाश्वत, नाशिवंत, क्षणभंगूर अशा अशाश्वत सुख देणाऱ्या दृष्य पदार्थातून तर कधीच लाभत नाही. ब्रह्मचैतन्यांचे एक वाक्य लक्षात ठेवा, **"शाश्वत सुख हवे असेल तर दृष्याचे–देवापासून दूर–दूर नेणाऱ्या दृष्याचे वेड कमी झाले पाहिजे आणि कमी होता–होता संपले पाहिजे.**

दृष्यातून लाभणारे हे सारे सुख भामट्याच्या क्षणजीवी मधुर संगतीसारखे असते. बचनागाच्या सुरवातीला लागणाऱ्या गोडीसारखे असते. सर्व दुःख परंपरेचे जे प्रत्यक्ष माहेरघरच अशा या उत्पति–नाशायुक्त असणाऱ्या दृष्यात सुख एक क्षणभरसुद्धा रमत नाही.

मग या दृष्याचे काय करावयाचे? दृष्टीचे काय करायचे? ती का फोडून टाकावयाची? नाही–नाही, मग ह्या संगळ्या दृष्यात अखंडाकार असलेला **पांडूरंग** पहावयाचा. आकारात असलेला परमात्मा पहावयाचा. मग दृष्य बाधत नाही. भक्तिप्रेमभावच अशी दृष्टी देतो.

इथे जे आहे, तेच तिथे आहे, जे तिथे आहे, तेच इथेही आहे. ब्रह्मचैतन्यात इथे–तिथे, याच्याकडली आरती–त्याच्याकडली आरती असा भेद नाही. ब्रह्म एकच आहे. काही भोपळे लहान–काही मोठे, एखादा गोल गरगरीत तर एखादा आडवा, एखादा हिरव्या तर एखादा केशरी सालीचा पण शेवटी भोपळाच ना?

अशा एकाच ब्रह्मचैतन्यात, एकाच ठिकाणी भिन्नपणाची कल्पना करणारा या जन्म–मृत्यूस्वरूप परंपरेला बळी पडतो. या देहात आणि विश्वात असणारे "ब्रह्मचैतन्य" एकच आहे असे जो जाणतो, तो पंचकोशातीत होतो; चारी देहाच्या पलीकडे पोहोचतो. म्हणजेच भगवंताशी तादात्म्य पावतो. **परब्रह्मस्वरूप** होतो.

**''याचि जन्मे, येणेचि काळे। संसारी होइजे निराळे। मोक्ष पाविजे निश्चले। स्वरूपाकारे।।''** असा श्रीसमर्थांनी सिद्धांतच सांगितला आहे त्यांच्या दासबोधात. तो स्वरूपी संतुष्ट असणारा कृतकृत्य असतो. या जगात तो केवळ उपकारापुरताच उरलेला असतो.

* * * *




वृंदावनात शरद ऋतुची शोभा अतिशय सुशोभित झाली. गोस्वामी तुलसीदासांच्या ''रामचरितमानसामध्ये'' ह्या ऋतुचे वर्णन आहे. ते अगदी हुबेहुब श्रीमद्‌भागवतातील वर्णनासारखेच आहे. ह्या सगळ्या वर्णनामध्ये एका बाजूला अध्यात्मिक दृष्टांत असून, दुसऱ्या अंगानी प्रकृतीच्या रूपाने वर्णन आलेले आहे.

श्रीकृष्ण/गोपालकृष्ण परमात्मा वृंदावनामध्ये आता ''वेणू'' वादन करू लागले. त्यांच्या वेणू नादाने केवळ गोप-गोपीच नाही तर सारेच्या सारे चराचर जगच मुग्ध झाले.

**''ऋतु बरवा शारदु। शारदी बरवा चांदु। चांदी बरवा चंद्रु। पौर्णिमेचा।।''** अस आपल्या ज्ञानराजांनी पण या शरद ऋतुचे वर्णन केले आहे. वृंदावनातील त्या वनात निर्मल अशा सरोवरामध्ये कमळे उमलली होती. त्यांच्या सुगंधानेयुक्त असा मन्द मन्द वायु वहात होता.

भागवतकारांनी फार छान शब्द वापरला आहे. **''पद्माकर सुगन्धिना!''** ह्याचा अर्थ असा की, स्वत: पद्मा अर्थात साक्षात् लक्ष्मीच गोकुळात येऊन आपल्या स्वत:च्या हाताने त्या वनातील प्रत्येक वृक्ष-वेली-पुष्पांना सुशोभित आणि सुगंधित करीत होती; की जेणेकरून भगवंताला तिचा जरासुद्धा विसर पडू नये; तसेच तिच्या हाताच्या सुगंधाने भगवान् सुप्रसन्न व्हावेत.

पहा! वृंदावनाचे काय स्वरूप आहे? तर त्याचे स्वरूप असे आहे की, त्या ठिकाणी एक तर गिरीराज (गोवर्धन) आहे. दुसरी वाहणारी नदी (यमुना) आहे आणि तिसरी गोष्ट म्हणजे निर्मल अशी सरोवरे आहेत. निर्मल असे सरोवर

म्हणजेच, भगवंताचे हृदय. नदी म्हणजे भगवंताकडे प्रवाहित होणारी भक्तगणांची वृत्ती आहे आणि गिरीराज पर्वत भक्तांची अत्यंत दृढ अशी भगवंतावरील निष्ठा आहे. ह्याचा सगळ्याचा सुंदरसा अर्थ काय म्हणाल? तर असा आहे की; "**भक्ती–प्रेम धाम**" अशा या वृंदावनातील भक्तांची हृदये आणि त्यांच्या वृत्तीतील सगळेच्या सगळे प्रवाह हे आपापसात अभिसरण करीत आहेत.

वसंताला "**मधु**" असे म्हणतात. भगवान् श्रीकृष्ण परमात्मा मधुपती आहे. म्हणजेच वसंताचाच काय पण सगळ्याच ऋतुंचा पती आहे. म्हणून त्याचे आगमन होताच सुंदर–सुंदर अशा पुष्पांनी बहरलेल्या त्या हिरव्यागार वृक्षराजीमध्ये भ्रमर गुंजारव करू लागले; पक्ष्यांचे थवेच्या थवे किलबिलाट पण (गोड हं) करू लागले. अशा बन्सीधर कदंबवृक्षातली "देहुडा" चरणी उभे राहून, त्यांनी आपली वेणू वाजविण्यास प्रारंभ केला. "वेणूनाद" इतका मधुर आणि रसमय होता की, तो श्रवण करून समस्त गोपी ह्या "प्रेमरसाने" जणू काय न्हाऊनच निघाल्या, परिपूर्ण झाल्या.

सावळ्या अशा मेघश्यामानी सुवर्णवर्णाचा असा सोनसळा पीतांबर, वनमाला, कंगण, बाजूबंद, नृपूर, मुद्रिका इ. रत्नखचित अलंकार परिधान केलेले. मस्तकी किरीट, त्यात मोराचे पिस, कानात कुंडले, त्याच्या शरीराचा जेवढा भाग उघडा होता तेवढ्या भागाची श्यामलता, सावळेपणा या सुवर्णालंकारामुळे जास्तच झळकत होता.

श्रीकृष्णाची वपु/शरीर वराप्रमाणे आहे. गायत्रीमधील "वरेण्य" श्रीकृष्णाच्या ठिकाणी "वर" बनून आले आहे. "ईश्वर" या शब्दामध्ये "ईश" धातू आणि "वर" हा प्रत्यय आहे. त्याच्यात "वर" आहे तसेच "वरत्व" देखील आहे, म्हणूनच तो सर्व विश्वाचा पती आहे, स्वामी आहे. होय की नाही?

श्रीकृष्णचंद्र वेणूच्या **छिद्रांना** आपल्या बोटांचा स्पर्श करून **परिपूर्ण** करू लागले. मुरली श्रीकृष्णाचे अधरामृत प्राशन करत होती. त्यामुळे अतिशय रसाळ–गोड–गोड स्वर उमटू लागले. गोपींनी पाहिले की, वेणूनादाने वृंदावनातील लता–वृक्ष–पुष्पे यांच्यातून मधाचा स्त्राव सुरू झाला. काय मधुर नाद असेल नाही का? नादब्रह्मच.

* * * *

# चिंतन २८०

आपल्या समाजात एक असा मध्यम वर्ग आहे की ज्याचा एक पाय जरी आपल्या श्रेष्ठ अशा भारतीय संस्कृतीत गुंतलेला असला तरी पण दुसरा मात्र खात्रीने पाश्चिमात्य संस्कृतीत पक्का रुतला आहे. या सगळ्याचा परिणाम, "आत्मविस्मृती हे एक तऱ्हेचे अंतर्गत संकट आहे, हे एक वैचारिक दुष्ट आक्रमण आहे, प्रदूषण आहे."

या वैचारिक संकटातून झंग्राजाळलेल्या मनोवृत्तीचे तथाकथीत **"विद्वान"** ??? म्हणू लागले की, "पुराणे म्हणजे जुन्या कथा, **इतकेच नाही** तर फेकून देण्याच्या लायकीच्या भाकडकथा. काही लोक तर या **पुराणकथांना** दंतकथाच म्हणू लागलेत."

परंतु या पुराणांकडे अशा दूषित भूमिकेतून पाहणे अत्यंत चुकीचे आणि तितकेच महाघातक आहे. अशा दृष्टीने आपणच आपले नुकसान करून घेत आहोत. सर्वच्या सर्व पुराणे, महाभारत, रामायण हा आपला मोठा मौल्यवान सांस्कृतिक ठेवा आहे. या पुराणांतर्गत जीवनतत्त्वज्ञानातून फक्त भारतीयांचेच नाही तर अवघ्या विश्वाचे कल्याण करण्याचे सामर्थ्य आहे.

पुराणाच्या या माध्यमातून ईश्वरविषयक तत्त्वज्ञान, सकळ धर्माचे मार्गदर्शन, सृष्टीच्या निर्मितीपासून तो कलियुगाच्या प्रारंभापर्यंतचा भव्य, उज्ज्वल तसाच रोमांचकारी असा इतिहास सुसंगतपणे उलगडून दाखविल्याचेच दिसून येते. मात्र त्यासाठी अर्थातच तशी दृष्टी मात्र हवी. पुराणकथांना "इतिहास" म्हणताना केवळ सनावळ्या, राज्यांची निर्मिती, राजसत्ता, लढाया, बंडाळी, यादवी, जय-पराजय, तह-समेट झाल्याच्या नोंदी एवढीच स्थूल शाळकरी कल्पना पुरी ठरणार नाही.

पुराणग्रंथांना इतिहास म्हणताना हे लक्षात ठेवले पाहिजे की पुराणग्रंथांनी आपला संपूर्ण सांस्कृतिक इतिहास ग्रंथित केलेला आहे.

हे स्पष्ट होण्याकरीता ''पुराण'' या शब्दाचा अर्थ आपल्याला खोलवर पहावयास हवा बरं का !!! ''पुर्+अन्'' अशा दोन शब्दांच्या साहाय्याने पुराण हा शब्द बनला आहे. पुर म्हणजे चौदा भुवनांचे संपूर्ण विश्व. अन् हा धातुशब्द असून श्वसन, प्राणन, जीवन अशा सारख्या शब्दांतही हा अन् धातू आहेच. याच्यामधून व्यवहार असा अर्थ ध्वनीत होतो. याचआधारे पुराण या शब्दाचा अर्थ आहे, ''संपूर्ण विश्वाचा व्यवहार'', ''विश्वजीवन'' !!! आपली पुराणे म्हणजे संपूर्ण विश्वजीवनाचा सुस्पष्ट असा आलेखच आहे. इंग्रजी भाषेत यालाच COSMOLOGY म्हणतात. पुराणे म्हणजे विश्वकोषच आहे असं म्हटलं तरी अजिबात अतिशयोक्ती होणार नाही.

या अर्थाने आपण पुराणांकडे पाहिल्यास, आपल्या पूर्वजांनी, ऋषी-मुनींनी आपल्यासाठी अपार मेहनत घेऊन आपल्या ज्ञानात भर घातली आहे. आपल्या प्राचीनतम इतिहासाची, तत्त्वज्ञानाची, धर्मविचारांची, शाश्वत जीवनमूल्यांची फार मोठी पुंजी ठेवली आहे याची खास जाणीव होईल.

या पुराणरुपी विश्वकोषांची रचना म्हणजे केवळ सनावळ्या नव्हेत, राजे-राजवंशांची नोंद नाही, युद्धे-तह, तहांच्या अटी यांची शुष्क रचना नाही.

पुराणे म्हणजे तत्त्वज्ञान, अध्यात्म, धर्मविषयक सम्यक दिग्दर्शन, ईश्वरभक्ती, जीवनाच्या समग्र पैलूंचा अविष्कार, अनेक कथा-उपकथांच्या माध्यमातून सत्कर्म-दुष्कर्म यांचे परिणाम इत्यादीचे स्पष्टीकरण. पुराणात सर्ग, प्रतिसर्ग (विसर्ग), वंशोत्त्पत्तिकथा, मन्वंतरांचे वृत्त, तसेच सूर्य आणि चंद्रवंश आदी वंशातील राजांच्या कथा, वर्णने, गुणगान, अवतार चरित्र आणि खूप-खूप आहे. आपला इतिहास हा प्राथमिकतेतून उत्क्रांती होत गेल्याचा क्रम दाखवीत नसून, पूर्णतेतून अध:पतनाकडे वळल्याचा/घसरल्याचा स्वाभाविक क्रम दाखवत आहे. **''पूर्णाकडून ढळलेले, पूर्णापासून ढळलेले जग पूर्णाकडेच जाते''** या तत्त्वज्ञानाचा पुराणांना आधार आहे.

* * * *

# चिंतन २८१

श्रीमद्‌भागवतांत भक्तीलाच अधिक प्राधान्य आहे. भागवतात या ज्ञानगम्य परमात्म्याची स्तुती करतानाही प्रत्यक्ष श्रृतींनीच (उत्पत्तीस्थिती आणि प्रलय ज्याच्यामुळे होतात ते परब्रह्मच या सर्वांचाच आश्रय आहे. सर्वांनी त्याचाच आश्रय करणे श्रेयस्कर-क्षेमकारक आहे.) या आश्रयाचे म्हणजे परमात्म्याचे वर्णन केले आहे.

भागवताचे हेच वैशिष्ट्य आहे की, भागवतकारांना "**मोक्ष**" गौण वाटतो व ज्ञानोत्तरभक्ती प्रधान वाटते. भक्तीमार्गात "**मोक्ष तुमचा देवा। तुम्हा दुर्लभ तो ठेवा।।**" या श्रीतुकोबारायांच्या वचनाप्रमाणे मोक्षापेक्षा "**भक्तीप्रेमसुखाची**" योग्यता अधिक मानली आहे. भागवतकारांनी काय प्रत्यक्ष भगवंतानी भक्तीच प्रधान सांगितली आहे. "**भक्त्याहं एकया ग्राह्या**" व "**भक्त्या त्वनन्यया शक्य**" अशा शब्दांत.

ज्याची भक्ती करावयाची त्या सर्वाश्रयभूत परमात्म्याची, पूर्णावतार भगवान श्रीकृष्णाची महती काय वर्णावी ? तो अत्यंत कल्याणप्रद आहे, त्याचे चरित्र, लीला, गुण, रुप, नाम सगळेच्या सगळे परमकल्याणकारी आहे. या सगळ्याला भागवतात फार-फार महत्त्व आहे. या लीला पुरुषोत्तम अशा षड्‌गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्णजीवनाचा, त्याच्या समग्र अवतार कार्याचा, विभूतिमत्त्वाचा विचार अगम्य, अनाकलनीय आहे. त्याची चिकित्सा करावयाची नाही तर श्रद्धा-प्रेमपूर्वक भक्तीभावाने रसपान करावयाचे.

श्रीकृष्णाच्या जीवन तत्त्वज्ञानाने, व्यास, शुक, नारद, आद्य शंकराचार्य, श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज, बाबू अरविंद, लोकमान्य, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, गुरुदेव रानडे, महात्माजी, विनोबा भावे आणि आपल्यासारख्या अनेकांना वेड लावले व आजन्म त्याच चिंतनात राहावे असा मोह

आपल्याला होतो. भूतकाळातील गीतार्णवापासून तो भावार्थदीपीकेपर्यंत जगन्मान्य जे-जे ग्रंथ निर्माण झाले ते सर्व या योगीराज-योगयोगेश्वर म्हणून वंद्य असलेल्या श्रीकृष्णाच्या तत्त्वज्ञानाच्या द्रष्टेपणाचेच द्योतक आहेत.

व्यवहारकुशलता तर त्याचीच वाखाणावी बघा !!! "**गोष्टी सांगेन युक्तीच्या चार**" एवढीच दिसायला माफक भूमिका घेऊन, ऐन समरांगणात करी शस्त्र न धरण्याचा निश्चय आणि भक्तांसाठी तो निश्चय मोडणारा द्वारकाधीश भगवंताचे "**जाणतेपण**" आपण पामरांनी काय वर्णावे ? पांडवांच्या समग्र जीवनपटात ज्याचे अनेक जरतारी धागे विणले गेले आहेत अशा यशस्वी, मुत्सद्दी, महापराक्रमी विजयी योद्धा, धर्मसाम्राज्याचा निर्माता, राजकारण धुरंधर असून "**भक्तवत्सल**" भगवंताचे काय गुणगान करावे ना ???

श्रीकृष्णाच्या भावविश्वाचा विचार केला तर गोकुळातील नंद-यशोदेच्या जीवनातील "कृष्ण" केवळ अविस्मरणीय !!! काय वत्सलभाव बघा !!!??? गोकुळ-मथुरा-द्वारका यातील सर्व लीलांचे नीट चिंतन केले, अभ्यास केला तर श्रीकृष्णाचे पूर्णावतारत्त्व आणि भावविश्वाचा सम्राट-साम्राज्य याचे जाणते महात्मे का वर्णन करतात हे कळून येईल. श्रीज्ञानोबाराय, नामदेव, एकनाथ व श्रीतुकोबाराय यांच्या अभंगातील "गौळणी" हे अभंग किती अवीट भक्तीप्रेमसुखाचे वर्णन, गुणगान, अनुभूती आणि मूल्यमापन करणारे आहेत हे कळेल. यातून श्रीकृष्णभगवंताचे चिंतन करताना आपण आपले उरतच नाही. "**लाला को देखन गयी तो मै हो गई लाल**" अशी अवस्था ! आपण केवळ "दंग" होत नाही तर रंगून जातो. दंग होण्यात देहभान काही काळापुरते हरपते आणि रंगून जाण्यात आपण देहबुद्धीने उरतच नाही. "**त्या श्रीकृष्णाहून वेगळे**" हीच भक्तीप्रेमसुखाची परमावधी.

"श्रीमद्भागवत" या ग्रंथात भगवंताचा अनुभव आणून देण्याचेच नाही तर श्रीकृष्णात-त्या नंदनंदनात, **आनंदकंदात** मिसळून जाण्याचे साधन आहे. भागवतातील भक्तीप्रेमसुखमार्गाची साधना करावी व "त्या"च्यात मिसळून जावे.

* * * *

# चिंतन २८२

भगवंताची आपणा सर्वा लेकरांना एक आज्ञा आहे, ''मुलांनो, लाभ मिळावा असं वाटत असेल तर त्याग करा. माझ्या इच्छेनुसार वागा, आचरण ठेवा, स्वतःला ओळखा आणि स्वतःला पवित्र करा (अंतःकरणाने), स्वतःच्या तालानुसार न नाचता ''माझ्या'' तालावर नाचा.'' केवढा छान सारभूत आदेश !!! नाही का ???

कोणाची आज्ञा आहे ही ? तर विश्वाचे पालन करणारा, सर्व जीवांचा नियामक, शासन करणारा असा ''ईश्वर'', तिन्ही काळात असणारा, मंगल -महन्मंगलमय, विनाशरहित, आनंदकंद, सर्व ज्ञेय वस्तूमध्ये जाणण्यास सर्व श्रेष्ठ, एवढे असून पुनः विश्वापासून वेगळा नसल्यामुळे जो विश्वात्मा आहे अशा श्रेष्ठ आधारस्वरुप अशा नारायणाची !!! मग ती पाळावयास हवी की नाही ???

''**संबंध**'' वेगवेगळ्या प्रकारचे असतात. या वेगळ्या-आगळ्या प्रकारच्या नानाविध भाव-भक्ती बंधनांच्या मिश्रणाने पुष्ट झालेला असा जो **अनिर्वचनीय** संबंध आहे आणि या सर्व संबंधात ज्या ज्या भावना असतात, ज्या भगवंताप्रती असतात या भावबंधास ''**मधुराभक्ती**'' असे म्हणतात. श्रीवल्लभाचार्य म्हणतात, ''**मधुराधिपतेरखिलं मधुरम।।**'' त्यात अनेक वेगवेगळे भाव असतात. याचकता असते, सेवकता असते, दास्यता असते आणि मोठी श्रेष्ठतम अशी ''**सख्यता**'' पण असते बर का.

''**ददाति प्रतिगृह्णाति गुह्यमाख्याति पृच्छति। भुङ्क्ते भोजयते चैव षड्विधं प्रीति लक्षणम्।।**'' श्रेष्ठतम् भगवंताबरोबर सख्यता ''अहो भाग्यं''!!! गीता हा ग्रंथ भगवंताच्या सख्यतेतून आणि सख्यभक्तीवर आधारित असा ग्रंथ आहे. ''सख्यभक्तीचा'' ग्रंथ आहे; ना श्रीगुरुंनी आपल्या

शिष्याला सांगितला, की सुशिक्षिताने अशिक्षिताला सांगितला की अडाणी अशा मूढाला शहाण्या पंडिताने सांगितला की तत्त्ववेत्त्याने एका मुमुक्षाला सांगितला, तर तो एका सख्याने आपल्या अंतरंग अशा सख्याबरोबर केलेला मधुर ''गोऽऽड'' संवाद आहे. त्याचा सुगंध, त्याचा स्वाद, त्याची माधुरी, त्यातील रसाळता अद्‌भुत अशीच शब्दांच्या पलीकडील आहे.

काही जण विचारतात, ''गीताच कशासाठी वाचायची ???'' त्यांना मी सांगत असतो की, वेदात तत्त्वज्ञान आहे, उपनिषदांत तत्त्वज्ञानच आहे पण गीतेत जे तत्त्वज्ञान आहे ते **''भक्तजनवत्सल''**, **प्रेमळजनप्रांजळ** अशा आनंदकंद भगवंताच्या मुखातून स्रवले आहे. म्हणून त्यात जो आनंद आहे तो तसा दुसऱ्या कशातही नाही. पाच, साडेपाच हजार वर्षांपूर्वी द्वारकाधीशप्रभूने जे शब्द उच्चारले होते तोच शब्दार्थ आपण आज व्यासेनग्रथिता अशा **''गीता''** वाचनातून उच्चारतो. म्हणूनपण त्यात एक शाश्वत असा आनंद आहे.

सख्यतेत पण एक प्रकारची तटस्थता असते. भगवंतासोबत देखील **''लेना देना बंद है, फिर भी एक अनुपम आनंद है।''** भगवंताला माझ्याकडून काहीही नको आणि मलाही भगवंताकडून काहीच नको, ही जी स्थिती सख्यभक्तीत आहे त्यामुळे भगवंताबरोबर एक विलक्षण **''तृप्ततटस्थता''** येते. **''तू पूर्ण आहेस, मी पण पूर्ण आहे''**, **''पूर्णमदः पूर्णमिदं''**, **''आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत्।।''** अशी ही परिपूर्ण स्थिती.

देवा !!! मला तुझ्याबरोबर सख्यतेनेच रहायचे आहे, तुझ्याबरोबर चालायचे आहे, तुझ्याबरोबर बोलायचे आहे, भांडायचे आहे, रुसायचे आहे. तू प्रत्येक वेळी, स्थळी, गोष्टीत माझ्याबरोबर आहेस, तूच माझा जीवनसाथी आहेस.

पण भक्त/सखा म्हणत असतो, ''मला फक्त एवढेच नको आहे. मला तुझाच होऊन रहायचे आहे.'' ही केवळ एक कल्पना नाही तर

भक्तीशास्त्रातला हा एक सिद्धांत आहे, अलौकिक आनंद आहे. हा भाव एक परिपूर्ण जीवन आहे. आपल्याला भगवंताचा/आनंदकंदाचा/नंदनंदनाचा बनून रहाता आले पाहिजे आणि असं ''होऊन'' रहाण्यासाठीच त्याच्या नामाचं अखंड स्मरण आहे.

* * * *



## चिंतन २८३

भगवंताचा/आनंदघन श्रीहरीचा आणि माझा भक्तीभावसंबंध झाला आहे, इतकंच नाही तर फार सामीप्य निर्माण झाले आहे, एवढ्यानेच झालेलं नाही तर आता सारुप्यही यायला लागले आहे. परंतु अजून संकोच संपत नाही, म्हणावा तसा !!! संकोचाची गाठ (ग्रंथी) दोन भावबंधात सुटते. एक वात्सल्यासक्तीमध्ये व दुसरी सख्या-कांतासक्तीमध्ये. या दोनच ठिकाणी, संकोचाची जी ग्रंथी आहे, गाठ आहे, ती तुटते बघा. म्हणून भगवंता !!! मी समजून चुकलो आहे की तू माझी आई आहेस, तू माझा पिता आहेस, नाही नाही तर तूच एकमेव माझा सखा..... सारं-सारं काही आहेस रे !!! **''त्वमेव माता च पिता त्वमेव''**.

असे आपण म्हणतो ना ? पूर्वासुरी महावैष्णवांचे/भागवतांचे उष्टे आपणही बोलतो. नाही का ? पण ते बोलत असताना आपल्याला कळतच नाही की आपण काय बोललो ??? **''त्वमेव माता''**, बोलत असतो आपण **''त्वमेव बंधुश्च सखा''**..... असे जे वाचले आहे, शिकवण्यात आले ते बोलतो, तेवढ्यात मंदिराबाहेर काढून ठेवलेल्या, कालच नवीन आणलेल्या भारी किंमतीच्या चपलांची आठवण येते की, कोणी घेऊन तर गेला नसेल आणि नेल्या असल्या तर आता काय करायचं ???

आम्ही त्याचेकडे जातो, कां तर हात पसरण्यासाठीच. मागितल्यावर

ताबडतोब देणाऱ्याला किंवा हाका मारल्यावर लगेचच धावून येणाऱ्याला आपण चांगला म्हणतो नाही का ? पण भगवंताचं तसं नाही.... मागितल्याशिवाय देतो, भरभरून देतो. **"न सांगता करी सर्व काम।"**.

मागितल्याशिवाय, तोंड वेंगाडल्याशिवाय कोण देतो ? बोलावल्याशिवाय कोण येतो ? **"एक आईच"** फक्त !!! आईजवळ मागावे लागत नाही. भगवंता मला तुझ्याजवळ काही मागायचे नाही, याचा अर्थ असा नाही की मला तुझी गरजच नाही. मात्र गुजराथी भाषेत अशी एक म्हण आहे की, **"मागितल्याशिवाय आई (सख्खी) पण वाढत नाही"**. याहून मातृत्त्वाची अधिक बदनामी कोणीच केली नसेल. **"आई"** शब्दाचा हा घोर अपमान आहे. मागितल्यावरच नाही तर मागण्याच्याआधीच लेकराला जी देऊन टाकते तिलाच आई म्हणतात; आईलाच वाटते की मुलाला/बाळाला भूक लागली असेल. तान्ह्याची भूक आईलाच कळते. मुलाला भूक जाणवतच नाही; तो तर खेळण्यात दंग असतो. त्याला कळत नाही की आपल्याला भूक लागली आहे. मुलगा तर म्हणत असतो, "आई, मला भूक नाही लागलेली." आई म्हणते, "पुरे पुरे झाले तुझे खेळणे, चल खायला....!!! मला माहित आहे तुला भूक लागलीय ते !!!" आणि काय गंमत आहे पहा ना ...... बसल्यावर तो किती खातो त्याचा अनुभव तर सगळ्यांनाच आहे नाही का ? त्यासाठी उपनिषद् उघडायची गरज नाही.

ज्याने लौकिक संसार चांगला केला त्याला आणि ज्याने केला नाही पण जाणला आणि "अवघाचि संसार" सुखाचा करण्यासाठी आपल्या स्वहस्ते, आनंदाने, स्वखुषीने आपल्या वैयक्तिक संसारावर पाणी ओतले त्याला वेदांत सहज समजतो बघा.

पण आपण संसारही धडपणे करीत नाही हेच खरे. संसार करताना ही **"टका धर्म, टका कर्म, टका हि परमं मम।"** अशी आपली प्रपंचाची तऱ्हा. "टका"च्या टकटकीहून जास्त असे आम्ही काहीच करीत नाही.

भगवंतासाठी जेव्हा "तू" शब्द वापरला जातो, तेव्हा लोकांना वाटते की भगवंत एवढा **मोठा** त्याला एकेरी नावाने कसे संबोधायचे ?

पण आपण आईला ''तुम्ही/आपण'' म्हणतो का **''आई''** म्हणतो ? आईला 'अहो'' म्हणण्यात **''आई''** या अत्यंत गोड शब्दाचा अपमान आहे, नुसता शब्दाचा नाही तर **''आई''**चा अपमान आहे. आईवर किती प्रेम आहे आपलं ??? म्हणून तर आईला एकेरी नावाने हाक मारतो आपण. आपल्या **आईला** !!!???/**सख्याला** अहो म्हणून आईला गुदगुल्या तर नक्कीच होणार नाहीत.... म्हणून हे विठ्ठला, रामा.....भगवंता....देवा होय ना ???

* * * *



# चिंतन २८४

आईचे तिसरे एक वैशिष्ट्य हे आहे की आई आशावादी असते. आईला आशा, मोठी आशा असते की आपले अपत्य सुधारेल, तो चांगला होईल, काही वेळा मात्र किती काळ येतो आणि जातो, हा मात्र आहे तसाच !!! परंतु मातेला मात्र कायम आशा असते. आईसारखीच भगवंताला/श्रीगुरुमाऊलीलाही आपल्याबद्दल आशा वाटते.

म्हणून तर तोच आपल्याला सकाळी उठवायला येतो. तो आला नाही तर आपण कसे काय उठू शकतो ? उठल्यानंतर ज्याला आनंदकंद भगवंताने केलेल्या गुदगुल्या होत नाहीत तो भक्तच नव्हे. आपण आपल्या उभ्या आयुष्यात अशी काय त्याची सेवा केली आहे की त्याने आपल्याला उठवायला यावे ??? तर ''काहीही'' केलं नाही, तरी त्याच/त्या सद्गुरुमाऊलीचं हृदय, आईचे हृदय, आईचे अंत:करण आहे म्हणून भगवंत उठवायला येतो.

ही समज ज्याला आली तो ''भक्त''. तोच भगवंताला ''आई'' म्हणून हाक मारतो, तेव्हा भगवंताला पण आनंद होतो. श्रीरामकृष्ण परमहंसांनी देवाला ''माँ'' म्हणून हाक मारली आणि मग अख्खा बंगालच परमात्म्याला

"माँ" म्हणू लागला. पण भगवंताला बरोबर समजते की माझा मुलगा/मुलगी कोण आहे ?

केवळ "आई/माता" शब्दात शक्ती नाही तर हाका मारणाऱ्याच्या/बोलणाऱ्याच्या भावनेमध्ये शक्ती आहे. संतांनी हाक मारली तशी आपणही हाक मारतो, म्हणतो, "**त्वमेव माता**"..... पण आम्हाला त्वम चा अर्थही माहीत नसतो आणि "एव" याचा तर नसतोच नसतो नाही का ??? कळवळा, निष्ठा, एकभाव पाहिजे.

करूनही बोलायचे नाही, त्याचा उच्चार करायचा नाही हे आईचे आणखी एक रुप आहे. एवढसं केलं तरी इतरेजन त्याची जाहिरात करतात. पण केल्यावरही न बोलणारी फक्त आणि फक्त एक "**गुरुमाताच**". आपण भगवंताचं स्मरण करत नाही, त्याला मानत नाही (म्हणजे आपला आपल्या कर्तृत्वावर विश्वास ना ?) तो आहे की नाही याबद्दलसुद्धा आपण तसे साशंकच नाही का ??? तरीही भगवंतच आपले सर्व करतो आणि तरीही भगवान असे कधी म्हणतो की, "मी तुझ्यासाठी इतके-इतके-असे-असे केले ?? रक्त बनवणारा-रक्त फिरवणारा, बोलत नाही की, मी हे केले.

आईला-वडिलांना जो ओळखतो तेच लेकरू, आईचे हृदय जे ओळखते तेच मूल. म्हणून भगवंताला ओळखणारा, एवढंच नव्हे तर भगवंतालाच एक सर्वस्व मानणारा खरा भगवंताचा-श्रीगुरुंचा.

भगवंताला ओळखायला पाहिजे. भगवंताला मानले पाहिजे. त्यासाठी चित्त एकाग्रता तर केलीच पाहिजे. चित्तशुद्धी झालीच पाहिजे. आपण भगवंताबरोबरचा एकेक संबंध पहात आहोत. आपल्याला मधुराभक्तीपर्यंत जायचे आहे. त्यासाठी भगवंताला प्रिय असणाऱ्या वेगवेगळ्या अनेक सद्‌गुणांची आपल्याठिकाणी जोपासना करायची आहे. कदाचित त्यात सारेच्या सारे जीवनही संपून जाईल म्हणूनच गीता पण म्हणते, "**बहूनां जन्मनामन्ते**.... भगवंत झटकन मिळत नाही.... तो झटकन आपलासा होत नाही. तो म्हणजे काही प्रदर्शनातील ठेवलेली वस्तु नाही!!!" आम्ही गेलो

होतो नी झाला साक्षात्कार. **"Realization"** "अरे, काय साक्षात्कार झाला ? कपाळाचा ???"

खरं-खरं लक्षात ठेवा "करेन" आणि "बनेन" हे दोन्ही **कर्तृत्वभाव** ??? जेव्हा जीवनातून पूर्णत: निपटून निघून जातात तेव्हाच आपण भगवंताचं होऊ शकतो. "**मी**" स्वत: बनलो हा उद्दामपणा, तसंच मी दैवामुळं/प्रारब्धामुळं बनलोय ही उद्दामताच. भगवंताला मानणं सर्वस्वी-सर्वे-सर्वा मानणं ही एक वेगळीच गोष्ट आहे.

देवाने बनवले आहे, त्यानेच दिले आहे, त्याच्याच कृपेने वाढले आहे यात एक मोऽऽऽठा मधुर भाव आहे. Self-made असं म्हणणं काय कामाचं ??? "माझा स्वामी भगवंत आहे, श्रीगुरु आहे" असं अनुभवण्यात भक्तीरसातील माधुर्य आहे. मधुराभक्तीतील एक रंगछटा आहे.

* * * *




आपण भगवंताचं लेकरू होण्याची इच्छा बाळगतो, कारण या भक्तीप्रेमसंबंधात संकोचाच्या गाठी पूर्ण नाहीशा होतात. पण पोर कोण ? पित्याची-मातेची जबाबदारी उचलणाऱ्या, आपल्या खांद्यावर घेणाऱ्याला पुत्र/कन्या म्हणतात. माता-पिता-श्रीगुरुंची शिकवण आत्मसात करणारा, त्यांना पूर्ण अनुसरणारे लेकरु. पित्याचे काही देणे असेल तर ते माझेच आहे आणि मला ते फेडायचे आहे असं मानून ते फेडणारे लेकरू. फक्त पैसा म्हणजेच कर्ज नाही, तर श्रीगुरुपरंपरेत प्राप्त झालेला बोध, नाम हे देणं आणि आपण त्याला पूर्ण स्मरून तो नामबोध जोपासणं, वाढवणं हे फेडणं. त्या भक्तीप्रेमलहरीत सतत सुस्नात होणं, क्रीडा करणं, रमणं हेच फेडणं. भगवंताने आपल्याला जन्म दिला आहे, तो सर्वांना सुखी आनंदी ठेवण्याची जबाबदारी

पत्करतो. साधी गोट बघा, आपण झोपतो !!! त्याची कृपा, फिरुन उठतो त्याची सत्ता, त्याने झोप दिली आहे, सगळे विसरून आनंदात जगण्यासाठी. बघा ना, झोपेत साधनसंपन्न सुखी आहे आणि साधनरहितदेखील सुखी आहे. प्रत्येकाला रोज काही ना काही काळ ही स्थिती प्राप्त होतेच, होय की नाही ??? याची व्यवस्था करणारा भगवंत किती चतुर आहे बघा बरं !!! पण आपण मूर्ख बिछान्यावर पडल्यावर त्याचे स्मरण करण्याच्या ऐवजी चिंता करतो....काळजी करतो. चिंता-काळजी करावी का त्याचं स्मरण करावं सांगा पाहू ?

संत भगवंताचेच पुत्र. अवघ्या जगाला सुखी करण्याचा त्यांचा प्रयत्न, **''अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदे भरीन तिन्ही लोक।।''** **''सर्वत्र सुखिनः सन्तु''**, **''सर्वे सन्तु निरामयः''** ही आपली वैदिक प्रार्थना. नाही होणार एखादा सुखी !!! पण म्हणून "Not Failure, but low aim is a crime". निष्फळता हे पाप नाही, पण ध्येय क्षुद्र ठेवणे हे मात्र निःसंशय पाप आहे. ''मी परमार्थ नेटाने करीन, नामच घेईन, श्रीगुरु-भगवंताचाच दास होईन असं ध्येय असावं.'' गाजराची पुंगी वाजली तर वाजली नाही !!! कोशिंबीर करू असं पळ काढू धोरण नको.

पांगळा आशावादी परमार्थ/उपासना/स्वाध्याय नसावा. तर कृतिशील असावा. ध्येय नजरेआड कधीच करू नये. परमार्थ सवडीने करायचा नाही तर मोठ्या आवडीने करायचा पहा. त्यासाठी अथक प्रयत्नांनी घाम गाळावा, आपला रक्ताचा थेंब न् थेंब त्यासाठी वापरावा. मग दयाघन, कृपाळू परमपुरुषाला करुणा येतेच. आपल्या साधनरुप उदबत्तीचा सुगंध भगवंताला शंभर नाही तर सव्वाशे टक्के येतोच.

परमार्थ आनंदस्वरूपता सांगतो, शिकवतो. आनंद होऊन जगण्याची दृष्टी देते ते तत्त्वज्ञान. इंग्रजीत चेक लिहिताना लिहितात Five lakhs only पाच लाख मिळाले तरी only ???!!! गुजरातीत चेक लिहितात तर कसा लिहितात माहित आहे ? ''दस हजार पूरा''.... यात समाधान **आहे, आनंद** आहे

आणि  बघा ना काय तऱ्हा. माणसाची मनोवृत्ती भाषेतून व्यक्त होते. संत वाङ्मय, गीता, भागवत, उपनिषदे, रामायण, महाभारत जीवनाबद्दल भाव-श्रेष्ठ भाव निर्माण करतात; अभाव नाही.

भगवंताचं/श्रीगुरुंचं लेकरू समृद्ध. समृद्ध तो की जो भक्तीभावाने संपन्न आहे. भाव-प्रेम-भक्तीने भरला आहे. या लेकराची भाषादेखील संपन्न. टिकणे ही गोष्ट वेगळी आणि संपन्नता ही गोष्ट पूर्णतः वेगळी. वेद-शास्त्र-उपनिषद्-संतग्रंथ टिकलेही आहेत आणि संपन्नही. भावयुक्त, भक्तीने भरलेला, **समाधानाची** ज्याला ढेकर आली आहे तो समृद्ध.

भगवंताला असं लेकरू फार-फार प्रिय बघा. "My man", **''यो मद्भक्तः समे प्रियः''** केवढं भाग्यवान लेकरू ना !!!??? गीतेच्या बाराव्या अध्यायात या लाडक्या लेकराचं अतिशय सुंदर वर्णन आहे.

श्रीगुरु पुत्राचं/कन्येचं जीवन मधुराभक्तीने दाटतं, त्यात भावभक्तीचा प्रसाद फुलतो. आनंदाचा बगीचा बहरतो, भक्तीप्रेमानंदाचा रसविषय होतो. भगवंत कधी लेकराला आपल्या हातांनी उंच फेकतो ते पुन्हा झेलण्यासाठीच ना ??? हा सगळा त्या आनंदकंदाचा आनंदसोहळा. मंद हासतो, मूकपणे अनुमोदन देतो तर कधी आपल्या लाडक्याला कवेत घेतो. आपण दास व्हावं, मित्र असावं, त्याचा सखा बनून रहावं, अंती आपण अखंड भक्तीप्रेमधारेची राधा हातो, होऊन जातो. त्या मधु मधुर मधुमिलिंदाच्या अधरामृतपानाने.

* * * *




जन्माला आलं की कर्म अटळच आहे आणि ते केलेच पाहिजे. कर्म करण्याला आपण नाही म्हटले तर ते चालणारच नाही. कर्म करायचे की नाही आपल्या हातातली गोष्टच नाही. मात्र कोणती कर्मे करायची व कोणती

करायची नाहीत हे थोडेफार आपल्या हातात असू शकते. मात्र एक गोष्ट शंभर टक्के आपल्या हातात आहे ती म्हणजे कोणतेही कर्म करत असताना नाम घेणे, त्याचे स्मरणात असणे.

कर्माची भौतिक फळे तीन आहेत. अन्य फळे आहेत (विकास, मुक्ती, पुण्य) ही मोजायचीच नसतात. फलांत लघु-लघु फल म्हणजे भौतिक फळ, जे इथे मिळते ते फळ म्हणजे ''भौतिक''. कीर्ती, लक्ष्मी आणि विद्या ही तीन भौतिक फळे इथे मिळतात (या लोकी), पण गंमत अशी आहे, ही तीन्हीही फळे सोबत दुर्गुण (काही) घेऊन येतात. कीर्ती (लौकिक) माणसाला ''**बेफाम**'' बनवते, लक्ष्मी माणसाची वृत्ती बिघडवते !!!??? आणि विद्या माणसाला घमेंड आणते. म्हणून म्हणाले भगवान्, कर्मफळाची ''**आसक्ती**'' राखू नका.

लोक अर्धवट वाचतात आणि कीर्ती, लक्ष्मी आणि विद्या ही एकंदर मिळवायलाच नकोत या चुकीच्या निर्णयावर येतात आणि गुहेत जाऊन बसतात. परंतु वेदांना हे अभिप्रेत नाही, हा निर्णय खऱ्या विचारवंताचा नाही, तर हा निर्णय अनुभवाशिवाय काही पलायनवादी विचारधारा असणाऱ्या लोकांचा आहे.

म्हणून लक्षात ठेवायचे की, कर्म करून **मागितलेली** जी फळे असतात ती दुर्गुण असतात आणि कर्म करून भगवंताने बक्षिस म्हणून मोठ्या **प्रेमभावाने** आपल्याला दिलेली जी फळे असतात ती मात्र सोबत दुर्गुण आणीत नाहीत. म्हणून आपले वेद, शास्त्र, पुराणे, संत-महात्मे यांच्यादृष्टीने कीर्ती, वित्त किंवा विद्या त्याज्य-दूषणास्पद नाहीत, फक्त कोणत्या मार्गाने ती आहेत (मागितली आहेत का मिळाली आहेत) ते मात्र बघायला हवे.

मागितल्यावर जे फळ मिळते की, ''या कर्माचे हे फळ मला मिळाले पाहिजे''. त्यात देखील दोन प्रकार आहेत. कर्म करण्याआधी मागितलेले फळ आणि कर्म केल्यावर मागितलेले फळ. आधी फळ मागतो, आधी नवस

बोलतो आणि नंतर शिरा खाऊ घालतो (सत्य ??? नारायण) !!! अशा माणसाचा भगवंतावर पूर्ण अविश्वासच ना ???

म्हणून आपण फक्त त्याच्या स्मरणात राहून कर्म करावं आणि भगवंतावर विश्वास ठेवावा. श्रीगुरुवचन हृदयी बळकट धरावं, त्याच्या चरणी घट्ट मिठी घालावी. भगवंत मग आपणहूनच विचारतो, "तुझे एवढे असे असे सत्कर्म आहे, तुला त्याचे काय फळ द्यायचे ?" आणि त्यावेळी जो म्हणतो की, "भगवंता माझ्या विकासासाठी/कल्याणासाठी जे तुला योग्य वाटेल तेच दे बाबा". "मी तुझ्याकडे थोडेच काही मागितले आहे ??? मी फक्त तुझी सेवा म्हणून कर्म करतोय." असे जे असतात त्यांना कर्माची फळे बक्षिस रुपाने मिळालेली असतात.

म्हणून संपत्ती आली तरी वृत्ती बिघडत नाही, कीर्ती मिळवूनही उन्मत्त होत नाही आणि विद्यावान होऊनही घमेंडखोर होत नाही. अशी दोन प्रकारची माणसे आपल्याला दिसतात. पैसा असूनही कित्येक सरळ असतात, उदार असतात आणि कित्येक उगाचच अहंकारी असतात.

याचे कारण एकाने कर्म समजून केले आणि दुसऱ्याने न समजता फलाकांक्षा ठेवून केले आहे. मूळ मुद्दा असा की फळाबाबतीत वादच नाही. आपण कोणत्या रुपात फळ आणतो याविषयी वाद आहे. म्हणून भगवान गीता अध्याय ४ श्लोक २० मध्ये "**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं**" असे म्हणतात. "**कर्मसङ्गं त्वक्त्वा**" असे म्हणत नाहीत.

कर्मफळाचा संग सोडल्यावर नेहमी एक अडचण निर्माण होते. फळाचा संग सोडल्यावर इच्छा होत नाही आणि इच्छा नाही म्हणून मग कर्मच होत नाही. पण पुन: एक प्रश्न ??? कर्म तर थांबून चालणार नाही !!! मग आता यातून काय मार्ग काढायचा ??? तर "**हेतूरहित**" इच्छा निर्माण करणे आणि त्या सहज इच्छेशी प्रसन्नपणे खेळायचे. इच्छेत आसक्ती चिकटली तर पंचाईत. न चिकटता (भिंतीला) चेंडू (इच्छेचा) परत आला तरच **खेळ** होतो. "**खेळा ऐसा प्रपंच मानावा**" त्याचं विवरण बघा पटतयं का ???

* * * *

# चिंतन २८७

“**नित्यतृप्त**” नेहमीच जो तृप्त आहे तोच नित्यतृप्त. “**नित्य**” शब्दात दोन गोष्टींचा समावेश आहे. एक व्यवहार आणि दुसरा परमार्थ. जशी व्यवहारात तृप्तता तशीच परमार्थातपण. श्री पुंडलिकराय आपले काम माता-पित्यांची सेवा करीत होते; एवढ्यात भगवंत त्यांना भेटायला आला; तेंव्हा म्हणाले, “जरा उभा रहा, आता मला वेळ नाही.” असे म्हणून उभे रहाण्यासाठी त्यांनी भगवंताला वीट दिली. केवढी कर्तव्य निष्ठा - त्यातून आलेली “**तृप्तता**”.

काही जणांना यात एक मोठी शंका येते. शंका अशी “अतृप्तीनंतरच तृप्ती येते” त्यांच म्हणण अस की, “प्रथम जर अतृप्ति नसेल तर तृप्तीला काही अर्थच नाही.” म्हणून त्यांना “नित्यतृप्त” हा शब्द काहीसा घोटाळ्याचा असा वाटतो. त्यांच्या मते माणूस नित्यतृप्त असूच शकत नाही; पण प्रत्येक क्रिया-कर्म अतृप्तितूनच आकाराला येते हा त्यांचा तर्क खरा नाही.

कित्येक क्रिया/कर्म “खेळ” म्हणूनही होतात. खेळात काही अतृप्ती नाही. तर निखळ आनंद. भर्तृहरिसारखा राजा म्हणतो, “मला भूक लागली असताना एक घास अन्न खावयास मिळाले तरीसुद्धा सुख वाटते. पण सुख स्वतंत्रपणेही वाटू शकते.” तो म्हणतो, “खडीसाखरेशिवाय माझा जीव काही व्याकुळ होत नाही; किंवा केव्हा एकदा ती मिळेल असेही वाटत नाही. पण जर कोणी मला खडीसाखर दिली आणि ती मी जिभेवर ठेवली तर ती गोडच लागते ना? त्या गोडीसाठी अंतरात अतृप्तिच असली पाहिजे असेच काही नाही.”

पहा! आपण अगदी सहज फिरता-फिरता बगीचा लागला. बगीचातील एखादे सुंदर-सुगंधी फूल पाहिले-सहज दिसले तर आपल्याला फार छान वाटते; आणि आपल्याला सहजच **आनंद** होतो. फूल दिसण्याच्या आधी अतृप्ती थोडीच होती? सुखाच्या आधि दुःख असलेच पाहिजे ही कल्पनाच

मुळात निराधार आहे. अगदी त्याच प्रकारे अतृप्ती असेल तरच तृप्ती येते अस म्हणण हेही काही योग्य नाही. खेळाच्या बाबतीत (प्रपंचाच्या) पण अगदी असेच आहे बर का!

भगवंत स्वत: आपल्यासोबत असाच चेंडूचा (इच्छा) खेळ खेळत असतो. खेळात चेंडू जसा भिंतीवर आपटून मागे आला पाहिजे तसाच इच्छेचा चेंडू आपल्या हाती परत आला पाहिजे. संतमहात्मे विश्वात असे खेळतात. नित्यतृप्त माणसे हा **खेळ** म्हणूनच जीवन जगतात.

हे लोक (महात्मे) जे जीवन जगतात, इच्छा करतात, कर्म करतात ते अवघ्यांना आनंद व्हावा म्हणून करतात. ‘‘**आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।**’’ जशी घर (खरे घर) चालवणारी ‘‘आई’’ मुलीच्या आनंदासाठी भातुकलीचा खेळ खेळते, तसेच हे महावैष्णव नित्यतृप्त असूनही दुसऱ्याच्या आनंदासाठी कृतिशील असतात.

नित्यतृप्तांनी दुसरे आनंदित व्हावेत अशासाठी कृती केली तरी कृती तर घडणारच ना? म्हणून ‘‘नित्यतृप्त’’ याचा अर्थ फक्त ‘‘**सदैव तृप्त**’’ एवढाच घेऊन चालणार नाही. मग काय अर्थ? तर ‘‘**नित्य**’’ कडून जो तृप्त तो ‘‘**नित्यतृप्त**’’.

नित्य एक प्रभू/भगवंतच ‘‘नित्य, सर्वगत, स्थाणू, अचल, आणि सनातन फक्त तोच तेवढा. आणि जगत् अनित्य.’’ महाभागवत जे नित्यतृप्त असतात याचे कारण ते नित्याकडून/भगवंताकडून तृप्त असतात. जगताकडून नाहीत. जगताकडून कधीच तृप्तता लाभत नाही. आपण सदैव अतृप्तच का? तर आपल्याला हवे ते भगवंताकडून मिळत नाही; मिळाले तर पटत नाही; पटले तर पुरत नाही. एकूण काय तर शेवटी अतृप्तताच ना?

नित्यतृप्ताच्या सर्व मनोरथांची पूर्तता-तृप्ती कर्मांनी पूर्ण होत नाही तर भगवंताच्या प्रसादाने (लाडू-पेढे-खडीसाखर नव्हे) पूर्ण होतात. जसे कुंतीमातेच्या हाताचा घास खाऊन मग भीमाला ढेकरा आल्या, तसच नित्य/ भगवंताकडून जो तृप्त झालेला असतो त्यालाच सदैव तृप्तीच्या ढेकरा येतात.

भगवंताच्या प्रसादाने त्याच्या हाताने/श्रीगुरूंच्या हाताने खाऊन तृप्ति

येते, एवढेच नाही तर श्रीगुरू/भगवंतासंबंधी नुसती कल्पना केली तरी तृप्तता येते. भगवंताच्या/श्रीगुरूंच्या स्पर्शाचा अनुभव आला तर सर्वच गात्रे तृप्त होतात. सर्व अंगोपांगांना आनंद देणारा भगवत्/ईश/श्रीगुरू स्पर्श असतो. तो इंद्रियातीत असतो. त्यात आसक्ती उरतच नाही.

* * * *




अनन्यभावाने, सर्वभावाने आपण भगवंताचे हातात हात द्यावा. एकदा का भगवंताच्या/श्रीगुरूच्या हाती आपला हात दिला की आपल्या हातावरच्या सर्व रेषा पुसल्या जातात. मग भगवंताच्या/श्रीगुरूच्या हाती हात दिलेल्याचे प्रारब्ध नाही. त्याची कुंडली नाही. कोणाला त्याची पत्रिका काढायची असेल, ग्रहमान बघायचे असेल तर बघोत बापडे!

दैव मानणे वेगळे आणि भगवंतावर/श्रीगुरूवर सर्वतोपरी श्रद्धा, विश्वास, भक्तिप्रेम असणे वेगळे. असे लोक धन्य.

जोपर्यंत आपल्या डोक्यात प्रारब्धाची मक्तेदारी/मिजाल आहे तोपर्यंत आपण भगवंताचे नाही. "**सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता**" म्हणजे एक भगवंतच दाता, "**तू हि दाता**". माझे कर्म दाता नाही तर एक **तोच** अशी स्थिती आली, "**ते नित्यतृप्त**" त्यांचे सगळे जीवन सुगंधित.

अशी नित्यतृप्तता निराश्रयता प्राप्त करून देते. निराश्रय म्हणजे एका भगवंताशिवाय/श्रीगुरूशिवाय त्याला जगात कोणाचाही आश्रय नक्की असतो पण निराश्रय म्हणजे अनाश्रित/निराधार नाही. नाही तर निराश्रय शब्दाचा अर्थ असा की ज्याला भगवंताचा/श्रीगुरूंचा महान् आश्रय मिळाला आहे; ज्याचा आश्रय कधीही जाणारच नाही असा समर्थ स्वामी धनी ज्याला मिळाला आहे.

अशा भाग्यवंताची भगवान् परीक्षा करायला कोणाला तरी माणसालाच पाठवत असतो. शिवपुराणात एक प्रसंग आहे. सती-पार्वती स्वतः जेव्हा

तपश्चर्या करायला बसली तेंव्हा खुद्द भगवान् शिवशंकर स्वत: तिची परीक्षा करायला आले. तसच आपल! आपण स्वाध्याय करायचे नक्की केले तर भगवान् कोणाला तरी नेमके त्याच वेळी कोणाला तरी पाठवतात. स्वाध्यायाच्या/नेमाच्या वेळीच नेमकी आत्या/मामी/काकी/मावशी कोणीतरी येऊन टपकते/बसते. आता काय करायचे? त्या आत्या/मामीला सांगा, "तू आली आहेस तर बस तासभर. स्वाध्याय/नेम झाल्यावर मी तुझे यथोचित स्वागत करीनच. का तूपण बसतेस नेमाला/स्वाध्यायाला? भगवंत/श्रीगुरू आपली भक्कमता पहातात. आपली अनंतरूपाने परीक्षा करतात.

पार्वतीची परीक्षा करण्यासाठी शंकरच आले. म्हणले, "तू कशासाठी तपश्चर्या करत आहेस?" तर पार्वती म्हणाली, "भगवान् शिवशंकर पती म्हणून मिळावेत यासाठी तपश्चर्या करत आहे." शंकर म्हणाले, "अग वेडे! तू कधी पाहिले तरी आहेस का? काय आहे त्याच्यापाशी? स्वप्नात जरी त्याचे रूप पाहिलेस तरी घाबरून जाशील. त्याचे कुळ-शील, घर-दार, पैसा अडका काही पाहिलस?"

पार्वतीने हे ऐकले आणि म्हणाली, "फार झाले, जास्त बोललात तर याद राखा. माझा तो आश्रय आहे." सांगायचे तात्पर्य म्हणजे कायमस्वरूपी आश्रय. बाकी सर्व आश्रय कामचलाऊ (Temporary). निराश्रय याचा सूक्ष्म अर्थ ज्याचा आश्रय **दिसत** नाही; सूक्ष्म-गुप्त झाकलेला आहे. पण तो दैवी आहे. भगवंत/श्रीगुरू.

बाकी व्यवहारातील सर्व आश्रय बघायला मिळतात वित्ताश्रय, राजाश्रय, लोकाश्रय, सत्ताश्रय आणि कित्येक तरी. हे सर्व दिसतात. पण ईश्वराश्रय/श्रीगुरूआश्रय जो सदैव आहे, त्याला **निराश्रय** म्हणतात. याचे कारण न दिसणारा, पण सदैव असणारा आश्रय. अशाप्रकारे आश्रय रहित म्हणजे भगवंताच्या/श्रीगुरूंच्या आश्रयासहित, त्यांच्या कृपांकित. ज्यांना हा आश्रय मिळाला असे भाग्यवान्. धन्य लोक.

असा आश्रय लाभला तर तो पकडता आला पाहिजे. त्या आश्रयाला घट्ट धरून ठेवायला पाहिजे. सर्वाहून अधिक सामर्थ्य आश्रयाचे आहे. अशा भक्कम आश्रयाने पै किमतीचीही बरकत कैक रूपयात होते.

* * * *




एकदा भगवान् शिवशंकर श्रीविष्णूंना भेटायला म्हणून गेले. मूर्ख माणसं त्यांच्यात भेद मानतात आणि वैर धरतात. पण तसे मात्र नाही. भेटायला गेले. दरवाजावर होती गरूडाची स्वारी. आता महादेवांच्या गळ्यात सर्प. त्यांनी गरूडावर फुत्कार टाकला. विनाकारण टाकला. तेंव्हा गरूड त्या सर्पाला काय म्हणला ?

**जानामि नागेंद्र तव प्रभावं**
**कंठे स्थितो गर्जसि शंकरस्य।**
**स्थानं प्रधानं, न बलं प्रधानं**
**स्थाने स्थित: कापुरूषोऽपि शूर:।।**

आता तू शंकरांच्या गळ्यात आहेस म्हणून तुझा फुत्कार सुरू आहे. ठीक आहे. खाली उतरून ये मग दाखवतो. तुझी काय ताकद, प्रभाव आहे मला चांगला माहीत आहे.

महदाश्रयाचा हा परिणाम. गावामागील ओहोळ गंगेत मिळाला तर मग अख्खी दुनिया त्याला नमस्कार करते ना? म्हणून आश्रय महान् असावा. भगवंताचा/श्रीगुरूंचा.

श्रीगुरू/भगवंत आश्रय देऊन लपून राहतात. लपून राहणे हेच त्यांच वैशिष्ट्य आहे. आपल्याकडे संपूर्ण चातुर्मासी देव झोपून राहतो. उगा बसतो. भगवंताचा भक्त म्हणतो, ''देवा अन्न, पाणी, हवा, प्रकाश सगळे तूच दिलेस.'' तर तो म्हणतो, ''नाही-नाही हे सगळे तुझ्याच कर्तृत्वाचे आहे बाबा.'' असे म्हणून देव/ श्रीगुरू पुन: नामानिराळे राहतात. यातून भगवंताचे/श्रीगुरूंचे मोठे मन दिसते.

भगवंताचे चातुर्मासातील झोपणे अलौकिक आहे. निराश्रयाचा आणिक एक अर्थ असा - आश्रय देऊनही ''मी देत नाही'' असे म्हणणारा.

सगळ्यांच सगळ यथासांग करून आणि प्रेमभावभक्तिन करताना मग्न होऊन, भान हरपून सर्वस्व पणाला लावून करतानाही पुनः **''नैव किञ्चित करोति सः।।''** हे श्री जीवन. फार अवघड आहे ही हातोटी.

श्रीकृष्णाचे जीवन पहा. वैरभावाने, सूडाने शेवटी चिडून अश्वत्थाम्याने पांडवकुळ निःसंतान व्हावे म्हणून उत्तरेच्या गर्भावर अस्त्र सोडले. त्यावेळी त्या गर्भाचे रक्षण करण्यासाठी स्वतः भगवान् श्रीकृष्ण उभा राहिला आणि म्हणाला -

**नोक्त-पूर्वं मया मिथ्या, स्वैरेष्वपि कदाचन।**
**नच युद्धात्परावृत्तस्तथा संजीवतामयम्।।**

जीवनात मी कधी थट्टेतही खोटे बोललो नसेन आणि युद्धातून कधीही परावृत्त झालो नसेन, स्वैर वागलो नसेन तर हे बालक जिवंत होवो. अगदी हातावरून पाणी सोडून म्हणाला. कमाल आहे त्याची. मस्करीत काय पण गंभीर प्रसंगातही हा खोटे बोललेला. जरासंधाबरोबर सतराव्या युद्धप्रसंगी रणांगण सोडून पळाला; नाही का?

कृष्ण असे प्रतिज्ञापूर्वक म्हणाला, आणि निसर्गाचा नियम तोडून गर्भ जिवंत राहिला. पण कृष्णाला ही बोलून घ्याव लागल, ऐकाव लागल, सोसाव लागल. एका भक्तीसाठी. भगवंताचे सोडून द्या. पण निराश्रय लोक कर्तव्यात मग्न राहूनहि **''सः न करोति।''** तर **''कः करोति?''** तर मग कोण करतो? भगवंत सांगतो, **''अहं करोमि.''** कर्म होत नाही असे नसून तो करत नाही असे म्हणतो. भगवान् म्हणतात, ''He is not responsible'' हा कर्म करताना दिसत असेल तरी त्याची संपूर्ण जबाबदारी माझी आहे. ''My Man'' **''यो मद्भक्तः स मे प्रियः।''** केवढे भाग्य ना अशा या भगवंताला प्रिय असणाऱ्यांचे? लोकोत्तर महात्मे. का तर एक भगवंताचा/श्रीगुरूंचा आश्रय खर ना?

जगात जन्माला आल्यावर त्याच्याच आश्रयाने असावे. मग तो जबाबदारी उचलतोच पहा.

अशांच्या ठिकाणी कोणा विषयी, कोणत्याही प्रकारचे यत्किंचित्

किल्मिष नसते, कोणत्याही प्रकारचे पाप नसते; कुणाचा दुष्टावा नसतो; राग नसतो; दुःस्वास नसतो. त्यांना बोलल, रागावल, तोडल, फोडल, मोडल तरी सर्वांच कल्याणच चिंततात. नुसत चिंतत नाहीत तर त्यासाठी झटतात. खपतात. झोकून देतात.

भगवंताचे लाडके असतात; त्यामुळे सगळ्यांचे लाड करतात. लाड करताना चुकल तर बोट दाखवतात. पण लाड करून घेण आवडत, बोट दाखवलेल खपत नाही. तरीपण दाखवतातच. का तर कल्याणासाठीच. चंदन स्वतः झिजते पण झिजवणाऱ्याला फक्त सुगंधच देते. उदबत्ती जळते पण अवघ्यांना सुगंधच देते.

* * * *




महावैष्णव भगवद्भक्त हे सदा सर्वदा सर्वांगाने प्रभुप्रेमात डोलत असतात. लडिवाळपणे भक्तिप्रेमसुख भोगून प्रसन्नतेचा-स्वानंदसुखाचा-आनंदामृताचा जगावर सतत वर्षाव करत असतात. जीवांच्या जड भावना सजीव करतात. चेतन करतात.

ज्याने जगत् निर्माण केले, त्या निर्गुण-निराकार-अव्यक्त परमात्म्याला आपल्या भक्तीप्रेमाने सगुण साकार व्हावयास लावतात. केवढे महान हे महात्मे ? केवढा त्यांचा भाव! "**विश्वव्यापक कमलापति। गौळणी त्यासी कडिये घेती।**" केवढी ही प्रचंड भक्तिप्रेमाची नवलाई!

सर्व सुख आणि आत्मानंद मनाच्या उन्मनी अवस्थेत आहे. "**या नांव अंतरा आला नारायण। चित्ती समाधान खूण त्याची।।**"

भगवंताशी बोलावे, त्याच्याबरोबर हास्य-विनोद करावा, त्याच्यावरच रूसावे, त्यालाच **अंतरीच्या गुजगोष्टी** सांगाव्यात, त्याच्याबरोबर रममाण

व्हावे, तोच आपला एकमेव सर्वस्वी आधार आहे. हाच एकविध भाव भक्तजनांचा स्थायिभाव असतो.

अशा या संतांच्या जवळ भक्तीप्रेमसुखाचे झरे अखंड झुळझुळ-झुळझुळ वाहत असतात. अमृताच्या खाणीच असतात. परमशांतीची नंदनवने येथेच आढळतात. "**या या वैष्णवांच्या घरी। प्रेमसुख ईच्छा करी। ऋद्धी सिद्धि द्वारी। कर जोडूनि तिष्ठती।।**"

हे दिव्य, परमपवित्र, पुण्यवंत, पुण्यात्मे संतजन जेव्हा आपले कृपादृष्टिकिरण **सत्साधकावर,** निर्मळ भावाच्या जीवावर फेकतात त्यावेळी तो निर्मळ जीव आनंदाच्या गाभाऱ्यात प्रवेश करतो. असा आनंदप्रकाश देणारे उज्ज्वल तारे म्हणजे हे संतमहात्मे.

या संतांच्या भगवद्‌भक्तीचे विशेष कौतुक हे की ब्रह्मांडनायकाला ते प्रेमसत्ताबलाने अंकित करतात. या प्रेमभावामुळे भगवंत त्यांच्या स्वाधीन होतो. रमानायकाला त्यांची गोडी लागते. किती? तर या रसराज रसेश्वराला भक्त-मुखातील अमृतपानाची गोडी लागते. वैकुंठातील अमृतापेक्षाही गोविंदास या सुखाची-भावरसाची गोडी जास्त भावते.

भगवंत हा रसास्वाद चाखण्यास धावून येतो. केंव्हा? **निर्मळ** अंत:करणात भगवत्प्रेमाचा झरा वाहू लागल्यावर. तेथे मग मनातील सुप्त भक्तीप्रेमभाव जागृत होतात. स्वयंप्रकाश, स्वानंद ज्योत भक्तीप्रेमात भिजून हृदयाच्या गाभाऱ्यात अखंडत्वाने तेवू लागते. "**परं प्रेमास्पद यत:**" अत्युत्कट परमप्रेमभावाचे स्थान भगवंत आहे. तो आनंदकंद आहे.

भक्तीप्रेम हा हृदयाचा निजधर्म आहे. तर **आनंद** हेच भगवंताचे स्वरूप आहे. आपल्या कृती अंतर्मुख झाल्यावर त्या भगवंतात लीन होतात. बुद्धी परमात्म्यात स्थिर होते.

वृत्ती अंतर्मुख होण्याचे साधन आनंदपुरूषोत्तमाचे आनंददायक नाम. हे नाम श्वासाबरोबर घ्यावे. नामाचे अखंड अनुसंधान राखावे. मग काय होते? "**नाही या आनंदासी तोटा। सांगता गोष्टी लागतो गोडा।।**" आनंदच आनंद.

* * * *

# चिंतन २९१

अतीन्द्रियम् म्हणजे इंद्रियांच्या पलीकडील. ब्रह्मसुख ही ज्याच्यावरून कुर्वंडी करून टाकावे असे परमश्रेष्ठ "भक्तीप्रेमसुख." ते अनुभवता येते इंद्रियांच्या पलीकडे गेल्यावर. **"रमन्ते योगिनेऽनन्ते सत्यानन्दे चिदात्मनि."** योगी जन देखील आनंदसागर असणाऱ्या हृदयस्थ परमात्म्याच्या ठिकाणी ध्यानाद्वारा धारणा करतात आणि मग स्वानंद अनुभवतात. असे सुख इंद्रियांना कसे अनुभवता येणार?

मग हे "चित्सुख" कसे आहे? तर **"देशे काळे वेदानुवादा। ज्या सुखाची न करवे मर्यादा। त्या सुखाची सुखसंपदा। मद्भक्त सदा भोगिती।।" "गोकुळीच्या सुखा। अंत-पार नाही लेखा।।"** असे श्रीतुकोबाराय या सुखाच्याच गोपीभावावर आरूढ होऊन वर्णन करतात. गोपीनी तर विचारलय, **"नित्यानंदापुढे आनंद तो कोण?"** म्हणून. **"सुखसागर परमानंद"** असे महात्मे म्हणतात, **"ते सुख काय सांगो?। वाचे बोलता न ये।।"**

हा भक्तीप्रेमानंद अनंत आहे; त्याला अंत नाही. हे कसे? तर आत्माराम शाश्वत आहे; सत् आहे, चित् आहे आणि आनंदघन आहे. भक्त हा आत्मारामपदी आरूढ झालेला असतो. त्यामुळे भगवंत (आत्माराम) आणि भक्त या दोघामधील (दिसायला दोन पण असत एकच) भक्तीप्रेमभावाचे आदान-प्रदानही शाश्वत असते.

अज्ञ-जड-मूढ माणसाला या शाश्वत सुस्वरूपतेची कल्पनाच नसते. तो नेहमीच या पांचभौतिक जगातील क्षणभंगुर सुखाच्या-मृगजळाच्या मागे धावत असतो. एक फार मार्मिक दृष्टांत आहे. एका बनेल पण हुषार लोभी माणसाला एक मंदबुद्धी आळशी जडमूढ माणूस भेटला. या मूर्खाचा त्या बनेल माणसावर विश्वास बसला. दोघांची घनिष्ट मैत्री झाली. या दोघांना समान

भागीदार समजून एकाने ५०० सुवर्ण मोहरा या बनेल माणसाला दिल्या. हा तर पुरता बनेल! तो भोळ्या माणसाला म्हणाला, ''जेवढ्या मला तेवढ्याच तुला. समसमान. आणि मोहरा ठेवल्या आरशापुढे. आरशापुढील ढीग माझा म्हणाला व आरशातील तुझा; झाली ना वाटणी बरोबर?'' आता आरशातील मोहरांचा ढीग त्या मूर्खाला खरा वाटला! प्रत्यक्षात त्याच्या हाती काय आल? तसच भौतिक सुख!

महाभारतात एक गंमतीदार कथा आहे. एका माणसाला ऊस कसा असतो ते काहीच ठाऊक नव्हत. त्याला कुणीतरी सांगितल की ऊस गोड असतो. त्याच्या गंडेऱ्या/कर्वे गोड असतात, रस तर काय गोडच-गोड. चघळला की गोड लागतो, जास्तच. हा म्हणाला, ''ओह वा-वा, पण काय हा कसा दिसतो-असतो? हा ऊस.'' लोकांनी सांगितल अरे बाबा आपला बांबू असतो ना अगदी तसाच दिसतो बघ! हा मूर्खच. त्याने जून, तसेच कोवळे हिरवेगार बांबू, त्याची कांड चाखायला सुरवात केली. चघळू लागला. आता कुठला रस आणि काय? दातांची-हिरड्यांची मात्र वाट लागली झाल.

आता बांबू जरी ऊसासारखा दिसत असला, तरी बांबू चघळून ऊसाची गोडी/रस कसा चाखणार नां? तसच भौतिक सुखाच. स्वानंदसुखनिवासी जोग महाराज म्हणायचे, ''कापसाचा मोठा बोळा अगदी लोण्यासारखा मृदू आणि पांढरा शुभ्र-धवल दिसला तरी तो चघळून थोडाच लोण्याचा स्वाद-आनंद-माधुर्य कळणार?'' श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ''भौतिक सुख म्हणजे आकाशातील चमकणाऱ्या वीजेप्रमाणे. लपंडावाचा खेळ नुसता.'' **''वीजेचा उदय। तोची अस्तु।।''** तात्पुरती चमकताना दिसते; परंतु मूळ विद्युत ही या चमकण्याच्याही पलीकडे आहे. मनुष्याला पण आपल्या मूळ, स्वयंभू, स्वत: सिद्ध ''सुस्वरूपतेची'' जाण नसल्याने तो या आपल्याच स्वानंदाला पारखा होऊन बसतो.

आपल्या स्वानंदसाम्राज्यात कायमस्वरूपी स्थित राहण्यासाठी केवळ **''भक्तीप्रेमभाव''** हाच एक निखालस खरा-खरा उपाय आहे. ह्या भक्तीप्रेमभावामुळे आपल्यात लपलेलाच आनंदसागर श्रीकृष्ण/परब्रह्मपरमात्मा/

भगवंत अनुभवास येऊ लागतो. हा अनुभव येण्यासाठी भक्तीभावाने भगवत्‌नाम घ्यावे लागते. जसे जसे नाम खोल-खोल आपल्या अंत:करणवृत्तीपर्यंत जाईल तसतशी आपलीच स्वानंदस्वरूपता अनुभवाला येते. या स्वाभाविक स्वानंदसुखातील रसोत्कर्षता अधिकाधिक वाढतच जाते.

ज्यांनी हापूस अंब्याचा रस चाखला, ते मग कांजी कशाला सेवन करतील ना? "**हा रस आनंदाचा। घोष करा हरिनामाचा।।**" अशी सगळ्या संतमहात्म्यांची ग्वाही आहे.

* * * *



# चिंतन २१२

परमसत्य भगवंताच्या साक्षात्कारसुखात भौतिक क्षणभंगुर सुखाबद्दल हळूहळू अनासक्तता निर्माण होते. भक्तीमार्गाने अशा प्रकारे भक्तीप्रेमसुखाच्या अत्युच्च शिखरावर आरूढ झाल्याचा परिणाम काय होतो?

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं तत:।**

**यस्मिन्स्थितो न दु:खेन गुरूणापि विचाल्यते।।**

जे महासुख लाभल्यावर, याच्यापेक्षा अधिक श्रेष्ठ असे काही असेल असे भगवद्‌भक्ताला वाटतच नाही आणि अशा महासुखावर आरूढ झाल्यावर मग मोठ-मोठ्या दु:खानेही हा कधीच विचलित होत नाही. "**तुका म्हणे आता। लाभ नाही या परता।।**"

भक्तीप्रेमभाव हा इतका शक्तीशाली, संपन्न, समर्थ आहे की जो आपल्याला अतिभयानक अशा संकटांमधूनही तारू शकतो. भक्तीप्रेमरस ज्यांनी चाखला त्याला मग इतर तथाकथित सुखे शुष्क आणि नीरसच वाटू लागतात. जो कोणी या भक्तीमार्गावर दृढ पाऊल रोवतो त्याला संसाराची कसलीच बाधा

होत नाही. जीवनात कितीतरी घोर विघ्न येतात, कारण हा सगळा संसारपसाराच मुळी संकटांनी भरलेला आहे. "**जन्माचे ते मूळ पाहिले शोधुनि। दुःखासी कारण जन्म घ्यावा।।**" जन्म, जरा, आधी, व्याधी कितीतरी!

श्रीमद्भागवतामध्ये या भौतिक विश्वाची तुलना विशाल महासागराशी केली आहे. हे जगत हाच एक दुःखाचा महासागर आहे. जन्म-मृत्यूचा सागर आहे. हा भासमान् होणारा अज्ञानसागर तरून जाण्यासाठी एखाद्या प्रबळ नौकेचीच नितांत गरज आहे; आणि ती प्रबळ नौका म्हणजे भगवंताचे/श्रीगुरूंचे चरणकमळ! भक्तांनी या चरणाचा आश्रय घेतल्यावर तो या चरणाच्या आधारे अगदी लीलया तरून जातो. भक्तासाठी हा भवसागर एखाद्या वासराच्या खुराने तयार झालेल्या खळग्यातील पाण्याएवढाच होतो. हा लहानसा खळगा पार करणं मग भक्ताला काहीच जड जात नाही. आपले श्रीज्ञानराय तर म्हणतात, "**तया ऐलीच थडी सरले। मायाजळ।।**"

मन नेहमीच क्षणभंगुर सुखाच्या नव्या-नव्या कल्पना करत असते; परंतु सत्य आणि कल्पना यातच मुळात जमीन-अस्मानाएवढा फरक नाही का? मग सत्य आनंदकारक की कल्पना? "हे सुख, ते सुख, इथ सुख, तिथे सुख, ह्यात सुख, त्यात सुख" अशा प्रकारे मन आपल्याला सतत ओढत असते ना? जणू काही आपण लगाम नसलेल्या अशा चार घोड्यांच्या रथात बसलो आहोत आणि ही सर्व घोडी उच्छृंखल आहेत. आपल्या बाहूत बल नाही, हातात लगाम नाही. केवळ असहाय्य भावनेने रथात बसून रहावे लागते. जाईल तिकडे जाईल.

पण "**राम-कृष्ण-हरी**" या भगवत् नामाच्या स्मरणाने मन त्या आनंद-रसात रत झाले की मग घोड्यासहित रथ आपल्या ताब्यात येतो; आणि भक्तीच्या राजरस्त्यावरून मोठ्या डौलात, ऐश्वर्याने मार्ग आक्रमण होते. सुखाच्या-महासुखाच्या ह्या राजरस्त्यावरून पाऊलघड्या घातलेल्या असतात भगवत्सेवेच्या, त्यावर गालिचे आंथरलेले असतात अनुसंधानाचे, भगवत्नाम आणि रूप यांच्या दाट-सुबक-घट्ट विणीचे, वर पुष्पे पसरलेली असतात भक्तीप्रेमसुखाची आणि सडे रांगोळ्या घातलेल्या असतात भक्तीरसाच्या.

मग प्रवास सुखाचा, आनंदाचा-महानंदाचा. भगवंताच्या दिव्य भक्तीप्रेमस्वरूप नामस्मरणसेवेमध्ये, त्याला लाभ होतो परिपूर्णसुखाच्या परमोच्च दिव्य-अतिदिव्य अशा अमृताभिषेकाचा. त्या रसातून प्राप्त होत असते ''शांती-पुष्टी-तुष्टी.''

भगवंत शरणागत, अखंडतेने स्मरण करणाऱ्या आपल्या भक्ताची सर्वतोपरी काळजी घेतो. भगवंत/श्रीगुरू हाच जीवाचा जिव्हाळा आहे, सुहृद आहे, सखा आहे.

भगवंताशी/श्रीगुरूंशी हा नातेसंबंध अधिकाधिक दृढ करण्याचा एकच एक मार्ग आहे तो म्हणजे ''भक्तीप्रेमामृतधारा'' ही धारा भगवंत आणि आपण यातले अंतरच संपवते. एकच एक सागर येथून-तेथपर्यंत अखंड-एकरस-भक्तीप्रेमरस. काठ-ऐलतीर-पैलतीर विरहित असा केवळ सुखसागरच.

* * * *




**''राम कृष्ण हरि''** या नाममंत्राचे उच्चारण (ध्वनी-नाद) दिव्य आहे. हा नाद-ध्वनी आपल्या मनरुपी दर्पणावरील जमा झालेला अविद्येचा (म्हणजेच स्व-स्वरुपाचा विसर) मळ नाहीसा करत असतो. आपल्या या मनरुपी आरशावर अनंत जन्म-जन्मांतरीची धूळ साचली आहे. मोठ्या-मोठ्या शहरात रहदारीच्या रस्त्यावरील रहदारीने रस्त्याचे कडेला असणाऱ्या घरातील वस्तूंवर धूळच धूळ बसते.

तशीच आपल्या मनावर नाना प्रकारच्या भौतिक कल्पनांची खूप धूळ सांडली आहे. आपण नाही-नाही, नको-नको त्या कल्पना करीत असतो, मात्र **''निर्विकल्पासी कल्पित जावे''** या श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या म्हणण्यानुसार निर्विकार अशा परमात्म्याची कधी कल्पना करीत नाही.

या आपल्या मनरुप आरशावरच्या धुळीमुळे आपण वस्तूमात्रांतील भगवंत पाहात नाही; पण भगवंताच्या दिव्य नाम-संकीर्तनाने/स्मरणाने ही मनावरची धूळ बाजूस होते आणि मग आपल्याला आपल्या मूळ-स्वयंभू स्वरुपस्थितीची/आनंदस्वरुपाची ओळख होते. ज्या क्षणी आपण मी हे शरीर नसून आनंदघन आत्माराम आहे हे अनुभवास येते, त्याच क्षणापासून आपण शाश्वत आनंदस्वरुपी "**स्व-स्थ**" होतो.

या हरिनामाच्या प्रक्रियेमुळे आपले मन-जाणीव-बुद्धी-चेतना अधिकाधिक स्वच्छ, सूक्ष्म, तरल होतात. जसजशी ही प्रक्रिया अखंडपणे होत राहते तसतशी आपली भौतिक दु:खे संपत जातात.

निखळ, निरामय, निरुपचार, निरुपाधिक **आनंद** हे आपले स्वरूप आहे, गुण नव्हे. गुण कमी-जास्त होतात, बदलू शकतात. परंतु स्वरूप बदलू शकत नाही. बघा ना !!! द्रवरुप असणं हे पाण्याचे स्वरुप आहे. आपण काही उपचारांनी या पाण्याला घनरुपता (बर्फ) दिली तरी ती घनरुपता पाणी दीर्घकाळ धरू शकत नाही. पाणी आपल्या मूळच्या द्रवरुप स्वरुपात येणारच. तसंच आपण आनंदघनराम अशा भगवंताचे अंश आहोत. मळभ येते आणि जाते, आकाश हे असतेच. तसेच भौतिक दु:खाचे ढग येतात व काही कालांतराने जातात पण. आनंदस्वरुपता कायमच नाही का ??? नामाने दु:खाचे मळभ कमी-कमी होता होता, यायचेच बंद होते.

भौतिक जगातील कर्तव्ये आणि आध्यात्मीक जीवनातील सेवाभाव एकच नाही. त्यांना कधीच समान समजू नये. जसं मंदिरावरील कळसाला लोटा म्हणून नये अगदी तसंच. भौतिक विश्वातील सेवकाची स्थिती ही कधीच आनंददायी नसते. का तर तेथे स्वामी व सेवक यांच्यात भेद असतो आणि त्यामुळेच सेवक सातत्याने एका अनामिक-अदृष्य अशा पण मोठ्या जबरदस्त दडपणाखाली दबून गेलेला असतो होय ना ???!!!

भक्तीप्रेमभावात मात्र स्वामी-सेवक, भगवंत-भक्त तसेच श्रीगुरु-शिष्य यांच्यामध्ये काहीच भेद नसतो बरं का. आता हेच पाहा ना !!! भगवान

द्वारकाधिश श्रीकृष्ण एका सामान्य सेवकाच्या रुपात अर्जुनाच्या रथाचे सारथी झाले, दौपदीची वस्त्रे झाले, बळीचे द्वारपाल झाले, पुंडलिकासाठी अजूनी तिष्ठत एका विटेवर उभे ठाकले. वास्तविक हे सर्वजण भगवंताचे-दास-सेवक आहेत ना ??? पण आपण पाहतो की, भगवंतच आपल्या सेवकाचे सेवक झाले. ''**दास्य करी दासाचे।**'' असं श्रीतुकोबारायांनी प्रमाण दिले आहे. या दिव्य भक्तीप्रेमस्वरुपस्थितीत भेदच उरत नाही. म्हणूनच भौतिक संकल्पनांची पादत्राणे पायातून काढून टाकून मगच या भक्तीप्रेमभावाच्या राजरस्त्यावर पाऊल ठेवावे.

साखरेपासून गोडी, मीठापासून खारटपणा, दगडापासून घनरुपता अलग करता येत नाही तसा भगवंतापासून भक्त, श्रीगुरुंपासून शिष्य वेगळा नसतोच.

भगवंताचे नाम जर काही करत असेल तर हा जो मूळचा अभेद, एकरुपता आहे, त्याचा नामधारकाला प्रत्यय-अनुभव आणून देते. ''**राम म्हणता रामचि होईजे। पदी बैसोनि पदवी घेईजे।। ऐसे सुख वचनी आहे। विश्वासें अनुभव पाहे।।**'' अशी श्रीतुकाराम महाराजांनी ग्वाही दिली आहे. नामानेच हा अभेद अनुभवास येतो. या हरिनामाच्या संकीर्तनाने/स्मरणाने ''वासुदेवस्वरुपता'' अनुभवी येऊनसुद्धा हरिनाम-स्मरण-सेवा थांबत नाही. ''**ऐसे मीचि होऊनि पांडवा। करिती माझी सेवा।**'' तो नवलाव काय सांगावा ? अशा ओव्यांमधून श्रीज्ञानराजांनी भगवंताच्या मनीचे, नाम-नामी-नामधारक यांच्यातील एकरुप-एकाकारतेचे वर्णन/हृद्गत प्रकट केले आहे.

* * * *

# चिंतन २१४

भक्ति म्हणजे भगवंताविषयी परमप्रेम भाव. ही भक्तिप्रेमभावना मोठी उत्कट हवी. अखंड आणि क्षण प्रतिक्षण वर्धमान होत जाणारी अशी 'भक्तिप्रेम भावधारा' असली पाहिजे. थोडासा भाव. थोडेसेच पूजन, भजन, वाचन, श्रवण एवढ्याने भागत नाही तर मग किती हवा तो भाव ? तर सर्वच्या सर्व अंत:करणच या भक्तिप्रेम भावाने अंतर्बाह्य व्यापून गेले पाहिजे आणि त्याचबरोबर आपले मन-बुद्धी या एका भगवंताच्याच विचारात आत्मीयतेने रस घेणारी झाली पाहिजे. असे होण्यासाठी त्या सावळ्या सुकुमार, आनंदचिद्‌घन भगवंताबद्दल परम आदर तसाच नि:स्वार्थी निष्काम 'भक्ति-प्रेम-अनुराग' असणे अत्यंत आवश्यक आहे. नाही तर काय होईल ? तर सुरवातीच्या चार दिवसानंतर उत्साह, ओढ, अधिरता, तळमळ, उत्कटता पार सर्वच मावळून जाईल. श्री ज्ञानोबाराय म्हणतात, **''वर्षाकाळी सरिता। जैसी चढो लागे पंडुसुता। तैसी निच नवी भजता। श्रद्धा दिसे।।''** नारद म्हणतात, **''प्रतिक्षणं वर्धमानम्''** भगवद्‌भक्ती प्रेमयुक्त झाल्यावाचून उत्कट, एकाग्र, अव्यभिचारी आणि चिरस्थायी होऊच शकत नाही आणि अशी भक्ती झाल्यावर ती अत्यंत उत्कट प्रेमभक्ती ही एक त्या भगवंताची/परमेश्वराची शक्तीरुपा होते. मग अशा भाग्यवान थोर महाभागवताच्या निकट कृपाकटाक्षात, छायेत, आश्रयाला जे जे येतील ते ते सुद्धा मोठेच भगवद्‌भक्त होतात.

भक्तीही दिव्य, भव्य आणि उदात्त आहे. कोणतेही लाभ हेतु अथवा लौकिक आशा अपेक्षा न ठेवता श्रीहरीची निष्काम, उत्कट, मधुरभक्ती सातत्याने चढत्या वाढत्या प्रमाणात करणे हेच निष्कलंक, निरागस, निरामय भक्तीचे द्योतक आहे.

ही अत्यंत विशुद्ध निष्काम भक्ती सदा सर्वदा अहैतुकी असते. जरासाही

लाभ हेतू न ठेवता अंत:करणापासूनच उसळणाऱ्या अकृत्रिम भक्तीप्रेमापोटीच ती प्रकटते, आकाराला येते आणि क्रियारुप होते.

अशा भक्ताला दर्शनावाचून अन्य काहीच कामना नसते. एकच कामना, **''तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडुरंग।''** नृसिंह भगवंताने जेव्हा प्रसन्न होऊन भक्त प्रल्हादास कोणताही वर मागण्यास सांगितले तेव्हा त्याने तत्काळ चोख उत्तर दिले, **''स्वामिन् कृतार्थोस्मि, वरं न याचे।।''** तो म्हणाला, ''हे प्रभो, आपल्या (इतरांना अलभ्य अशा) दर्शनानेच मी कृतार्थ व पूर्णतृप्त झालो आहे. आता आपल्या पुण्यस्मरणावाचून अन्य कोणतेही वरदान मला नको. आपले तुकोबाराय हेच सांगतात, **''हेचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।''**

अशा निरपेक्ष, निर्मम, निर्मळ भक्तीनेच तो मोठा जगदीश्वर परमात्मा प्रसन्न होऊ शकतो. अशा भक्तीप्रेम योगात एक केवळ त्या आनंदघन रामाचेच चिंतन उरते. अखंड एकमेव भगवत् चिंतनासाठी मन एकाग्र व्हावयास हवे आणि भगवत् स्वरूपावर मन एकाग्र करणे, त्या केवळ आनंद स्वरूपाचेच चिंतन करणे किती कठीण आहे याची कल्पना नाम-चिंतन करावयास सुरुवात केली म्हणजेच कळते की ते किती भरकटते ? कोठे कोठे जाते ? कशा कशाचे चिंतन करते ?

मग यावर उपाय काय ? मन स्थिर करण्यासाठी योग व ज्ञान या मार्गात अनेक उपाय कथन केले आहेत. पण ते सर्वच्या सर्व अति रुक्ष आहेत. भक्तीमार्गात एकच उपाय आहे व तो मोठा रम्य आणि अमोघ आहे. भगवंताची दृढ उपासना म्हणजे त्याचे नामस्मरण.

भक्तीमार्गात तत्त्वचर्चा व शास्त्राभ्यास यापेक्षा आचारावर व भावनाप्रवाहावर अधिकाधिक भर दिला आहे. उपासकाने, भक्ताने आपल्या सर्वच्या सर्व भाव भावना भगवत् केंद्रित, श्रीगुरुकेंद्रित व संबंधित करावयाच्या. मग सगळ्याच्या सगळा आचार श्रीहरी प्रित्यर्थ, त्या आनंदकंदासाठीच करावयाचा अशा सर्व भावभावना व सर्व आचार भगवत् केंद्रित होणे हीच भक्ती होय.

अशा प्रकारे चित्त, भाव, भावना आचार अतूटपणे वासुदेवाच्याच ठिकाणी जोडले जाणे, आसक्त होणे हाच श्रेष्ठ असा भक्तीयोग आहे. हा साध्य झाला की मग पूर्ण वैराग्य. भगवंताचे समग्रज्ञान, त्याचे दर्शन व अचल अशी वासुदेव स्वरूपता या सर्व गोष्टी सहजच प्राप्त होतात आणि भक्त हा भगवंताशी मूळच्या तन्मयतेला, तदाकारतेला, तद्रूपतेला, तल्लीनतेला प्राप्त होतो.

* * * *



# चिंतन २१५

आज मकर संक्रमण. संक्रमण म्हणजे स्थित्यंतर, स्थानांतर, अवस्थांतर. तीळ शर्करा, वाण-वसा हा अधिभौतिक भाग. जीवदशा ओलांडून शिवदशा अनुभवणे हे अवस्थांतर. त्यासाठी उपासना म्हणजे भगवंताची प्रेमलक्षणा परमप्रेमस्वरूप भक्ती. भक्तीरसायनाचा सुमधुर पाक भगवद्दर्शनाच्या उत्कट आचेवर, जीवरुप तिळावर हळूवारपणे चढवता चढवता अष्टसात्त्विक भावाचा छान काटा येतो ढळतो, येतो ढळतो आणि होता होता जीवाचे रुपांतर दाणेदार, शुभ्र, स्निग्ध, मधुर हलव्याच्या रुपाने शोभू लागतो.

भक्तीसाधक हा (किंवा ही) कोणीही असो ९९ टक्के संसारीच असतो. तो लोकांमध्येच राहतो, वावरतो आणि जीवन व्यवहार करीत असतो. त्यामुळे त्याच्या जीवनक्रमावर अगदी सहजच, स्वाभाविकपणे अनेक लौकिक बंधने पडत असतात. तथापि भगवद्प्राप्ती हेच ध्येय निश्चित करून निरलसपणे, निष्ठेने, एकविधभावाने काही काळ (कित्येक वर्षेसुद्धा) साधना केल्यानंतर मात्र त्याच्या स्थितीत असा फरक पडावयास हवा की इतरेजनांच्या आवडी निवडीपेक्षा आपली आवड वेगळ्या स्वरूपाची आहे. हळूहळू हा फरक लक्षात येतो. नंतर तर एक अशी स्थिती येते की लौकिकाचा संसर्गही सहन

होईनासा होतो. एक प्रकारचा भिन्न भिन्न मनोवृत्तींचा सरळ विरोध (Temperamental conflict) उद्‌भवतो. अशावेळी तळमळीच्या साधकाने काय करावे ? आपले भगवद्‌प्राप्तीचे ध्येय सोडून इतरेजनांप्रमाणेच वर्तावे काय ?

काही झाले तरी भगवद्‌प्राप्ती साधावयाचीच असा दृढ संकल्प करावा. मग कायावाचामने एकच एक हरिभक्ती करावी. आपले सर्व अवधान एकमात्र हरिभक्तीकडेच केंद्रित करावे. हाच स्वधर्म. भगवंताच्या भक्तीप्रेमाच्या तुलनेत लौकिक, व्यावहारिक गोष्टी या दुय्यमच. म्हणून एका एकांतिक परमप्रेमलक्षण भक्तीचीच कास धरावी. काही लौकिक सोडावं लागलं तरी चालेल. प्रसंगी निंदा, चेष्टा, कुचेष्टासुद्धा होईल पण ते सर्व मनोधैर्याने सहन केले पाहिजे. 'हे करू का ते करू ?' असा धर-सोडपणा सोडला पाहिजे. भगवान सांगतात, "**अर्जुना ! सर्वधर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज ।।**"

मात्र लौकिक टाकायचा तो काहीतरी लोक विलक्षण, सनसनाटी, प्रसिद्धी यासाठी नाही. समाज धारणेसाठी कर्तव्यविचार आचार आवश्यकच आहे. पण ते पाळीत असताना एक श्रीहरी हाच आचार, विचार, उच्चार व व्यवहार करावा. "**बोलावा विठ्ठल, पहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव ।।**"

* * * *




आपल्या हृदयातील भक्तीप्रेम भावनेचा परमोच्च भाव म्हणजेच एकांतभक्ती होय. हिलाच कोणी अद्वैतभक्ती अथवा पराभक्ती असेही म्हणतात. अशी भक्ती करता करता मग भक्ताला सर्व लौकिक सुखे, सुखकल्पना व जीवनव्यवहार नीरस वाटू लागतो. एका भगवंतावाचून दुसरे काहीही आवडेनासे होते. भक्त मग आपला सर्व जीव प्राण एकवटून

हरिप्राप्तीसाठी झटतो, तळमळतो. जरा एक क्षणभरसुद्धा श्रीहरीचे विस्मरण झाले तर तो कासावीस होतो, अगदी व्याकूळ होतो.

**"ना अरत्र ना परत्र"** म्हणजे लौकिक व्यवहाराविषयी उदासीनता आणि श्रीहरीप्राप्ती तर अद्याप झालेली नाही अशा 'ना हा काठ ना तो' अशा अवस्थेत दिवस कष्टाने कंठीत असताही जो हरिस्मरण एक क्षणभरही सोडीत नाही अशा भक्तास अचानकपणे आवडत्या देवाच्या स्वरूपात साक्षात्कार होतो.

ईश्वरस्वरूप भक्ताला तृप्त करून त्याच्यावर आनंदघनाचा अमृतवर्षाव करून अल्प काळात अंतर्धान पावते आणि नंतर त्या सच्चिदानंदकंद परमात्म्याचा प्रत्यय चराचर स्वरूपांत सृष्टीत अणूरेणूत अव्यक्तपणे येऊ लागतो. ज्ञानदृष्टीने ही ब्राह्मीस्थिती तर भक्तीयोगाच्या दृष्टीने हीच एकांतभक्ती, पराभक्ती, अद्वैतभक्ती होय. या अनुभवाच्या स्थितीत भक्त व देव यातील अंतरच लोपते. त्यांचे मूलभूत ऐक्य प्रकटते, विलसू लागते. ही परमोच्च भक्ती प्रत्येक भक्ताने आत्मसात करावी असा नारदांसारख्या भक्ताचार्यांचा प्रेमळ आग्रह आहे.

भक्तीचा अपार महिमा एवढ्याने संपत नाही. ही परमप्रेमस्वरूपा भक्ती कर्म, योग व ज्ञान या अध्यात्म मार्गापेक्षा अधिकतर आहे. आता ही अधिकतर कोणत्या बाबतीत आहे ? तर परमविरहावस्था आणि विरोधी भक्ती.

पराभक्तीच्या प्रकर्षाने प्रकट होणाऱ्या आणि अखिल जीवन व्यापणाऱ्या एका स्थिर प्रत्ययी महाभावाला, आनंदभावाला भक्तीशास्त्रकारांनी एक वेगळेच विशेषण जाणीवपूर्वक योजले आहे ते म्हणजे आसक्ती. सक्त म्हणजे जोडले जाणे, वज्रलेप होणे. या व्युत्पत्तीनुसार आसक्ती म्हणजे, "आपल्या आवडत्या विषयाबद्दल मनास वाटणारी अनिवार्य ओढ आणि या ओढीमुळे मनुष्य त्या विषयाशी विचारांनी व भावनांनी आसक्त होणे." प्रत्येक मनुष्यमात्राचा आवडता विषय वेगळा वेगळा असतो. अनन्य भक्ताचा एक

आनंदकंद भगवंतच आवडता विषय असतो. म्हणजे आसक्ती ही भगवंताशी जोडली गेल्यावर तिचेसुद्धा उन्नयन होते. तो श्रीहरीशी अतूटपणे जोडला जातो.

नाहीतरी एरवी साधारणपणे वाईट गोष्टींची सवय दर्शविण्यासाठी आसक्ती हा शब्द योजला जातो. जसा व्यसनासक्ती, द्यूतासक्ती, धनासक्ती, सत्तासक्ती इत्यादी. अशा माणसाला आपल्या आवडीच्या गोष्टींबद्दल आत्यंतिक ओढा असतो. तत्पूर्ततेसाठी तो वाटेल तेवढे कष्ट व साहस सोसतो. परंतु भगवंत हाच एकमात्र आवडीचा (आनंदाचा) विषय होतो व त्याचबरोबर परमभक्ती प्रेमाने ओथंबलेली अत्युत्कट भावधारा हृदयांत सतत उचंबळते, तेव्हा त्याच आसक्तीस मान्यप्रद ''भक्ती'' असे म्हणतात.

भगवंताच्या ठिकाणी चित्त आसक्त होणे ही गोष्ट भक्तीशास्त्राने अत्यंत प्रशंसनीय म्हणून वर्णीलेली आहे. ती भक्तीप्रेमाची एक अत्युच्च कोटी आहे. सामान्य आसक्त मनुष्याच्या ठिकाणी स्व-आवडीबद्दल, व्यसनाबद्दल जी एकनिष्ठता, क्रियाशीलता, तडफ, उत्साह इतकंच काय जशी निर्लज्जता असते अगदी तशीच एकाग्रता, प्रयत्नशीलता भगवत् प्राप्तीसाठी भक्ताच्या ठिकाणी असावी हेच आसक्ती या शब्दामागील प्रयोजन भक्तीशास्त्रकारांना अभिप्रेत आहे.

असे झाल्यावर भक्ताची काय अवस्था होते पहा, ''**आता मज एक विठ्ठलाचा छंद। लौकिक संबंध दूर ठेला।। विठ्ठलावाचून न बोले वचन। न देखे नयन दुजे काही।। मज रात्रंदिन विठ्ठलाचे ध्यान। वाटे जीवप्राण विठ्ठलचि।।**''

ब्राह्मीभाव प्राप्त झाल्यावर ज्या सर्वात्मभावात ज्ञानी, योगी पुरुष असतो त्याच शिखरोच्च अवस्थेत भक्त भक्तीयोगाने, प्रेमाने अवस्थित असतो. पण त्यानंतरसुद्धा, ''आई मला निर्विकल्प समाधीचा निश्चेष्टपणा नको तर मला तुझ्या सृष्टीत मुक्तपणे नाचू दे, गाऊ दे, भजन पूजन करू दे.'' असेच श्रीरामकृष्ण परमहंस विनवीत असत. अशा देवभक्त सापेक्ष द्वैतभावाला बाळगून तो भक्त काही विशिष्ट स्नेहसंबंध विविध नातेसंबंध स्विकारून त्या आनंदघनाशी आमरण अतूट नाते जोडतो.

* * * *

# चिंतन २१७

श्रीगुरुजवळ काय मागावे ? तर **''अवीट पदपद्माची अमला भक्ती दे मला.''** हे सद्गुरुराया, तुझ्या पदकमली रमून जाणारी, अवीट गोडी असलेली, अशी ती अमला भक्ती तेवढी मला द्या. अमला भक्ती = शुद्धभक्ती, परमश्रेष्ठ भक्ती असाच तिचा अर्थ आहे. अशी ही अमला भक्ती, भक्तीमध्ये सर्वश्रेष्ठ भक्ती आहे. ज्याचे मन, बुद्धी, काया आणि वाचा पूर्ण शुद्ध झालेली असते, जो आनंद, समाधान, प्रसन्नता यांचाच जणू प्रत्यक्ष मूर्तीमंत आकार असतो, स्वत: भगवंताचा, सद्गुरुंचा दास म्हणवून घेण्यातच ज्याला कृतार्थता वाटत असते असा भक्त जी भक्ती करतो तीच अमला भक्ती.

**''मुखी अमृताची वाणी। देह देवाचे कारणी। सर्वांग निर्मळ। चित्त जैसे गंगाजळ।।''** असा असून जो भक्तीच करतो ती अमला भक्ती. अशा भक्ताच्या ठायी मग विवेक, वैराग्य, ज्ञान अगदी सहजपणे प्रकट होतात. त्याशिवाय त्याच्या ठिकाणी रसमयता, आनंद हा त्या भक्ताचा उल्लेखनीय विशेष असतो. श्रद्धा, निखल भक्तीप्रेमभाव त्याच्या ठिकाणी ओसंडून वाहात असतो. तो सदा सर्वदा समर्पितच होऊन गेलेला असतो. ही सर्व लक्षणं तर अतिश्रेष्ठ भगवंताची सामान्य लक्षणं आहेत.

असा भक्तभागवत मग देवाजवळ, श्रीगुरुंजवळ अशा अमला भक्तीशिवाय दुसरं काय मागणार ? नामदेवासारखे श्रेष्ठ भक्तराज काय मागतात बघा ! **''देई भक्तीरस प्रेमा। देवा घाली आम्हा जन्मा।।''** असा लडिवाळ हट्ट भक्तच फक्त आपल्या देवाकडे, श्रीगुरुंकडे करू शकतात. भगवंताशी, श्रीगुरुमाऊलीशी अशा भक्ताचे एक अतूट, अत्यंत सुंदर, नितांत रमणीय, परमविशुद्ध आणि ऋजु असेच नाते जमून गेलेले असते. भक्तीप्रेम-प्रेमभक्ती या पलीकडे त्याला काही कळत नाही. तो काही पाहात नाही आणि

अनुभवीतसुद्धा नाही. याला ‘संयोगदीक्षा’ असं भक्तीशास्त्रकार म्हणतात. ‘‘**मिळोनि मिळतची असे। समुद्री गंगाजळ जैसे। मी होवोनी मज तैसे। सर्वस्वे भजती।।**’’ अशी त्या भक्ताची अवस्था होऊन गेलेली असते. भक्त भगवंताला सर्वार्थाने, सर्वांगाने समर्पित होतो आणि पहा भगवंत तर त्याचा स्वत:हून अंकित होउन राहतो. अशा त्या भगवंतालाही प्रिय असणाऱ्या अमला भक्तीची प्राप्ती होऊन तदद्वारा अमलानंद (म्हणजे परमपवित्र, परमश्रेष्ठ आनंद) आपल्याला प्राप्त व्हावा अशीच मागणी भक्त भगवंताजवळ, श्रीगुरुरायांजवळ करत असतो. समुद्रावर समुद्राची लाट आनंदाने, अत्यानंदाने क्रीडा करते. आकाशात वारा अगदी मुक्तपणे वाहात असतो तसेच भक्ताचे असणे म्हणजे भगवत् सत्तेतील आनंदक्रीडाच असते.

परमरसाने, अमृतरसाने रसना ओलावली, मनाची वृत्ती आनंदकंदाच्या चरणी राहिली की या विश्वातील सगळी मांगल्ये एकत्र येतात. आनंदजळाचीच वृष्टी होते. मग अशाने सगळीच्या सगळी अगदी सगळीच्या सगळी इंद्रिये ब्रह्मरुप होतात. त्यांना सर्व क्रियाकर्मामध्ये एका स्व-स्वरूपाची, आत्मस्वरूपाचीच प्रचिती येते. त्याच्याजवळ प्रत्यक्ष देवच नांदत असतो.

अशी अमला भक्ती लाभलेला भक्त सहजच स्वरूपज्ञानी असतोच. ज्ञान, कर्म, योग त्याच्या ठिकाणी सहजच नांदू लागतात. तो तत्त्वज्ञ, भक्त आणि जीवनमुक्तही असतो. थोडक्यात सांगायचे तर तो परमार्थाचे भूषणच होऊन गेलेला असतो. भगवंतानी स्वमुखाने अशा भक्ताचे वर्णन केले आहे. झाडाच्या फांद्या जरी लहानमोठ्या असल्या तरी त्या जशा एकाच झाडाच्या असतात, सूर्यकिरणे अनंत असली तरी ती जशी एकाच सूर्याची असतात तसेच प्राणीमात्र भिन्न भिन्न असले तरी त्यांच्या अंतर्यामी एकच एक परमात्मा भरून राहिलेला असतो.

भक्त हा स्वरूपज्ञानी असतोच. रामकृष्ण म्हणत, ‘‘मूल वृद्ध होण्याचे नाकारीत असले तर ती विकृतीच मानावी लागेल. बीजाचा अंकुर, अंकुराचे रोपटे, रोपट्याचा वृक्ष असाच विकास झाला पाहिजे. तसाच भक्त हृदयाचा पण विकास झाला पाहिजे आणि भक्तीने तो होतोच होतो.’’ सर्वत्र भरून

राहिलेले, विलसत असलेले चैतन्य हे आपल्या उपास्य दैवताचे, श्री पांडुरंगाचे खरे व्यापक स्वरूप आहे हे त्याला ओळखता येते. सर्व रुपांनी सर्वत्र एक आपला पांडुरंगच नटला आहे असा व्यापक अनुभव त्याचा असतो. **''जेथे तेथे देखे, तुझीच पाऊले। विश्व अवघे कोंदाटले।।''** असा व्यापक स्वरूपावर आरुढ झाल्यावर पुन्हा त्याचे नामाचा उच्चार, स्मरण, चिंतन नित्य व्हावे हेही मागणे भगवंताजवळ असतेच.

* * * *




तुकोबाराय भक्ताचार्य निर्व्याज, निरंजन, दिव्य अशी भक्ती कशी प्राप्त करायची ? तर भक्ती म्हणजे खरोखरी अगदी नवीन, वेगळे असे काहीच करावयाचे नाही. फक्त आपल्या अंत:करणाचे सर्वभाव आणि विचार हे एका भगवंताकडे वळवायचे. असं सर्वभावांनी, सर्वस्वी त्याच्याशी लगटून, त्याचेच होऊन राहणे हीच मंगलभक्ती.

अशी ही भक्ती परमप्रेमस्वरूप तर आहेच पण अमृतास्वरुपाचीसुद्धा आहे. भक्ताचार्यांनी भक्तीला उद्देशून 'रुप' आणि 'स्वरूप' असे म्हटले आहे. या दोन शब्दांत काही फरक आहे ? का एकच अर्थाचे ? सामान्य व्यवहारात हे दोन्ही शब्द एकार्थाचे वापरले जातात पण भक्ती हे शास्त्र आहे, 'रुप' शब्दाने वस्तूचा रंग, आकार, उंची, भारमान, काठिण्य आदी बाह्य गुणांचा बोध होतो तर त्या वस्तूच्या अंगभूत स्थायीभावाचे 'स्वरूप' या पदाने सुस्पष्ट होत असते. साधक भक्ती साधना करू लागला की त्याच्या आचार, विचार व उपासनेचे दर्शन इतरेजनांस/सर्वांस जाणवते. पण या परमप्रेमलक्षण भक्तीची सुधा (अमृत) जो प्रत्यक्ष भक्त चाखत असतो, त्यालाच त्याची अवीट गोडी कळते, इतरेजनांना नाही. पराभक्ती हे अमृत

आहे आणि ही भक्ती साध्य करून घेतलेला भक्त हा अमृतमयच नाही तर अमृतस्वरूप होतो.

अमृत म्हणजे काय ? जे मृत, नष्ट होत नाही ते अमृत. आत्मा/परमात्मा हाच एकमेव अमृत, अविनाशी आहे. म्हणून अशी भगवंताची परमप्रेमस्वरूपा भक्ती करणारा हा परमात्मस्वरूप, अमृतस्वरूप होतो.

अमृत म्हणजे मोक्ष, आपल्या समग्र भावभावना, विचार व क्रियाव्यवहार यांचे शुद्धीकरण, उदात्तीकरण आणि अध्यात्मीकरण करीत करीत साधकाला अपूर्णतेतूनच परीपूर्ण परमात्म्याकडे सुखरुपपणे घेऊन जाणारी प्रभावी शक्ती म्हणजे ही निष्काम, एकप्रवाही, परमप्रेमस्वरूप अमृताभक्ती होय.

खरं सांगायचं तर अमृत म्हणजे अनुभवगम्य आनंदरस आहे. मात्र हा केवळ भौतिक द्रव्यपदार्थ, रसायन नाही. तसेच सागर मंथनातून काढलेले (देव–दैत्यांनी) अमृतपण नाही. रस हा केवळ उपमेय भाव आहे. रस म्हणजे ब्रह्मरस तथा भगवंताच्या परमानंदाचे अनुभवगम्य रसायन. भगवंत वस्तुत: रसमय आहे. भक्ताला अमृतरसपानाचे भाग्य लाभते. मग तो सर्वथैव आनंदातच राहतो, आनंदच होतो आणि म्हणून द्रवीभूत ब्रह्मज्ञान, ब्रह्मरस म्हणजेच दुसरे तिसरे काही नसून परमप्रेमस्वरूप भक्तीच.

या पराभक्तीच्या अमृतपानाने मत्त होऊन हरिनाम गात भक्त विश्वसंचार करतात आणि आपला स्वानुभवच जगाला सांगतात. नुसता सांगतात एवढेच नाही तर **"सेवितो हा रस, वाटितो आणिका"** अशा अवघ्या विश्वाला पाजतात.

भगवंत इतका रसमय, **"रसो वै स:"** की त्याच्यामुळे साहित्यातील असो वा स्वयंपाकातील असो सर्व रसांना रसत्त्व लाभते. तो रसराज आहे मग त्याचे रुप, त्याचे नाम, त्याच्या लीला, त्याचे चरित्र केवढे रसाळ ? नाम तर अमृताहूनी गोड, त्या नामातून गळणारा रस अखंड सेवन करावयाचा, अमृतपान करायचं एवढंच भक्ताचं काम.

* * * *

# चिंतन २११

देवकार्य, धर्मकार्य वा समाजकार्य यात "मम" म्हणणाऱ्यांचा वाटा मोठा असतो, पण "मम"च्या जागी "इदं न मम" अशा भूमिकेवर येणं हे फार मोठं सौभाग्य, महत्‌भाग्य. श्रीगुरु ज्ञानोबारायांनी dichotomising चा अध्यात्मातील अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत अनुभवांतून, आपल्या साहित्यात जागोजागी मांडला आहे. म्हणजे एक आत्मारामच स्वत: आपल्याला आपल्यातच विभागून आपल्यालाच पाहतो, अनुभवतो, भक्तीप्रेमाचा आनंद अनुभवतो. आता मायेचा अंगिकार करून परमात्माच सगुण साकार भगवंत रुपाने नटतो, दर्शन देतो. असा हा आत्मा भगवंतच. मग रुप, रस, गंध, नाद, स्पर्श (पण अगदी अतिंद्रिय) अनुभवाने साधकासमोर आविष्कृत होतो. देह, मन व बुद्धिसुद्धा जड असल्याने त्यांना आत्मदर्शनाची शक्ती नाही तर हे दर्शन होण्यासाठी प्रज्ञा लागते. तो प्रज्ञेचा अधिकार, सन्मान आहे.

अशी प्रज्ञा परिणत होण्यासाठी साक्षात्कारी संतांच्याकडून नाममंत्राची, सबीजनामाची, बीजाक्षराच्या अनुग्रहाची मोठीच आवश्यकता असते. असा अनुग्रह लाभला, साधकाने, सत्‌शिष्याने सबीजनामाचा स्वीकार केला. एवढ्याने संपत नाही तर सुरुवात होते. श्रीसद्‌गुरुवचनावर अविचल श्रद्धा ठेवावी. नेमाने निष्ठापूर्वक पालन, संकल्प-विकल्प, एवढंच काय ध्यानविरहित होण्यासाठी सतत स्वत:चे स्वत:च आत्मनिरीक्षण व आत्मपरीक्षण करीत राहिले पाहिजे. श्रीमद्‌भगवद्‌गीता हेच सांगते, **"उद्धरेत् आत्मन् आत्मानं"** त्यासाठी कथनी, करनी व रहनी यात एकवाक्यता फार फार मोलाची. ह्या त्रयीने अवघे जीवन व्यापलं पाहिजे.

यासाठी साधकाने संसाराकडे विश्वस्त अगर साक्षी या नात्याने पहावे. म्हणजे मग संसाराचाच परमार्थ होतो. **"दु:खात सुख पहावे"**, संसार

दुःखमय आहे, तो भयग्रस्त आहे, तो मुळात खोटा नाशवंत आहे हे मनात दृढ धरून मग संसार करावा म्हणजे जो बाधक नाही तर साधकच होतो. लाभ-तोटा, सुख-दुःख, यश-अपयश याकडे साक्षित्वाने पाहावे व निष्ठेने परमार्थ आचरावा. त्यातलं वर्म आहे, ''मी देह नव्हे तर आनंदघन आत्माराम आहे'' याची सतत आठवण असावी. 'जीवभावाचा शिवभाव करावा' त्यासाठी काय करावे लागते ? सदा नामस्मरण करावे. 'देवा बरे झाले' असे अनुभवावे, खरे खरे सुख मिळते, खरी खरी शांती लाभते.

ज्ञान म्हणजे उपनिषदे, भगवद्गीता, ब्रह्मसूत्र, अकारादी प्रकरणादी ग्रंथ, भाष्य, टीका, वार्तिके, दर्शने, पुराणग्रंथ, संतसाहित्य यांचे शाब्दिक ज्ञान नव्हे. या शब्दज्ञानाला मग काहीच मूल्य नाही का ? तर आहे. या शाब्दिक ज्ञानाने काय होईल ? तर या शब्दज्ञानावर विश्वास असल्यास भगवंताच्या केवळ अस्तित्वाची खात्री होईल. फार फार तर साक्षात्काराच्या महाद्वारापर्यंत जाता येईल. पण आत्मसाक्षात्काराच्या गाभाऱ्यात प्रवेश होणार नाही. म्हणून शब्दज्ञान हे ज्ञानच नव्हे, का तर 'ज्ञान' ही एक परमविकसित अवस्था आहे. प्रत्यक्षानुभूती आहे. भगवंत बोलण्याची गोष्ट नाही तर तो प्रज्ञेने अनुभवायचा आहे.

जी गोष्ट ज्ञानाची तीच भक्तीची. भक्ती निष्काम असावी, एकनिष्ठ-अव्याभिचारी असावी. ही शुद्ध भक्तीची ठळक लक्षणे आहेत. अशा शुद्ध भक्तीची परिणती आत्मसाक्षात्कारात दर्शन, स्पर्शन, संभाषणादी अनुभूतीत होते. ही आवडीप्रमाणे सगुण किंवा निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांत होते. प्रेमळ भक्ताला सगुणाचे प्रेमाबरोबर निर्गुणाचे ज्ञान असतेच. पण सगुणाचे विलक्षण प्रेम असते. भक्ती स्वयंफलरूप आहे म्हणून ती ज्ञानस्वरूपही आहे.

मग आपण काय करावे ? तर नामसाधना, नामस्मरण, दीर्घकाल, निरंतर व सत्कारयुक्त करीत राहावे. याने काय साधते ? तर हळू हळू जीवभावाचा क्षय होतो व कमी होता होता त्याचाच मग शिवभाव होतो. देहबुद्धीची आत्मबुद्धी होते. या नामस्मरणांत निष्ठेबरोबर आर्जवाची मोठीच गरज आहे.

आई लेकराला जेवायला घालताना किती आर्जव करते, तसेच नाम घ्यावे. अशा नामस्मरणाने भगवंत खुणा दाखवत असतो. त्या खुणा आपण ओळखाव्यात. तुकोबारायांच्या शब्दांत सांगायचे तर **"ओळखा रे वस्तू उघडा ज्ञान दृष्टी"** आपण डोळे उघडे ठेवावेत, तो दाखवतो त्या खुणा ओळखाव्यात, या आनंदाच्या खुणा ओळखून नाम घेत राहावे.

* * * *




परमार्थात सद्गुरुंची किती आवश्यकता आहे ते उपनिषदांपासून ज्ञानेश्वरमहाराज तुकोबारायांपर्यंत साऱ्यांनी एकमुखाने सांगितले आहे. आत्मज्ञान हे अत्यंत गहन असल्यामुळे (राजविद्या राजगुह्यं) ते केवळ स्वत:च्या बुद्धिबळावर प्राप्त होणे शक्य नाही. त्यासाठी ज्याने ते करून घेतले आहे अशा आत्मज्ञानी श्रीगुरुची मोठी आवश्यकता आहे. कठोपनिषदांत असे अगदी सुस्पष्ट व ठामपणे म्हटले आहे. पारमार्थिक अज्ञानाची काळोखी रात्र श्रीगुरुकृपेच्या सूर्योदयावाचून उजळत नाही.

श्रीगुरु हा सत्‌शिष्याने, साधकाने, परीश्रमपूर्वक साधनबाग फुलवणारा उपायन वसंत आहे. एका मूळसिंचनाने लता वेली वृक्षाच्या शाखापल्लवांना टवटवी यावी त्याप्रमाणे एक गुरुभक्तीने, गुरुसेवेने (म्हणजे गुरुपदिष्टित साधनाने) साधक पूर्णकाम कृतकार्य होतो असा खुद्द श्रीगुरुज्ञानेश्वर माऊलीचा निर्वाळा आहे. गुरुकृपा ही आत्मानंदाच्या भांडारगृहाची एक किल्लीच आहे. प्लेटोसारख्या पाश्चात्य तत्त्वज्ञानेही, "गुरुमुखांतून लाभणारे जीवनज्ञान व पुस्तकातील निर्जीव ज्ञान यांची तुलनाच होऊ शकत नाही" असे म्हणून श्रीगुरुची आवश्यकता प्रतिपादिली आहे.

"सद्‌गुरु शिष्यासाठी काय करतात ?" दूरध्वनीच्या उपमेने हे छान

स्पष्ट करून सांगता येईल. आपल्याला दूरवर कोणाशी बोलावयाचे असेल तर आपण क्रमांक फिरवितो आणि एक्सचेंजच्याद्वारा तो क्रमांक जोडला जातो हेच कार्य श्रीसद्गुरु करतात. ते देव व भक्त यांची गाठ घालून देतात. विजेच्या पॉवर हाऊसची उपमा देऊन असे म्हणता येईल की, श्रीसद्गुरु म्हणजेच साक्षात्कारी संत हे विजेच्या मुख्य तारांप्रमाणे असून आपण सर्वजण त्या तारांच्या उपशाखांना लावलेल्या विजेच्या दिव्यांप्रमाणे आहोत. मुख्य तारांतून विद्युतप्रवाह आला की सर्व दिवे एकदम प्रकाशतात. त्याचप्रमाणे साक्षात्कारी संतांच्या अंत:करणांत भरून राहिलेला भगवंताच्या चित्प्रकाशाचा झोत त्यांच्याशी संबद्ध झालेल्या त्या साधकांच्या, शिष्यांच्या अंत:करणात चित्प्रकाश उत्पन्न करतो.

जेथे देव जागा झाला आहे त्याच्याशी संलग्नता साधली की देव अगदी हमखास सापडतोच. यासाठी नादाच्या निनादाचा (Resonance) दृष्टांतही चांगलाच लागू पडतो. सुरात लावलेल्या सतारीची एक तार छेडली तर दुसऱ्या बाकीच्या तारा आपोआपच वाजू लागतात. त्याप्रमाणे आत्मानंदाचा दिव्य झणत्कार ज्यांच्या ठिकाणी झणाणत असतो त्यांच्या संगतीने तो त्याच्या सत्शिष्यालाही प्राप्त होतो.

"**अंतरी गेलिया अमृत। अवघी काया लखलखीत।।**" या न्यायाने ज्याच्या अंतरी स्वरुपस्थिती बाणली असा साक्षात्कारी सहजच गुरुत्वाला पोहोचतो. ज्याच्याकडे पाहिले असता भगवंताकडे पाहिल्याचे समाधान मिळते तो संत, तो श्रीगुरु. हे श्रीगुरु आपल्या शिष्याला त्याच्या ठिकाणीच गुप्त रुपांत असलेल्या स्वात्मानंदाची स्वानुभवाच्या पातळीवर ओळख करून देतात.

श्रीगुरु स्वत: भगवत्नामाचा प्याला भरभरून आपण तर पितातच व आपल्या सत्शिष्यालाही पाजतात. "**सेवितो हा रस, वाटतो आणिका।**" असं तुकोबारायपण म्हणतात. नामस्मरणात भाव फार महत्त्वाचा. भगवंताला पण हा अंत:करणातील भाव फार फार प्रिय आणि हा भाग निर्माण होण्याचे

साधन म्हणजे नामस्मरण. "**सार, सार, सार नाम, विठोबा नाम तुझे सार**"

असे नाम श्रेष्ठ का ? तर हे नाम भगवंताच्या रुपाचा, आनंदाचा अनुभव आणून देते म्हणून. नाम हे तेल असून त्यात मनाची वात चांगली भिजवली असता भगवंताच्या रुपाची ज्योत श्रीगुरुकृपादृष्टी काडीने पेटते. नाम हे सगुण व निर्गुण या भगवंताच्या दोही स्वरुपाचे साक्षी असून स्वानंदाचा प्रकाश नामधारकाच्या जीवनात पसरविणारी दिव्य स्वयंभू ज्योतच आहे. अशा नामालाच श्रीगुरुंकडून मिळालेल्या नामाला दिव्य नाम अगर सबीजनाम असे म्हणतात. अशा सबीज नामाचे रुपांतर पारमार्थिक अनुभवाच्या वृक्षांत होते.

श्रीगुरु नामबीज देतात. पोते भरून खाण्यासाठी फुकट दाणे देत नाहीत. ते बीज नाम साधनेच्या शेतांत पेरून, राबून, मशागत निगराणी करून स्वतःच पिकवावे लागते. असे दिव्य नाम पूर्वजन्मीचे सुकृत असल्याशिवाय थोडेच मिळते ?

* * * *



## चिंतन ३०१

जवळ जवळ ६७ वर्षे झाली त्या प्रसंगास, उपनयनाच्या दिवशी, चित्तवृत्तीला आन्दोलित करणारा, हृदयरुपी तंतूवाद्याला झंकारीत करणारा, अमृतमधुर एक दिव्य स्वर कानाशी-कर्णकुहरात गुंजारत होता. त्या अद्भूत अशा गोडस्वराने-शब्दांनी सम्मोहित होऊन गेलो !!! इतका की बाकी कशाचेच भान राहिले नाही. मृग जसा वीणानाद कानी पडल्यावर त्या नादाने मुग्ध होऊन त्या नादाकडे ओढला जातो तसा त्या नादाने मी लुब्ध झालो.

तो नाद, ते शब्द होते **वै.प.पू. गुरुवर्य सोनूमामांचे**. त्यांना पाहिलं, ऐकलं आणि आनंदमग्न झालो. असं वाटलं की स्वतः कैवल्याचे पुतळे

असणाऱ्या श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरुमामांच्या स्वरुपात दर्शन देऊन अनुग्रहीत करून धन्य-धन्य करून सोडले.

इतक्या बालवयात, प्रथमच आणि अनपेक्षित, अचानक, पूज्यमामांचे नाव, रुप, स्वरुप याचे अद्भूत-दिव्य दर्शन झाले. श्रीगुरुंच्या मुखातून बाहेर पडलेल्या नादब्रह्माच्या भावपूर्ण प्रभावाने प्रभावित झालो, भारला गेलो. शब्द होते, "**आनंदा, आनंद स्वरुप आहेस, रामकृष्णहरि-रामकृष्णहरि-रामकृष्णहरि**". या श्रीगुरुमुखीच्या महावाक्याने आनंदरसात डुलक्या घेत राहिलो आणि अशा प्रकारे विनाकष्ट-प्रयास-सायास-आयास एका अनामिक भाव-भक्ती-प्रेम रसात सचैल न्हाऊन निघालो. या महात्म्याबरोबर मनोहर-दिव्य असा गुरु-शिष्य संबंध निर्माण झाला. कंठ गद्गदून गेला आणि डोळे आनंदाश्रूंनी पाझरू लागले.

ब्रह्मविभूषित अशा श्रीगुरुदर्शनाने अंत:करण विरघळून गेले. ते द्रवीभूत झाले आणि श्रद्धा-भक्ती-भाव-प्रेमाची एक अखंड धारच वाहू लागली भगवंताकडे.

अविस्मरणीय असा तो दिवस-प्रसंग. ज्ञानोद्भासित भक्तीने आनंदित, शुचिता-सात्त्विकता यांनी प्रकाशित, कर्मनिरत "**कर्पूरगौरं करुणावतारं**" असं श्रीगुरुस्वरुप मामांच्या रुपाने प्रकट झालं. त्यांच्या प्रथमदर्शनाने असा अनुभव आला की ढगांशिवाय, घनगर्जनेशिवाय अमृताभिषेकाचा वर्षाव. हृदय म्हणू लागलं की, हेच आपलं श्रद्धास्थान. या विभूतिला एकटक नजरेने न्याहाळलं-मायलेकरांची दृष्टादृष्ट झाली. परमश्रद्धा-परिपूर्ण अंत:करणांने त्या चरणकमलावर माथा टेकला आणि आपलं जीवनपुष्प सर्वस्वाने त्या गुरुपदाम्बुजास वाहिले. कारण अनुभूतिचा तो क्षण, नाही, क्षण नाही असंप्रज्ञात-समाधी-रम्य समाधी.

या आनंद सागरात, नाही दु:ख, चिंता, द्वेष, राग, इच्छा ना काहीच, सगळ्या भावांत, पदार्थांत, प्रमाणांत, पात्रात हा आनंद समान. हा आनंदभावच शांतरस आहे. भरतमहामुनिंनी यालाच शांतरस म्हटले आहे. "**शान्ता महान्तो निवसन्ति संतो; वसन्तवत् लोकहितं चरन्तं**" अनेक

जीवांचं परमकल्याण-परमहित हाच त्यांचा आचारधर्म. त्याचेच आचरण करीत अतिशांत महापुरुष ऋतुराज वसंतासारखे विचरण करतात.

मी मोठा सौभाग्यशाली आहे, का म्हणाल तर भक्ती-ज्ञानाचा-भक्तीप्रेमाचा रसप्रवाह ज्यांच्या गळ्यातून, नुसता गळ्यातूनच नाही तर हृदयमंदिरी नित्य झुळझुळत होता अशा **वैकुंठअधीश्वर** श्रीगुरुस्वरुप मामांच्या मुखातून ३० वर्षापेक्षा जास्त ज्ञानेश्वरी-सुधा-रससुधा या कानांनी ऐकली, जिव्हेने चाखली, डोळ्यांनी पाहिली, त्वचेने-मृदूमुलायम स्पर्शांनी रोमांचितता अनुभवली.

या वाक्‌गंगेचे श्रवण झाले, चिंतन-मनन आजपण चालूच आहे. निदिध्यास आहे.

शिष्याचे अंतर्यामी अंतरंग श्रीगुरुच जाणतात. आपल्या कृपेचे अनंत भांडार मोकळं करतात आणि घन:श्याम श्रीकृष्णाबरोबर आपल्या शिष्याचे दिव्यमीलन करून त्याला कृतार्थ करतात. ‘‘**प्रयच्छति गुरु प्रीतो, वैकुठं योगिदुर्लभम्**’’.

गुरुवर्यांचा मूलमंत्र ‘‘**भक्तीप्रेम आणि भक्तीसेवा**’’ ते म्हणावयाचे, ‘‘भक्तीप्रेम ही एक दिव्य अनुभूती आहे. भक्तीप्रेम ही करण्याची गोष्ट नसून ते ‘‘**होते**’’ - होत राहते आणि समर्पण हा भक्तीप्रेमाचा स्वभाव आहे. ती भक्तीप्रेमाची अट नाही.’’

* * * *

**प. पू. गुरुवर्य अण्णांचे वैशिष्ट्य 'गुरुभक्ती', सत्संग, नामसाधना व शेवटी आत्मतृप्ती !**

**प. पू. अण्णा ''आत्मतृप्त'' झाले, ''नित्यतृप्त'' झाले. आपले काय?**



**ऐसी कळवळ्याची जाती।**
**करी लाभाविण प्रीती।।**
– तुकाराम महाराज

**या चिंतनातून आपल्यासारख्या साधकांना बोध केला आहे.**

**पाऊस कोसळत आहे. आपली घागर आपण पालथी अगर आडवी करुन न ठेवता नीट उपडी केली पाहिजे.**



समाधीपूर्वी, लोकोध्दारासाठी ज्ञानेश्वर म. आणि तीन भावंडांनी जगच्चालकाला केलेली विनंती फारच थोड्यांना ज्ञात आहे. पसायदानातील प्रार्थना सर्वज्ञात आहे. या चारही विश्ववंद्य बंधुंचा विश्वेश्वर श्रीहरीशी झालेला संवाद, अपूर्व आणि संस्मरणीय आहे.

**जगाच्या कल्याणाकरिता आलेल्या या चारी भावंडांनी समाधी सोहळ्यासाठी आलेल्या परब्रह्म परमात्मा श्री पांडुरंगाजवळ काय मागणे मागितले ?**

**आळंदीला कोटीतीर्थ आणून त्यात स्नान करणाऱ्याला वैकुंठपदाची प्राप्ती व्हावी** अशी विनवणी यांनी त्रैलोक्य स्वामी केशवास केली. विश्वोध्दारासाठी मागितलेले हे मागणे ऐकून भगवंतालापण मोठी धन्यताच वाटली. **दीनोध्दारासाठी तळमळणाऱ्या, स्वत:साठी काही एक न मागता आनंदाचे आवार जगासाठी घालण्यासाठी सर्वस्व वेचणाऱ्या या माहात्म्यांची** ही अलौकिक इच्छा पांडुरंगाने पूर्ण न केली तरच नवल नां ? **आळंदीत येऊन जो कोणी भगवंताचे प्रेमभावभक्तीने नाम संकीर्तन करील, त्याला हे सिध्द क्षेत्र आनंदनिधान-स्वानंद साम्राज्याचा चक्रवर्ती करील. अनंतकोटी ब्रह्मांड नायकाने अलंकापुरीला प्रदान केलेला हा अमोघ प्रेमार्शीवाद.**